# श्री भीमोपदेश

## प्रस्तावना

### — तें अनंत सद्गुरुपद —

जें अनुभविलें नाहीं कवणीं । जें देखिलें चि नाहीं नयनीं ।
जें ऐकिलें चि नाहीं श्रवणीं । वाचेनें बोलवेना जें ॥ ८–५–२१

अशा अनिर्वचनीय अनंतसद्गुरुपदाची जोड ज्यांनीं करून घेतली ते श्रीसमर्थशिष्य अनंत मौनी, त्यांचे शिष्य मेरुस्वामी यांची योग्यता फार मोठी असली पाहिजे. श्रीरामसोहळा ग्रन्थाचे ११ रुद्र व प्रत्येक रुद्राचे ११ उल्हास, मिळून १२१ उल्हास-पृष्ठसंख्या ६०३-व श्रीभीमोपदेश ग्रन्थाचे १२ सूर्य आणि प्रत्येक सूर्याच्या १२ कळा, मिळून १४४ कळा-पृ. सं. ४१२-मिळून पृष्ठसंख्या १०१५ चे दोन अप्रतिम अध्यात्मपर ग्रन्थ ज्यांच्या लेखणींतून उतरले ते थोर अधिकारी पुरुष असले पाहिजेत, हें उघड आहे. प्रज्ञावंत, विचारवंत, वेदवेदांतशास्त्रपारंगत पुरुष असून हि मस्तकीं श्रीसद्गुरूचा वरद हस्त नसेल तर हें ज्ञान स्फुरणें आणि मुखावाटें बाहेर पडणें नितांत अशक्य होय. सर्व प्रख्यात गुरुभक्तांप्रमाणें मेरुस्वामींची गुरुभक्ति अनुपम होती. पण हें आपलें केवढें दुर्दैव म्हणावयाचें कीं, असल्या महान् साक्षात्कारी पुरुषाच्या जीवनक्रमाविषयीं कांहीं विशेष माहिती उपलब्ध नसावी! जीव कासाविस झाला पाहिजे, तंजावर प्रांतात आणखी शोध केला पाहिजे.

मेरुस्वामींचे हे असे दोन ग्रन्थ आहेत, तशीं च त्यांचीं आणखी दहा वीस लहानमोठीं प्रकरणें व पदपदांतरें आहेत. त्यांपैकीं कांहीं श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत आहेत, पण बहुतेक तंजावरच्या प्रख्यात सरस्वतीमहालांत आहेत. हे दोन ग्रन्थ हि त्या महालांत असलेल्या प्रतींवरून च आमच्या दोघा मित्रांनीं वीस बावीस वर्षांमागें उतरून आणले होते. पैकीं श्रीरामसोहळा शके १८४२ स प्रकट झाला आणि आज हा श्री भीमोपदेश सर्वांच्या कानीं पडत आहे. दुसर प्रकरणें आणखी किती वर्षांनीं उजेडांत येणार असतील तें श्रीस्वामींना माहीत. महालांतील हि हे दोन्ही ग्रन्थ अस्सल नसून नकललेले च होते. त्यांत चुका असणार च. त्यांवरून उतरून घेतांना आमच्या मित्रांनीं त्या चुकांत थोडी तरी भर घातली च असली पाहिजे आणि कांहीं संशोधकाच्या साहाय्यानें आणि कांहीं स्वतंत्रपणें छापखान्यानें हि चुका करण्याचा आपला भार उचलला असला पाहिजे. छापलेला ग्रन्थ

## सूर्य दशम



## सूर्य एकादश



## सूर्य द्वादश



टीप— कर्त्यांची नावें संपादकानें योजिलेलीं आहेत.

॥ श्रीराम ॥

# श्री भीमोपदेश

## प्रस्तावना

### — तें अनंत सद्गुरुपद —

जें अनुभविलें नाहीं कवणीं । जें देखिलें चि नाहीं नयनीं ।
जें ऐकिलें चि नाहीं श्रवणीं । वाचेनें बोलवेना जें ॥ ८–७–२१

अशा अनिर्वचनीय अनंतसद्गुरुपदाची जोड ज्यांनीं करून घेतली ते श्रीसमर्थशिष्य अनंत मौनी, त्यांचे शिष्य मेरुस्वामी यांची योग्यता फार मोठी असली पाहिजे. श्रीरामसोहळा ग्रन्थाचे ११ रुद्र व प्रत्येक रुद्रांचे ११ उल्लास, मिळून १२१ उल्लास-पृष्ठसंख्या ६०३-व श्रीभीमोपदेश ग्रन्थाचे १२ सूर्य आणि प्रत्येक सूर्याच्या १२ कला, मिळून १४४ कला-पृ. सं. ४१२-मिळून पृष्ठसंख्या १०१५ चे दोन अप्रतिम अध्यात्मपर ग्रन्थ ज्यांच्या लेखणींतून उतरले ते थोर अधिकारी पुरुष असले पाहिजेत, हें उघड आहे. प्रज्ञावंत, विचारवंत, वेदवेदांतशास्त्रपारंगत पुरुष असून हि मस्तकीं श्रीसद्गुरूचा वरद हस्त नसेल तर हें ज्ञान स्फुरणें आणि मुखावाटें बाहेर पडणें नितांत अशक्य होय. सर्व प्रख्यात गुरुभक्तांप्रमाणें मेरुस्वामींची गुरुभक्ति अनुपम होती. पण हें आपलें केवढें दुर्दैव म्हणावयाचें कीं, असल्या महान् साक्षात्कारी पुरुषाच्या जीवनक्रमाविषयीं कांहीं विशेष माहिती उपलब्ध नसावी! शोध कासाविस झाला पाहिजे, तंजावर प्रांतात आणखी शोध केला पाहिजे.

मेरुस्वामींचे हे जसे दोन ग्रन्थ आहेत, तशीं च त्यांचीं आणखी दहा वीस लहानमोठीं प्रकरणें व पदपदांतरें आहेत. त्यांपैकीं कांहीं श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत आहेत, पण बहुतेक तंजावरच्या प्रख्यात सरस्वतीमहालांत आहेत. हे दोन ग्रन्थ हि त्या महालांत असलेल्या प्रतींवरून च आमच्या दोघा मित्रांनीं वीस बावीस वर्षांमागें उतरून आणले होते. पैकीं श्रीरामसोहळा शके १८४२ त प्रकट झाला आणि आज हा श्री भीमोपदेश सर्वांच्या कानीं पडत आहे. इतर प्रकरणें आणखी किती वर्षांनीं उजेडांत येणार असतील तें श्रीस्वामींना माहीत. महालांतील हि हे दोन्ही ग्रन्थ अस्सल नसून नकललेले च होते. त्यांत चुका असणार च. त्यांवरून उतरून घेतांना आमच्या मित्रांनीं त्या चुकांत थोडी तरी भर घातली च असली पाहिजे आणि कांहीं संपादकाच्या साहाय्यानें आणि कांहीं स्वतंत्रपणें शास्त्रज्ञानें हि चुका करण्याचा आपला भार उचलला असला पाहिजे. छापलेला ग्रन्थ

वाचीत असतां हें आमच्या निदर्शनास आलेलें आहे. कांहीं चुकचा दृष्टचा राहिल्या असतील, त्या वाचक हि दुरुस्त करूं शकतील. शुद्ध प्रकाशन करणें हा आमचा बाणा, हे दोन ग्रन्थ प्रकाशित करतांना आम्हांस निरुपायानें सोडावा लागला आहे. आहेत तशा च प्रती छापण्यास आम्ही परवानगी दिली, हेतु हा कीं, असले महत्त्वाचे ग्रन्थ एकवार महाराष्ट्रापुढें येऊं द्यावेत म्हणजे महाराष्ट्रास कळेल व पुढें मागें कोणी तरी मूळ ग्रन्थांचें संशोधन करून त्यांचें शुद्ध प्रकाशन करील.

बाकी, हल्लींच्या महाराष्ट्रास या ग्रन्थांकडे पाहण्यास सवड होईल किंवा नाहीं, याविषयीं आम्हांस जबर शंका आहे. लोकमान्य गेले आणि त्यांच्या वेळची महाराष्ट्राची सर्वसंग्राहक बुद्धि तेव्हांपासून मंदावत चालली. हल्लींच्या निदान नांवाजलेल्या साहित्यिकांची दृष्टि केवळ पुरोगामी वाङ्मयावर जडलेली दिसते. तथापि आम्हांस आशा आहे कीं, पुनरपि लवकर च एक वेळ अशी येईल कीं, या च साहित्यिकांना मागें वळून पाहण्याची बुद्धि होईल. महाराष्ट्राच्या स्वभावांत एकदेशीपणा पूर्वीं केव्हां हि नव्हता, तो जो आज त्यांत आलेला दिसत आहे तो परप्रांतांतून आलेला आगंतुक आहे. आपल्या मूळ स्वभावावर महाराष्ट्रास यावें च लागेल, हें आम्हांस ठाऊक आहे. तोंवर, निःशब्दाचें शब्दांनीं प्रतिपादन करणाऱ्या भीमोपदेशासारख्या ग्रन्थांनीं तिष्ठत राहिलें पाहिजे. दरम्यान, ज्या कांहीं थोड्या साध्या भोळ्या साहित्यिकांनीं व धर्मनिष्ठांनीं आपल्या पूर्वजांचें आदरपूर्वक स्मरण कायम ठेवलें आहे, त्यांनीं मेरुस्वामींचे ग्रन्थ एकवार नजरेखालून घालावे, अशी आमची विनंति आहे.

भीमोपदेशांतील कांहीं कांहीं भाग तर अति हृदयंगम आहे. ग्रन्थाचा मुख्य विषय कठीण तर खरा च, पण सावकाश वाचीत गेल्यास त्याचा उमज पडत जातो. श्रीसमर्थग्रन्थांतील भाषेची आणि विचारांची प्रभा, दिनकराच्या स्वानुभवदिनकराप्रमाणें या ग्रन्थावर पडणें साहजिक होतें च तशी ती पडल्याचें वाचकास सर्वत्र आढळेल. या ग्रन्थांत ज्ञानेश्वरीप्रमाणें दृष्टान्तांची रेलचेल झालेली आहे. सर्व ग्रन्थ गुरुभक्तीनें थबथबलेला आहे, त्यामुळें तो वाचकाचें चित्त सहज आकर्षून घेतो. ठिकठिकाणीं प्रभु रामचंद्र मारुतीच्या उपकाराचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत आहेत, तर उलट मारुतिराय भक्तिप्रेमानें श्रीरामरायाच्या चरणीं लागत आहेत ! हे प्रसंग एकांतांत वाचीत असतां वाचक हि गहिंवरणें साहजिक आहे. संतस्तवनाची एक हि संधी मेरुस्वामींनीं दवडली नाहीं. या सर्व कारणांनीं, ग्रन्थाचा प्रतिपाद्य विषय गहन असून हि ग्रन्थ संपेतों वाचकाच्या हातचा तो सुटत नाहीं.

वाचकांनीं स्वतः अनुभव घेऊन पाहावा, अशी विनंति आहे.

| | | |
|---|---|---|
| पुणें<br>१८६० वैशाख शु. ३ | } | चिटणीस<br>सत्कार्योत्तेजक सभा–पुणें |

॥ श्रीरामदासार्पणमस्तु ॥

# श्रीसद्गुरुस्तवन

रे सज्जना ऐके तूं माझिया मना ।
दत्त मत्स्येंद्र गोरक्ष जाणा ।
व्यास वसिष्ठ जयमुनिराणा ।
गुरुकृपें पावले निरंजना ॥ ध्रु०

ब्रह्मादिकां दुर्लभ रामपाये ।
तेथें मानवी बापुडें केवीं जये ।
मतामता विरोध वाद पाहे ।
शास्त्रें भांडती न पडे ठाईं सोये ॥ १

गुरुकृपावरदवर ज्यासी ।
रामपदीं मिळणी सीघ्र त्यासी ।
सिद्धीसामर्थ्य कोण पुसे यासी ।
गुरुकृपें अगम्य पुण्यरासी ॥ २

वरें शोधिलें आगमनिगमाला ।
जीवा शिवा संगम उगमाला ।
माया अविद्या गल्बला निर्गमला ।
विनवी कल्याण सज्जनसुगमाला ॥ ३

श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग बत्तिसावा

मेरुस्वामिकृत

# श्री भीमोपदेश

श्री

## सूर्य १ कळा १

श्रीगणेशायनमः । श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीरामसमर्थब्रह्मभीम । अनंतबोध हृदयक्रम । वेदांतसार सुगम । सद्गुरुकृपेनें ॥ १ ॥ प्रसन्न कृपाहस्तें उदित । अभयवरप्रद शाश्वत । मूळपुरुष सदोदित । मंगळमूर्ती ॥ २ ॥ सर्वाधिष्टान तूं हृदयस्थ । स्वप्रकाश सूर्य समस्त । भवतमासी अस्तवीत । हृदयाकाशीं ॥ ३ ॥ अनंतबोध सूर्य रश्मी । निजांगप्रभेची लक्ष्मी । विळासली अंतर्यामीं । निवाले निजनयन ॥ ४ ॥ अनुभवमुकुट मेरु ऐसा । खचित ज्ञानरत्नें प्रकाशा । उपमा नाहीं निरावकाशा । घनवटितसे ॥ ५ ॥ स्वानंद मंदर पाठार । दशाभाळ शोभे सुंदर । रम्य अनुराग सिंदुर । चर्चिला असे तेथें ॥ ६ ॥ वरी अपरोक्ष आधिर्येसीं । प्रथमेची चंद्रकळा जैसी । मिरवला केशरटिळा उपमेसी । गौण आणिलें ॥ ७ ॥ बोधसुवर्णाद्रीची शिखरें । तेवि गंडस्थळें मनोहरें । धातुरस द्रवती निर्झरें । तेवि पाझरे मकरंद ॥८॥ कदंबवृक्षगर्भसार । प्रवाहे मद श्रवे अपार । तेथें कविराज भ्रमर । झेपावले प्राशीसी ॥ ९ ॥ सेविती मद स्वानंदें । झुंकारती कविता उन्मदें । प्रमाद टाकुनी स्वबोध-पदें । विस्तारती प्रबंध ॥ १० ॥ प्रळयार्क तेजाचें निजतेज । गजवदनाक्ष

अब्ज । शुंडा उभारिली कृतांत भुज । विघ्नमंडळावरी ॥ ११ ॥ निज-सामर्थ्याचीं आयुधें । शोभतीं अन्वयहस्तें प्रसिद्ध । कुबुधी भ्रम द्वंदविरुद्ध । निरसूनी टाकिती ॥ १२ ॥ आनंदचंद्र गर्भद्विज । प्रकाशली चंद्रिका सतेज । चमत्कार शुंडाग्र अंबुज । कवळी सत्ता मोदक ॥ १३ ॥ विशाळ प्राप्तीचें निजउदर । सर्वांग शोभा मनोहर । कासिला विज्ञानपीतांबर । मध्यस्त कटिप्रदेशीं ॥ १४ ॥ विशेष प्राप्तीचा प्रकाशकर । श्रवणें केला क्षीरोदक सुंदर । विद्या प्रसन्नता सागर । हेलावत हृदईं ॥ १५ ॥ आदिपुरुष वाणपती । विज्ञानप्रद गभस्ती । प्रकाशित मती जगती । महा प्रस्थान ॥ १६ ॥ रिर्धीसिर्धीसह शक्ती । नवरस साहित्य संपती । कळा चातुर्य मनोहर मूर्ती । बैसली हृदईं ॥ १७ ॥ हृदईंचे निज अभिष्ट । प्रसन्नतेचा समय उत्कट । मूर्ति साक्षात्कार अवचट । देखिली डोळां ॥ १८ ॥ फळल्या मनोहर सिर्धी । बोळल्या मोक्षादि उपलब्धी । निर्विकल्प सहज समाधी । वळें चि वरूं आल्या ॥ १९ ॥ च्यारी पुरुषार्थ कर जोडुनी । पुढें टाकले सेवानुसंधानीं । भक्ती नवविधा ततक्षणीं । वस्तीसी आल्या गृहा ॥ २० ॥ आत्मप्राप्ति स्वयंसुख । सर्वदा जाले सन्मुख । सुप्रसन्नतेचें गजमुख । देखत क्षणीं ॥ २१ ॥ मनोरथाचे पुरवी लळे । कृपा मंगळमूर्ति अवलीळे । बोळली सरस्वती सरळे । येती परमार्थ वाचेसी ॥ २२ ॥ ते त्रिभुवनसत्ता सरस्वती । कवि आदि विभु अंतरस्थिती । चैतन्य चमत्कार व्यक्ती । देखिली डोळां ॥ २३ ॥ जे प्रसन्नतेची प्रसन्नता । विश्वसंभव सत्तेची सत्ता । आदि जननी कवेश्वर माता । ज्ञप्तिक्षेत्र निवासिनी ॥ २४ ॥ विज्ञानचंद्राची प्रभा । नेमली चिदंबर शोभा । सत्त्व स्फटिकाची स्वयंभा । दिव्य चिदाकृती ॥ २५ ॥ जिच्या सौंदर्याची महिमा । अतर्क्य जाहली निगमा । लावण्यप्रभेनें चिद्योमा । प्रकाशिलें ॥ २६ ॥ जे बोधविधी तापची वल्लभा । जे स्वयंभ दशेचा उभारी गाभा । जे प्रकटीत तोष उभा । उभयी परमार्थ ॥ २७ ॥ जे भव्र उदय पट्टण पताका । जे आत्मसुखप्रद आमिका । जे परा अभ्यंतर गायका । ग्रंथोपग्रंथें ॥ २८ ॥ विज्ञानपत्र निज वीणा । चमत्कार

हस्तें निजखुणा । वीणावादनप्रवीणा । नमिली ते श्रीशारदा ॥ २९ ॥
आतां सद्गुरूसी अभिवंदन । आठवे चि आनंदसंवर्धन । ध्यानासी
आणितां चि ध्यान । त्रिपुटी सरली ॥ ३० ॥ सोहं भावना सविस्तर ।
प्रचीतीसी आला निजविवर । होय सद्गुरु आठव साक्षात्कार । स्वरूपाचा
॥ ३१ ॥ अनंत हृदयस्थ प्रार्थना । वैसली श्रुतिपंक्तीसी वेधना ।
अनिर्वाच्य सुखसंभावना । निज आस्तिक्यें ॥ ३२ ॥ हृदयस्थेर्षण कवण ।
विचारिता आहे हृदयज्ञान । परेचें अभ्यंतर संपूर्ण । प्रणवासी येतसे
॥ ३३ ॥ प्रणव मूळ सकळाचें । अर्धमात्रा स्थान प्रज्ञेचें । चहूं वाचे
अंतरींचे । प्रमेय येतसे ॥ ३४ ॥ आपुलें स्वहित आपण । करावयासी
मुळींचें अनुसंधान । प्रवाहीं पडिलें ज्ञान । स्थूळपर्यंत ॥ ३५ ॥ स्वहितीं
असतां सकळ । महामाया सत्ता अकळ । भ्रमासी आणुनी प्रांजळ ।
करीतसे ॥ ३६ ॥ ते अनादि दुस्तर माया । सद्गुरूनें पावविली लया ।
अभिवंदीन त्या पदद्वया । निरंतर भावें ॥ ३७ ॥ स्वहितार्थी स्फुरली
स्फूर्ति । अनंत युक्ती परमार्थी । प्रचीतीसी आणूनि सर्वार्थी । निवळ केलें
॥ ३८ ॥ वाचेनें वाचेचें स्तवन । स्वाभाविक होतसे संपूर्ण । आपुली
प्रसन्नता आपण । पावन होतसे ॥ ३९ ॥ प्रमेयें प्रमेय उपलब्धिजे । अर्थे
अर्था अनुभविजे । आत्मज्ञानासी प्रबोधिजे । आत्मज्ञानें ॥ ४० ॥ जो
वाचेची निज वाचा । जो प्रज्ञेसी प्रकाशी साचा । तो आत्माराम निजाचा ।
सर्वत्र वसे ॥ ४१ ॥ आत्मारामीं बोध विशुद्ध । ब्रह्मस्वरूपें स्वतः सिद्ध ।
रामब्रह्मानंद निर्वेध । साक्षात्कारी ॥ ४२ ॥ त्या अभिरामीं प्रगट सत्ता ।
ते चि विश्वात्मक शक्ती तत्वता । विश्वसंभव आदिमाता । सीताशक्ती
महा सती ॥ ४३ ॥ सीताराम दंपत्यमुळीं । सिद्धसंभव संतकुळीं ।
अभिवंदुनी सकळीं । अभिष्ट पाविजे ॥ ४४ ॥ महा विष्णु रमा
स्वरूपें । कीं सदाशिव शांभवी स्वरूपें । पद्मसंभव ब्रह्माणी साक्षेपें ।
विश्व व्यक्तीसी ये ॥ ४५ ॥ इंद्र इंद्राणी विभवें । चंद्र चंद्रपत्नी गौरवें ।
ऋषी ऋषिपत्न्या लाघवें । शोभती अभिवृद्धी ॥ ४६ ॥ प्रकृतिपुरुष
सीताराम । वंदिला विश्वात्मा पूर्णकाम । भीमोपदेश परम । क्रमें चि

आरंभला ॥ ४७ ॥ सुप्रसन्न गुरु राममूर्ती । सप्रचीत शिष्य परमार्थी । स्वराज्य सुख सर्वार्थी । प्रसन्न केला ॥ ४८ ॥ निगम तरुवराची रसाळें । लागलीं अखंडैक रस फळें । स्वानंद सुरस गव्हाळें । गोडी घोटविली ॥ ४९ ॥ मिठीसी पडली अद्वैत परा । नव्हे चि निःशब्दाचा उभारा । महा मौन्यमुद्रा अभ्यंतरा । कपाट लागलें ॥ ५० ॥ तो अद्वैत उपदेश पवाड । व्हावया स्वानंद सुरवाड । श्री अनंतमौनीनें कृपा जाड । केली तदर्थी ॥ ५१ ॥ अवचट परा उद्घाट । उघडलें निःशब्द कपाट । क्रम स्वानुभवें प्रगट । आला वैखरीसी ॥ ५२ ॥ श्रुति सार सिद्ध संकेत । परा अभ्यंतर वस्तु अनंत । अनंत प्रसादें अनंत । सहज प्राप्ती ॥ ५३ ॥ भीमस्वरूपें भयंकर । प्रगट बोध श्रीशंकर । होय विश्वांसी अभयंकर । प्राप्ती परब्रह्म ॥ ५४ ॥ काळ संभव काळ शासन । होय भयकृत भयनाशन । विश्वाचें भाग्य सनातन । रूपासी आलें ॥ ५५ ॥ विद्या केतकी वनांतरीं । उद्बोध समीर विहारीं । येत सुवासरूप जगदांतरीं । विश्रांतिरूप ॥ ५६ ॥ स्वानंद सरोवर जीवनीं । व्यापकदशा कमळिणी । अवधान भ्रमर होऊनी । बोधमकरंद घे ॥ ५७ ॥ तें ग्रंथांतर अनुसंधान । अद्वैत रसाळ निरूपण । देऊनियां निजावधान । अवधारिजे ॥ ५८ ॥ इति श्री भीमोपदेश । चिदानंद घन प्रकाश । कविमति गुरुतोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५९ ॥ प्रथम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ श्रीरामार्पणमस्तु । श्रीराम । श्रीराम । श्रीराम । श्रीकृष्ण । श्रीराम । श्रीकृष्ण । श्रीराम । राम ॥

श्री

## सूर्य १ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनंत बोधरुद्र । अद्वयानंद कृपासमुद्र । स्वानंदघनदशा-सुभद्र । भद्राचळनिवासी ॥ १ ॥ राम होऊनी निजप्रचीती । दास जाला

अभिनव स्थिती । सर्वगत रामदास विख्याती । जगत्प्राण अभ्यंतर ॥ २ ॥
साह्य परमार्थ निजमुळें । शोधिलीं भवनिशीचर कुळें । चित्शक्ति सीता
तात्काळ । तोषविली ॥ ३ ॥ दया संजीवनी प्रयोगें । सुमित्रासी मित्र
होय सानुरागें । निज वंशज कपीस वेगें । कृपा जीवविलें ॥ ४ ॥ भवहर
सेना जीवन । सकळ प्राणाचा मुख्य प्राण । आत्मविजय श्रीनिकेतन ।
ब्रह्मत्व मूर्त ब्रह्म ॥ ५ ॥ निष्काम शुचित्व अभंग । स्वयंभ कासोटी
सुवर्ण सांग । तपोधन अंतरस्थिती वीतराग । वोध सारस्वतेत ॥ ६ ॥ मूळ
प्रणवाचें निज प्रमेय । स्वरूप अनुभवूनी स्वयें । नव व्याकर्ण सिध्दी
चित्सूर्य । चिदाकाशीचा ॥ ७ ॥ चैतन्य चंद्र आत्मप्रभेचा । निजदशा-
प्रकाशक मुळींचा । कृपामृत किरणीं दयेचा । वर्षाव करी ॥ ८ ॥ प्रबळ
विख्यात प्रतापसूर्य । सत्ता ज्ञान अद्भुत वीर्य । तुर्या दृढव्रत चातुर्य ।
महातेज विभवें ॥ ९ ॥ हा होय त्रिगुण त्रिपुरारी । नित्य आत्माराम सहाकारी ।
जगदात्मा साक्षात्कारी । अपरोक्ष द्रष्टा ॥ १० ॥ भक्तमंडळीचा अग्रणी ।
तपस्वीयांचा शिरोमणी । योगियांच्या अंतःकरणीं । राहे प्रकाशरूपें ॥ ११ ॥
सकळ सिध्दांचा निज सिध्द । तो हा हनुमंत प्रसिध्द । रामावतारीं भव
विरुध्द । कार्ये साधिलीं ॥ १२ ॥ साह्य होऊनी श्रीरामासी । जाला
अंतरंग निश्चयेसीं । कीर्तीचा सूर्य जगतीसी । प्रतापें उदेला ॥ १३ ॥
रजोगुण विकल्प रावणीं । कपट मूर्त विख्यात जनीं । तेणें कपटाळें
समरंगणीं । अवरोधिलें श्रीरामातें ॥ १४ ॥ कल्पना सर्पपाशजाळीं ।
भेदिलीं कपिकुळें तात्काळीं । भीमें जनक मुखें त्या अकाळीं । सोडविलें
सकळां ॥ १५ ॥ पुन्हा दोनी वेळ रणविक्रमें । शरसंधान वळें नेमें ।
निर्जीवित करूनि कर्दविभ्रमें । पुरुषार्थ भोगिला ॥ १६ ॥ तेव्हां
संजीवनीसभव । द्रोणाद्रीतें घेऊनि आव्हा निर्भव । कृपा संजीवनी स्पर्श
राघव । वाहिनीसी उठविलें ॥ १७ ॥ मायामहिकावनीच्या नृपें । कपट
करूनियां मार्क्षेपें । अज्ञानगर्भामाजि प्रतापें । चोरूनि नेलें धुंग्मीं ॥ १८ ॥
सन्मेनेचा प्राण अपहारिला । ते समई कल्पांत गमला । महा दुर्घर्ष
पवाडा । भेटल्या गुप्त धुरेसी ॥ १९ ॥ अहिमहिरावण विकल्पीं । पुत्री

पराभविलें महापापी । घेऊनियां सत्य संकल्पी । आला यशस्वी भगवान ॥ २० ॥ स्वामियासी सोडविलें । येवढें विद्यार्तीचें येश जोडिलें । आत्मारामाचें अरिष्ट घेतलें । आपणावरी ॥ २१ ॥ आठ मात्रुका साधुनी सर्वीज । आठ घटिकेमध्यें मुहुर्तराज । अहं रावणें शक्ति सतेज । प्रेरिली रघुत्तमें ॥२२॥ न कळत श्रीरामासी स्वयें । सन्मुख प्रवर्तोनि वज्रांग हृदयें । शक्ती साहुनी प्रतापसूर्ये । निस्तेज जाला ॥२३॥ पाठीसीं घालुनी रघुराज । शक्तींसह होय निस्तेज । दुर्घट वाहूनियां सहज । होय ब्रह्मरूप ॥ २४ ॥ मूळस्वरूप अनुसंधानीं । प्रगटला वसिष्टाचे ध्यानीं । निज अभंग भंग श्रवणी । त्या सुचविला ॥ २५ ॥ जो स्वयंभानुभव मूर्त । अहं शक्तिपातें होय विकृत । तयाच्या खेदें विश्वहृत्त । विष्कळित जाहलें ॥ २६ ॥ शंवरीचा शत्रु स्वयें । वसिष्ट योगें लंकेसीं येता होये । सुचऊनी श्रीरामासी हृदय । प्रशंसिलें सत्वें ॥ २७ ॥ तूं विश्वसंभव पिता । तुझी त्रैलोक्य विस्तारणी सत्ता । तूं कारणाचें कारण तत्वता । कायसी चिंता तुजलागीं ॥ २८ ॥ पंचशिखारिप्रति काकुस्थें । स्तविलें जें आम्हा तूं साह्य सर्वार्थें । भीमाकृतीनें प्रगट पुरुषार्थें । सत्तारूप विश्वेशा ॥ २९ ॥ वसिष्ठ शिव राम हृदय । ब्रह्मा विष्णु महेश्वर स्वयें । येक जाले जगद्गुरुत्रय । भीमसंभव स्वयंभ ॥ ३० ॥ प्रगटला स्वरूपाचा बोध । प्रचीत संजीवनी अगाध । भीमात्म अकृती प्रसिद्ध । प्रत्यक्ष जाली ॥ ३१ ॥ अव्यक्त जाली होती तत्वें । ते आक्रमिली मुर्छ्याच्या सत्वें । सर्वातीत शुध्द साक्षत्वें । अनुभवामृतीं योजिली ॥ ३२ ॥ चिद्गगन तनुता सुखें । सर्वाजमंत्र गुरुत्रय मुखें । प्रसन्न करूनि मुर्छीच्या उल्लेखें । रूपासी आणिला ॥ ३३ ॥ जाला भीम विग्रह प्रत्यक्ष । प्रळयाग्नीचें उजळलें अक्ष । भक्त जनांनी धरितां लक्ष । दर्शन होय तात्काळ ॥ ३४ ॥ स्वानंद उदधी हा सावेव । निजात्मरूपाचा अनुभव । देवत्रय रूप आदिदेव । येणें प्रकारें ॥ ३५ ॥ आत्म व देऊनी आपुलें । श्रीरामासी गौरविलें । महाविद्यार्तीचें जालें । आख्यान जगीं ॥ ३६ ॥ यास्तव वाटे हा परमप्रिय । सकळ प्राणीयांची प्राप्ति स्मरणें होये । भीमआटवें सरती अपाय । उपाय पळती ॥ ३७ ॥ यऊभीम सारें

रघुनंदन । विजयी जाल्या सनातन । काल शासन भवकंदन । भीम प्रसन्नता ॥ ३८ ॥ तया सद्गुरु भीमासी अभिवंदन । अभिष्टपूर्तीचें होय वरदान । भीम प्रसन्नता स्वसुखवर्धन । भीमोपदेश हा ॥ ३९ ॥ आत्माराम मूळ गुरुमुखें । फावला चित्शशिबोधसुखें । तो हा महाउद्बोध हरिखें । सीतामुखें हनुमंतासी ॥ ४० ॥ तया भीमापासूनी प्रसन्नता । भक्तपरंपरा बोध तत्वता । तो हा भीमोपदेश प्रसिध्धता । अवधारिजे श्रोतीं ॥ ४१ ॥ आधीं भीमाची प्रसन्नता । भीमोपदेश श्रवण होतां । भीमप्रसन्नतेनें मूळ सत्ता । बोळे सीता चित्शक्ती ॥ ४२ ॥ जालियां चित्शक्ती सुप्रसन्न । प्रसन्न होय आत्माराम संपूर्ण । या ग्रंथाचें ऐसें अनुसंधान । रहस्य ज्ञानाचें ॥ ४३ ॥ भक्ती विरक्ती आणि ज्ञान । प्रस्थानत्रय भीम अधिष्ठान । अनुष्ठान सिध्दी ग्रंथ श्रवण । भीमदर्शनें होये ॥ ४४ ॥ तुम्ही संत सज्जन कृपाळ । जालेती परमार्थासी अनकूळ । तुमचें अवधानें चि केवळ । जीवन होय ग्रंथासी ॥ ४५ ॥ अवधानामृत घन वर्षे । तें युक्तिसंजीवनी वर्धती तोषें । ग्रंथोक्ति वनस्पती सौरसें । फळती अपाडें ॥ ४६ ॥ अवधान चित्सूर्य प्रभेनें । प्रकाशग्रंथ सृष्टी शोभेनें । अवधानसुखचंद्रकिरणें । ग्रंथभुवन तोषे ॥ ४७ ॥ अवधान पूर्ण चिदंबर । संरक्षीत ग्रंथ अभ्यंतर । तयासी नाहीं पारावार । संत अवधानमुळें ॥ ४८ ॥ सकळ संतासी अभिवंदन । अवधारिजे अवधान महिमान । दिधले चि यावें वरदान । सर्वदां ग्रंथश्रवणीं ॥ ४९ ॥ प्रबंध परमार्थें जाड । वदविजे देउनी अवधान वाड । पुरवा माझे जीवीचें कोड । हे चि प्रार्थना संतासी ॥ ५० ॥ इति श्री भीमोपदेश । ग्रंथोपक्रम मूळ तोष । भीम आख्यान विख्याति चंडांश । म्हणे मेरु अनंत ॥ ५१ ॥ प्रथमसूर्य द्वितीय कळा संपूर्ण ॥ २ ॥

श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥

श्री

## सूर्य १ कला ३

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामउपासक ध्यानीं । भीम आर्जविजे भजनीं । आत्मबोध समाधानीं । समाधानप्रद ॥ १ ॥ रामउपासक अंतर्निष्ट । तिहीं भीम प्रसन्न करावा स्पष्ट । भीमकृपेनें राम वरिष्ट । अनुभविजे सुखें ॥ २ ॥ नसतां बलभीमाचें साह्य । भव दुर्घट बाधाचि होय । भीमकृपेनें सरती दुर्जय । भवबाधा ॥ ३ ॥ अवघड पर्वतस्थळीं । येकांत निर्जन सर्व काळीं । निर्वात गुहा ध्यान समेळीं । रहावे निरंतर ॥ ४ ॥ सुस्नात निर्मळ जळीं । आसनसिद्धीं सोहं अनिळीं । प्रणव साधुनि नभमंडळीं । निज अंतर्लक्षें ॥ ५ ॥ परम सुंदर मनोहर । सुवर्णगाभा वज्रशरीर । घनवटील चिदंबर । अंतरीं ध्यावा ॥ ६ ॥ सद्भावनिष्ठेनें ध्यान करितां । भीमस्वरूप होय ध्यातां । दृष्टीसी स्वरूप प्रत्यक्षता । भीम ठसावे ॥ ७ ॥ भीमप्रत्यक्षासी कारण । निजांगीं विरक्तीभरण । अनुष्ठानविधी आचरण । महातपश्चर्या ॥ ८ ॥ अवघड गुहा नदीनीरीं । भीमसंस्थान आरामांतरीं । रमणीयदेवालयविस्तारीं । महा शोभा ॥ ९ ॥ भीम भयंकर महामूर्ती । प्रतिष्ठा होय विख्यात कीर्ती । नवविधा भजनप्रवृत्ती । समर्थाच्या विभवें ॥ १० ॥ त्यजुनियां भवप्रवृत्ती । रुचीस पटली नित्य निवृत्ती । परमार्थी जन सर्वार्थी । जाले सानुकूळ ॥ ११ ॥ उपाधीचा संसर्ग नसे । निर्विकल्प समाधीसुखें वसे । ऐसी च चर्चा होतसे । महास्थळीं ॥ १२ ॥ पवित्र स्थळें रमणीय बैसका । मनोहर मठ मठिका । स्थळ पाहतां चि विवेका । विश्रांति होय सुखें ॥ १३ ॥ नाना देशींचे सद्भाविक । येती वैभवें उपासक । उपासना ते पुण्यश्लोक । आर्जविती ॥ १४ ॥ तारकमंत्र पुनश्चरणें । भीमआर्जव मालामंत्रानें । मिताहारी उपोषणें । जपअनुष्ठानशीळ ॥ १५ ॥ प्रातर्मध्यान्हसायान्हीं । चुकों नेदितां काळ तिन्हीं । अग्निहोत्री जैसा त्रिकाळ वन्हीं । तापसी

हवनें ॥ १६ ॥ तेंवि त्रिकाळ पूजन अभिवंदन । भक्तासमोहें अंतर उजळोन । पूजाद्रव्यें विधिविधान । समर्पण होतसे ॥ १७ ॥ नित्य नेम मंत्रमाळा । नित्यानुष्ठान जिव्हाळा । नित्यगुरुपूजन प्रेमळा । आवडी उपजे ॥ १८ ॥ सद्गुरु राम सावळा । भीम आराधन वेळोवेळा । अंतर्निष्ट साधुमेळा । भक्तांचीं थाटें ॥ १९ ॥ नित्य हरिकीर्तनाचा गजर । श्रुति शास्त्र वाक्याचा विचार । पुराण चर्चा निरंतर । व्युत्पन्न मंडळी ॥ २० ॥ भीम आश्रमाची परवडी । पाहतां दृष्टी जडे कडोविकडी । रचना मनोहर आवडी । उभविले आलय ॥ २१ ॥ उपवनीं वृक्षाची सुखाडी । फळती कल्पद्रुम पडीपाडी । सुमनसंभार आवडी । पुरतसे अर्चन ॥ २२ ॥ उपवनीं दिव्य पडशाळा । सोपे मंडप धर्मशाळा । शृंगार सभेसी घन-सांवळा । अर्चिती भक्त तोषें ॥ २३ ॥ महा उत्सव समारंभ । जो कां ब्रह्मादिकांसी दुर्लभ । जगत्कुटुंबिणी वल्लभ । देतसे सकळां ॥ २४ ॥ शोभा तरुवरांसी सफळ । कुंजती पक्षी सर्वकाळ । नाना सुमनवनें-परिमळ । पवन अर्पी देवासी ॥ २५ ॥ शोभायमान कदळीवन । दृष्टीसी तोष पवमाननंदनें । संगीतकाळमानत्रयानें । गाती गायक ॥ २६ ॥ सरिता निर्मळ जळें वाहे । विलासले दमदायेसी समुदाय । स्थळोस्थळीं पाकनिष्पत्ति होये । नैवेद्य सर्वोत्तमाचा ॥ २७ ॥ संत महा प्रसादें जेथें । स्वानंदासी काय उणें तेथें । सगुण साक्षात्कारी भक्त । यतें अमृत वेळा ॥ २८ ॥ सर्व हृदईं रूप सावळें । नयन पाझरती आनंदजळें । अष्टभावें उचंबळे । प्रेमा अंतरींचा ॥ २९ ॥ हरिकीर्तन निरूपण । नित्य चालिलेंसे भजन । भीमप्रसन्नतालक्षण । तेथें जाणावें ॥ ३० ॥ सकळ सृष्टीचें वैभव । समारंभ होती उत्सव । दिव्या पताका नवनव । शोभा आणिती ॥ ३१ ॥ अभिनव सामर्थ्य देवाचें । पाहतां भाविक दैवाचे । भाग्य उदेलें भक्तांचें । पार नसे सुकृता ॥ ३२ ॥ उपासकांचा निजविश्राम । सिंहासनीं शोभे आत्माराम । एक छत्री राजा परम । नीतीवंत कृपाळू ॥ ३३ ॥ इतुकेन कृतार्थता आली । उभयकुळें उध्दरलीं । जगदोध्दारें वसविली । उपासना सूर्योनी ॥ ३४ ॥ अंतरनिष्ट येर्नातवनीं । भीम प्रसन्न निजजन्मनी ।

स्वानंदसिंधूंत मज्जोनी । कृतार्थ जाला ॥ ३५ ॥ सगुणानिर्गुणा अंतर्भाव । प्रांजळ जाला अनुभव । संतसहवासी अभिनव । काळक्षेप होतसे ॥ ३६ ॥ स्वानुभविक नित्य बोलणें । अभ्यंतरीं जाणोनी उत्तर देणें । अद्वैत वेद निरुपणें । चर्चा चाले ॥ ३७ ॥ श्रोता अभिनव निष्ठेनें । पुसे वक्तयासी सद्भावानें । उपदेशक्रम ग्रंथउक्तीनें । प्रांजळ कीजे ॥ ३८ ॥ इति श्री भीमोपदेश । भक्ता नरभाव विशेष । भीमप्रसन्नता संतोष । म्हणे मेरू अनंत ॥ ३९ ॥ प्रथम सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ श्रीराम । श्रीराम । श्रीराम । श्रीराम ॥

---

श्री

## सूर्य १ कळा ४

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीराम मुख्य प्राण हृद्गत । जे निगम मथित सिधांत । प्रमेय प्रबोधान्वयें वेदांत । महावाक्य वस्तुता ॥ १ ॥ गुरुशिष्य उपदेशक्रमें । अनुभवासी कारण सप्रेम । ग्रंथपीठिका उपक्रम । अवधारिजे ॥ २ ॥ श्रोता वक्ता निजहृदय । प्रगटीत आत्मारामस्वयें । स्वस्वरूप स्वयंप्रत्ययें । ग्रंथसंगतीनें ॥ ३ ॥ मागें श्रोतीं केला प्रश्न । सांगेल जे उपदेशक्रमलक्षण । प्रत्योत्तर हा ग्रन्थ संपूर्ण । अक्षेपनिवृत्ति ॥ ४ ॥ पुढती श्रोतयांनीं आक्षेपिलें । जे उपदेश क्रमाचेनि मुळें । पाहिजे आम्हांसी निवळ केलें । मायाब्रह्मलक्षणी ॥ ५ ॥ परब्रह्म तें कैसें आहे । परतत्व म्हणती तें काय । परब्रह्मासी अनुभवती ते होय । कैंवि कवण ॥ ६ ॥ परब्रम्हासी जाणते कवण । त्याचे भेद कीं अभेद लक्षण । बोध कवण कर्त्ता प्रमाण । ईश्वर तो कैसा ॥ ७ ॥ जीवशिव भेदाभेद । हा चि केला पाहिजे स्वसंवाद । निरसुनी मायाद्वंदखेद । स्वानंद वर्धविजे ॥ ८ ॥ परम विनयें सद्भावें । विचारलें श्रोतयांनीं बरवें । सुप्रचीत अंतःकरण विभवें । वक्ता बोलतसे ॥ ९ ॥ उद्बोधगिरा हृदयांवर । अभिनव बोधसुधाकर । अवधान

भाव चकोर। होउनी सेवी ॥ १० ॥ घनानंद अपरांपर। आश्रयुनी कृपांबर। अवधान चातक निरंतर। होउनी सेवी ॥ ११ ॥ अमन संवाद सरांत। सुमन सुवासिक पारिजात। अवधान मुख्य प्राण निवांत। सुवास तल्प विहारीं ॥१२॥ निगम काननें अभ्यंतरें। अवधानमृगेंद्र विहरे। स्वसुखभक्तीनिर्धारें। हो पुष्टीवर्धन ॥ १३ ॥ अवधान विहंगमगती। अनुभव तरुवर पुढती पुढतीं। प्राप्ति परमानंद फळाप्राप्ती। अविनाश तोषे ॥ १४ ॥ प्रमय आनंदसुखसार। सेवी यंत्र वाळेनें अतिमधुर। हा अनुभवामृतसागर। मीन होउनी विहरे ॥ १५ ॥ बोध अक्षय संपत्ति। होउनी अवधान नृपती। भोगी साक्षात्कार महामती। प्रज्ञावंत वरिष्ठ ॥ १६ ॥ मायामोहमदवारण। निरसुनी संसृती कारण। सद्भाव तो असाधारण। अवधान रुद्वी ॥ १७ ॥ परब्रम्ह अर्थ अभ्यंतर। निजांगचर्या ज्ञाननिर्धार। पवाडोन हृदईं निरंतर। प्रचिती ती आणी ॥ १८ ॥ महावाक्य त्रिपद भेद। पाहें हृदईं रिघोनी अभेद। जीवशिव शब्दार्थी विशद॥ अर्थीच निवळे ॥ १९ ॥ अकळ मायेची प्रवृत्ति। बोलती ते अज्ञानमती। न जाणोनी आपणाप्रती। गाथा प्रवर्तली ॥ २० ॥ अकळ भवनिवृत्ति आहे। बोलती संशयासी कारण स्वयें। आत्मप्रचितीचें हृदय। परीक्षिले नाहीं ॥ २१ ॥ मूळमायेचा उल्लेख। जाला म्हणती ते अतिमूर्ख। प्रतिक्षणीं हृदयीं अंतर्मुख। उल्लेख चि अवघा बहिर्मुख ॥ २२ ॥ भाविती कल्पना। नेणोनी स्वये जगत्कारणा। प्रवृत्तिविस्तारें नाना। प्रवाहीं पडिले ॥ २३ ॥ अमूळहेतु संसरणे। जगदाद्य निजकारणें ॥ सकळ प्रवृत्ती भरणे। नित्य प्रवर्तती ॥२४॥ याकारणें मूळींच्या मूळीं। हृदयीं रिघोनी सर्वकाळीं। नित्य जो संभव त्याहळीं। आणि निवेदी ॥ २५ ॥ जेथील तेथें समर्पण। पाहतों स्वप्रकाशदर्पण। अभेद भवसंतर्पण। अनर दीक्षा ॥ २६ ॥ अनुभवस्वानंदपल्लोळीं। सोहं स्वभावें निजमौळीं। मज्जनविज्ञान जळीं। नित्य पुनीत ॥ २७ ॥ नित्यानुभव परमान्न। सेवुनी नित्य तृप्ति निर्वाण। त्या अनरांश दरोचें स्मरण। जागर्ती सदा ॥ २८ ॥

या अवधानीं अखंडीत । असे श्रोता तो हृदया विदित । सकळ तत्वार्थ हृद्गत । प्रांजळ तसा ॥ २९ ॥ श्रवणाचें अभ्यंतर । मननें निवळे निरंतर । निजध्यासे अर्थांतर । प्रत्ययासी ये ॥ ३० ॥ प्रज्ञा निजध्यासीं जागे । अर्थ अभ्यंतर होउनी वागे । अवचर सोय लागे । स्वरुपाची ॥३१॥ जन्मांतर सुकृताच्या कोटी । असतां संग्रह ज्या गांठीं । तयासी च पडे दृष्टी । स्वरूपीं निजध्यासे ॥ ३२ ॥ योगभ्रष्ट सज्जन कुळीं । संभवला स्वानुभव सुकाळीं । तया स्वरुपानंद सर्वकाळीं । सद्गुरु कृपेनें ॥३३॥ पूर्वी साधनें केलीं होतीं । फळें अर्पुनी ईश्वरीं निश्चितीं । निष्काम चि ते परमार्थी । होय संपन्न तो ॥ ३४ ॥ जो त्रिविध तापें दुखावला । मनापासुनी विपईं विटला । तो चि येक अधिकारी जाला । परमार्थासी ॥ ३५ ॥ संसारजनित सुख । जयासी वाटे परम दुःख । सर्वदा स्वरुपीं सन्मुख । निजानुसंधान ॥ ३६ ॥ निःसंग होउनी सर्वांपरी । सर्वदा आत्मानुसंधान करी । तो चि मोक्षाचा अधिकारी । महा विरक्त मुमुक्षु ॥ ३७ ॥ तापला भवतापदावानळीं । माया त्यागुनी तो तात्काळीं । उडी घाली अर्थ गंगा जळीं । विश्रांति व्हावया ॥ ३८ ॥ अनादिक्षोभ विक्षेप चित्तें । अतृप्त क्षुधेनें तळमळीत । स्वानंद सदनीं त्वरान्वित । झड घालीतसे ॥ ३९ ॥ मुखें धनाचें आवर्पण । संतप्त निज जीवनेंवीण । तृष्नेनें फुटतसे प्राण । धावे जीवनार्थी ॥ ४० ॥ जो अवरोधीला मर्वे । त्यासी निर्भय विश्रांतीनें फावे । याकारणें निरोपाधी स्वभावें । तो चि सुखी या येक ॥ ४१ ॥ मायाजाळविक्षेपमुळें । न लभे चि स्वात्मसुख आगळे । वेष्टिल्या काम-क्रोधादि व्याळें । विषयफासीं ॥ ४२ ॥ येथे पाहिजे ईश्वरदया । तरी निरसेल हे माया । आपेआप स्वरुप चर्या । निवळेल हृदयीं ॥ ४३ ॥ प्राचीं उदेला या सूर्य । दावी पदार्थांचें आधिर्य । तया गभस्तींवीण कार्य । कांहीं न घडे ॥ ४४ ॥ हिरण्य जगत्कारणें । तेणें प्रबळे असाधारण । तो संसार निष्कारण । तेणेंविण होय ॥ ४५ ॥ स्वरुप अक्षरें सर्वदा । लाभे सेवितां सद्गुरुपदा । महावाक्य त्रिपदा । अंतरींचा

निवळी जे ॥ ४६ ॥ भवसंकल्पआपदा । नाना भव विरुधे हेतु बाधा । न सेवित सद्गुरुपदा । तवरी बाधी ॥ ४७ ॥ सज्जन संपदा ते पत्र । स्वयंभ निधी दाटल्या सर्वत्र । परंतु अनुभवाचे नेत्र । पाहिजेति तिया ॥ ४८ ॥ तेवि महावाक्य श्रवणी । रिघतां अर्थाची लाभे धरणी । ऐसी अभिनव करणी । सद्गुरुरायाची ॥ ४९ ॥ आधीं पाहिजे चित्तशुध्धी । निश्चयाची कृतबुधी । तेणे अंतरनिष्टा त्रिशुध्धी । गुरुकृपा होय ॥ ५० ॥ सत्कर्मे शास्त्रसंपन्न । सात्विकता भगवद्भजन । जो ईषणात्रयविहीन । विशेष गुरुभक्ति ॥ ५१ ॥ शांतीचा अक्षोभ सागर । जागवी नवविधा जागर । सेवी नव घनवर्ण नागर । मनोरम रुपें ॥ ५२ ॥ नित्य लावण्य गाभा नयनीं । सेवी उन्मनी निज शयनी । सर्वदा अवधानभवनी । वास्तव्य करी ॥ ५३ ॥ ऐसें श्रोतव्या प्रज्ञापूर्वक । सावधान विश्वासी येक । सत्समार्गेम विवेक । नित्य जागवी ॥ ५४ ॥ श्रोता वक्ता होउनी आपण । करी श्रवणाचें निजमनन । जगदांतर अर्थेऊन । संवाद करी ॥ ५५ ॥ या अधिकारें श्रोता । त्याचे होय सार्थकता । आतां ग्रंथांतर तत्वता । अवधारिजे संतीं ॥ ५६ ॥ इति श्रीभीमोपदेश । मुमुक्षु दशानिर्विशेष । श्रोता अधिकारें आदिशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५७ ॥ प्रथम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण । श्रीगोविंद-दामोदरमाधवाय नमोनमः ॥



श्री

## सूर्य १ कळा ५

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीराम अनंत अवधानी । ग्रंथपरमार्थी॥ अनुसंधानी । प्रचीतीच्या शुक्तिकयनी । विवरां वरें ॥ १ ॥ मूळ अहंकार प्रबळ । अवरोधिलें विश्व सबळ । बुडऊनि भवजळीं विवळ । भोगविती जन्मदुःखें ॥ २ ॥ तो विश्वावरोधी असुर । स्वहिताचा शत्रु अनिवार । कामादि षड्वर्ग परिवार ।

आत्माराम स्वयें ॥ ४० ॥ उत्तररामायणीची कथा । अगस्ती होय अनुवादता । शिव पार्वतीप्रती सांगता । रहस्य अंतरींचें ॥ ४१ ॥ सफळ सत्वाचें निज जीवन । तें हें रामतत्व परम गहन । योगी अनुभविती सनातन । आत्मारामासी ॥ ४२ ॥ शिवमुखीं अगस्तीसी श्रवण । रामतत्वाचें बोध आख्यान । मग त्या अगस्तीपासूनि संपूर्ण । विख्यातीसी आलें ॥ ४३ ॥ बोलिजे तया अद्वैतरामायण । जेथें ब्रम्हानुभव कथन । नामरूप पदार्थज्ञान । रूपातीत केलें ॥ ४४ ॥ पदार्थासी अद्वैतसंकेत । वस्तु अनुभवूनि अखंडित । संकेतार्थें निवळे चित्त । परमार्थें प्रांजळ ॥ ४५ ॥ मुख्य सिंहासनींचा श्रोता । हृदयसभा वसविता । तत्वार्थ सृष्टीचा सविता । स्वसुखघन ॥ ४६ ॥ वसिष्ठ विश्वामित्र तपोराशी । कश्यप अंगिरा महाऋषी । गौतम भरद्वाज सभेसी । बैसले विख्यात ते ॥ ४७ ॥ नारद आदि करूनि मुनी । जे तपस्वी अनुष्ठाने स्वरूपें अग्नी । भक्त विख्यात तपोवर्धनी । चर्या जयाची ॥ ४८ ॥ सिद्ध साधु समाधिस्त । योगी अनुभवी महंत । ब्रम्हदीक्षादीप्तिमंत । अपर सूर्य ते ॥ ४९ ॥ यती ब्रम्हचारी दिगंबर । दिग्वल्कालि व्याघ्रांबरधर । परमहंस विख्यातीनें थोर । कपिलादिक ॥ ५० ॥ घनवटली स्वयंभ शोभा । कैवल्य सिंव्हासनीं स्वसुखगाभा । ऋषेश्वरीं दाटली सभा । चर्चा होतसे ॥ ५१ ॥ आतां पुढें तें चि निरूपण । श्रीरामसभेचें महिमान । श्रोतीं देऊनियां अवधान । अवधारिजे ॥ ५२ ॥ इति श्रीभीमोपदेशसार । अवधान देउनी निरंतर । अवधारिजे तत्व साचार । म्हणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ प्रथम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीराम । समर्थ । वल्भीमायनमः ॥

---

श्री

॥ सूर्य १ कळा ६ ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्रीरामजगदात्मा अनंत । हृदय सभा विभूषित । द्योतक भाव ते समस्त । सभासद होती ॥ १ ॥ भीमोपदेश कारण । विश्व उध्दरितां

असाधारण । भवाब्धीसी होय तारण । ग्रंथश्रवणें ॥ २ ॥ अहं रावण दुराचारी । रामें संव्हारिला ज्ञानशरीं । मुक्त अमर विश्रामाशारीं । आनंद वर्तला ॥ ३ ॥ जगदोद्धार रामकरणी । नमीं प्रगटल्या प्रतापतरणी । अद्भुत त्र्यी भवतारिणी । कीर्ति संभवली ॥ ४ ॥ भव विजय गजरें । चित्पुष्प की सद्द परिवारें । सीतासह साक्षात्कारें । आला कैवल्य क्षेत्रा ॥ ५ ॥ अमर ऋषि समारंभें । मुक्तमंडपीं शृंगार सभे । पट्टाभिषेक चर्या शोभे । सुदा प्रभूसी ॥ ६ ॥ उत्सव पट्टाभिषेक सिध्दी । तोष जाला असे निरवधी । त्या सभेची शोभा दृष्टीसी वेधी । मनें सहित ॥ ७ ॥ शिवादिक महासिद्ध । दाटले ब्रह्मादि देव प्रसिद्ध । ज्ञान रवींद्रव प्रबुध । मंडण सभेचें ॥ ८ ॥ दत्तात्रयादिक सिद्ध श्रमणी । नव सिध्द महा निर्वाणी । सनकादिक ब्रह्मज्ञानी । मिळाले थाटें ॥ ९ ॥ विदेहराज राम सभेसी । भूदेव विख्यात तापसी । कण्व जाबाली रोहर्षी । तपोधन मिळाले ॥ १० ॥ नमीं नक्षत्रांच्या कोटी । तेवि सभेसी ऋषींची दाटी । अष्ट वसु रुद्रादित्य घरटी । प्रकाशमंत पाहतां ॥ ११ ॥ सरिता समुद्र मूर्तिमंत । कल्पद्रुम वनें पर्वत । रामसभेसी तिष्टत । उभे असती ॥ १२ ॥ गणेश षड्मुख भैरव । भूत सेना ते अभिनव । शार्णीकुळीचे संभव । नृप सभेसी तिष्टती ॥ १३ ॥ चारी वेद मनोहर रूपें । शास्त्रें पुराणें मूर्तिमंत सर्वे । गणगंधर्व रत्नरूपें । कळप्रवीण सभेसी ॥ १४ ॥ यक्ष पिशाच गुह्यक । किन्नर किं पुरुषादिक । विद्याधर गुणी गायक । मिळाल्ली सत्पात्रें ॥ १५ ॥ रामसभा चिदंबर । अनंत ब्रह्मांडें तेथें विस्तार । जगदांतरींचा रघुवीर । प्रगटला सभेसी ॥ १६ ॥ मीना लावण्यसिंधूची लहरी । शोभे श्रीरामाच्या अंतरीं । उन्मनीरूप अगोचरी । दशा केवळ ॥ १७ ॥ जिचे सत्तेनें त्रैलोक्य चाले । विषहून सीता बोले । सत्संकल्प सिद्धांतें पावले । जिचेच्या स्मरणें ॥ १८ ॥ जे जगत्कारण पूर्ण सत्ता । ते वामांगीं शोभे सीता । राम त्रैलोक्यजनिता । होय निश्चयेंनि ॥ १९ ॥ भरत शत्रुघ्न सौंदर्यनिधी । परम मनोहर रूपें निगुधी । सेविती श्रीरामासी सद्बुद्धि । दिव्योपचारें ॥ २० ॥ केवळ आनंदाचा गाभा । निजिजा

आंगीं वीरश्रीशोभा । तो लक्ष्मण पाठीसीं उभा । च्यापशर घेउनी ॥ २१ ॥ ब्रह्मचर्य मूर्तिमंत । कर जोडुनी विनयान्वित । श्रीरामासन्मुख हनुमंत । सप्रेमयुक्त उभा असे ॥ २२ ॥ श्रीराम सभेचें ऐश्वर्य । लावण्य दृष्टीसी होय आश्चिर्य । प्रकाशलीं रत्नें जैसे सूर्य । सभांवरीं उदेले ॥ २३ ॥ लावण्य वसुमती मथित । सभेची रचना अकल्पित । सौंदर्य रत्नाकर जात । मणिमय भूमिका ॥ २४ ॥ गाळींव तेजाचें निजतेज अत्यंत । सुवर्णरसें रत्नखचित । अक्षय भूमिका हृद्गत । अप्रांतपाया ॥ २५ ॥ मंडपाची वैसका विस्तीर्ण । विलोकितां वेडावलें मन । मनोहर वेदिका संपूर्ण । विशाळ मणिमय ॥ २६ ॥ विचित्र चित्राकृति अनेक । यंत्र पीठिका सूर्यशशांक । मंडलें विविध प्रकाशक । पद्माकर पंक्ती ॥ २७ ॥ सुरंग पवळ्याच्या पवळी । रत्नाकर कमळकळिका चोळी । सुमन तरुवर अळिकुळी । शोभती आश्चिर्यकृत ॥ २८ ॥ श्रृंगार वन लावण्यसदनी । लोचनासी लोचन लाऊनि निशिदिनी । पाहतां पाहतां न पुरे धणी । वेध होय तटस्त ॥ २९ ॥ दिव्य राजांगण शोभा । दिव्य रत्नजात फांके प्रभा । सुशोभित सुरंगशोभा । चौक झळकती मुक्ताचे ॥ ३० ॥ लावण्य-रचनेची संपूर्णता । नाना आकृती आश्चिर्यता । गोपुरें कळस पाहतां पाहतां । वेध देती चित्तासी ॥ ३१ ॥ सुवर्णांवर लखलखाट । मिरवले ध्वजपंक्तीचे थाट । सभोंवते प्रकार सदट । सुवर्णमय ते ॥ ३२ ॥ चहूं प्रदेशीं मनोहरें । रमणीय चत्वार महाद्वारें । सहस्र पाउरिया विस्तारें । सोपानपथ सभांगणीं ॥३३॥ अनंत रत्नखचित स्तंभ । उंचीनें भेदित गेले नभ । मनोहर आकृतीनें स्वयंभ । ब्रह्मांडीची रचना ॥ ३४ ॥ तया स्तंभावरी निरोपम । रत्नशिळा सतेज योम । लावण्य चित्रिलें परम । खणोखणीं आगळें ॥ ३५ ॥ मुक्तमंडप तो प्रसिद्ध । प्राकाशिले मुक्त चांदवे विशुद्ध । मुक्त झालर शोभा सिद्ध । सार्वभौम सभा ॥ ३६ ॥ मणिमय दीपाच्या हारीं । नित्य प्रकाश सभेमाझारीं । सत्व सोमकांत परोपरीं । निर्मित दिव्य वैसका ॥ ३७ ॥ उल्लेख सूर्यकांत सोज्वळ । येके स्थळीं कामाविळे केवळ । दिव्य कास्मीर-रचना निर्मळ । निरूपम स्थळें ॥ ३८ ॥ भाव स्फटिक स्वच्छ प्रभा ।

निवास निर्मिला कमनीय गाभा । निखिळापार्चाचा उभा । शृंगार निवास तो ॥ ३९ ॥ श्रीराम सभेची रचना । तटस्त करी सर्व जना । जे अंतर्निष्ट तेहीं विलोकना । पात्र केलें सभेनें ॥ ४० ॥ विश्वरूप रामाची रूपडीं । पाहतां पाहणें सरे चोखडी । दृश्य द्रष्टा दर्शन प्रौढी । राहिली तेथें पाहतां ॥ ४१ ॥ मुक्तमंडप लावण्यसभा । संपूर्ण सभेमाजीं श्रीराम उभा । दर्शनमात्रें चिदिव्य शोभा । वेध करी ऐसा ॥ ४२ ॥ श्रीराम जगदानंदकर । मनोहर सभेचें जिव्हार । श्रीरामरूप ऋषेश्वर । वैसले सभेसी ॥ ४३ ॥ सबाह्य सुंदर मनोहर । विश्वात्मा तो वैदेहीवर । सिंव्हासनीं आत्मसाक्षात्कार । मूर्तिमंत वैसला ॥ ४४ ॥ पट्टाभिषेक महां गजरीं । अर्चिलासे नाना उपचारीं । स्वसुख सछाप तदुपरीं । होतसे ऋषेश्वरमुखें ॥ ४५ ॥ तये अवसरीं अगस्ती ऋषीनें । परमानंद तोषवृत्तीनें । संबोधुनी श्रीरामासी ,सुवचनें । स्तवन प्रशंसिजेत ॥ ४६ ॥ अगस्तीवाक्य अमृतघनधारा । सानंद भद्राचळावरी सैरा । वरुषों लागल्या अपारा । प्रमयजीवनेंसीं ॥ ४७ ॥ तें अनावृत्त प्रमयसार । अगस्ती प्रोक्त अपरंपर । रहस्य अमृताचें जिव्हार । प्रगट सूर्य विख्यातीनें ॥ ४८ ॥ तें परम रसाळ निरूपण । श्रीरामचरित्र विज्ञानघन । देउनी निरंतर अवधान । अवधारिजे श्रोतीं ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेश स्थिती । विश्वविख्यात श्रीरामाची कीर्ति । हृदयासी आणितां होय विश्रांति । हाणे मेरु अनंत ॥ ५० ॥ प्रथम सूर्य षष्ठम कळा संपूर्ण ॥ ६ ॥



श्री

## सूर्य १ कळा ७

॥ श्रीपरमात्मनेनमः ॥

श्रीराम जगदानंदविभु । तुझा प्रबोधनंदन स्वयंभू । अखंड ध्यातसे तुजला शंभु । परम पुरुष ॥ १ ॥ परात्पर परंधामा । निगमहृदय .निरूपमा । विज्ञानधन चिद्व्योमा । परेशा पावना ॥ २ ॥ सुवासाची

भूमिका सुमन । तैसिये सत्तेचें अपरोक्ष ज्ञान । उत्पत्ति स्थिति निदान । नसे चि तुझ्या स्वरूपीं ॥ ३ ॥ उत्पत्ति स्थितीचें कारण । तुजवांचुनि नव्हे चि प्रमाण । जेविं व्यापकपणें गगन । निवास सकळां ॥ ४ ॥ परि ते करीना ना न करी कांहीं । तेणेंविण कांहीं च नाहीं । तैसी जगत्कारणें वैदेहीं । प्रबळ तुझेनि ॥ ५ ॥ तुझें हृदय सनातन । तत्वतां तूं गुणविहीन । निर्विकार निरंजन । निर्मन निःप्रपंचा ॥ ६ ॥ नित्य शुद्ध बुद्ध सनातन । तुज प्रमाण नसे चि स्थानमान । तूं परब्रम्ह वस्तु निर्वाण । निःसंग निर्भवा ॥ ७ ॥ तूं सहज विष्णुतत्व विशाळ । तूं केवळ स्वरूपीं निर्मळ । आदि मध्यांत मायामळ । लागला चि नसे तुतें ॥ ८ ॥ ऐसें निजरूप तुझें परम । प्रमाण नसे चि हें निज वर्म । उपरमल्यां भावें परब्रम्ह । वेदसंकेतें बोलिलें ॥ ९ ॥ आतां स्वाभाविक स्वरूप । अभिनव सत्ता संकल्प । ज्ञानास्तिक्य निर्विकल्प । साक्षत्वं विस्तारें ॥ १० ॥ स्वभाव निर्विकार ब्रम्ह । काळत्रयरहित निष्कर्म । ऐसें घोतविलें तें निजवर्म । प्रत्यक्षाकारें ॥ ११ ॥ परब्रम्हाचा अनुभव । त्रिपुटीविण निर्भेव । विज्ञान हृदय अभिनव । अपरोक्ष साक्षात्कारें ॥ १२ ॥ ज्ञानाचें अभ्यंतर निर्गुण । ज्ञानामाजि ज्ञानाचें निदान । ज्ञानामाजि साक्षत्व संपूर्ण । ज्ञानीं त्रैलोक्य सत्ता ॥ १३ ॥ तो तूं ज्ञानघन आत्मा । ब्रम्हानुभव विश्रामा । अकळ तुझा महिमा । वेदविधींसि नाकळे ॥ १४ ॥ त्या ज्ञानाचें आश्चर्यरूप । सत्तेनें प्रगटलासी विष्णुस्वरूप । चिदाकाशींचा चिद्दीप । अमृतकर होसी ॥ १५ ॥ त्या विष्णूचें केवळ हृदय । सत्तास्वरूपें नर-वैडूर्य । चित्सूर्यवंशींचा सूर्य । मिरवलासी स्वप्रकाशें ॥ १६ ॥ धन्य आमुचें दैव सभाग्य । निज नयनासी आलें महाभाग्य । दर्शनासी पात्र जालों योग्य । स्वानंद संभवा ॥ १७ ॥ तुझी चर्या परम पावन । अवतार-लीळा जगदोद्धरण । तुझा प्रताप असाधारण । शत्रूतें निवर्तविलें ॥ १८ ॥ महा पतित दुरात्मा खळ । विंशतिनयन तो दुष्ट अमंगळ । दुराग्रहें पिडिले सकळ । त्रैलोक्यवासी जन ॥ १९ ॥ तो जनकंटक दशानन । अमरांसी दशा आणिली दीन । मा इतरांची दशा तेथें कवण । दुखविलें त्रैलोक्यहृदय

॥ २० ॥ त्रैलोक्याचें दरिद्रदुःख । संभवलें विंशतिभुजें दशमुख । तया त्रैलोक्य घेतसी उल्लेख । सहीत शमविलें तुवां ॥ २१ ॥ तुझें अवतरणें सुकृताचें । महद्भाग्य जगताचें । परीस हाता चढलियां मनींचें । अभिष्ट पुरे च कीं ॥ २२ ॥ उपेगी जीवन जगाचें । दैव पाहिलें निज दृष्टीचें । अभिनव महा तेजाचें । संभवलें विंब ॥ २३ ॥ जें सारस्वत संमतीचें । उपेगी तेज गभस्तीचे । आश्चर्य जात पदार्थाचें । विश्वतीपाचें मूळ ॥ २४ ॥ धरावाहक होय जगा । पवित्रतेसी स्वर्गंगा । सद्वतीस सत्संगा । वांचुनी न दिसे ॥ २५ ॥ परत्रासि तुझें चरित्र । प्रसन्नतेसी तव नाम मात्र । सायोज्यतेचें सत्क्षेत्र । वसविलें तुवां ॥२६॥ तव कथा सेतु भवसिंधूसी । तुझें स्मरण सुकृताच्या राशी । तुझ्या दर्शनें उपशम पापासी । सूर्यदर्शनें तम जैसा ॥ २७ ॥ ऐसें अनुवादतां अगस्ती । श्रीरामासी स्वसुखाचे डोळ येती । महा आनंद सभेप्रती । वर्तला ते वेळे ॥ २८ ॥ अमृत-संदोह वाक्यप्रवाहें । स्वानंदजळप्रवाहे । स्वसुखहृदय निज निर्वाहें । चालिलें प्रबळ ॥ २९ ॥ श्रीरामस्वरूप सागरीं । समरसलीं साक्षात्कारी । ऋषिवाक्य महा गजरीं । गंभीर दुमदुमतिसे ॥ ३० ॥ ऐकोनि अगस्तीचें संभाषण । स्वरूपानुभव सुखवर्धन । जगदात्मा रघुनंदन । महा तोषें बोलत ॥ ३१ ॥ म्हणे ऋषिवर्या समर्था । अभिनव तुझे कृपेची सत्ता । मंत्र सर्वीजें प्रतिष्ठिता । धातुपाषाणीं देवत्व ॥ ३२ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । इंद्रादि महा सुरवर । जाले सभाग्य थोर । तुझ्या आशीर्वादें ॥ ३३ ॥ वैदिकीं दैविकी सत्ताद्वयें । माजि सामर्थ्य वर्ते अद्वय । तया सामर्थ्याचें रूप होये । वेदमुखें करूनियां ॥ ३४ ॥ निजसत्तेचें आस्तिक्यधन । नित्यनूतन वेदपुरातन । तया वेदाचें ऐश्वर्य संपूर्ण । भोक्ते वैदिक ॥ ३५ ॥ वेदीं प्रतिष्ठिला परमार्थ । तो वैदिकांचा जाणिजे स्वार्थ । त्या वेदार्थदानी समर्थ । चक्रवर्ति मुनिश्रेष्ठा ॥ ३६ ॥ तूं केवळ शिवाचा अतर्भाव । तुज प्रत्यक्ष सर्वदा शिव । तेणें स्वरूपाचा अनुभव । मूर्तिमंत होसी ॥ ३७ ॥ विश्वरूप तुझे दृष्टीसी । दिसे शिवरूप निश्चयेसी । भेददृष्टीचें तुजपासी । देखणें नसे ॥ ३८ ॥ आत्मपरायण पावना ।

ब्रम्हरूप तव भावना । चिदानंदघन वियमाना । देखसी मातें ॥ ३९ ॥ वसिष्टमुखें तुझी महिमा । ऐकोनि विश्रांति पावलों मुनिसत्तमा । तुझी कृपा निरूपमा । पदासी पाववी ॥ ४० ॥ माझ्या स्वरूपाचें महिमान । न कळे निगमादिकांसी जाण । ऐसा मी परम गहन । निवळलों गुरुमुखें ॥ ४१ ॥ जो गुरुकृपेचा प्रत्यय । तुझ्या संभाषणीं वर्धता होये । तव मुख आनंद चंद्रोदय । उचंबळवी मम प्रेमसिंधूसी ॥ ४२ ॥ रामअगस्ती संभाषण । निरोपम प्रमय संपूर्ण । वसिष्ठें करूनि श्रवण । प्रशंसिजेत अगस्तीतें ॥ ४३ ॥ ऐसिया अवसरीं अभिनव । हनुमंतासी प्रगटला सद्भाव । हृदईं विलोकुनी राघव । तटस्त जाला ॥ ४४ ॥ विशुध्द सत्व भुमिका विचित्र । तेथें प्रतिष्ठिलें विरक्ती क्षेत्र । तेथें अभिवृध्दीचें पावला पत्र । स्वानंद प्रौढीनें ॥ ४५ ॥ निर्धारिलें अनादि सुकृत । सफळ जालें निज हृद्गत । स्वरूप प्रातीचें अकल्पित । दैविक उदेलें ॥ ४६ ॥ मुमुक्षदशेचें लक्षण । सच्चित्सुखाचें अयतन । बाणलें सर्वांगीं चिन्ह । कपींद्रासी ॥ ४७ ॥ पूर्ण तपस्वी निष्ठावंत । विरक्त अग्रणी हनुमंत । अष्टभावें जाला उदित । विलोकिला श्रीरामें ॥ ४८ ॥ जाणोनि प्रेमळाचें हृदय । जाहला रघुवर सदय । तो भीमोपदेशसमय । सप्रचीत अवधारिजे ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेशचर्या । श्रवणें सेविजे चित्सूर्या । प्रभा प्रचीतीची तूर्या । म्हणे मेरु अनंत ॥ ५० ॥ प्रथम सूर्य सप्तम कळा ॥ ७ ॥ श्रीराम ॥ श्रीगोविंद ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥ राम ॥



श्री

## ॥ सूर्य १ कळा ८ ॥

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम निज सात्विकाचें वचन । प्रगटले हनुमंतीं सनातन । कारुण्यप्रेम कळवळून । चाळिलें नयनद्वार ॥ १ ॥ परम पवित्रता जिव्हार ।

सुकृताचें माहेरघर । भास्कर क्षेत्र प्रभाकर । निजभक्तीचा ॥ २ ॥ महा देहांतीक साधनें । नित्य नेम स्वभाव स्थितीनें । हनुमंती तोपवृत्तीनें । वसती सदाचार ॥ ३ ॥ दया शांति संमति । असाधारण सत्ता संपति । सामर्थ्य प्रताप विख्याति । विद्या चातुर्य ॥ ४ ॥ अद्‌भुत शक्ति चमत्कार लीळा । होय जगदांनंद जिव्हाळा । जो मुमुक्ष दर्शनें स्वलीळा । वरिला समीरात्मज ॥ ५ ॥ प्रज्ञा अंजनी गर्भ निधान । सिद्ध अनुष्ठाता तपोधन । सद्गतीचा अवसर लक्षून । होय सप्रेमभरे ॥ ६ ॥ करुणारसें द्रविलें चित्त । वरी अनुतापें घडवडीत । निखळ प्रेमाची मूर्तिमंत । स्वसुख उदधी ॥ ७ ॥ निर्धूत निःसंग निर्हेत । निःप्रपंच निर्मन विशुद्ध चित्त । अकल्मश विपयविगत । निर्मम उदासीन ॥८॥ स्वरूप साक्षात्कार संपदा । साधन सिध्य सर्वदा । महा संकटीं आश्रित पदा । न सोडी प्रतिज्ञाशील ॥ ९ ॥ ऐसा परम प्रतापी गंभीर । यशस्वी महा येकांग वीर । भव निर्वतक जिव्हार । निज विरक्तीचे ॥१०॥ महत्कार्य कर्ता रणशूर । सर्व कर्तव्यांचा परपार । जो संकल्पविहीन अभ्यंतर । होता जाला स्वभावें ॥११॥ जो बुद्धिमंतांचा अग्रणी । जगदांतर सूत्राची स्मरणी । सुतार्किकाचा चूडामणी । ह्रदय परिशुध्यकर्ता ॥ १२ ॥ निज अभ्यंतरीं रिघोन । शोधूनि पाहिलें मूळ स्फुरण । प्रति उल्लेख संस्थान । परिक्षिले बरवें ॥ १३ ॥ तवं तें अप्रांत अगोचर । मूळ प्रवृत्तीचे जिव्हार । जगत्कारण विधाकार । बीज ब्रह्मांड कोटींचें ॥ १४ ॥ जैसा कड्यावरील वोघ । लोटिला धरवेना वेघ । पोहोनि निज जीवीं अनघ । स्थिरावलासे तेथे ॥ १५ ॥ म्हणे हे प्रवृत्ती निवर्तावया । युक्ती चाळीतां गेल्या वाया । स्वकीय उपाये हे माया । निरसेचिना कीं ॥ १६ ॥ मी येवढा प्रतापी शूर । येथें माझा न चले कांहीं प्रकार । ऐसें विवंचितां अभ्यंतर । कोंडलें तयाचें ॥ १७ ॥ नदी प्रवाह अवरोधला । तो प्रमाण टाकोनि उचंबळला । तैसा प्रेमा पवाडला । सचिन्हांत बाहेरी ॥ १८ ॥ भीम भावार्थाचा गिरिवर । आनंदाश्रु चालिले निर्झर । श्रीराम सुख सुधाकर । नयन चकोरीं लक्षिला ॥ १९ ॥ सद्भाव दृष्टी श्रीरामचरणीं । प्रज्ञा चक्षु राम वदनीं । भृंगी कीटका परी ध्यानी ।

राहिला निरंतर ॥ २० ॥ म्हणे धन्य धन्य मी आजि कृतार्थ । माझें मस्तकीं श्रीरामसमर्थ । जरी हा बोलला तरी परमार्थ । प्रत्यक्ष जाला चि मज ॥ २१ ॥ माझें निज आराध्य दैवत । मायें होय प्रत्यक्षार मूर्त । तोषाभिप्रद विख्यात । सेव्य शिवादिकां ॥ २२ ॥ सिद्ध साधुयोगी वृंदें । यासी चि सेविती स्वानंदें । सकळ वरप्रद पदारविंदें । सेविती मुनिभृंगें ॥ २३ ॥ वेदांत रहस्य जिव्हार । श्रीराम ईश्वराचा ईश्वर । माझा स्वामी तो निरंतर । कृपेनें बोलला ॥ २४ ॥ माझिये मनोरथसिद्धीचा कळस । धरीं रामपादुकारज तोष । मज कायसी चिंता प्रकाश । रत्न हातासी आलियां ॥ २५ ॥ माझें भाग्यसृष्टी प्रभाकर । माझ्या पुरुषार्थाचा चि हा अवतार । माझे सत्कीर्तीचा निर्धार । प्रगटला रामरुपी ॥ २६ ॥ जरी हा न होता रामावतार । तरी व्यर्थ चि होता माझा संस्कार । पाहतां ब्रह्मादिकीं दिधले ते वर । श्रीरामेविण निर्फळ ॥ २७ ॥ सत्कर्में सुखें अर्जवावीं । ते सर्वार्थ प्रदपदवी । परी ते ईश्वरें चि करावी । योग्यता तियेची ॥ २८ ॥ नानाधान्य बीजे परवडी । पेरिता फळ प्राप्तीचि आवडी । परी ते पिकवी सुरवाडीं । सत्य ईश्वरसत्तेनें ॥ २९ ॥ सूर्यप्रसन्नता वरदान । सभक्तिल्या रामरुप निधान । स्वानंदघन अक्षयी धन । रघोत्तमरुपें ॥ ३० ॥ प्रवृत्तीचे पुरुषार्थ सकळ । जाले श्रीरामाकरितां सफळ । अघटीत कार्यकर्ता प्रबळ । मी रूढीलों रामकृपेनें ॥ ३१ ॥ कपटी राक्षसाचीं छंदें । अपेशाचीं रमणीय सद्में । कमनीय विमोहक पद्में । जीवभृंगावरोध ॥ ३२ ॥ दुरुक्तियांहीं महासंकटीं । कामोद्भव कारण त्रिपुटी । रक्षिलें निजचरण दृष्टी । रामचंद्रप्रभूनें ॥ ३३ ॥ श्रीराम सत्ता निजबळें । विभांडली रजनीचरकुळें । मज आटवितांचि कृतांतकाळें । चळीं कांपीजे ॥ ३४ ॥ स्वामीकार्यी मी धुरंधर । उदित सर्वारंभीं अभ्यंतर । म्यां प्रयोजनींच असावे तत्पर । हे चित्ताची प्रसन्नता ॥ ३५ ॥ विद्यमानी पाहतां साचार । निराक्षसी कृत चराचर । विजयश्रीनें रघुवीर । अभिषेचिला पटीं ॥ ३६ ॥ निष्कंटक जालें त्रिभुवन । निर्वैर रामराज्य संपूर्ण । शत्रुत्वजिती अभिधान । दरलोंचि नाहीं ॥ ३७ ॥ श्रीरामें निजमुखें मजला । काय कार्यभाग

सांगावा वहिला । यदर्थींच तोष मंदावला । जे मी अप्रयोजनीक ॥ ३८ ॥ स्वामीप्रयोजनीं वेचावा प्राण । तें चि जन्मासी आलियाचें प्रयोजन । देह धरिलियाचें प्रमाण । महत कार्ये करावीं ॥ ३९ ॥ तेसें चि माझे मनोरथ । सिद्धी पाविता श्रीरामसमर्थ । परंतु त्रैलोक्यासी केले कृतार्थ । निर्वैर समस्तां ॥ ४० ॥ शत्रुकुळ निर्मूळ केलें । निष्कंटक विश्व जालें । विजयध्वजासी उभविलें । पट्टाभिषेक समेसी ॥ ४१ ॥ आतां मज येक सुचलें जिवीं । जे श्रीरामाची अद्वैत पदवी । योगी मुनि सिद्ध स्वानुभवी । अनुभविती ते दशा ॥ ४२ ॥ द्वैत पदार्थ नाशिवंत । पदार्थ अवघा समजात । हरिहरादि पदें कल्पांत । पावती स्वभावें ॥ ४३ ॥ प्रवृत्तीच्या पुरुषार्थे कांहीं । मजला स्वहितसें वाटत नाहीं । आतां श्रीराम कृपेनें लवलाहीं । स्वरुपी अनुभवीजे ॥ ४४ ॥ इंद्रादि देव संपदा । क्षयाते पावोनि देती विपदा । ते अमृतहारी प्रमदा । इछ्या सदा फलहो करिती ॥ ४५ ॥ मछर न सुटे मनींचा । काय गौरव त्या देवप्राणाचा । ऋषि तापसी प्रवृत्तीचा । सोस करिती जिवीं ॥ ४६ ॥ ब्राह्मणोत्तम केवळ ब्रम्हा । तयाचे इछेसी नाहीं सीमा । तो प्रवृत्ती काम कर्मा । कुटुंबकावाडी ॥ ४७ ॥ अभिनव कर्मांची गती । परमात्मा आणिला प्रवृत्ती । विधिकपाल ईश्वराचे हातीं । भिकेसी लाविला तेणें ॥ ४८ ॥ परम पुरुष परात्पर । महाविष्णु जगदाधार । तयासी देहधारीं संस्कार । लाविला कर्मे ॥ ४९ ॥ विचित्र कर्माची गती । चंद्रसूर्य नक्षत्रें फिरती । या कर्मापासुनि कवणे रिघती । सुटिका होय न कळे ॥ ५० ॥ कर्मबंधन जन्मबंधन । अनिवार ते कामबंधन । दुराशा मोह अज्ञान । बंधन मायेच्या संकल्पें ॥ ५१ ॥ नानाचित्ताचे संस्कार । तितुकेहि बंधनें चि अपार । एक आत्मज्ञानेविण साचार । आक्रमिळे प्रवृत्तीनें ॥ ५२ ॥ अज्ञान भवपाशीं बांधलिया । होती यातायाती जिवासी या । दुःखाच्या राशी मागुतिया । भोगितां न सरती ॥ ५३ ॥ जंववरी नाहीं स्वरूप प्राप्ति । तंववरी मोहमय महा विपत्ती । नित्य दुःखें काय किती । अनुभविजेत ॥ ५४ ॥ क्षुधा तृषादि माहा मारे । जठराग्नी प्रळयरूप

पावेरे । त्याचें उपशांतीसी न पुरे । त्रैलोकींचा पदार्थ ॥ ५५ ॥ या कारणें प्रवृती । त्यागुनी सनकादिक संतीं । सेविली स्वरूपविश्रांति । सर्वकाळ ॥ ५६ ॥ आर्षभादि महासिद्ध । नित्य समाधानी प्रसिद्ध । निमग्न परमानंदीं उद्बोध । अमृतपानें निवाले ॥ ५७ ॥ एवं सद्भाव स्थिरतेने । अंतर कळवळिलें विरक्तीनें । प्रेम द्रवलें सद्भक्तीनें । प्रत्यक्ष शरीरीं ॥ ५८ ॥ स्वेद कंपरोमांचित । आनंदाश्रु नयनीं लोटत । स्तंभीभूत अचेत । दशेनें भीम वरिला ॥ ५९ ॥ चित्त निर्वाण मूर्छायुक्त । अवचट आयुर्भविला सत्त्व तेथे । तेणें सद्गद असे कांपत । कंठावरोध सहजें ॥ ६० ॥ वाचा निष्फळिता वदनी । अंतःकर्णीचे न ये चि वचनीं । दाटलें हृदय दृष्टीसी देखोनी । सभा विस्मित जाली ॥ ६१ ॥ मारुतीसी देखोनी श्रीराम । विस्मित जाला असे परम । तो भीम अंतर्भाव निरुपम । प्रगटेल पुढे ॥६२॥ इति श्री भीमोपदेश । आत्मानुभव निर्विशेष । प्रबोधविळ परम पुरुष । म्हणे मेरु अनंत ॥ ६३ ॥ प्रथम सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥



श्री

## ॥ सूर्य १ कळा ९ ॥

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसिद्ध संभवसुखें । भीमासी समीप पाचारी हरिखें । विचारी हृद्गत निजमुखें । कृपाईक्षणीं विलोकित ॥ १ ॥ श्रीराम अवचितां हृदईं । विवंचना करूनि सर्वहीं । ह्मणे आजि महत्सुख सर्वांसही । परि विपरीत कां हनुमंतीं ॥ २ ॥ वसिष्ठादि महा ऋषेश्वर । पट्टाभिषेकसुखें निर्भर । तैसे चि शिवादि सुरवर । अत्यंत तोषें तोषले ॥ ३ ॥ विश्व अभ्यंतर सुखावलें । त्रैलोक्य सभेमाजि वसलें । तितुकियाचें हृदय आनंदलें । सभास्थानीं पाहतां ॥ ४ ॥ श्रीराम वसिष्ठाकडे पाहोनी ।

भीम चिन्ह सुचविलें ईक्षणीं । वसिष्ठ ह्मणे मोक्षपाणी । तव कृपेसी पात्र असे हा ॥ ५ ॥ अनादि प्रारब्ध जातमाया । सरळी विकल्पेंसी दशकाया । संपूर्ण सुकृताची चर्या । फळली हनुमंतीं ॥ ६ ॥ हे मुमुक्षदशा गहन । जयासी वाणली तो पावन । कृपा करूनि सनातन । कृतार्थ करी रुद्रासी ॥ ७ ॥ अगस्ती ह्मणे रघोत्तमा । मारुतीच्या सुकृता नाहीं सीमा । तुझे कृपेसी पात्र जाला प्रेमा । प्रत्यक्ष सुचवी. तो ॥ ८ ॥ इतर संकल्प नाहीं हनुमंतासी । हा जितकाम तेजोराशी । आतां संकल्पशून्य दशेसी । अतिशयेंसीं आला असे ॥ ९ ॥ तरी कृपा करूनि सर्वोत्तमा । रहस्य सांगोनी पूर्णकामा । स्वरूप साक्षात्कार हनुमा । सुखी करी कृपालुवा ॥ १० ॥ ऐसे चि ऋषेश्वर सकळ । ह्मणती आत्मया तूं कृपाळु केवळ । रुद्राचे अभिष्ट पुरवीं अकळ । विवंचुनी हृदया ॥ ११ ॥ ऐकोनि वसिष्ठादिकांचि उक्ती । आत्माराम सुखावला चित्तीं । ह्मणे मज विपरीत स्थिती । पाहतां गमली याकडे ॥ १२ ॥ अवसरीया तोषयुक्त असतां । कां विक्षेपिलें या हनुमंता । काय कीं मजकडुनि पाहतां । कांहीं अंतर पडिलें ॥ १३ ॥ अथवा कांहीं सीतेपासुनी । अंतर पडिलें असेल वर्तमानीं । ना तरी भविष्यार्थ भावोनी । काय हा चिंतावला ॥ १४ ॥ सीतेसी अवलोकुनी श्रीरामें । ह्मणे तुझा प्रेमा हनुमंतीं नेमें । हा परमभक्त नित्यानुक्रमें । सेवेसी तत्पर ॥ १५ ॥ येणें अशोकीं तुज सुखी केले । येणें तुझे शुद्धीनें मज तोषविलें । येणें महत्कार्य सिद्धीतें नेलें । बांचविलें ममानुजासी ॥ १६ ॥ येणें राक्षससैन्य विभांडिलें । येणें लंकादुर्ग विघडिले । येणें विजयश्रीनें अभिषेचिलें । स्वराज्यपदीं मजला ॥ १७ ॥ याचे कृतोपकार उत्तीर्ण । होइजेत ऐसें नाहीं आन । याचे गुणकीर्तीवरून । त्रैलोक्य कुरवंडी कीजे ॥ १८ ॥ दाटलो याचिया कृतोपकारें । उत्तीर्णतेसी कांहीं च न स्मरे । याच्या वात्सल्यरसनिर्झरें । मी वर्धलों संपूर्ण ॥ १९ ॥ केवळ कौसल्येची दया । ते या हनुमतीं वसे चर्या । दशरथाची प्रीति सांगावया । उपमेसी हा चि येक असे ॥ २० ॥ मजवरी भरताची जैसी आवडी । तैसी या कपींद्रा बसे प्रौढी । याचे प्रीतीनें मज कडोविकडी । गोऊनि ठेविलें

सीता हनुमंत । तत्वत्रयाचा क्रम इत्थंभूत । राम ब्रह्मज्ञान सप्रचीत । वैदेही सहजें ॥ ३ ॥ मुख्य प्राण तो हनुमंत । जेणें वर्धविलें जीवजात । चित्शक्तीनें तें विख्यात । फळप्राप्तीसी आणिलें ॥ ४ ॥ श्रीराम सर्वांचें अधिष्ठान । निर्विकार निरंजन । कर्ता कार्य कारण । तेथें असेचिना ॥ ५ ॥ कारण ते सीता संपूर्ण । कार्यबद्ध मोक्ष रूप जाण । कर्ता तो चि मुख्य प्राण । हे कारण त्रिपुटी ॥ ६ ॥ असो या कारणसंगें । कर्ता रूढला श्रीराम निजांगें । गुरुशिष्य होउनी सानुरागें । रूढला प्रबोधीं ॥ ७ ॥ श्रीराम संपूर्ण अधिष्ठान । त्या दक्षिणांकीं विज्ञानघन । समीरात्मज मुख्य प्राण । सत्पात्र कृपेचें ॥ ८ ॥ परम पुरुषाचा प्रीतिनंदन । विश्वजीवन स्वानंदघन । निजांगप्रभा संवर्धन । विश्वसाक्षी स्वभावें ॥९॥ साक्षत्वरहित आत्माराम । तयाचें हृदयज्ञान परम । ज्ञानकृपेचे सत्तेनें बल्भीम । प्रबोधित सीता ॥१०॥ वामांगीं चित्शक्ति माया । प्रबोधासी वर्धविलें तिया । फळप्राप्तीसी आणुनियां । अनुभव दिधला ॥११॥ तोप होउनी तृषा हरिली । अमृत होउनी मरणें मारिलीं । अन्नें होउनी प्रतिपाळिलीं । कुळें विश्वांचीं ॥ १२ ॥ निद्रा होउनी निरूपम । निवारिला देहाचा विराम । सर्व संकल्पाचे काम । सिद्धीनें पुरविलें ॥ १३ ॥ धर्मार्थकाममोक्ष । वर्धवी जगन्मातेचा कटाक्ष । सर्वोत्तम पदवी प्रत्यक्ष । निजवल्लभासी निवेदिली ॥ १४ ॥ श्रीराम सीतेचेनि होय योलिका । चालों सिकविला सीतेनें चि निका । सर्वस्वें त्या रविकुलटिळका । रूढीसी आणिलें प्रियेनें ॥ १५ ॥ अभिनव रूढली वैदेही । श्रीरामासी सच्चिदानंद देहीं । करूनि वामांकीं लवलाहीं । आरूढली सुखें ॥ १६ ॥ जेणें ब्रम्हांड निर्मिलें । तेणें चि येक सद्म निर्माण केलें । पिंड ब्रम्हांड ठेविलें । नामाचें लक्षण ॥ १७ ॥ येक पुरुषक्रमें करूनि रूढले । येक प्रकृत्तीक्षेत्रें प्रतिष्ठिले । उभयामाजि प्रवर्तले । कारणकार्यकर्तृत्वें ॥ १८ ॥ कारण तें पुरुष शरीरीं । कार्य कर्तृत्व प्रकृतीमाझारीं । त्यासत्र प्रत्यगात्मा मदनारी । प्रकृतिजन्य स्वभावें ॥ १९ ॥ साच चित्शक्तिने चिदंबर । सुधामय वसुमती साचार । सच्चिदानंद कंद अंकूर । स्वभावें अंकुरले ॥ २० ॥ ते जाणिजे

ब्रम्हाविष्णुमहेश्वर । आदि शक्ति संभव अगोचर । विलोकुनी तियेसी परात्पर । आत्माराम बोलत ॥ २१ ॥ म्हणे हा मुख्य प्राण सर्वोत्तम । यासी उपदेशी सीते परब्रम्ह । जेथें अद्वैत श्रुतिसंगम । सामावले सुखें ॥ २२ ॥ प्रियेसी संबोधउनी मधुरोत्तरें । हनुमंताकडे पाहिलें श्रीरघुवीरें । तव रुद्रें उठोनियां चमत्कारें । अभिवंदिलें श्रीरामासी ॥ २३ ॥ सप्रेम जनकजावल्लभें । हनुमंतासी आलंगिलें यारंभें । स्वरूपप्रद सत्यलाभें । जडला भीम श्रीरामपदीं ॥ २४ ॥ पद धरूनियां निज हृदयीं । सच्चित्सुखात्मा आणि वैदेही । निज दृष्टीसी विलोकुनी सर्वही । मनोरथसिध्दि पावतसे ॥ २५ ॥ हनुमंताचा उपदेशक्रम । श्रीरामसभेसी तोष परम । विश्रांतीचा अवसर सप्रेमें । आनंद प्रवर्तवी सकळ ॥ २६ ॥ स्वरूप उपदेश स्थिती । बोधी प्रवीण चिच्छक्ति । जेविं सुगरणीहस्तीं । होती पदार्थ परवडीचे ॥ २७ ॥ स्वयंपाक जालिया उत्तम । भोक्ते पाहिजेत समर्थ परम । तरी त्या परवडी निरूपम । प्रचीतीसी येती ॥ २८ ॥ ना तरी केलें तितुकें व्यर्थ । उदंड बोधिला परमार्थ । निष्ठावंताविण कृतार्थ । सार्थकासी न येती ॥ २९ ॥ सीतेची प्रबोध पदवी । विज्ञानप्रद सिद्ध अनुभवी । त्रैलाक्य आत्मा प्रगटवी । प्रशंसूनि सीतेतें ॥ ३० ॥ आत्मारामाची प्रिया सीता । केवळ स्वरूपदशा चि तत्वता । आत्मसाक्षात्कारें वस्तुता । बोधीतसे कपीतें ॥ ३१ ॥ तव श्रीरामाकडे पाहोनी । बोलता जाला अगस्तिमुनि । भविष्योत्तर ऋषीची वाणी । ऐसी च पूर्वी वदली ॥ ३२ ॥ सीता राम हनुमंत । येक हृदय सदोदित । उपदेश क्रमसंकेत । अद्वैत रामायणीं ॥ ३३ ॥ तो प्रसंग आजि डोळां देखिला । माझ्या भाग्याचा दिवस पाहिला । आजि अमृताचा वर्षाव जाला । वर्तला परमानंद ॥३४॥ सीता तत्व चित्प्रकाशक । जेवि सूर्य बिंबीची कळा सम्यक । स्वयंभू बिंब निष्कलंक । आत्मसूर्य श्रीरामा ॥ ३५ ॥ हे चिदानंद गरिमा चिच्छक्ति । बोलली चतुर्विध पुरुषार्थ स्थिती । अक्षय संपदा विख्याति । भुवन भरणदशा ॥ ३६ ॥ परम रसाळ अगस्तिभाषण । तोषला सर्वात्मा सुखैकघन । तटस्त जाले सभेचे जन । आदिशक्तीच्या

सप्रेमें ॥ ३७ ॥ अमृत संदोह भागीरथी । अगस्तिप्रोक्त सीतास्तुति । अनुभव गिरिहृदय सन्मती । चालिली प्रवाहें ॥ ३८ ॥ अद्वैत महा पर्वणी । मिळाले सिद्ध ऋषिमुनि । गंगाधरसह शर्वाणी । ब्रह्माणीसह ब्रह्मा ॥ ३९ ॥ अमरेंद्र आणि इंद्राणी । सीतास्तवनें राम आख्यानी । मज्जती सानंदजीवनीं । मननयुक्त सकळ ॥ ४० ॥ सनक सनंद सनत्कुमार । नवसिद्धादि कपिल मुनेश्वर । विज्ञानघन जिव्हार । मज्जती सुखें ॥ ४१ ॥ दिगंबर ब्रह्मानंदघन । श्रीरामचरित्र अनुसंधान । मननें करूनियां स्नान । वैसल्या समाधिस्त सभेसी ॥ ४२ ॥ श्रीरामसंभव संजीवनी । जयघोष मुखें सुख श्रवणीं । सर्वांग क्षाळण मननीं । पवाडतो सुस्नात ॥ ४३ ॥ त्रैलोकीचे भाविक जन । अर्थावगाहनें जाले पावन । जय जय रामघोषें गर्जेन । कथानुसंधानीं वसे ॥ ४४ ॥ प्रचीतीच्या तत्वदर्शनीं । सभा अवघी समाधिस्त श्रवणीं । आत्मसाक्षात्कार भरणीं । भरतसे मुनि सुखें ॥ ४५ ॥ विश्वमुखीं तारक उच्चार । तेणें शब्दें दाटलें चिदंबर । ब्रह्म सायोज्यता अवसर । प्रत्यक्षतेसी आला ॥ ४६ ॥ अपरोक्ष होतसे विवर । भेदोनियां निज ओंकार । स्वरूप साक्षात्कारीं धर । घोष मिळाला ब्रह्मीं ॥ ४७ ॥ ज्योतिर्मय आनंदघन । जयघोष जाला तो सुलीन । पुढें अगस्तिमुखीचें संभापण । अवधारिजे श्रोतीं ॥ ४८ ॥ इति श्री भीमोपदेश । ब्रह्मानुभव क्रमविशेष । सकळ श्रुतीचा सारांश । म्हणे मेरु अनंत ॥४९॥ प्रथम सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य १ कळा ११

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीरामा स्वानंद वर्धनीसी । निजांग दीक्षा तुझी ऐसी । अमृतोद्भव विख्यातीसी । विख्यातिकर्ता गुरु तूं ॥ १ ॥ सफळ सारांशाचें तात्पर्य ।

ब्रह्मानंदाचार्या आश्चर्य । ब्रह्मसाक्षात्कार्यसूर्य । वंश उद्धरणा ॥ २ ॥ ऐसीं अगस्तीमुखींचीं संबोधनें । प्रचीतीचीं प्रखर वचनें । अखिल हृदय प्रकाशमानें । चिद्रत्नें चि तें ॥३॥ अनुहात शब्दें गाजे नभ । तेविं अगस्तीमुखींचे शब्द स्वयंभ । रामसभा ते अक्षोभ । ग्रासित निःशब्दातें ॥ ४ ॥ अनादि चित्कळा घनवटें । प्रभेत विज्ञानरवि प्रगटे । ब्रह्मप्राप्तीचा बोध उद्घाटे । प्रसवतसे वरिवरी ॥ ५ ॥ त्या निःशब्दें रूढली परा । प्रचीत समेच्या अभ्यंतरा । ब्रह्मसमाधी त्या अवसरा । घेउनि गेली ॥ ६ ॥ वसिष्ठ ऋषि तो ब्रह्मवेत्ता । वेधी सावधान तत्वता । सुखावरोध नसे चित्ता । अमळ वस्तुरूप तो ७ ॥ बोधामृत रसायन । अखंड करीतसे पान । परी त्या उन्मादें अनुसंधान । न पालटे कदा ॥ ८ ॥ महा सुखाची निजमस्ती । ब्रह्मानंदघन महस्ती । अखंड उन्माद निर्वेध स्थितीं । परि तो सावधान ॥ ९ ॥ अखंडैकरस सुखें घोंटित । उन्मनीपर निमग्न चित्त । प्रवृत्तिमुळींहूनि विवर्जित । आत्मरूपचर्या ॥ १० ॥ अगस्तीसी ह्मणे वसिष्ठ भगवान । तूं ब्रह्मवेत्ता स्वानंदघन । विज्ञान कृशाननयन । दक्षिणें प्रत्यक्ष तूं ॥ ११ ॥ तरी श्रीशंकराचें निजहृदय । तुवां अनुभविलें सदोदय । त्या स्वप्रकाशचर्येची निरामय । दशा प्रगट करीं ॥ १२ ॥ शंभूचें स्वयंभ अभ्यंतर । अगस्ति होउनी निरंतर । आत्मस्वयंभू सुता प्रतिउत्तर । देता होय चमत्कारें ॥ १३ ॥ ब्रह्मबोध विधिनंदन । अनुभवकंद स्वसुखवर्धन । श्रीराम होउनी सनातन । अवधारितसे ॥ १४ ॥ अगस्ति म्हणे स्वबोधस्थिती । तूं ब्रह्मस्वरूप महामती । ब्रह्मदेव तुजप्रती । जें तत्व सांगितलें ॥ १५ ॥ त्या निजतत्वास्तव तत्वता । चालिला उपदेश पाहतां । आत्मप्राप्तीस्तव सर्वगता । झड घालिती सर्व ॥ १६ ॥ आत्मतोषप्राप्तीविना । कोण्हासी कोण्ही च विचारेना । त्यास्तव हे ज्ञानसंभावना । मुळींहुनी चालिली ॥ १७ ॥ सकळ विपर्यास घोर । ब्रह्मविद्या चि जाण साचार । नाना दुःप्रवृत्ति संसार । ब्रह्मज्ञानें निरसे ॥ १८ ॥ ब्रह्मज्ञानें ब्रह्मप्राप्ती । ब्रह्मज्ञानें भवनिवृत्ती । ब्रह्मज्ञानेंविण कल्पांती । संसार सरेना ॥ १९ ॥ त्या ब्रह्मज्ञानाचें

निजमूळ । आत्माधिष्ठान विष्णु केवळ । त्या विष्णूचें हृदय प्रांजळ । बोधविधि तव पिता ॥ २० ॥ बोधविधि हृदय सहज । होसी तूं अनुभवी योगीराज । तुझे दीक्षेचें निज तेज । प्रगट रघोत्तमीं ॥ २१ ॥ ब्रह्मदेवाची अंतरस्थिती । भविष्योत्तरें विश्वविख्याति । रामायणप्रसंगें वाल्मिकाप्रती । प्रबोधिलें विधीनें ॥ २२ ॥ रामतापिनी अगोचर । तत्त्वानुक्रम वेदसार । जें आदि शेषासी साचार । दिधें प्रबोधिलें ॥ २३ ॥ तो पातंजली भगवान । शब्दसृष्टीचा होय सुभान । शब्दसंभव अनुसंधान । सूत्र विख्यातीनें ॥ २४ ॥ षट्शास्त्रांचीं नाना प्रमेयें । विविध काव्यरचना अन्वयें । प्रौढीसी आलीं निजहृदयें । स्वभाव आत्मसत्तेनें ॥ २५ ॥ त्या निजभाव विधी त्या प्रती । हंसरूपें मुख्य अंतरस्थिती । प्रबोधिलें तें चि विश्वविख्याति । ज्ञानसद्म संभवें ॥ २६ ॥ चतुःश्लोकी ते भागवत । देवऋषीनें अखंडित । अनुभव सुखें अभ्रांत । घेतलें सुख कीर्तनीं ॥ २७ ॥ नारदें व्यास अनुग्रहिला । व्यासें पुराणीं विस्तारिला । परंपरा सृष्टीसी चालिला । इतिहास क्रमें ॥ २८ ॥ परिपाठ आणि प्रचिती । भविष्य आणि वर्तती स्थिती । होतसे जितुके प्रवृत्ती । जयासी प्रांजळ ॥ २९ ॥ करपद्मींचें मुक्ताफळ । सूर्यतेजें दिसे झळाळ । तें चक्षूचें वैभव केवळ । तेविं प्रांजळ व्यासमती ॥ ३० ॥ पाठीसी असलिया डोळे । मग पाठीमोरें केवि कळे । पाठीचें न दिसे सर्वाळे । विज्ञान तेज तें ॥ ३१ ॥ निखिळ सूर्यबिंबासी । पाठीपोटींची सीमा कायसी । अखिळ प्रकाशाची राशी । तेवि आत्मविद ॥ ३२ ॥ निजांग तें निर्मळ ज्ञान । तयासी डोळा लक्षिजे कवण स्थान । या चि दृष्टीनें सज्ञान । डोळस स्वरूपीं ॥ ३३ ॥ सज्जन दृष्टी ते चित्प्रकाश । अद्वैत सृष्टीचे कळस । समाधि शय्या राहिवास । स्वानंदसदनीं ॥३४॥ विगतमतिरत उन्मनी । आपपर न संभवे ईक्षणीं । स्वानंदघन सिंहासनीं । आरूढदशा ॥ ३५ ॥ ऐसे योगी ब्रह्मविद् अपार । त्यांचा नृपचक्री रघुवीर । तो तुझा होय अनुचर । परम निष्ठेनें ॥ ३६ ॥ तुझ्या उपदेशींच साचार । विश्रांतीसी आश्र निरंतर । सकळांसी सुखकर्ता ईश्वर । जयासी ध्यातसे ॥ ३७ ॥

शंकरें मज जें उपदेशिलें । तें रामतत्व वेदीं प्रतिष्ठिलें । त्या श्रीरामासी तुवां अनुग्रहिलें । येवढा प्रतिष्ठावंत तूं ॥ ३८ ॥ सच्छिष्याचा मस्तकमणी । होऊनि वर्ते तुझ्या वचनीं । वसिष्ठ सत्कीर्तीनें जनीं । आख्यात जाले ॥ ३९ ॥ तुज न कळे तें काय आहे । आनंद सिंहासनीं प्रत्यय पाहे । सर्वोत्तम दीक्षाप्रद हे । पदवी तुझेनि प्रसिध्द ॥ ४० ॥ सगुणज्ञान क्रमान्वयें । निर्गुणतत्व रामस्वयें । प्रचीतीचें अभ्यंतर प्रमय । लांचावलें भक्तीसी ॥ ४१ ॥ आनंदविग्रही रघुराज । स्वरूप साक्षात्कारीं महातेज । जयाच्या ईक्षणें चि महांकाज । सिध्दीतें पावे विश्वीं ॥ ४२ ॥ आपुला अनुभव आपण । ध्यावया धरिला प्राण । सकळांसी धावया दर्शन । उत्तमोत्तम रूपासी आला ॥ ४३ ॥ विश्व अपेक्षित ऐकावया । प्रतिष्ठिलें श्रोत्रद्वया । सकळांसी वर द्यावया । आला वचन क्रमासी ॥ ४४ ॥ निजहृदय सनातन । विश्रांति बोधावया स्वानंदघन । धरिलें श्रीमुख सुप्रसन्न । आल्हादकर चंद्रा ऐसें ॥ ४५ ॥ विज्ञानघन दाशरथी । पतितपावन महामूर्ति । तुझा अनुग्रहीत होउनि प्रीति । अनुसरे सर्वस्वें ॥ ४६ ॥ स्वसुखकंद रघुनंदन । अविबोध भवकंदन । मुनिवृंद सिध्दाभिवंदन । करिती तया ॥ ४७ ॥ हा स्वानंदसृष्टीचा पाळक । हा सर्व क्षत्रियांचा सूत्रचाळक । हा कारणसृष्टीचा बाळक । प्रसवता होये ॥ ४८ ॥ याची चिच्छक्ति अभिनव । हृदयासी बोधी नवनव । नवरस सिध्दि अभिनव । जगत्कारण स्थिती ॥ ४९ ॥ सत्ये चि श्रीराम तियेचेनि । आत्मप्रसिद्धीसी आला जनीं । महां बळिवंत शक्तीचेनि । धनुर्विद्या वीरोत्तम ॥ ५० ॥ पंच तत्वाचीं सारबीजें । अंकुरलीं विश्वबीज सहजें । अनंत विग्रह सत्तेजें । रूपासी आला ॥ ५१ ॥ द्रष्टा साक्षी सर्वकर्ता । अवतार चर्येचा होय भर्ता । परेहूनि त्या पर्ता । अनुभव चिच्छक्तीचा ॥ ५२ ॥ विश्वकुटुंबिनी रामप्रिया । विश्वसंभव परिपाळण दया । विश्वसंवर्धन चैतन्य काया । कळवळा जियेचा ॥ ५३ ॥ विविध नामरूप रूढवी । सकळांसी परतत्व पदवी । विश्वाभिराम मुळीं जडवी । अक्षय स्वरूपें ॥ ५४ ॥ परत्रीच्या निजस्नेहें । कृपेनें महा-

दिशांसी पाहे । सर्व सत्तेची सत्ता सीता हे । तत्वार्थ उपदेशिती ॥ ५५ ॥ या सीतेचेनि प्रसंगें । रूढला जगीं श्रीराम सन्मार्गे । दुष्टदमनचर्या शक्तीयोगें । सात्विक परिपाळण ॥ ५६ ॥ व्यापक व्याप्य न होनी । राम व्यापक जाला जनीं । हे विज्ञान शक्तिकरणीं । अद्भुतदशा ॥५७॥ राम पुरातन नित्य नवा । राम सर्व जीवांचा विसावा । राम सीतेचेनि जीव-शिवा । आनंदविता होये ॥ ५८ ॥ गगन सकळांसी व्यापी । राम गगनासी आटोपी । सत्य सीता चित्संकल्पीं । इतुकें करितसे ॥ ५९ ॥ ज्ञानाचा हि न साहे संग । ऐसा परम उदासीन निःसंग । हा हि सीतेचा चि प्रसंग । श्रीरामीं कांहीं न घडे ॥ ६० ॥ सकळ हृदय ते चित्कळा । तियेचे पोटीं तत्वजिव्हाळा । जगत्संभव ते अवयीळा । महा शक्ति सीता ॥ ६१ ॥ चिरशक्तीच्या अंतरीं । कौसल्या होती सहस्त्वरी । जीव दशरथ शरीरीं । तैसे चि अवतार कर्म ॥ ६२ ॥ उद्धार सृष्टीचा भाग्योदय । तैसा चि रघोत्तम अवतार होये । लावण्यासी कुर्वाळी जे विस्मयें । धरी मनोहर चर्या ॥ ६३ ॥ वंशपरंपरा राघवें । गौरवीत आणिला निरावेव । हें परमशक्तीचें वैभव । जाणिजे वसिष्ठा ॥ ६४ ॥ *श्रीराम निःसंग येकायेकी । यातें कवण पा अवलोकी । होती मूळमाया* जानकी । इचेनि आह्मी देखिला ॥ ६५ ॥ हें सीतेचें जाणोनि अंतर । तोषतसे जीवीं रघुवीर । त्यास्तव हनुमंतासी साचार । बोधवी सीतेच्या मुखें ॥ ६६ ॥ ते आदिशक्तीची विख्याति । अवधारिजे पुढें श्रोतीं । अगस्तीवाक्य प्रमय स्थिती । संतीं परिसिजे ॥ ६७ ॥ इति श्रीभीमोपदेश । सीताराम तत्वप्रकाश । उपक्रमध्वनितार्थ तोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ६८ ॥ प्रथम सूर्य येकादश कळा संपूर्ण ॥



श्री

## सूर्य १ कळा १२

॥ श्रीरघुनंदनाय नमः ॥

श्रीरामसीता अभ्यंतर । निराश्रयतत्व साचार । राम सनातन निर्विकार । अनुभवी सीता ॥ १ ॥ उपक्रम उपसंहार स्थिती । सीतेची घडमोडी महाप्रवृत्ती । राम शाश्वत अवंती । जैसा तैसा चि असे ॥ २ ॥ जाति वर्ण विकार नसे । आश्रमधर्म कांहीं च न दिसे । सीताग्रहणीं होउनी विश्वासें । गृहस्थ केले श्रीरामासी ॥ ३ ॥ दीपकळा रूप होउनी । जाळी पदार्थासी विलोकुनी । राम सीता या अनुसंधानीं । विश्व भरिलें ॥ ४ ॥ विज्ञान ते वसिष्ठावधान । प्रचिती अगस्ती अनुसंधान । उभयाचें हृदय अवधान । उभयांनीं प्रकाशिलें ॥ ५ ॥ अवधान आणि अनुसंधान । देखिलीच नाहीं सनातनें । तें रामतत्व गहन । जाण दं वसिष्ठ ॥ ६ ॥ सीता अनुभवें श्रीराम । रामानुभवें सीताभिराम । उभय प्रचीतीनें परम । प्रासि सर्वत्र ॥ ७ ॥ आराम पावले योगेश्वर । निजांगरमणें उन्मनीपर । रामशब्दार्थ परात्पर । परम विश्रांति ॥ ८ ॥ रकार अग्निवर्ण दुर्धर । मकार माया अंधकार । मकारासी निरसुनी तो रकार । प्रकाशला स्वरूपें ॥ ९ ॥ रामशब्दाच्या उच्चारें । पापें निवारिलीं दुष्करें । कपाट होऊनी त्या मकारें । येऊं ने दितां वारिलीं ॥ १० ॥ रमु क्रीडायां धातु हे । याचि अर्थें स्वरूपीं सुखें राहे । स्वरूपानुभव दशा हे । रमविती कळा ॥ ११ ॥ नित्यानंद संवर्धनी । ते धातु चि विदेहनंदिनी । जगदानंदकरणी । आत्मयोगचर्या ॥ १२ ॥ रामसंबोधन तत्वार्थ । हृदयार्थवी परमार्थ । सुखकर होय सर्वार्थ । प्रकाश भानु ॥ १३ ॥ लिखिळ सुखाचें अयतन । परा अर्जित अक्षयीधन । अनुभव स्थितीचें सदन । अभिधान रामाचें ॥ १४ ॥ अवचट वाचेसी येतां राम । सरिसाचि हृदयीं भरे विश्राम । निष्कामबोधें निरूपम । दशेसी प्रगटे ॥ १५ ॥ रामस्वानंद शर्करा । रसना होउनी गोडी दे अंतरा । राम मधुरामृत मधुरा । मधुर करीतसे ॥ १६ ॥ सकळां

सुखकर शंकर। त्या शंकरासी सुख देत अपार। रामाचा घेऊनि अभयंकर। किंकरदीक्षेनें वर्ते ॥ १७ ॥ राममात्रा रसायन। करी भवरोग उपशमन। रामनामामृतपान। करितां अमर होइजे ॥ १८ ॥ साच चि या दोहीं अक्षरीं। याचविलीं अमृतें या लोकोत्तरीं। रामसंजीवनी निर्झरीं। महा सिद्ध संरक्षिले ॥ १९ ॥ श्रीरामशब्दीं चमत्कार। तारक ब्रह्मीं जगदोद्धार। चित्शक्तियोगें साचार। फळप्रद होय ॥ २० ॥ स्वानंदघन जालियां वृष्टी। पेरिलीयाविण प्रज्ञा सृष्टी। सफळ गुरुकृपादृष्टी। सीताराम प्राप्तीसी होये ॥ २१ ॥ लावण्यसिंधु सोमसुंदर। सीतावदनाब्ज दिवाकर। तो सीतामुखचंद्रीं चकोर। अपेक्षित अमृता ॥ २२ ॥ श्रीराम परतत्व निरंजन। सीता विज्ञानतत्व सुखघन। साच चि सीतेचेनि विमोचन। जालें सुरवरांसी ॥२३॥ सीता सत्तात्मक सर्वसृष्टी। देव दानव मानव कोटी। व्यक्ति विस्तारें परिपाटीं। संपूर्ण सीता ॥ २४ ॥ सीता विश्वमूर्ती असतां। विश्वकारण होय अहंता। स्वानंदजळीं अहंमलिनता। ज्ञयगंधवती होये ॥ २५ ॥ भव औषधीयोगें निजजीवन। त्रिगुण मधुरामृती क्षण। तेंचि द्विधा होउनी षड्गुण। क्रमें षड्रसासी ये ॥ २६ ॥ गुणसाम्यें गुणक्षोभ। दाखवितें सत्ता अक्षोभ। त्या गुणक्षोभापासुनी प्रक्षोभ। जाला विश्वाकारें ॥ २७ ॥ ब्रम्हाश्रित तो नित्यानंद। परमात्मा विज्ञानकंद। हे सीतेची च सत्ता विद्रद। वेध होय सर्वत्रां ॥ २८ ॥ अहं ब्रम्हास्मि अनुसंधान। अर्धमात्राश्रित तत्वज्ञान। अनुभउनी सुखनिदान। सहज वृत्तीसी आलें ॥ २९ ॥ जाला अविवेचा संसर्ग। पंचतन्मात्रा उत्पति स्थिति सर्ग। महतत्व उद्भती विसर्ग। नाना साक्षत्वें ॥ ३० ॥ विश्वकारण म्हणावें तया। विश्वोद्भव तेथुनियां। महदाहंकार अहंकारत्रया। नित्य संमवीतसे ॥ ३१ ॥ त्रिगुणाची रूपें संपूर्ण। जालीं विश्वायतन सज्ञान। *सर्वसाक्षी ज्ञानाज्ञान। प्रकाशलें तेथें ॥ ३२ ॥ निज द्रष्टव्याचे नयनीं।* विश्वलोचन कळा देखणी। विश्वश्रवण अवधानी। विश्वरूप सत्ता ॥३३॥ प्रकृतीपासून अव्याकृत। महाकारणी कारण होत। हिरण्यगर्भी अकल्पित। वासनात्मक जालें ॥ ३४ ॥ तें समूळी अपंचीकृत। पंचतत्वप्रवेशें संमिश्रित।

संभवलें सबळ पंचीकृत । सत्ता ईश्वर दशेनें ॥ ३५ ॥ पंचीकृत ब्रम्हांड-
कोटी । अविद्या कुर्कटीचे पोटीं । नाना विस्ताराच्या सृष्टी । गणना होय
॥ ३६ ॥ अविद्या वासना विस्तार । लक्ष चौऱ्यांसी संस्कार । खाणीवाणी
मूळसंसार । प्रमाणासी नये ॥ ३७ ॥ वर्तत असतां निरहंकृती । वसिष्ठा
तुझे चि कुळीं तो लंकापति । अहंकृतीनें त्रिजगती । आक्रमिलें तेणें ॥३८॥
कामादि दुष्ट परिवारें । अज्ञानसिंधु परिघपती सारें । कपटमुळीं त्रिकुट-
प्राकारें । बळावळा दुर्जय ॥ ३९ ॥ तयासी निरहंकृती । आणावया महा-
सती । हे मूळमाया चित्शक्ती । मूळींहूनि आली ॥ ४० ॥ सात्विक देवत्रय
सृष्टी । पावन करूनि निजदृष्टी । तत्व महीतळासी आनंदवृष्टी । करीत
आली ते ॥ ४१ ॥ देखिले देव महा संकटीं । तेणे क्षोभली लावण्यपेटी ।
विंशतिकर योग त्रिकुटीं । पाहोनि आली मैथुले ॥ ४२ ॥ नरोत्तम महा
वीर रूप । शामशरीरें सत्यसंकल्प । सत्य करूनियां आपेआप । प्रगटली
मूळमाया ॥ ४३ ॥ याचि परी किती वेळा सृष्टी । प्रगटल्या अवतारकोटी ।
देवासी अहंकृतीनें कष्टी । करितां दानवी प्रगटे ॥ ४४ ॥ दानवहस्ती
ते निर्भय । गर्वरहित करी सर्व देव । ऐसें तियेचें अभिनव । कर्तव्य
पाहतां ॥ ४५ ॥ नाटोपतां देवदानवासी । मानवाहातीं शिक्षी
त्यासी । परंतु कोणाच्या अभिमानासी । उरों नेदी सीता ॥ ४६ ॥
ऐसी हे जगदाद्य महादेवी । पार्वतीसह ईश्वर तियेतें सेवी । वसिष्ठा
वेदादि महा कवि । स्तविती सर्वदा सीतेतें ॥ ४७ ॥ वर्ते जें जें
श्रीराम पवित्र । तें तें सीतेचेनि जालें चरित्र । सीता सत्तेविण तृणमात्र ।
ते हीं संभवेना ॥ ४८ ॥ विद्यावसुमतीगर्भ सीता । अवताराप्त प्रस्थान
तत्वता । जेवि सेनासंपत्ति प्रवर्तनां । पाठीं प्रभूसी आणी ॥ ४९ ॥
विष्णूचे हातींचें सुदर्शन । सुटोन रिपुचक्र विध्वंसी जाण । करावया
राक्षसकंदन । तेवि सीता सवेग ये ॥५०॥ पंचाक्षरीया पासुनी सबीज ।
मंत्रशक्ती नियोगीं सतेज । उपशमाते पावती सहज । भूतबाधेसी त्या
॥ ५१ ॥ की सद्गुरुमुखींची ब्रम्हविद्या । निरसानपा समूळ अविद्या । तेवि
दानवभंजन आद्या । पासूनि प्रगटली हे ॥ ५२ ॥ परात्पर सीता ऐसी ।

आत्मयापासूनि ये स्थितीसी। विघविपत्ति निवृत्तीसी। चित्कळा लक्ष्मी ॥ ५३ ॥ अमृतसंभव विवकळ्य। योग ऐश्वर्याची लीळा। सचित्सुखवर्धन वेळा। केवळ गुरुकृपेची ॥ ५४ ॥ ब्रह्मात्मविर्धी संभवश्रेष्टा। सीतेचेनि आत्मारामप्रतिष्टा। ते सविस्तार अवधारी वसिष्टा। सीता चरित्र सुंदर ॥ ५५ ॥ अगस्ती मुर्नीचीं वचनें। विश्रांतिरूप अवलोकनें। द्यावें अवधान मज कारणें। सिद्ध साधुसज्जनीं ॥ ५६ ॥ हा भीमोपदेश साचार। कर्ता चिद्रविवंशउध्धार। द्वादशादित्य विस्तार। अनंतकळ्य स्वरूपें ॥५७॥ प्रमाणासी नये तें प्रमय। द्वादश सूर्य संकेत बोलिलें स्वयें। येकेक सूर्यी निरोपण विस्मयें। संख्या द्वादश कळ्याः ॥ ५८ ॥ हें चि सविस्तर ग्रंथान्वयें। अवधान देउनी सदोदय। श्रवण कीजे ग्रंथ हृदय। होऊनियां ॥ ५९ ॥ इति श्री भीमोपदेश। आदिशक्तिस्तवन विशेष। प्रथम सूर्य चित्प्रकाश। म्हणे मेरु अनंत ॥ ६० ॥ प्रथम सूर्य द्वादश कळ्य संपूर्ण ॥ १२ ॥ श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीरामसमर्थ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य २ कळा १

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामसमर्थ जगदांतरा। सत्तासंपन्न विश्वेश्वरा। सर्वाढ्य सर्वश्रेष्टा वीरा। महाबाहो प्रसिध्धा ॥ १ ॥ विशाळ हृदया रणधीरा। महा गांभीर्य गुणागरा। रमणीयरूप मनोहरा। नवनागरा रूपश्रेष्टा ॥ २ ॥ तुह्मी औदार्यता आणि दया। लोकसंवर्धन केवळ माया। ते हे चिच्छक्ति रघुराया। सीतारूपें प्रगटली ॥ ३ ॥ शरीरीं जैसें प्राणाचें। बळ अधिक्य ज्ञानी सत्तेचें। ज्ञान निर्विकार त्रैलोक्याचें। पारपत्य करी सत्ता ॥ ४ ॥ ब्रह्मानुभव ज्ञानघन। तूं निर्विकार निरंजन। परतन्त्र स्वभावें पूर्ण। परब्रह्म निजांगें ॥ ५ ॥ अज्ञान शक्ती पासुनी। प्रबळली अविद्या जनीं। देहधारक ते प्राणी। त्रिगुणें वर्तती ॥ ६ ॥ रजोगुणें प्रवृत्तीसीस। तमोगुणें क्रिया

तामस । तमरजाचा निजध्यास । अधोगती जीवासी ॥ ७ ॥ प्रवळलीयां सत्व आंगीं । निचळे परतत्त्व अंतरंगीं । सत्वविशुद्धावांचुनी जगीं । सार्थकता नव्हे ॥ ८ ॥ रज प्रतिष्ठा ब्रह्मदेव । भ्रांतिसोस भवसंभव । तमाधिपत्य महादेव । विश्वहंता विभु ॥ ९ ॥ येक प्रवृत्तींत वाढवी । येक प्रवृत्तींत बुडवी । उभय देव पदवी । येवं प्रकारें ॥ १० ॥ परंतु उभयता देवीं । मुमुक्षता संभव जीवीं । होय ऐसी मृत्यु पदवी । दुःखातिशयें ॥ ११ ॥ हा तामसाचा उपकार । मृत्युरूप दावी निर्धार । राजसीं जन्मसंस्कार । पुनरावृत्ती ॥ १२ ॥ जन्ममृत्यूचें संकट । निरसी तो सत्वश्रेष्ठ । उत्कट ज्ञानें होय प्रगट । सद्गुरु जगाचा ॥ १३ ॥ तो तूं विष्णु सर्वोत्तमा । तुझे चित्शक्तीची गरिमा । अवधारीं आत्मयारामा । प्रचीतीयोगें ॥ १४ ॥ तुजप्रती काय सांगणें । सूर्यासी दर्पण देणें । चक्षूसी उपचक्षूनें । दृष्टीसी देइजे ॥ १५ ॥ लावण्यासी भोगणारें । उपचारिजे शृंगारें । तारुण्यासी मनोहरें । रूपें गौरविजे ॥ १६ ॥ ब्रह्मानुभवासी जावें । केविं श्रीरामा तोषवावें । परात्परासी स्तवावें । मुक्तियानें केवीं ॥ १७ ॥ जगदोद्धर रमेशा । प्रबोधपर विशेषा । होय आत्मप्राप्ती तोषा । तुझा अवतार ॥ १८ ॥ रामसीता उभयता । प्रगट होऊनि सत्ता । केली जगीं कृतार्थता । चर्या पावन ॥ १९ ॥ जगदानंद पितरें । वंशपरंपरा विस्तारें । संपूर्ण या विश्वाकारें । विस्तारलीं तुम्ही ॥ २० ॥ प्रकृति पुरुष अनादि । द्वंद्व घालितसे प्रमादी । त्या द्वंद्व निवृत्तीसी निर्द्वंदी । हे तुमची दशा ॥ २१ ॥ पुरुषाचें हृदय निर्मळ । निर्दोष निःसंग केवळ । उदास पूर्ण अंतराळ । भरीव सुखें ॥ २२ ॥ त्या केवळाची पदवी । नित्य संतीं अनुभवी । तियेचेनि तो गोसावीं । सर्वाध्यक्ष ॥२३॥ ब्रह्मादिक सुरवर । योगी ऋषि महा थोर । सिद्ध साधक अपार । कुमर प्रतिष्ठिले ॥ २४ ॥ त्यस्तोसी आलें तिनुकें । कुटुंब पाळिलें निकें । विश्व-कुटुंबिणी कौतुकें । प्रकृती प्रबळ ॥ २५ ॥ प्रकृति सांभाळुनी स्वयें । निवृत्ति विस्तारी प्रत्ययें । वल्लभ उपचारी स्नेहें । असाधारणेंनें ॥ २६ ॥ संभी सांभाळणें पटणें । सगुणापरिस गुण । निर्गुणा पैसी निर्गुण । चर्या

तियेची ॥ २७ ॥ येकांगीं शीतोष्णता । धरी विष आणि अमृता । सांभाळूं जाणे समता । विषमा माझारीं ॥ २८ ॥ येकदेशीं ते अज्ञान । त्रिगुणाचें अधिष्ठान । तैसें चि परी ज्ञान । वर्धविलें दुजें ॥ २९ ॥ सुखदुःख ज्ञानाज्ञान । पंचभूतिक जन । भूतातीत निरंजन । उभय आंगें ॥ ३० ॥ अनंत ब्रह्मांडें भरी । आपणें चि संसार करी । जीवमात्रासी उपचारी । स्वर्ग स्थिति निदानें ॥ ३१ ॥ क्षोभवी अंतर विविध । इछ्या पुरवी ते त्रिविध । संकल्पपूर्तीनें सिद्ध । आत्मप्राप्तीसी ये ॥ ३२ ॥ व्यापासूनि हे संतति । त्यासी भेटवी शुद्धमती । आत्मसंभव पुढती । उत्पत्ति असेना ॥ ३३ ॥ पुरवी मीनलियां । संततीसी जाय लया । ऐसी प्रवीण हे माया । सीता आदिशक्ति ॥ ३४ ॥ चिदानंद कल्लोळिणी । चित्सूर्य प्रियनलिनी । जयेच्या स्मरणीं च पळणी । पापासी होये ॥ ३५ ॥ उन्मेषपर सुलीना । आत्मपददशा नवीना । लीला लालन ललना । प्रिया तुझी ऐसी ॥ ३६ ॥ शिवें मज प्रबोधिलें । तें चि मज प्रत्ययासी आलें । पडताळुनी घेतलें । तुजपासीं म्यां ॥ ३७ ॥ अंतरीं स्वरूप सनातन । बाह्य प्रचीती समाधान । अंतर्बाह्य अनुसंधान । बोध वस्तूचा ॥ ३८ ॥ ऐसा अगस्तींचा अंतर्भाव । जाणोनि तोषला राघव । सीता आनंदली निर्भव । आख्यान अवधारा ॥ ३९ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रशंसिला प्रकृतिपुरुष । चालिला अद्वैत इतिहास । ह्मणे मेरु अनंत ॥ ४० ॥ द्वितीय सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य २ कळा २

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीरामचरित्रविख्याति । श्रवण होय सद्गती । चरित्र आख्यान चिद्व्यक्ती । काळग्रासनता ॥ १ ॥ दानवीं प्रगटोनि मुळीं । देवासि पडले छळीं । त्यास्तव अमरीं सकळीं । प्रार्थिलें विष्णूसी ॥ २ ॥ स्वानंद-

क्षीरार्णवीं शय्या । शेषतल्यावरी सुखचर्या । हिरण्यगर्भासि तया । प्रसन्न केलें ॥ ३ ॥ देऊनि वरदान देवा । साधु सज्जन विसावा । ज्ञान सूर्यवंश वैभवा । गौरविता होये ॥ ४ ॥ ज्ञानियांचा थर कळस । होय घननीळ रूपस । जीव दशरथगतीस । कारण जाला ॥ ५ ॥ कौसल्या ते सद्भक्ती । उदरा येऊनि निजप्रचीती । कृतार्थ केली त्रिजगती । रघोत्तम अवतारें ॥ ६ ॥ मूळमाया सीता चिद्रूप । रामपरत्वें सद्रूपें । उभय योगें आनंद-रूप । केलें विश्वासी ॥ ७ ॥ सर्वकर्ती सीतासती । राम अत्यंत अंतरस्थिती । रामाचेनि संतिप्रती । अवकाश होय ॥ ८ ॥ राम सदोदीत गगन । व्यापकपणें सनातन । सर्व कर्तव्यता सत्ता पवन । सीता चळवळेचि ॥ ९ ॥ विश्वामित्री प्रगटली । यागसिद्धी इच्छा जाली । दशरथासि मार्गो आली । सामर्थ्य प्रसन्नते ॥ १० ॥ सर्वात्मा स्वानंदघन । सर्व निजलक्ष लक्ष्मण । चित्शक्तिपाणिग्रहण । विश्वमुक्त हेतुसी ॥ ११ ॥ निमित्य करूनि यागसिद्धीसी । मार्गी वधिलें ताटिकेसी । सुबाहु निवटुनि विशेषीं । मरीचीसि त्रासिलें ॥ १२ ॥ याग-सिद्धीनें ऋषी तोषविले । विदेहनगरा जातां ऋषीमेळें । अहल्येसि उध्दरिलें । पदरजयोगें ॥ १३ ॥ प्रगटोनि भवशर्कात । रावण केला गर्वहत । सत्ता रामशरीरांत । होऊनि च्याप भंगिलें ॥ १४ ॥ माळ घालूनि रघोत्तमा । प्रकृति पुरुष गरिमा । उभयशरीरमहिमा । येकजीव सत्त्वेनें ॥ १५ ॥ उभयदीप येक होतां । प्रभेची होय आधिक्यता । तेविं श्रीराम आणि सीता । योग जाला ॥ १६ ॥ अयोध्येसि येतां उद्भवें । मार्गी गर्व केला भार्गवें । गर्व भंगोनि रघोद्भवें । सुखी केलें तया ॥ १७ ॥ स्वराज्यीं वैसे श्रीराम । तंव देवाचें अंतर्याम । विक्षेपलें परमप्रेम । कैकई-सत्तेचें ॥ १८ ॥ व्हावया देवविमोचन । शक्तित्रयअधिष्ठान । करूनि पितृआज्ञापाळण । निघाला वना ॥ १९ ॥ जान्हवीतीरीं गुहकासी । पावन केलें निश्चयेसी । भेटोनिया भरद्वाजासी । चित्रकूटीं असतां ॥ २० ॥ भरत कौसल्यादि माता । आल्या भेटिसि सप्रेमता । त्यासि बोधूनि समता । धाडिलें अयोध्ये ॥ २१ ॥ अत्रीअनसूयेसि भेटोनि । जातां दंडकारण्यवनीं । वधिलें विराधासि मार्गी । अद्‌भुत शक्तीनें ॥ २२ ॥ शरभंगु आणि सुतीक्ष्ण ।

त्यांसि करूनियां पावन । मंदकर्णास दर्शन । दीधलें कृपेनें ॥ २३ ॥ भेटोनिया ममानुजा । माझे हातींची घेतली पूजा । पंचवटिकेसि रघुराजा । वसता होय ॥ २४ ॥ शूर्पणखीच्या प्रसंगें । सांचासि वधिलें सवेगें । खरदूषण त्रिशिरा आंगें । निवटिलें महासैन्येसीं ॥ २५ ॥ मरीची मृगवेशें नटला । रामसुमित्रा घेउनि गेला । माईक सन्यासें तो आला । गुंफेसि रावण ॥ २६ ॥ निर्मूळ व्हावया दुष्ट । घेउनि चालिला दशकंठ । प्रळयशक्तीनें त्रिकुट । पाहिलें डोळ्यां ॥ २७ ॥ मार्गी जटायूनें युध्य केलें । कपटमुळें त्यासि वधिलें । चित्शक्तियोगें उध्दरिलें । सहकुळ जटायूसी ॥ २८ ॥ लंकेसि पावलियां सीता । जाला देवांसि तोष तत्वता । सीता शुधिस्तव सवेगता । राघव वनें धुंडितो ॥ २९ ॥ सीता तपश्चर्या अद्भुत । वनीं वृक्षरूप राहो समस्त । सीता म्हणोनि कृतार्थ । करितसे तया ॥ ३० ॥ सीताभ्यासें कबंधहत । जनावरोध निजमुक्त । पंपासरोवरीं हनुमंत । मुख्य प्राण भेटला ॥ ३१ ॥ ज्ञानसत्ता निजलक्षेसीं । असतां शक्ति पुरेना मानसीं । मुख्य प्राणत्रय तनुसी । प्रबळ केलें ॥ ३२ ॥ सुग्रिवेसीं सख्य केलें । रामें वालीसि निवटिलें । सुग्रिवासी राज्य दिल्हें । सीता उदेशें ॥ ३३ ॥ मिळाले जुत्पती भीम । अठरा पद्म प्लवंगम । सीताशुधिस्तव व्योम । आक्रमिलें तेहीं ॥ ३४ ॥ रुद्र लंके पवाडला । राक्षससंघ निवटिला । शुध्दी घेउनियां आला । रघोत्तमापासीं ॥ ३५ ॥ राम सहसैन्येसि निघाला । सिंधु पाषाणीं पालाणिला । त्वरा सुवेळे पावला । घेढिलें लंकादुर्ग ॥ ३६ ॥ रावण कुंभकर्ण आणि प्रधान । सहसैन्येसीं निवटून । निर्वाणशरें दशानन । निर्दाळिला रोषें ॥ ३७ ॥ तोष पाउनि स्वस्थिती । दिधली रावणासि सद्गती । बिभीषणासि लंकापती । केलें अमर मुक्तीनें ॥ ३८ ॥ निर्दाळिला जनकंटक । तोषे उंचावे सत्य लोक । कैलास-वैकुंठादिक । सुखें उचंबळलीं ॥ ३९ ॥ अद्वैत येकछत्री राजा । पुष्पकीं बैसोनि सहफौजा । आला अयोध्ये अनुजा । भेटला सुखें ॥ ४० ॥ चिच्छक्तिचा हा पवाडा । पट्टाभिषेकीं तोष गाढा । देवऋषी मुनी रोकडा । होय साक्षात्कार ॥ ४१ ॥ जगदानंदकारणी । दशा वर्तली सभास्थानीं ।

त्रैलोक्यचंद्य कारणी । अभिनव सत्ता ॥ ४२ ॥ त्रैलोक्यभाग्य वैदेही । प्रगट सत्तेनें सर्व ही । विश्वरूप या प्रवाहीं । पडली प्रवृत्ती ॥ ४३ ॥ सीता स्वयंभ ज्ञानप्रभा । सीता शोभेची निजशोभा । सीता आत्मरूप नभा । उभऊनि वर्ते ॥ ४४ ॥ स्वरूपप्रचीतीसि कारण । विस्तारली सीता चि जाण । अर्धमात्रेचि संपूर्ण । गरिमा सीता ॥ ४५ ॥ अष्ट महासिध्दी नव महानिधी । संकल्पपूर्तिची महासिध्दी । चिदानंद सिंधूचि उपलब्धी । निरवधीसुखें ॥ ४६ ॥ जाण वसिष्ठा हें अभ्यंतर । सीता रामतत्व साचार । ब्रम्हप्राप्तीसि निरंतर । आर्जविजे सुखें ॥ ४७ ॥ प्रचीती विज्ञानस्थिती । चित्शक्तिदशा अगस्ती । संबोधितां श्रीरघुपती । चमत्कारला ॥ ४८ ॥ इति श्रीभीमोपदेश । पराशक्तीचा आक्रमतोष । गौरविला निर्विशेष । म्हणे मेरू अनंत ॥ ४९ ॥ द्वितीयसूर्य द्वितीय कळा ॥ २ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य २ कळा ३

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामसीता मूळ वोहरें । विस्तारलीं विश्वाकारें । निजह्रदईंच्या विचरे । प्रथमें वंदिलीं ॥ १ ॥ निजात्मबोधसंभव । कारण करूनियां भव । तो चि बोध क्रमें निर्भव । केला चित्शक्तिनें ॥ २ ॥ राम सीतेविण कोण्ही । इतर नाहीं त्रिभुवनीं । आत्माराम संजीवनी । सत्ता सीता दुर्धर ॥ ३ ॥ या सीतेचें येक अभिनव । महा विकृतींचा दुर्भव । निजांग प्रगटोनि संभव । लीळेनें परिहरी ॥ ४ ॥ रामें बिभीषण प्रतिष्ठिला । लंकेसि वसतां तयाला । महा उपद्रव केला । शतमुख प्रधानें ॥ ५ ॥ रावणासि रामें संव्हारिलें । लंके बिभीषणा स्थापिलें । शतमुखें अंकोनि केलें । बिभीषणा देशधडी ॥ ६ ॥ प्रधानेंसि बिभीषण । अयोध्येसि आला पळोन । श्रीरामासि वर्तमान । भेटीनंतर सांगितलें ॥ ७ ॥ प्रतिज्ञार्गाळ

ध्यानपाणी । वर्तमान ऐकोनि श्रवणीं । मद्य क्षोभला मनीं । हरिदिनीं तें होती ॥ ८ ॥ शतमुख वधूनि बाणें । उपरी वर्तेन पारणें । प्रतिज्ञा करूनि नेमानें । चालिला शतमुखावरी ॥ ९ ॥ तये वेळे ब्रह्मनंदन । आला स्वर्गीहूनि जाण । करीत स्वछंदें गायन । सभेसि पातला ॥ १० ॥ हे कल्पांतर भेदकथा । अवधारीं ऋषीसमर्था । सीतेचि सत्ता संस्थार्था । विमोचनकर्ती ॥ ११ ॥ सीतेचें केलियां स्मरण । तात्काळ नासे महाविघ्न । सीता जालियां सुप्रसन्न । साधती पुरुषार्थ ॥ १२ ॥ ब्रह्मपुत्रें श्रीरामाप्रती । स्तवन करूनि पुढती । रावणवध विख्याति । प्रशंसित गायनें ॥ १३ ॥ तोडिलीं अमराचीं बंधनें । सीता अवतार रिपतिनें । त्रैलोक्य पावित्रें सुमनें । घरोघरीं उत्सव ॥ १४ ॥ अमर करूनि शत्रुभावा । स्थापिला लंकेसि तत्वता । दिल्ही ब्रह्मसत्ता । आचंद्रार्कवरी ॥ १५ ॥ ऐसिया कीर्तनगजरीं । सभा दाटली ऋषेश्वरीं । नृप क्षेत्री वीरसंभारी । आले वानर राक्षस ॥ १६ ॥ मिळाले सेनासंभार । करिती जय जय घोष गजर । विस्मयपणासि निधिकुमर । पाहे विस्मय करी ॥ १७ ॥ म्हणे काय तुमचें आगमन । लंका नगरी आहे कोण । कांहीं उपद्रवासि कारण । जाले कीं न कळे ॥ १८ ॥ श्रीराम म्हणे ब्रह्मसुता । तूं तरि त्रिकालज्ञाता । जाणोनि पुससी वार्ता । आश्चर्याची ॥ १९ ॥ प्रतिक्षणीं मानसगती । त्रैलोक्य पाहोनि पुढती । ऐसी विख्याति स्वध्याप्रती । सप्रेमवत्सला ॥ २० ॥ तुज न कळे तें काय आहे । होसी त्रिभुवनहृदय । निर्मत्सर कलहप्रिय । विश्व मायरूपें ॥ २१ ॥ निवैर रजनीसंचार । पाहतां देव दानवा वैर । तूं सकळांसि प्रियकर । जीवापासूनि होसी ॥ २२ ॥ पापनिवृत्ती तुझ्या दर्शनें । सुकृतकोटी लाभ होणें । दुष्टाप्रति दुष्पण । उरो नेदिसि तूं ॥ २३ ॥ तुझे श्रीमुखीं अल्हादकर । वसलासे साक्षात्कार । तुझ्यादर्शनें चि निर्विकार । होय तात्काळ दशा ॥ २४ ॥ सखा जिवलग आत्मा । वाटे जिवीं मुनिसत्तमा । ब्रह्मानंद महिमा । तूं मूर्तिमंत होसी ॥ २५ ॥ महा कीर्तन भक्ति जनीं । नित्य घडतें तुजलागुनी । नव ही भक्तिचे श्रवणी । सार प्रगटे ॥ २६ ॥ शतमुख तो आहे कवण । सांगिजे

मज तयाचें स्थान । तेणें उच्छेदिला विभीषण । दुष्ट निशाचरें ॥ २७ ॥ रात्रिमाजि तेथें जाऊनि । जंव उदेला नाहीं तरणी । तंव त्या दुष्टासि निजवाणीं । वधीन प्रतिज्ञा हे ॥ २८ ॥ ऐसें बोलतां अयोध्याधीश । प्रत्योत्तर दे मुनि संतोषें । कल्पांत करिसील रोषें । तेथें हें कार्य तें किती ॥ २९ ॥ तुझी वक्र जालिया भृकुटी । खचतील ब्रह्मांडचलया । कांळशासन तुझी सत्ता । विश्वनियंता तुज वंदी ॥ ३० ॥ अनंतकोटी विधिगोळ । निर्मिसी ईक्षणें चि केवळ । तूं आदिदेव विश्वमूळ । सनातन-रूपा ॥ ३१ ॥ उत्पत्ती स्थिती कर्तव्यता । तुझे मायेचि ते सत्ता । तूं अकर्ता चि तत्वता । परम पुरुषा रामा ॥ ३२ ॥ चिच्छक्तिच्या विलासें । रूपवंत लीलाल्लसें । अवतरलासि मज ऐसें । गमतसे परेशा ॥ ३३ ॥ निजानंद घन पावना । परतत्व निजनिधाना । चिच्छक्तिचेनि देखणा । चतुर्विध होसी ॥ ३४ ॥ भक्तजन सभाग्यचर्या । अप्रांतसुख चित्सूर्या । विद्योनि हृदयाकाशीं तुर्या । प्रकाशिलीं परतत्वें ॥ ३५ ॥ आतां तियेचा चि समारंभ । तुझी व्यापकता स्वयंभ । प्रकृतिपुरुषयोगें लाभ । होय परत्रीचा ॥ ३६ ॥ शतमुख कैंचा कवण । विचारिलें मजलागून । तरी अवधारीं संपूर्ण । सांगेन सर्व हि ॥ ३७ ॥ काश्यपाची दनुप्रिया । अकाळीं रति कश्यपासिया । मागोनि प्रसवली काया । शतानन दानव ॥ ३८ ॥ तयाचि बळ प्रशंसा थोर । प्रसवसमईं भयंकर । चिन्हें होऊनि चराचर । भयातुर जालें ॥ ३९ ॥ भूमीसि पडतां तो अघोर । भूकंप जाला दुर्धर । दाहो फोडितां दंडधर । चळीं कांपों लागला ॥४०॥ महा उग्रतेजी तो असुर । आर्जविला परमेश्वर । तयाचि तपश्चर्या अनिवार । लाधला प्रसन्नता ॥ ४१ ॥ थोरधीर विशाळ काया । द्विशत भुजवल्लाची चर्या । अनंत ब्रह्मांड रिघोनियां । देवतया विरोधी ॥ ४२ ॥ ब्रह्मांडकटाह फोडी करें । वळें कृतांतासि नावरे । मायापट्टण नभ पैं सारें । सत्ताधीपर वसवी ॥ ४३ ॥ सप्तसिंधुजळ अनादि । रचुनि नगर महाप्रमादी । नांदतसे त्रैलोक्य दंदी । नाटोपे कवणा ॥ ४४ ॥ विष्णु आणि महेश्वर । ऐकोन तयाचें वृत्त अघोर । गुप्त स्वस्थानीं निरंतर ध्यानस्त होती

॥ ४५ ॥ विधींद्रादि अमर । केले देशधडी ऋषेश्वर । पीडिलें त्रैलोक्य दुर्धर । मायानगरी वसोनि ॥ ४६ ॥ जनीं आश्चिर्य पहावयासी । जावें शतमुखाच्या नगरासी । विविधविधी इंद्र बंदिसी । घातले विक्रमें ॥४७॥ चतुमुख पंचमुख । शतमुख सहस्रमुख । ब्रह्मांडकोटीचे देख । ब्रह्मे बंदिशाळेसी ॥ ४८ ॥ चतुमुख ब्रह्मयासी । पुसे शतमुख ब्रह्म तोषीं । तूं कवण निश्चयेसीं । सांग मजला ॥ ४९ ॥ तो म्हणे या ब्रह्मांडींचा मी । तैसे चि सहस्राक्षवार्ता वर्मी । विवादती ते संभ्रमी । दनुजेंद्र ऐके ॥ ५० ॥ ऐसें शतमुखकर्तव्य । नेणोनियां सव्यासव्य । विधिवाद हव्यकव्य । अवरोधिलें तेणें ॥ ५१ ॥ व्हावया दैवांक उद्धार । पावला तो कृपावसर । तेथें जावयाचा निर्धार । कीजे रघोद्ववर्या ॥ ५२ ॥ नारदमुखें तें वर्तमान । अवधारिलें श्रीरघुनंदन । श्रोतीं देऊनि अवधान । अवधारिजे पुढें ॥ ५३ ॥ इति श्री भीमोपदेश । लीळा सल्लाप विशेष । तोपसमुद्भव अशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५४ ॥ द्वितीय सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥ श्रीगोविंदाय नमः ॥ श्रीरामाय नमः ॥

---

श्री

## सूर्य २ कळा ४

॥ श्रीसीतारामायनमः ॥

श्रीरामसमर्थ वीरोत्तमा । सर्वाढ्य गुण घन गरिमा । सर्वज्ञ श्रेष्ठ महिमा । नृपवैडुर्य विभु ॥ १ ॥ महा बाहो नरशार्दुला । प्रताप सूर्य वंश जिव्हाळा । कृतोपकार अवतारलीळा । महा बाहो संपन्ना ॥ २ ॥ माया पट्टण शतमुखाचें । मनें कल्पवेना कर्तव्याचें । तें अद्भुत दुर्ग विकृतीचें । भयंकर मुख ॥ ३ ॥ अक्षोभ अज्ञान जळ । अवर्ति भवाब्धि तुंबळ । अदृश्यतम निखिळ । आवर्ण तया ॥ ४ ॥ तेथें जावयासि संमारें । मार्ग न चलेचि निर्धारें । दैविक गती चमत्कारें । गेलियां न कळे ॥ ५ ॥ ऐसें बोलतां विधिनंदन । विस्मित जाला भवकंदन । ह्मणे यासि उपाय कवण । कीजे तो सांग ॥ ६ ॥ उपाय चक्र चूडामणी । संबोधुनि

रामवचनीं । सांगता जाला नारदमुनी । राजराजेश्वरासी ॥ ७ ॥ धीरोदार-
गुणसंपन्ना । सत्यसंघ सीताजीवना । भुवनपती रघुनंदना । अवधारीं
आतां ॥ ८ ॥ महद्भूत वीर्यबळ तेज । तुझा सेवक कपिराज । भीम
शरीरी ऊर्ध्वभूज । काळहर्ता महा ॥ ९ ॥ हा कैलासनाथ अवतारी । तुज
सेवितसे सर्वापरीं । कल्पांतकर त्रिपुरारी । कामजित त्रिंबक ॥ १० ॥
याचेनि होईल हें कार्य । स्तवनें तोषवीं कपिवर्य । विराटरूपी होय
आश्चर्य । महत्कार्यकर्ता ॥ ११ ॥ मानलें महामुनीचें वचन । समीप
पाचारिला मुख्य प्राण । तोषोनि निजमुखें स्तवन । कर्ता होय श्रीराम
॥ १२ ॥ अगा ये रुद्रा मम मित्रा । माझा जिवलग होसी पवित्रा ।
परत्रासी कारण स्नेहसूत्रा । वर्यविसी प्रबळ ॥ १३ ॥ तुझें औदार्य
गुणगांभिर्य । तुझें असाधारण बळ वीर्य । महत्कारण साधन सुचर्य ।
दीक्षा सूर्य वर्चसें ॥ १४ ॥ तुझे कृतोपकार आठवितां । पार न लगे
माझ्या चित्ता । स्नेह वात्सल्य सप्रेमता । ऋणी जालों असें मी ॥ १५ ॥
कृतोपकाराचे प्रत्योपकार । न करीं च मी कांहीं साचार । उपचार शब्दें
वारंवार । काय बोलों आतां ॥ १६ ॥ जयवर्धन यशस्वी तनु । महत्कार्य
संपन्नप्रभा भानु । जितेंद्रिय निरोपमा वानूं । काय तुज मी सखया ॥ १७ ॥
संकटीं तुज स्मरावें । तेव्हां तुवां प्रगटावें । असाध्य साध्य करावें ।
विराटरूप रुद्रा ॥ १८ ॥ वेदें स्तविजे तुजला । बळ निधी तया वेदाला ।
घेउनि हृदयीं दिधला । विसावा पूर्ण ॥ १९ ॥ सर्वविधेचा ईशान ।
जगीं प्रसिद्ध तुजपासून । आतां होऊनियां सुप्रसन्न । नेईं मायापट्टणासी
॥ २० ॥ ऐकोनि श्रीराममुखींचें स्तवन । गहिंवरला वायुनंदन । मौळी
पदीं ठेऊन । श्रीरामासी अभिवंदी ॥ २१ ॥ ह्मणे मी तुझा आज्ञाधार ।
होय नित्य सेवानुचर । कायसें कार्य हा विस्तार । स्तवनाचा करिसी
॥ २२ ॥ वाचेसहित तुझें अभ्यंतर । सत्तारूप बळ साचार । माझ्या
हृदयासी आलें अपार । स्तुतीच्या मिसें ॥ २३ ॥ नावरे अद्भुत बळा-
वेश । उचंबळे तोषाब्धि अशेष । पिंजारिल्या रोमावळी रोषें । खवळला
देहीं ॥ २४ ॥ ब्रह्मांड नेत्राग्नीनें जाळी । कीं आवेश चिन्ह सांभाळी ।

विशाळत चालिला पोकळी । आकृतीनें पूर्ण ॥२५॥ महा विराट शरीरें वानर । ब्रह्मांडकोटीहूनि पर । रोमरंध्रीं करिती थार । ब्रह्मकटाह तें ॥ २६ ॥ चिदानंद घन शोभा । भीम सामर्थ्याचा गाभा । राहिला प्रत्यक्ष उभा । देखिला सकळीं ॥ २७ ॥ लांगुळ गगनीं तळपे । तेणें कृतांत चळीं कांपे । रोमावळी विस्तीर्णरूपें । महा तरुवर ॥ २८ ॥ गगन सम तनु कपि । प्रतापसूर्य स्वरूपीं । अभिवंदूनि तया समीपी । आले सेनासंभार ॥ २९ ॥ येक पाउल अयोध्येसी । दुजें सप्ताब्धीसीमेसी । शरीराचळ प्रदेशीं । सेना सर्व चाले ॥ ३० ॥ जन होय पर्वताश्रित । तेविं सेनेसीं श्रीरघुनाथ । भीम तनुवरी वेघत । आश्चर्य पावे ॥ ३१ ॥ सरिता द्रम विस्तारें । महा पर्वत पाठार । तेविं तें हरिशरीर । प्रत्यक्षतेनें ॥ ३२ ॥ वामांगीचे दक्षणांगीं । उतरले संभार सवेगीं । माया पट्टण त्या प्रसंगीं । देखिलें सकळीं ॥ ३३ ॥ महा उद्यान मनोहर । सुवर्ण वृक्ष अपार । रत्न प्रभाफळ संभार । तेथें पवाडले ॥ ३४ ॥ वानर सेना अनिवार । वेघले दिव्य तरुवर । फळें भक्षिलीं मधुर । अमृत गर्भें ॥ ३५ ॥ नैरूत्यसेना निशाचर । निशासमयीं त्यांसी जागर । उद्यानींचे निवास सुंदर । कडाफोडींनें लुटिती ॥ ३६ ॥ भयंकर निशा कराळी । आकाश देवता कंकाळी । अज्ञान स्वरूपें काळी । संपूर्ण असतां ॥ ३७ ॥ स्वानंद चंद्रोदय वेळा । तेणें निशा जाली ते सोज्वळा । भाग्योदय जनाच्या डोळां । दिसों लागलें स्वच्छ ॥ ३८ ॥ शामा विभावरी सुंदर । चंद्रकळा नेसली मनोहर । नक्षत्र भूपणें अपार । गौरविली वल्लभें ॥३९॥ जाणवली मात शतमुखासी । क्षोभें पाठविलें काळिकेयासी । बिभीषण सुग्रीव तेणेसीं । घोरांधर मांडलें ॥ ४० ॥ शतकोटी काळिकेय सेना । सुग्रीवें आणिली रणा । महा उत्पत्ती रणकंदना । प्रवर्तले वळें ॥ ४१ ॥ भरत शत्रुघ्न लक्ष्मण । पुरुषार्थी वीर दारुण । शाणौ कुळीचे संपूर्ण । वीर सेनेसीं लोटले ॥ ४२ ॥ वज्र शरीरीं हनुमंत । पवाडला माया पट्टणांत । ज्वाळामय नगरी समस्त । केली क्षणामाझारीं ॥ ४३ ॥ काळिकेय युद्धीं पडिला । शतमुखासी वृत्तांत कळला ।

भावी आश्चर्य वर्तलें । आजिचा समयो ॥ ४४ ॥ कृतांतासी अजिंक्य नगरी । देवदानव न करिती सरी । कोणें येऊनि रात्रिमाझारीं । उपद्रविलें येथें ॥ ४५ ॥ क्रोध ज्वाळामुखी टाकी । कृतांत दृष्टीनें विलोकी । लोटला निशीमाजि पावकी । सेनेसह बळें ॥ ४६ ॥ तव नगर ज्वाळामय देखिलें । तें पर्जन्यास्त्रे विझविलें । मार्गी कपींद्रासी अवलोकिलें । सोडिलें शरजाळ त्यावरी ॥ ४७ ॥ वज्रकाया प्रभंजनसुत । जेवि मेघवृष्टीत पर्वत । तेवि शतमुखशर जात । घेत सुमनापरी ॥ ४८ ॥ दुर्गमहाद्वाराभीतरी । जाली दाटी सेना संभारीं । घडघडिले रथ धरेवरी । शिखरा ऐसे ॥ ४९ ॥ दशचक्रीं शतांग । वज्रांगत्राणें वीर सवेग । धांवती रथेसी लाग । करिती पर सैन्याचा ॥ ५० ॥ अतुर्बळी वीरवाहिनी । सहस्रमुखें नेदी तुंबळोनी । परसेने समुद्रालागुनी । मिळणीसी आली ॥ ५१ ॥ शतचक्रीं सुवर्ण स्यंदन । जैसीं काळाचीं चक्रें दारुण । व्याघ्रासुर मकराननें । संपूर्ण रथ चालिले ॥५२॥ रथीं योजिलीं अश्वथाटें । दिसती स्वरूपें लखलखाटें । विश्वकर्म्यानें चित्त चोखटें । निर्मिली अश्वरत्नें ॥ ५३ ॥ ऐसिया सेना समभारीं । शतमुख येऊनि महा समरीं । श्रीरामेसीं रणचत्वारीं । युद्ध करील ते अवधारा ॥५४॥ इति श्रीभीमोपदेश । भवकंदनी रणकर्कश । खवळला कृतांत आवेश । हणे मेरु अनंत ॥५५॥ द्वितीय सूर्य चतुर्थ कळा संपूर्णमस्तु ॥ ४ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

श्री

## सूर्य २ कळा ५

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामसमर्थ सर्वकर्ता । विजयश्रियेचा पूर्णभर्ता । भवशत्रु समूळ हर्ता । चिदानंदकंद ॥ १ ॥ कार्यकारण सृष्टी । दावी आश्चर्याच्या कोटी । शत्रु मित्र समसाटी । करी आत्मत्वे पूर्ण ॥ २ ॥ चित्शक्तीचेनि योगबळें । अवतार कृत लीळा रोळें । दैविक गति तात्काळें । आला मायापट्टणा

॥ ३ ॥ शतमुख संस्थान दुर्जय । निजदासांचा व्हावया विजय । सेनासमुदायेसीं जयजय । घोषें चि प्रवर्तला ॥ ४ ॥ भव निवर्तक वीर निधडा । रणविशारद धन्वी गाढा । दशमुखारि कृत पवाडा । प्रसिद्ध जगीं ॥ ५ ॥ शतमुख पट्टण प्रदेशीं । वसला उद्यान विलासीं । सुमन तल्प शय्येसीं । शोभे मदन मनोहर ॥ ६ ॥ स्वर्गीचे अमर वृंद आले । आदि विभूसी अभिवंदिले । म्हणती निजभाग्य भले । जें सांभाळिसी स्वामियां ॥ ७ ॥ रावणकारागृहीं अमर । असतां दैन्यदशेनें जर्जर । धांवोनि कृपेनें सत्वर । देवा सोडविले ॥ ८ ॥ दशानन केतुवदनी । अमरतोपचंद्र पडोनी । जाला कल्याहीण ते क्षणीं । पुच्छ केतूनें ग्रासिला ॥ ९ ॥ आतां शतानन महाकेतु । देवां दुःखदायक हेतु । यास्तव भवाब्धीसी भीमसेतु । करूनि तूं आलासी ॥ १० ॥ रघुवर विज्ञानशीळ । देवा सन्मुख होय तात्काळ । परस्परें प्रेम कल्लोळ । भेटी जाल्या ॥ ११ ॥ इंद्रादि सुरवर थाटें । आली विमानें लखलखाटें । दुंदुभी स्वघन आर्माट । गाजतसे नभ ॥ १२ ॥ रघुवीर सेनेमध्यें लीळा । घनगंभीर वाद्यमेळा । वाजती भीम रणकाहळा । भयंकर घोषें ॥ १३ ॥ किंकाटती नादें रणमोहरी । शत्रूसी पराभविती स्वरीं । देव समुदाव अंबरीं । दाटलीं विमानें ॥ १४ ॥ विधि विष्णु महेश्वर । अष्ट वसु वीर दुर्धर । येकादश रुद्र भयंकर । आवेशें पातले ॥१५॥ द्वादशादित्यांचा मेळा । येत वीरावेशें आगळा । षण्मुख गणपतिमेळा । भूतपाळा संपूर्ण ॥१६॥अष्ट दिक्पाळ रोषें । प्रवर्तले कृतांतावेशें । लीळा विलास राघवेशें । आश्चर्य आरंभिलें ॥१७॥ पद्मसंभव विष्णु शिव । भेटोनि तोषवी राघव । मधुरामृत गिरागौरव । जाले परस्परें ॥ १८ ॥ आवेश नावरे सैनिका । लोटले नगरा उजु अवांका । विभांडुनी पट्टण तवका । ह्मणती शत्रूतें पछाडूं ॥ १९ ॥ राघवसेना अतुर्बळी । सुरवर दाटले अंतराळीं । पैस नाहीं भूमंडळीं । माया पट्टण वेढिलें ॥ २० ॥ तमयुक्त निशीचा अवसर । वानरीं अद्भुत केला थोर । शुष्क काष्टें पर्वताकार । चुडिया पावकीं पेटविल्या ॥ २१ ॥ ज्वाळामय संपूर्ण । तेणें प्रकाशलें गगन । माया पट्टणांत रिघोन । दाहो केला

वस्तीचा ॥ २२ ॥ राक्षसी चमू दारुण । तेणेसी वीर बिभीषण । पट्टणा
उजू रोपें पूर्ण । वळें चि लोटला ॥ २३ ॥ भरत शत्रुघ्न महा वीर ।
नगरावेष्टित रणशूर । सेनासंभारीं दुर्धर । सुमंत पवाडला वळें
॥ २४ ॥ येकांगवीर रणप्रवीण । इंद्रजितहंता रोष दारुण । शतमुखासी
भेदावया आपण । लोटला लक्ष्मण तो ॥ २५ ॥ श्रृंगार उपवना माझारीं ।
रघुराज तोषनिर्भरीं । सुमनी अर्चिला किन्नरीं । दिव्योपचारें ॥ २६ ॥
सकळ्यं अमरांसी अर्चिलें । सभांवर सुमनीं शोभलें । गंधर्वगायन आरंभलें ।
मधुर सप्तस्वरीं ॥ २७ ॥ स्वर्गीचे गायक किन्नर । कळा प्रवीण ते चतुर ।
यंत्रविशेषें ते अपार । तोष वर्तविला ॥ २८ ॥ स्वर्गभूषण स्वर्गांगना ।
नृत्यीं प्रवीण गीतसंपन्ना । अभिनव नाट्यकळापूर्णा । साहित्य पुरविती
॥ २९ ॥ ताळ विशेष अवसानें । तोषविती चतुराचीं मनें । जगदात्मा
अंतःकर्णें । तोपला नृपचक्री ॥ ३० ॥ तंव शतमुखाचे अनुचर । गुप्त
रुपानीं करितां संचार । अंगदें परिक्षुनी सत्वर । धरूनि आणिले सभे
॥ ३१ ॥ हे शतमुखाचे पाळती । जाणविली मात रामाप्रती । राजेश्वर
ह्मणे नव्हे नीति । अवरोध चारांसी ॥ ३२ ॥ मुक्त केले वार्तिकाळां ।
तोषाभिवृद्धी तोष जाळा । सभारंगीं गायकाळा । गौरविलें दानें ॥ ३३ ॥
मुहूर्तत्रय यामिनी । उरली असे प्रमाणी । यामध्यें शतमुखा वधुनी ।
विजय सूर्योदय व्हावा ॥ ३४ ॥ तंव तो शतानन सैन्येसीं । येत
विक्रमें रणभूमीसी । प्रतापसूर्य तेजोरासी । निजांग विभवें ॥ ३५ ॥
सहस्रचक्री रथ त्याचा । सूर्य सम रत्न प्रभेचा । लखलखाट हेमाद्रीचा ।
अनुज तो ह्मणवी ॥ ३६ ॥ स्वयंभू अनेक रथपंक्ती । जया रथावरी
शोभती । विश्वकर्म्याची मती । न पुरे निर्मितां ॥ ३७ ॥ तया रथासी
योजिले । विविध तुरंगोत्तम भले । जे मानस पूजेतुनी आणिले । आदि
विधात्यानें ॥ ३८ ॥ तप्त जांबुनद वर्णप्रभा । पाहतां येकेक अश्वशोभा ।
दर्शविध लावण्यगाभा । विचित्राकृतीनें ॥ ३९ ॥ सुंदर मनोहर हय याटें ।
शतमुखाचे रथासी नेटें । वोढिती ते कडकडाटें । तेणें रथ लोटे धुरंधर
॥ ४० ॥ शतमुख संदनाचे नंदन । शोभले रथ कराळ वदन । शतानन-

सुत दारुण । आरूढले त्यावरी ॥ ४१ ॥ तयाची सेना दुर्धर । वीरश्रीचे वीर रणशूर । कराळवदन अघोर । चालिल्या चल्या ॥ ४२ ॥ सहस्र सहस्र सेनापती । प्रकाशरूप सेनासंपत्ती । वज्रांग त्राणें शोभती । राऊत अश्वोत्तम ॥ ४३ ॥ मदोन्मत्त गजाचीं थाटें । शोभती जैसे गिरि अचाट । वरी बैसले वीर उद्भट । त्रिशूळधारी ते ॥ ४४ ॥ गजचक्र बहु प्रचंड । सेना चालतां कोठ अखंड । वरी यंत्रविशेषें अग्निकुंड । प्रळय विद्युघोषें ॥ ४५ ॥ अर्बुद महा अर्बुद अश्व । शृंगारिले वीरश्रिया वैभव । वज्रमय पाखरा गौरव । हरिती रवीतें ॥ ४६ ॥ वरी वीरश्रिया तेजमंडित । पंचायुधीं वीर्यवंत । रणयोध्ये विख्यात । राऊत आरूढले ॥ ४७ ॥ युद्धाची इच्छा सर्वकाळ । भुजा स्फुरती बळें प्रबळ । कावे मंडळें अंतराळ । भूमीसमतया ॥ ४८ ॥ चालिलीं अश्वथाटें अपारें । वाजती रणवाद्यें दुर्धर । असंख्य पदाती वीर । वीरश्रिया लोटले ॥ ४९ ॥ तळपती असिलता करीं । वीजु झळकती जेविं अंबरीं । लोटले परसेनेवरी । महा विक्रमें ॥ ५० ॥ रामसेना सुवर्ण भद्र । दळबळें जळें तो समुद्र । त्यावरी लोटलासे शोणभद्र । शतानन संभारें ॥ ५१ ॥ परस्परें सैन्य मिळणी । जाली युद्धासी बोहणी । तुंबळेल युद्ध येथुनी । महा अघोर ॥ ५२ ॥ मायापट्टणाचा प्रांत । पाहेल तो वैदेहीकांत । शतमुखासी सशांत । करील निजांग शक्तीनें ॥ ५३ ॥ ते परम रसाळ निरूपण । प्रचीतीचे उघडुनी श्रवण । अवधारिजे चरित्र पूर्ण । रघोत्तम रायाचें ॥ ५४ ॥ श्रवणें संकटे हरती । अभिनव प्राप्ती फळें येती । सार्थकाचीं सार्थकें होती । श्रवणमात्रें ॥ ५५ ॥ इति श्री भीमोपदेश । भवविक्षेप मूळ तोष । प्रसन्न होय तो परेश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५६ ॥ द्वितीय सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीरामसमर्थ ॥



श्री

# सूर्य २ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामबोध कार्मुकपाणी । भवनिर्मूळ कर्ता रणीं । विज्ञानशरसंधानी । दश्यजात हर्ता ॥ १ ॥ कल्पनाशताननसंभारें । आला युद्धासी अहंकारें । कामादि दनुज मत्सरें । युद्धासी पातले ॥ २ ॥ वीरभद्र भूत संभारें । लोटला शतमुखावरी निर्धारें । वानरवीर गिरि प्रहरें । त्राहटिते जाहले रिपूसी ॥ ३ ॥ नैऋत्य सेना समबळें । लक्षूनि शतमुखाचीं दळें । मिसळले युद्ध कौतुहलें । परस्परें भीडती ॥ ४ ॥ शाणीकुळींचे नृपवर । लोटले युद्धासी रणशूर । दानव मानवसमर । होतसे सैन्य पुरें ॥ ५ ॥ उभयतां पदाती वीर । हतियेरांप्रती हतियेर । भीडती वीरश्रीनें रणधीर । वीर निधडे ॥ ६ ॥ घाव हाणती स्मरोनि द्वंद । प्राणरहित होती निर्द्वंद । वक्कार विदें विब्रद । संदोहभूमी अर्पिती ॥ ७ ॥ घायें उलती पुढी उदरें । पर्वत निर्झरा परी रुधिरें । वाहती तें विभत्स शरीरें । दिसती शोणवर्ण ॥ ८ ॥ भीडत असतां पदाती दळ । लोटले असि वार तुंबळ । घाये दारुणें वाजती अनळ । निघतसे तेथुनी ॥ ९ ॥ घायें बोढिती परस्परें । साहोनी भेदिती कटारें । अश्वगतीचेनि निर्धारें । जाती निजसैन्यांत ॥१०॥ रथांचे महावीर दुर्धर । शरसंधानीं बुजिती अंबर । सायक तीक्ष्ण जळधर । वैश्वानर वरुषे ॥११॥ शतमुखाचे सेनानी । पावकवर्ण घोर वाहिनी । युद्धावेशें खचरयेनी । रणांगणा आले ॥ १२ ॥ रामसैन्यांतील महावीर । लोटले तेणेसीं रणझुंझार । सुमंत सेनापति सभार । मिसळले युद्धा ॥१३॥ भरत शत्रुघ्न युद्धप्रवीण । तैसा चि महावीर लक्ष्मण । युद्धा प्रवर्तले दारुण । शरसंधानीं ॥ १४ ॥ दनुजेंद्रसुत सकळ । युद्धीं लक्षुनियां प्रबळ । लोटले रामानुज सोज्वळ । शस्त्रास्त्र विभवें ॥ १५ ॥ भीम वज्रदेहीं विशाळ । घेऊनि निज करीं शैल । रिपूच्या चमूवा प्रबळ । मारीत चालिला ॥ १६ ॥ शतमुख क्रोधें खवळला । द्विरात नेत्रीं प्रळयाग्नि ज्वाळा । टाकीत रणसिंधु

माजवला । चोटला सवेग ॥ १७ ॥ इंद्रादि सुरवर कोटी । वसु आदित्य रुद्र घरटी । वेष्टुनी शतमुखासी वृष्टी । करिती शस्त्रांचें ॥ १८ ॥ शताननें शतचापें । वोढुनी रौद्रावेशप्रतापें । टणत्कारिलीं तेणें कांपे । ब्रह्मांड थरथरां ॥ १९ ॥ शत कार्मुकाचा टणत्कार । गाजला ब्रह्मगोळ दुर्धर । बधिरावलें भयंकर । चंटनादें ॥ २० ॥ नक्षत्रें तुटोनी पडलीं । सप्ततळें दणाणिलीं । भयाभीत आरोळी । दिधली कृतांतें ॥ २१ ॥ द्विशतकर लाघवें । शरसंधान वीर वैभवें । अग्निमुख शरसंभवें । भरिलें भूगोळ ॥ २२ ॥ अनिवार शतमुखाचे बाण । करितां देवादिकांसी निर्वाण । राक्षस आणि वानरगण । आक्रमिले शरीं ॥ २३ ॥ प्रळयाग्निज्वाळाशर । वर्षों लागले अंबर । हें देखोनी शेषावतार । खवळला रोषें ॥ २४ ॥ सज्जूनि प्रचंड चाप निकुरें । असिवार सहस्रशरें । निवारिलें शरजाळ सत्वरें । पैस केला मोकळा ॥ २५ ॥ रणांगणीं वज्रठाणी । उभा राहिला कार्मुकपाणी । शतमुखासी पाचारूनी । शर सोडिले विक्रमें ॥ २६ ॥ शतास्य धनुर्विद्या वीर । सोडुनी कोटीच्या कोटी शर । नर वानर अमर । भेदिले बाणीं ॥ २७ ॥ हें न साहे चि रघुवीरा । पाठीसीं घेउनी सौमित्रा । शतबाणीं शत वक्त्रा । भाळीं भेदिलें ॥ २८ ॥ अनिवार रामाचे बाण । करिती काश्यपासी निर्माण । जेविं पर्वतरूप हुताशन । समुद्रांत पडे ॥ २९ ॥ शतमुख शतसागर । प्राशिती अग्निरूप शर । शतमुखाचें तें उदर । शर संपूर्ण पाहती ॥ ३० ॥ मायापट्टण जिव्हाळा । अज्ञाना मकरंद लीळा । न मरेचि तो कळिकाळा । नाटोपे विक्रमें ॥ ३१ ॥ अनिवार रामाचे शर । शतमुखासी अर्चिती साचार । तोष न पवे चि तो असूर । कोपें खवळला ॥ ३२ ॥ महास्त्र शरसंधानी । निवटीतसे काकुत्स्थ वाहिनी । दाशरथी प्रत्योपकार वाणी । समान स्कंद होय ॥३३॥ मोंवता भवसिंधु अगड । माया दुर्गती अवघड । पर्वतरूप महा दगड । वृष्टी होतसे ॥ ३४ ॥ रामशरे ते निवारिले । उपरी शतमुखें काय केलें । गंधर्वास्त्र सोडिलें । आश्चर्य कर ॥ ३५ ॥ येका शस्त्रापासुनी अनेक । असिछता निघाल्या माइक । कोटीच्या कोटी भयानक । वीर उठावले ॥३६॥

अग्निमय पर्वत सैरा । वर्षताति शरधारा । प्रळयाग्नीनें पांजिरा । घातला नभासी ॥ ३७ ॥ गमला तो कल्पांतसमय । असिलताचे विझती घाये । पुरुष दिसतां परिदेह । वावेसी नातुडे ॥ ३८ ॥ अदृश्यरूप गंधर्वस्थिती । श्रीरामें रौद्रास्त्रें त्याप्रती । भेदूनि तये क्षणीं जगती । मोकळी केली सुखें ॥ ३९ ॥ उपरी लोल्य युद्धपरवडी । परस्परें शरवांकुडी । शस्त्रास्त्रें फडोविकाडी । सोडिते जाले ॥ ४० ॥ काश्यपें अग्नि अस्त्र सोडिलें । तेणें ब्रह्मांड प्रकाशलें । प्रळयाग्नीपरी सुटलें । जाळीत ते वेळेसी ॥ ४१ ॥ रणकर्कशें रघुनंदनें । वरुणास्त्र सोडिलें त्वरेनें । शमऊनि अग्नि अस्त्र तेणें । शीतळ केलें सर्वत्रां ॥ ४२ ॥ वरि प्रळय प्रभंजनास्त्र । सोडिता जाला शतवक्त्र । उडों लागले पर्वत । पत्ररूप प्रमाणें ॥४३॥ कवण सांभाळील कवणा । मांडला वृक्षजात घोळाणा । आट भवंतसे पवना । नावरे च कोण्हीं ॥ ४४ ॥ युद्धविशारद राघवें । पर्वतास्त्रविद्या वैभवें । सोडिते वेळेसी स्वभावें । आले महा पर्वत ॥ ४५ ॥ अवरोधिला तो पवन । जाले स्वस्त सर्वांचे प्राण । उपरी तो शतवदन । काय करिता जाला ॥ ४६ ॥ कंकाळीअस्त्र कराळ । काळमुखी अस्त्र बंबाळ । ज्वाळमुखी प्रळयकाळ । अस्त्रसमूह सोडिला ॥ ४७ ॥ तेणें आक्रमिलें ब्रह्मांड । शत होत चालिलें भूखंड । ब्रह्मांड खर्पर तें प्रचंड । खंडविखंड होतसे ॥ ४८ ॥ महा वीर बळें प्रबळ । गेले शस्त्रास्त्र योगें प्रबळ । विस्मित पावे घननीळ । शतमुख चर्या ॥ ४९ ॥ अभेद वज्राचळ शरें । निवारिलें शस्त्रास्त्र ज्वाळ त्वरें । ब्रह्मास्त्रवीर परस्परें । सांडिते जाले बळें ॥ ५० ॥ ते समान तेजें प्रौढी । भेटोनि शमलीं आवडी । उपरी वीर ते परवडी । माहेश्वरास्त्र सोडिती ॥ ५१ ॥ तेंहीं समान प्रतिपत्तीनें । ऐक्य होऊनि सन्मानें । असतां ते वेळे दानवानें । रौद्रास्त्र टाकिलें ॥ ५२ ॥ श्रीराम निवारिलें तेणेंचि तें । येवं सम्युद्ध उचितें । रामें शतानन बळातें । तुळिती परस्परें ॥ ५३ ॥ विज्ञान निर्वाण प्रौढी । भवनिर्भय उभय रूढी । पृथ्वी आकाश एकघडी । घडिते जाले ॥ ५४ ॥ निर्वाण अस्तित्व वाणी । वरुपती प्रळय अग्नि । तरणी चक्रापरी फुटोनि । तिडक्या उसळती ॥ ५५ ॥

पृथ्वी अहळतसे तेणें । होती पर्वताचे फुटाणे । नक्षत्राच्या तेणें उष्णें । थाहा फुटती पहा ॥ ५६ ॥ उष्णातिशयें करूनि । नभ कर्पलें वाटे मनीं । वाटे चंद्र सूर्य जळोनी । कोळसे जाले ॥ ५७ ॥ प्रत्यक्ष वर्ते कल्पांत काळ । कटों लागलें सिंधुजळ । सिंधुमाजि पेटलें ज्वाळ । स्नेहयोगें जेवि ॥ ५८ ॥ श्रीरामें विचारिलें मनीं । जे अकाळ कल्पांत मेदिनी । मांडला आजि समरंगणीं । न साहे चि मज ॥ ५९ ॥ तव तेथें ब्रह्मनंदन । आला गायन प्रवीण । म्हणे शतमुखासी निर्वाण । केलें तुवां विक्रमें ॥ ६० ॥ श्रीराम म्हणे मुनिश्रेष्ठा । न कळे शतमुखप्रतिष्ठा । यासी उपाय अंतर्निष्ठा । सांगसी तो करीन ॥ ६१ ॥ विधिसुतासी विचारिलें । शतमुखाचें निदान वहिलें । नारदें निरोपिजेल तें ऐकिलें । पाहिजे श्रोतीं ॥ ६२ ॥ इति श्री भीमोपदेश । दनुजकाकुत्स्थयुद्ध विशेष । भवनिर्भेत्र चर्या सरोप । म्हणे मेरु अनंत ॥ ६३ ॥



श्री

## सूर्य २ कळा ७

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीराम निर्द्वंद स्वस्थिती । विश्व अभावें घेत विश्रांती । नित्यात्म सुखसंपत्ती । चित्शक्तीनें रूढवी ॥ १ ॥ भवशतास्य दुर्धर । महा विकृती अहंकार । भवनिवर्तक साचार । धीर राम निधडा ॥ २ ॥ उभयबोध रणांगणीं । विद्याविद्यास्त्र संधानी । भीडतां नित्यानुसंधानीं । न सरती मागें ॥ ३ ॥ प्रबळशक्ति उभयांगीं । भीडतां समान रणरंगीं । दाशरथीनें तें प्रसंगीं । आश्चर्य मानिलें ॥ ४ ॥ दशमुखाच्या दशगुणें । हा शतमुख होय ऐक्यतेनें । याचें जिव्हार निजबाणें । वर्मीच भेदावें ॥ ५ ॥ ऐसी अलोचना करी मनीं । तवं पद्मजसुत तियेक्षणीं । बोलता जाला वचनीं । वर्म शतमुखाचें ॥ ६ ॥ ह्मणे सर्वज्ञ नृपवरिष्ठा । युक्तिबळाधिक्य वीरश्रेष्ठा । शतमुखीं वरद प्रतिष्ठा । ते चित्तासी आणिजे ॥ ७ ॥

तदनुसार गुणसंपन्न । मंत्र कीजेत मुखनिदाना । अल्प प्रयोजनी भावना । कां महद्रेचावी ॥ ८ ॥ औषधानें रोगनिवृत्ती । होतां रसायनें कां त्याप्रती । पाहूनि कार्याकार्य स्थिती । कीजेत ते प्रयोग ॥ ९ ॥ अल्प मंत्रें विंचु सर्प । उतरती तेथें न वेचावें तप । संसारासी सत्यसंकल्प । प्रयोगूं नये ॥ १० ॥ पंच्याक्षरीचेनि सहजें । पळिजेत भूतसमाजें । तेथें वेद अजेय बीजें । कां प्रयोगावीं ॥ ११ ॥ नवसें पावती दैवतें । अंतर्निष्ठा कां कीजे त्यातें । उत्तम मध्यम कनिष्ठ तें । क्रमें चि कार्यें व्हावीं ॥ १२ ॥ जेविं दशमुखा होता वर । सात्त्व धरिला नरावतार । तैसा चि शतमुखा दुर्धर । वर आहे वरिष्ठा ॥ १३ ॥ अबीज स्त्रीरत्नहस्तीं । व्हावी शतमुखाची शांति । हें विवंचुनि सीतापती । कार्यसाधी सर्वज्ञा ॥ १४ ॥ सृष्टींत पाहतां शोधून । कोठें आहे अबीज स्त्रीरत्न । रामें सांगतां ब्रह्मानंदन । हांसोनि बोले ॥ १५ ॥ वस्तु असतां आपणापासीं । कोण्हीं विवंचिना चित्तासी । भ्रमाची भूमि ऐसी । सर्वत्र असे ॥ १६ ॥ तूं तरी भ्रमरहित देवा । दाविसी विश्वकृत माया । सर्वज्ञ गोसांवीं जीवशिवा । प्रतिष्ठिसी सुखें ॥ १७ ॥ कारुण्य जलधी कृपाघना । मुनिमानस गुणनिधाना । जाण शतमुखनिदाना । वामांकीं वसविसी ॥ १८ ॥ तुझे दक्षणांकीं निर्वेर । ब्रह्मानुभव साचार । तो निजानंद निरंतर । प्रसिद्ध योगी सेविती ॥ १९ ॥ वामांगीची मूळमाया । अभिनव शक्ति रघुराया । उत्पती स्थिती करावया । निदान हेतु तियेचा ॥ २० ॥ महाशक्ति ते सीता सती । नाटकलीळा मूळप्रकृती । साच चि काळ्याची नियंती । प्रळयकृत चर्या ॥ २१ ॥ ऐकोनि ब्रह्मसुतवाणी । रघोत्तम चमत्कारला मनीं । ह्मणे अभिनव या वर्तमानीं । वर्तलें दिसे ॥ २२ ॥ अवताराचा अभिमान । अथवा निजरूप आख्यान । विचारें पाहतां संपूर्ण । आश्चर्य धृत आहे ॥ २३ ॥ वसिष्ठबोधाचें हृदय । पाहतां यथार्थ चि प्रत्यय । अभिमान कोठें चि न साहे । तो साहेल मद्रूपीं कैसा ॥ २४ ॥ न यापी विकल्पाचा वारा । तें स्वरूप आठे जिव्हारा । स्वभाव स्थिती हे सैरा । अनिर्वेध चि वर्ते ॥ २५ ॥ एवं निजहृदय विवर । घेउनि

सुखावें निरंतर । जाणोनि राम अभ्यंतर । स्वयंभूसुत तोषला ॥ २६ ॥
ह्मणे अयोध्येसी राहिली सीता । ते कैसेनि येईल आतां । नारद ह्मणे
या हनुमंता । प्रार्थिजे यदर्थी ॥ २७ ॥ तुह्मी आलेति कवणेपरी । हें
विचारा अभ्यंतरीं । तैसें चि ये क्षणामाझारीं । आणील सीतेसी हा
॥ २८ ॥ ऐसें अनुवादतां विधिसुत । ऐकत होता हनुमंत । रामपदीं
विनयान्वित । मस्तक ठेविला ॥ २९ ॥ ह्मणे समर्था आज्ञा प्रमाण ।
निमिषांत अयोध्या आणीन । तेथें सीतासह सदन । येईल सहजें
॥ ३० ॥ आज्ञा दिधली रघोद्भवें । जे आणीं सीतेसी विभवें । मग गेला
कपींद्र सद्भावें । मानसगती अयोध्ये ॥ ३१ ॥ श्रीरामाचें अंतःपुर ।
कपीनें करीं घेऊनि सत्वर । बोलत असतां मुनि नरवर । सीतासौध
आणिला ॥ ३२ ॥ अभिवंदिलें श्रीरामासी । रुद्र वार्ता सांगे प्रीतीसीं ।
सीता अंतःपुरनिवासी । सद्म आणिलें त्यास्तव ॥ ३३ ॥ स्वामी रिघोनी
अंतःपुरीं । करीं धरूनि महिजांबरी । आणावी निजनिर्धारीं ।
विजयर्थीयेच्या लाभें ॥ ३४ ॥ जगदानंदकारिणी । ब्रह्मबोध संवर्धनी ।
विश्वजिव्हाळा जननी । जगत्कारणच्यर्या ॥ ३५ ॥ देवत्रय शक्तिनायका ।
आदिविभुलें चिदंबिका । मूळ स्वरूपें हरादिकां । प्रतिष्ठिती होय
॥ ३६ ॥ ते हे आदिशक्ति दुर्धर । नटली सीतारूपें सुंदर । तुझे
निजांगीची चित्शक्ति साचार । प्रसन्न करी श्रीरामा ॥ ३७ ॥ विचार
समीरात्मज । बोलतां सुखावे रघुराज । ह्मणे प्रकृतीचे चि सहज । उभारलें
विश्व ॥ ३८ ॥ कर्तव्य त्रिभुवनींचें । पाहतां सर्वही शक्तीचें । निर्द्वंद्व
हृदय आमुचें । यथार्थ पाहतां ॥ ३९ ॥ जैसी लेंकुराची क्रीडा । तैसी
चराचराची हे क्रीडा । लाघवें चि भवभयपीडा । दुस्तर होतसे ॥ ४० ॥
निर्दोष हृदय शुद्धीनें । सदोदय स्वरूपतेनें । असतां निर्विकार दर्शनें ।
शंका चि नसे कांहीं ॥ ४१ ॥ येवं समर्पक उत्तरें । आत्मबोध अमृतसारें ।
समर्पूनि रुद्रासी रघुवरें । सीतेसी आणिलें ॥ ४२ ॥ रिघोनी अंतःपुरांत ।
विदेहात्मजा सुप्रशांत । श्रीरामबोध करांबुजकृत । स्वरूप जागरें ॥ ४३ ॥
कवळुनी दशा पद्मकरीं । आणिली दर्शेसी शक्ति निर्धारीं । श्रीरामस्तवनें

मधुरोत्तरीं । तोपली आदिशक्ति ते ॥ ४४ ॥ समनिजांग भानु प्रेमें ।
तुझेनि सर्व शोभा शोभे । मदनजित लावण्यगाभे । सुतं संभवसी लीळा ।
॥ ४५ ॥ त्रिभुवनकृत सत्ता सिद्धि । विधिसंभव सृष्टि स्थिती । समाधि
उद्बोध निरवधी । चिदानंदचर्ये ॥ ४६ ॥ माझें सत्खरूप पूर्ण । अनुभविसी
तूं सुखैकघन । सोहं स्वभावें सघन । अभेद वस्तुता ॥ ४७ ॥ शरीरीं
जैसे अवेव । तैसें तुझेनि अभिनव । भवचर्या समुद्भव । सर्व कीर्ति तूं
॥ ४८ ॥ ऐसें स्तवितां सीतेप्रती । आनंदली आदिशक्ति । करील
शतमुखाची शांती । ते अवधारिजे पुढें ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेश ।
आश्चर्याचा रूपसवेश । महिमा आदिशक्तिविशेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५० ॥
॥ ७ ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥

---

श्री

## सूर्य २ कळा ८

॥ श्री सीतारामायनमः ॥

श्रीरामस्वानंदप्रक्षोभ । वस्तुता स्वरूप स्वयंभ । चिच्छक्ति सीता सुप्रभ । कर्ति सर्व कांहीं ॥ १ ॥ समूळ हेतु अस्तिक्यता । द्वैताद्वैत कारण सत्ता । भेदाभेद निर्ममता । ममतायोगें ॥ २ ॥ ममतायोगें दुर्भव । निर्ममतेनें निर्भव । हें आदिशक्तीचें वैभव । लोकीं विस्तारलें ॥ ३ ॥ येऊनि मायापट्टणासी । कृत आश्चर्यचर्या ऐसी । सुरनरवानरेंसीं । संभारीं शोभली ॥ ४ ॥ महादि सुरवर । जियेचे आज्ञाकिंकर । त्रैलोक्य स्वामिनी साचार । विश्वंभरचर्या ॥ ५ ॥ वेदादिकीं धरूनियां ध्यान । सहस्रविधानें कीजे स्तवन । विष्णु आणि ईशान्न । प्रसन्नतेनें प्रतिष्ठिले ॥ ६ ॥ तैसी पराशक्ति अभिनवे । अघटितघटित विभवें । स्तवितां दाशरथीभावें । प्रसन्न जाली स्वरूपस ॥ ७ ॥ आकृतीसी आली चित्कळा । सचित्सुख वेल्हाळा । पदीं तोडर आगळा । शतास्य पूतळे रूळती ॥ ८ ॥ उग्रचर्या सहस्रभुज । प्रळयादित्याचें आंगीं तेज । कराळ वदनातें अवोज । पंचशत वदनें

॥ ९ ॥ शरळ नयन अग्निचक्रें । यमदंष्ट्रा भीमवक्त्रें । महा आवेश दृढगात्रें । वज्राचळ तनु ॥ १० ॥ भयंकर शोणवर्ण । बिभछचित्र प्रावर्ण । वेष्टिलें हरिद्रावसन । मुक्तकच संदोहते ॥ ११ ॥ लखलखीत प्रळयकर । केतुपरीं खड्ग दुर्धर । भीम कपाळ करपात्र । समूह घसवी ॥ १२ ॥ प्रचंड चाप मेरूपरीं । शर वसवी तैसाचि करीं । लक्षुनि शतमुख समरीं । लोटली सुहासी ॥ १३ ॥ अनुहात ध्वनी कडकडाटें । नादें होती हृदयस्फोट । तडतटों लागलें पोट । क्षमेचेंही ते वेळे ॥ १४ ॥ नयनी वर्षतसे वन्ही । प्रळय विजा टाकी वदनी । प्रळय वन्हिरूप वाणी । आकाश भरिलें ॥ १५ ॥ सत्ता उभी टाकली रणीं । शतमुख धाकीनला मनी । जीव घेतला दर्शनीं । भयाभीत जाला ॥१६॥ शताननाचा प्राण । आकर्शोन सीतेनें पूर्ण । शयासनी संधान । शर योढिलें ॥ १७ ॥ आकर्णांत योढितां बाण । प्रेत जाला शतवदन । कुठारें तोडितां उलथोन । पडे वृक्षापरीं ॥ १८ ॥ रणकर्कश महाशक्ति । असुरांसी धावया मुक्ती । सोडिला योधरूप स्वहस्तीं । शर मुक्तिदायक तें ॥ १९ ॥ सर्व शस्त्रास्त्र वीजें । बळविख्याति महांतेजें । जियेच्या ईक्षण व्याजें । प्रसिध्दीसि आली ॥ २० ॥ शताननाचें शरीर । शराग्निनें निर्विकार । भस्म करूनि साचार । गतीसि पावविलें ॥ २१ ॥ सीतेनें शतमुख वधिला । अमरीं जयघोष केला । दुंदुभीघोषें भरिला । ब्रम्हगोळ आवघा ॥ २२ ॥ तोष वर्तला अपार । वर्षती सुमनाचे संभार । वर्णिती महिमा रघुवीर । शक्तिचा प्रबळ ॥ २३ ॥ नरवानर असुर । तोषले सुखें अपार । भाट वर्णिती साचार । ब्रिदावळी गजरें ॥ २४ ॥ शतमुखाचा जेष्ट सुत । जाला श्रीरामाचा शरणागत । मायापट्टणी त्यासि शाश्वत । राज्य दीधलें सुखें ॥ २५ ॥ बिभीषण लंकेसि गेला । देव पावले स्वस्थानाला । श्रीराम अयोध्येसि आला । परमानंद घोषें ॥ २६ ॥ आत्मारामाची महांसत्ता । ते हे विजयशक्ति सीता । कर्तव्यासि होय तत्वता । कारण अनादी ॥ २७ ॥ श्रीराम स्वयंभ शुध्दबुध्द । परब्रह्म तत्व प्रसिध्द । सीता मूळमाया सि[illegible]संपन्न

सर्वार्थ ॥ २८ ॥ सीता तत्वज्ञानघन । सत्तारूप सनातन । सचित्सुख संवर्धन । सीताचि होये ॥ २९ ॥ स्वजातीय निजांग निर्गुण । भरततत्व सुखैकघन । ब्रम्हानुभवपूर्ण । याचि अर्थे रूढला ॥ ३० ॥ करी भवभयाचें कंदन । तो बोधरूपी निपुण । शत्रुघ्नतत्व निर्वाण । खंडतरज्ञानें ॥ ३१ ॥ या सकळ तत्वाचें अनुसंधान । लक्ष्मणतत्व तें प्रज्ञान । रामतत्व पंचायतन । जाण वसिष्टरुपी ॥ ३२ ॥ शिवप्रोक्त हे तत्वलीळा । अध्यात्मज्ञानाचा जिव्हाळा । पंचतत्व अख्यान माळा । शिवें कंठीं धरिलीं असे ॥ ३३ ॥ शिवराम संवाद तत्वता । विस्तारिली असे शिवगीता । शिवहृदय स्वभावता । रामतत्व स्वयंभ ॥ ३४ ॥ येवं अंगस्ति अनुवाद । जाला वसिष्टासी स्वानंद । श्रीराम स्वसुखाचा कंद । तोषला अगस्तिभाषणी ॥ ३५ ॥ पुढें वसिष्ठमुखें निरूपण । होईल भीमाचें स्तवन । तें चित्तासि आणूनि श्रवण । केलें पाहिजे सादरें ॥ ३६ ॥ इति श्री भीमोपदेश । निरसोनि गेला भवशतास्य । विजयी जाला आदिपुरुष । म्हणे मेरु अनंत ॥ ३७ ॥ द्वितीय सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ श्री ॥ ॥ ८ ॥ राम ॥



श्री

## सूर्य २ कळा ९

॥ श्रीरामचंद्रायनमः ॥

श्रीरामपरतत्व प्रांजळ । सत्वाचें हृदय केवळ । शांतीचें होय निजमूळ । आनंद निलये ॥ १ ॥ अनुभव ज्ञानघन सीता । सर्व गतदशा सत्ता । स्वरूपानंद तत्वता । भरत स्वभावें ॥ २ ॥ भवांतक तो शत्रुघ्न । निजलक्ष लक्ष्मण । अगस्ती तुझें अनुसंधान । यथार्थ शिवप्रोक्त ॥ ३ ॥ येक हृदय स्वभावता । प्रचीतीसी आलीं माझ्या चित्ता । प्रशंसुनिया तत्वता । बोलें वसिष्ट तोषें ॥ ४ ॥ स्वानुभवी तूं महा मुनी । अंतरनिष्ठ

स्वरूपज्ञानी । शिवानुभव वचनी । प्रांजळ केला ॥ ५ ॥ शिवाचें हृदय परम । व्योमगाळींव निरोपम । योगी अनुभवितां विश्राम । तो तुजपासीं देखिला ॥ ६ ॥ शिवकल्याण हृदय । परब्रह्म तव अद्वय । अभिन्न तुजपासीं प्रलय । तो चि देखिला ॥ ७ ॥ अगाध शिवाची लीळा । होय अद्वैत प्रत्ययें आगळा । त्याहि वरी भक्तिचा जिव्हाळा । अभिनव वसे ॥ ८ ॥ श्रीरामासि सनातन । गुरुत्वें सेवी अनुदिन । तारकमंत्राचें अनुष्ठान । चालवी नित्यव्रत ॥ ९ ॥ भक्तियुक्त अनुभवज्ञान । तेथें चि पूर्ण समाधान । विरक्तीचें अधिष्ठान । शिव चि होय सर्वस्वें ॥ १० ॥ श्रीराम सेवितां निजरूपें । धणी न पुरे चि या संकल्पें । मग वानराकृतीं प्रतापें । प्रगटला रामसेवे ॥ ११ ॥ तो हा भीम रुद्रावतारी । श्रीराम सेवा जिवें करी । उभा आठ हि प्रहरीं । कर जोडुनि पुढें ॥ १२ ॥ युक्ति सर्वस्वें वेचु ये । वाचे बोलतां काय जाय । शरीरें करणें स्वयें । तें दास्य यथार्थ ॥ १३ ॥ श्रीरामकाजीं वेचिला प्राण । नाहीं अपेक्षिला सन्मान । सर्वकाळ निराभिमान । दास्य करी श्रीरामाचें ॥ १४ ॥ भीम रामदास विख्याति । प्रगट कीर्ति त्रिजगती । राम चि जाला असे चित्तीं । सर्वस्वें विनटला ॥ १५ ॥ देहजात सुख कांहीं । चित्तीं अपेक्षिलें चि नाहीं । ज्ञानाज्ञान उमसहीं । कांहीं च असेना ॥ १६ ॥ ऐसा विशुध चित्त निर्मळ । वर्तमानी मुमुक्षु केवळ । होउनि अपेक्षी अकळ । परतत्वबोधासी ॥ १७ ॥ या शिवाचें तुजपासीं ज्ञान । येथें कायसा अनुमान । माया कल्मष अज्ञान । स्पर्शलें नसे ॥ १८ ॥ चंद्र बिंबीं अमृत झरे । तेथें विष केवि पाझरे । परमानंदीं निर्धारें । खेद संभवे केविं ॥ १९ ॥ सुवासीं दुर्वास न ये । तेवि सज्जनाचें हृदय । विकृतीनें न वाहे । कदापि हीं मुनिंद्रा ॥ २० ॥ प्रकाश सूर्यमंडळीं । न ये चि तमरूप काजळी । सुधार्णव सुखकल्लोळीं । कडुवट कैचें ॥ २१ ॥ तुझें हृदय सनातन । नित्यानुभव संस्थान । विश्वभाग्य प्रसवे ज्ञान । ब्रह्मसाक्षात्कारें ॥ २२ ॥ अनुभव पंचवदनी । तुज प्रत्यक्ष जाळासे ध्यानी । तूं शिवरूप महामुनी । आपणें कृतार्थ करिसी ॥ २३ ॥ आत्मरवि हृदयांबर । प्रकाशित तेज दुर्धर । नित्य समाधि परात्पर । चर्या तुझी

अगस्ती ॥ २४ ॥ होसी स्वानंद जळधर । बोध वर्षसि साचार । वाक्यधारा अमृतकर । ज्ञेयधरत्री भिजविसी ॥ २५ ॥ उन्मन अमृत वाहिनी । वाहे तव हृदयापासुनी । तया अर्थावगाहनी । विश्व पावन जालें ॥ २६ ॥ ऐसा तूं परम संपन्न । अगाध तुझें समाधान । आत्माराम सनातन । तुजपासीं वसे ॥ २७ ॥ श्रीरामतत्त्व अत्यान सिध्य । बोलिल्यासि अनुभवसिध्य । जें वेदरहस्य प्रसिध्य । योगी अनुभविती ॥ २८ ॥ अनुभवाब्धि अप्रांत । श्रीराममय तुझें चित्त । श्रीरामपंचायतन दैवत । तूं चि होसी सर्वस्वें ॥ २९ ॥ जगज्ञान-काचा जनक । होय प्रज्ञानुभवि येक । तोषला रविकुळटिळक । सद्गुरुभापणीं ॥ ३० ॥ अगस्तीचें हृदय निवालें । स्वानंदाभरण भरलें । विश्रांतिचें पूर्ण टाकिलें । प्रमाण ते वेळे ॥ ३१ ॥ उभयबोध सिंधु पूर्ण । वसिष्ट अगस्ति गहन । परस्परें भापण । मिळणी मिळाले ॥ ३२ ॥ उभय योग येकार्णवीं । श्रीरामसहित अनुभवी । सप्रेम बोध सर्वही । ऐक्यासि आले ॥ ३३ ॥ बोध कल्लोळाकृति लीळा । घोप गर्जना तोषवेळा । अद्‌भूत स्थितीनें सकळा । वेध वर्तला ॥ ३४ ॥ अनुभव येकार्णवीं पूर्ण । बुडालें ज्ञेय ज्ञाताज्ञान । विरोनि गेले गगन । जालें अनिर्वाच्य ॥ ३५ ॥ सावरोनि परस्परें । अगस्ति वसिष्ट प्रेमभरें । आलिंगनीं साक्षात्कारें । सुखावले तटस्त ॥ ३६ ॥ अनिवार प्रेम न संवरे । अद्‌भुत वेध नावरे । रोमांचित वपु पाझरे । आनंदजळ डोळां ॥ ३७ ॥ निर्वेध वेध अद्वैत । विराले सभेचे चित्त । विदेह काया निचेष्टित । दशा प्रगटली ॥ ३८ ॥ हे अभिनव बोध करणी । वरिवरि सुखाचीं भरणी । बुडाली नभधरणी । जया सुखांत ॥ ३९ ॥ प्रज्ञेर्वाण शब्दतोप । निखिळ आनंदाचा आवेश । प्रगटतसे मुखीं घोप । परेश आंगीं भरला ॥ ४० ॥ सावरील कोण कोणाला । सभेसहित सुख जिव्हाळा । आत्माराम तोषला । नित्य अनुभवें ॥ ४१ ॥ वेध उपरमे आगीं । सावधान जाले वेगीं । पुढती चर्चा प्रसंगीं । सावरले सुखे ॥ ४२ ॥ परतत्व अधिष्ठान । अनुभव मूर्ति गहन । तो प्रत्यक्ष रघुनंदन । डोळ्यां पाहतां ॥ ४३ ॥ रामाकार जालियां वृत्ती । आटवेचिना ते प्रवृत्ती । हे संप्रज्ञात स्थिती । समाधि प्रज्ञापूर्ण ॥ ४४ ॥ सचेत चित्रे

सुंदर । वेध निर्वेध साचार । प्रज्ञावंत तरुवर । काया प्रभवें ॥ ४५ ॥ स्थावर प्रतिमा सप्रमाण । अचेतदशा निर्वाण । श्रीरामसमेचे जन । या साक्षात्कारें असे ॥ ४६ ॥ सज्ञान सहज स्थिति । विज्ञान उन्मनी निवृत्ती । उभयबोध विश्रांती । सहां स्थिती जागृत ॥ ४७ ॥ जागृत सिंहासनी मूर्ति । ईक्षणें चि दे जागृती । नित्यबोध सहज स्थिती । दशेवरि आणिलें ॥ ४८ ॥ नित्यबोध कारारविंदें । विकसलीं नेत्रारविंदें । प्रेमरस मकरंदें । झरकती सुखें ॥ ४९ ॥ फरकती रोमांच आंगी । थरकती सकंप योगी । झरकती स्वेदानुरागी । तें चि अवधान घावें ॥ ५० ॥ इति *श्रीभीमोपदेश । वसिष्ट प्रोक्त परम तोर । प्रगटला बोध अशेष । ह्मणे* मेरु अनंत ॥ ५१ ॥ द्वितीय सूर्य नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य २ कळा १०

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम परम कृपाळ । दिनानाथ भक्तवत्सल । स्वरूपदर्शनें केवळ । दासांसि बोधी ॥ १ ॥ मुमुक्षामाजि अग्रणी । सद्भाविकांचा चूडामणी । तो मुमुक्षदर्शनें पावनी । अत्यंतिक असे ॥ २ ॥ मूर्तिमंत श्रीरामाची दया । सीताप्रबोधी कपिराया । म्हणे तू मुख्य प्राण हृदया । तुझा तूंचि शोधीं ॥ ३ ॥ नवनीतें भरलें पात्र । वन्हि स्पर्श पाहिजे मात्र । तेणें चवी आगळें पवित्र । घृत होय तेंचि ॥ ४ ॥ काष्टमांडादि पदार्थ । पाकसिधी होय यथार्थ । परि वन्हिवांचुनी निश्चितार्थ । पाक नव्हेचि तो ॥ ५ ॥ सर्वार्थ युक्तिनें संपूर्ण । होय शास्त्रीं निपूण । भूतभविष्य वर्तमान । जर्‍हीं कळलें ॥ ६ ॥ तर्‍हीं सद्गुरुकृपेवीण । नव्हे स्वरूप समाधान । सार्थकाचें कारण । सद्गुरुकृपाचि ते ॥ ७ ॥ ते सद्गुरुकृपेसि सत्पात्र । तूं अधिकारी होसी पवित्र । पावसी स्वरूप परत्र । निजानुग्रहें ॥ ८ ॥ तुझें तूंपण जेवुनी । आठवासि येतें मनीं । तें तूं अधिष्ठान मननी । पाहें कीं

लक्षण ॥९॥ पाहतेपणाचा अवकाश । जाणवे विशेषाविशेष । तो तूं कवण निर्दोष । पाहे आपआपणा ॥ १० ॥ रामपरोक्ष किं अपरोक्ष । पाहे तुजमाजि प्रत्यक्ष । अवधानि लाउनि लक्ष । निवळ होईं बरा ॥ ११ ॥ येकदेशी किं सनातन । नूतन कीं पुरातन । आपआपणांत रिघोन । पाहे आत्मारामासी ॥ १२ ॥ श्रीरामी प्रीति धरितोसि जे । ते अहाच बाहाच किं काजें । प्रेमें फुंजसी सहजें । कळोनि काये ॥ १३ ॥ न कळतां प्रीति धरी । प्रेमाश्रु गहिवरी । अष्टभाव वरिवरी । भरणें येती ॥ १४ ॥ काय जाणोनि चमत्कारसी । फुंजसी करुणारसीं । काय आठव तुझ्या मानसीं । तो यथार्थ सांगें ॥ १५ ॥ प्रज्ञा भूनंदिनी । विज्ञानसुखसंवर्धिनी । आत्मबोध गतिदायिनि । उचंबळली सुखें ॥ १६ ॥ जाला कपीचा भाग्योदय । बोधें जाली सीता सदय । आक्षेपवचनीं हृदय । घेत कपिंद्राचें ॥ १७ ॥ भवसंपन्न मारुती । करुणेनें द्रवतसे चित्तीं । अवंचक तो प्रेम प्रीती । निवेदितसे सीतेते ॥ १८ ॥ म्हणे मी माझें नकळे । करुणारसें स्खलीळे । हृदय द्रवतसे न कळे । काय कीं प्रेम हें ॥१९॥ गेली बुधीची धारणा । सत्वगळित मति सुलीना । मानसीं काहीं स्मरेना । सुखे हृदय उतटे ॥ २० ॥ उगेंचि चित्त गहिंवरे । अनिवार प्रेमा न संवरे । महद्भुत संचारे । बोधिलें मज वाटे ॥ २१ ॥ मी भीमबळनिधान । जालो सत्वगळित पूर्ण । तृणाचि हीं शक्तिप्रमाण । मज उरली नसे ॥ २२ ॥ ऐसें कारुण्य आथिलें । धारिष्ट न कळे काय जालें । युक्तिबुधिचें हारपलें । ज्ञान सर्वही ॥ २३ ॥ यहलोक पराक्रम । न सुचेचि कांही कर्म । विक्षेप मतिनें सुधर्म । नाकळे परत्रीचें ॥ २४ ॥ ऐसा मी मूढमती । पश्चात्तापें तसरिथत्ती । शरण आलों तुजप्रती । सर्वभावें करूनि ॥ २५ ॥ सर्व संकल्प सोडुनी । माथा ठेविला तव चरणीं । कळेल तैसें करूनि । माते मज उध्दरीं ॥ २६ ॥ तूं तारक माझी जननी । जनकें निरविलें तुजलागुनी । सत्वर कृपा करूनि । देईं समाधान मज ॥ २७॥ स्वानंद सिंधुमाझारीं । मज्जवीं मज निज करीं । अमृतानंद ल्हरी । कोंडवीं बरीं सुखें ॥ २८ ॥ चित्कल्लोळ सरिते । त्रिताप हर त्वरिते । द्दर्इ सुखानंद

विदेहता संभाव्य । भावना रूढे ॥ २३ ॥ मूर्छा तादृत्तता येथ । प्रांजळ ज्ञानासि अवरोध । टाकुनि होई सावध । सर्वांग अवधाना ॥ २४ ॥ निर्विकल्प समाधि गहन । सविकल्प समाधानें पूर्ण । सहजसमाधि सुखघन । अनुभवीं श्रवणें ॥ २५ ॥ अरे श्रवणासि ऐकवी । जो अर्यान्वय भावी । मननें निवळोनि लावी । अखंड निज ध्यास ॥ २६ ॥ तो हृदयस्थ विसांवा । पाहें परि तो नित्य नवा । तुंचि तुजमाजि बरवा । पूर्ण प्रवेश करीं ॥ २७ ॥ ज्ञेय त्रिपद विस्तारें । ऐकें अर्थ चमत्कारें । कृपेनें बोलुनि संस्कारें । चेतविला मुख्यप्राण ॥ २८ ॥ सीता अभयकरकमळें । स्पर्शला मस्तकलीळे । करांबुजें नेत्रयुगळें । कृपा कुरवाळी ॥ २९ ॥ मुख्य प्राणहृदयां भोज । दया पद्मकरें सतेज । थापटुनि पाठि सहज । सावध केला ॥ ३० ॥ निद्रिस्थ सुषुप्ति उठऊनि । जेविं स्नेहाळु जननी । घालित कवळ वदनी । दयेनें पुरती ॥ ३१ ॥ तेविं हनुमंतासि मुखें । प्रबोधित सीता सुखें । आत्मज्ञान तें हरिखें । वृत्तीतें पावतसे ॥ ३२ ॥ बोधावया हनुमान । दयेनें विवंचितां विज्ञान । तंव आपेआप प्रगटोन । प्रवेश हनुमंतीं ॥ ३३ ॥ सीतेची आज्ञा समर्थ । निज-हृदईंचा परमार्थ । कपिंद्रासि तो इत्यर्थ । होय निवळ ज्ञानें ॥ ३४ ॥ निःशब्द वेदगर्भआंगें । प्रगटोनि त्या प्रसंगें । समाधान निजयोगें । अवचट प्रबोधी ॥ ३५ ॥ ज्ञानामाजि सत्ता संपूर्ण । ते सत्तेचि वैदेही आपण । हृदईच्या ज्ञानासि उठऊन । जागें करितसे ॥ ३६ ॥ मुख्य प्राण दहराकाश । निजज्योतिनें स्वप्रकाश । उजळिला दीप अशेष । प्रकाशलें स्वरूप ॥३७॥ नाडळे दृश्य द्रष्टा दर्शन । अभिन्न उदेलें विज्ञान । ज्ञेय ज्ञाता अनुसंधान । असेचिना कांहीं ॥३८॥ जागृती स्वप्न सुषुप्ति । तुर्या ना उन्मनि स्थिती । अनुसंधानाची कांहीं जाति । उरलीच नसे तेथें ॥ ३९ ॥ ज्ञातेपणें उरला ज्ञाता । कोणा असेल ज्ञेय आस्था । समूळ ज्ञान व्यवस्था । आटोनि गेली ॥ ४० ॥ दहराकाशिचा दीप । होउनि गेला तद्रूप । आपपर संकल्प । कवणा होये ॥ ४१ ॥ सुषुम्नेचि पाणदी । शून्य अनादि प्रमोदीं । तियेमाजि स्त्रा सद्वदीं । निर्बंध जाला ॥ ४२ ॥ हे अपरोक्ष

समाधि घन । सनकादि सिद्ध संपूर्ण । अनुभविती ते विद्यमान । हनुमंतीं रूढली ॥ ४३ ॥ अपरोक्षानुभवसुख । हनुमंतासि जालें सन्मुख । नित्य उल्लेखेंवीण लेख । कवण करील तया ॥ ४४ ॥ रसना अमृतचि जाली । तैसी अनुभवें वृत्ति धाली । सुखार्णवीं उपशमलीं उन्मेशलहरी. ॥ ४५ ॥. अभिनव दशा हनुमंतीं । सुषुप्ति माजि जागृती । संतेच्या बोधाची.स्थिति । प्रगटली दिसे ॥ ४६ ॥ सर्व ऐकोनि श्रवणीं । श्रवणाचि नसेचि काहाणी । सर्व देखोनि नयनी । द्रष्टुत्वचि नसे ॥ ४७ ॥ अद्वैतज्ञान महिमा । प्रगटला वस्तुता आत्मा । साक्षी विहीन हनुमा । अवधारा तें ऐका ॥४८॥ करूनि सर्वांगाचे श्रवण । आत्मज्ञानें द्या अवधान । मागतों तुम्हासि वरदान । खंडियाळ तुमचें ॥ ४९ ॥ इति श्रीभीमोपदेश । स्वरूप वस्तुता संतोष । पराशक्ति बोधप्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ५० ॥ द्वितीय सूर्य येकादश कळा ॥ ११ ॥



श्री

## सूर्य २ कळा १२

॥ श्रीरामाय नमः ॥

श्रीराम निजात्मनिर्भेव । निःसंग निर्मन निरावेव । निर्धूत निर्वेध स्वभाव । सिद्ध सहजें ॥ १ ॥ या निजात्मत्वें करूनि । तुज प्रबोधिलें पावनी । तरि तें प्रचितीनें निवळोनि । बोल मजसीं ॥ २ ॥ शब्दाची उत्पती सहजें । अर्थ रूढला तेणें व्याजें । अर्थज्ञान निज उमजें । स्वभाविक दशा ॥ ३ ॥ सुमनी सुगंध येतां । केविं वर्जिजे तत्वता । तैसी स्वभाविक सत्ता । रूढे शब्दार्थे ॥ ४ ॥ प्रज्ञेचें निज जिव्हार । स्वयें जाणिजे साचार । तेथुनि उल्लेख अपार । होती सहजें ॥ ५ ॥ निरंजन वन्ही माजि । ज्वाळा निघती समाजीं । यवगें वर्जाज्या सुतेजीं । रूपाची धरव ॥ ६ ॥ तैसें अभिप्रायें हृदय । रूपासि येतसे विस्मयें । तेथें स्वसुखाचि होये । अभिवृध्दि कौतुकें ॥ ७ ॥ द्रव्येंवीण पदार्थ

जात । केसेनि पा होतील प्राप्त । तैसें द्रव्य सुनिश्चित । जाण निजहृदय ॥ ८ ॥ हृदयज्ञानाची शुद्धि । जया लागली निरवधी । तयासि सर्वार्थ उपलब्धी । होय परमार्थ ॥ ९ ॥ दीपाचेनि विलोकिजे । तें रूप ठेवी देखिजे । ज्ञान संपर्तनें पाविजे । पूर्ण समाधान ॥ १० ॥ हृदया पाहोनियां वरवें । सुखें व्यापकतेसि यावें । मग सहज विसरावें । व्याप्य समुळीं ॥ ११ ॥ अप्रांत अंतराळ पैस । सदोदित निराभास । भावले भावना निःशेष । पाहिजे जालें ॥ १२ ॥ येवं निजअस्तिक्यताधर । हृदयांवर विवर । भव अक्षयारि स्थिर । सुखावें निवांत ॥ १३ ॥ सत्यसंकल्पचर्या । बोध प्रतिष्ठिली तूर्या । लक्षुनि निजात्म सूर्या । प्रभाते समर्पी ॥ १४ ॥ ब्रह्मार्पण करिती स्थिति । अवधारीं निज प्रचीती । ज्ञानचंद्राची जोति । चंद्रचि संपूर्ण ॥ १५ ॥ चंद्र आणि चंद्राचि प्रभा । हा व्यर्थ रूढला लोभा । पात्र धरूनियां क्षोभा । क्षोभविलें व्यर्थ ॥ १६ ॥ मृगजळें बुडविलें । तैसे व्यर्थ मोहें नाडिलें । स्वतसिद्धासि आणिलें । अभावाचें व्यसन ॥ १७ ॥ वनिता ग्राणीं मुक्ताफळ । असतां शुक्रापरिं मुढाळ । अभावें आणिला आळ । व्यर्थ नास्तिक्यतेचा ॥ १८ ॥ भिन्न बुत्वींसी नाहीं आलें । तें अभ्यंतर आपुलें । शोधूनि पाहतां भलें । समाधान लाभे ॥ १९ ॥ अभिनव ते कडोविकडी । आपणामाजि आपळी तिर्डी । पडोनियां घडमोडी । होय कारण विवेका ॥ २० ॥ आश्चिर्य सांगतां न पुरे । विचार वेढावले निर्धारें । निगमहीं याचि चमत्कारें । निशब्द जाले ॥ २१ ॥ बोधरूढी परंपरा । सांगतां हारपली परा । अगोचर परात्परा । हृदयासि तूं बोळखें ॥ २२ ॥ प्रत्यक्ष पाहतां विद्यमान । भिन्नपण दावी संपूर्ण । तें तरि येकलें आपण । दुजें असे चि ना कीं ॥ २३ ॥ काय ह्मणोनि विस्मय । भिन्न भिन्न निजहृदय । येक चि असतां होय । अनेकापरीं ॥ २४ ॥ जैसी तरळली दृष्टी । विपरीत देखे सृष्टी । चुकी न पडतां पोटीं । चुकी हे संपूर्ण ॥ २५ ॥ आपळी वस्तु आपण । देखत दृष्टी प्रमाण । मनाच्या विसरें जाण । भांबावला धुंडी ॥ २६ ॥ तैसें स्वरूप साचार । स्वयें

असतां निरंतर । निज प्रातीसी वारंवार । विचार करिती ॥ २७ ॥ हे. काय ह्मणावी वुद्धी । नसे आपआपणा शुद्धी । परभावनेनें त्रिशुद्धी । वुडाले भवीं ॥ २८ ॥ आपणाहूनि परब्रह्म । ह्मणती तया लागला भ्रम । ब्रह्मभ्रांतीनें कर्म । लागलें वळेोत्तरें ॥ २९ ॥ या कारणें निज निधाना । पाहे पवमाननंदना । चित्प्रकाशक गगना । सामउनि पोटीं ॥ ३० ॥ सकळ तत्वाचे उभारे । ब्रह्मांड कोटी विस्तारें । निमिषार्धांत निर्धारें । प्रसवतसे हृदय ॥ ३१ ॥ येणे प्रवृत्तीचें होय कारणें ॥ प्रवृत्ति पाहतां साधारण । परि स्वरूप असाधारण । नुमसे कांहीं येकपणें ॥ ३२ ॥ जें जे तत्व निर्वाळलें । नामरूप गुणाथिलें । तें चि पृथकत्वें आलें । निज प्रलयासी ॥ ३३ ॥ नव्हे धरा नव्हे जीवन । नव्हे तेज नव्हे पवन । नव्हे नभ अनुमान । शून्यास्तिक्यता ॥ ३४ ॥ नव्हे ज्ञान कांहीं येक । गुणधर्म व्याप्य व्यापक । नव्हे क्रिया ना कारक । कांहीं येकपणें ॥ ३५ ॥ आपुलेपणारी पाहतां । नसे वर्णव्यक्ति तत्वता । प्रमाण न दिसे पाहतां । निजस्वरूपासी ॥ ३६ ॥ आतां काय ह्मणे नित्यासी । पाहते पाहणेपणेनसी । दिसे चि ना असो पासीं । प्रमाण रूप ॥ ३७ ॥ श्रीमुख पाहवें दर्पणीं । लावण्य तोपावें मनीं । तैसे परी माझ्या वचनीं । अनुभवीं स्वरूप ॥ ३८ ॥ गोटींच्या पत्रवडी जेवितां । उपचार न रुचे चित्ता । माधुर्यतेने तत्वता । अवधानें वेधिली ॥ ३९ ॥ तैसें मारुतीचें अभ्यंतर । सुखें लागले सुस्थीर । अनुभवयोगें साचार । त्यांचावले सुखें ॥ ४० ॥ सुबुद्धि धरणीजा चतुर । जाणून भीमनिर्धार । ह्मणे पासीं जाला साक्षात्कार । वळवळा येणें हा ॥ ४१ ॥ आतां नाटोपे मवणा । प्रवृत्तीसी तरी मानीच ना । निवृत्तीसी हि आणींना । निज दृष्टींसी ॥ ४२ ॥ जैसें पक्व जालियां फळ । गोडीसी हेलावे परिमळ । घ्राणदेवताचि ते केवळ । जिव्हा होउनि सेवी ॥ ४३ ॥ तैसें महारुद्र-हृदय । पक्वतेसी आलें प्रमेय । अर्धांकरस प्रत्यय । चिन्हित आमोदें ॥ ४४ ॥ मुकुळित नयन सरोजें । पातीं फोडूनि विंवती तेजें । सुख पारव्र अव्जें । हास्यें विकसित ॥ ४५ ॥ आनंदाविर्भूत तनु । तेजस्वी

प्रसन्नता भानु । सत्व चिन्हित दशा वानू । शकेल कोण तुतें ॥ ४६ ॥ परत्रीं धरिली सोय । परतोनि मजकडे पाहे । तुवा बोलावें येणें हृदय । जांटिलेंसे माझें ॥ ४७ ॥ अवरोध टाकुनी सहज । धरूनियां निज उमज । संभापणीं निववीं मज । पाडसा माझिया ॥ ४८ ॥ सीता करुणेनें तुंबळली । कारुण्यें सीमा टाकिली । मारुती हृदयीं भरली । विज्ञानसरिता ॥ ४९ ॥ जैसी जागृती ये अवचट । तैसा मारुती निकट । सावध दशेने स्पष्ट । सावरिला सुखें ॥ ५० ॥ म्हणे आहे आहे माते । तारक भवाब्धीसी तूं सीते । तुझ्या कृपेचा बोध सत्ते । स्वराज्यीं अभिषेचि ॥ ५१ ॥ अवरोधें गेला दुर्भव । जालें स्वभावाचें वैभव । स्वरूप प्राप्ति निज दैव । फळलें सुखें ॥ ५२ ॥ काय तें मी बोलों मुखें । घनवटलें हृदय सुखें । स्वानंदाचेनि हरिखें । मिठी पडली परेसी ॥ ५३ ॥ आतां कपिमुख संभापण । गोडीचें निज निरूपण । येकाग्र देउनी अवधान । अवधारिजे श्रोतीं ॥ ५४ ॥ उपदेश क्रम आश्चर्य । तुर्येचें वेढावलें चातुर्य । घडमोडीचा द्वितीय सूर्य । संपूर्णतेसी आला ॥ ५५ ॥ प्रथम सूर्यीं प्रकाशिलें । द्वितीय सूर्यें पाहिलें । पुढें तृतीय सूर्यें भोगिलें । प्रमय ते अवधारा ॥ ५६ ॥ इति श्रीभीमोपदेश । जाला स्वरूपीं समावेश । पावला सीतारूप परेश । म्हणे मेरु अनंत ॥ ५७ ॥ द्वितीय सूर्य द्वादश कळा संपूर्णमस्तु ॥ १२ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ३ कळा १

॥ श्रीगणेशाय नमः ॥

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम प्रतिष्ठित देवी । सत्ता ज्ञानी तूं स्वानुभवी । अपरोक्ष सुखाची पदवी । अर्पित वल्लभीं ॥ १ ॥ सुलभ प्राप्ति तुज सेवितां । दुर्लभ अर्थ येती हाता । नित्यानंद स्वभावता । अधिष्ठित बोधें ॥ २ ॥

सुखें स्वयंभ जागतीये । मुखें उद्बोध वागतीये । सांख्यें अभेद विभागें तिये । स्वानंद सरिते ॥ ३ ॥ कलि कल्मष हर हृदया । प्रबोधें पाळिसी हृदया । सुखकृत माया सदया । तुर्यानिवासिनी ॥ ४ ॥ हृदयांभोज विकासिनी । चित्कळा विंब भरणी । स्वयंभ अनुसरणें करणी । कटाक्षें वर्षविसी ॥ ५ ॥ हृदयामृत करखंड । अनुभविती सिद्ध अखंड । तिये तृप्तीमाजि खंडाखंड । उमस चि नसे ॥ ६ ॥ स्वयंभ स्वरूप ज्ञान । बोधी अभेदसाधन । अद्वैत वस्तु समाधान । निखळानंदकरें ॥ ७ ॥ परब्रह्म साक्षात्कारिणी । बोध समुद्भव कारिणी । महाकारण धरणी । सुखें पिकविसी ॥८॥ स्वभावस्थितीचीं गरिमा । न कळे ब्रम्हादिकां सीमा । मौन्य पडलेंसे निगमा । स्तवितां तुज ॥ ९ ॥ तेथें वाचस्पती केउता । सरता होइल स्तवितां । शिव विष्णु विधाता । तुझा पार नेणती ॥ १० ॥ तूं निजांगें अविनाश । तुझेनि प्रकाशिला स्वप्रकाश । तुझेनि ब्रह्मोपदेश तोष । उपक्रम सर्वहीं ॥ ११ ॥ तूं सद्गुरुरूपें प्रत्यक्ष । मोक्षासी देसी निजमोक्ष । अनुभवामृत कटाक्ष । तुझा जननिये ॥ १२ ॥ अकाया सच्चित्सुखें । परेसी बोधिसी सुखें । परामूळ सुखदुःखें । ईक्षणें वारीसी ॥ १३ ॥ परेश परा हृदयस्थ । त्यासी बोधें केलें स्वस्थ । अस्तविला अभेद अस्त । साक्षत्व सूर्याचा ॥ १४ ॥ स्वानंदचंद्रिका हीं येक । मायामय होता कळंक । तो विलोकनें निःकळंक । केला चिदंबिके तुवां ॥ १५ ॥ परम शिवासी उपदेसिलें । पूर्ण विष्णूसी अनुग्रहिलें । तुवां स्वरूपासी दिधलें । स्वरूप सुख ॥ १६ ॥ तुवां आदि विधि प्रबोधुनी । प्रबोधिला बोध प्रतिष्ठानी । संस्थान सुख अधिष्ठानी । चालविला क्रम ॥ १७ ॥ अमरपदें वर संस्कार । ठेविली स्वरूप साक्षात्कार । योगियांची निजमाहेरें । परिपाळिसी सुखें ॥ १८ ॥ संतमुनी ऋषिवृंदें । तुझेनि तोषली स्वानंदें । स्वसुखासी हि आलीं दोंदे । निर्द्वंद्व पदवीनें ॥ १९ ॥ साधु साधक सफळ । तपोनिधि सूर्य सोज्वळ । तुझ्या कटाक्षेंचि प्रांजळ । निवाले हृदयीं ॥ २० ॥ अभेद दुर्भेद संस्कार । कटाक्षेंचि वारिसी साचार । जीवासी कृपेनें निर्विकार । करिसी निज प्रलयें ॥ २१ ॥ शिवचिदानंद

विग्रह । ज्याचा अक्षयी धनसंग्रह । लाधला तुझा अनुग्रह । मूळ पुरुषासी त्या ॥ २२ ॥ तो मी शिव बोधिसी मज । पाहती ऋषिदेवसमाज । वेधिले वचनें चि सतेज । ऐसी सत्ता ज्ञानाची ॥ २३ ॥ अधिष्ठान विभूचे अंकीं । अपरोक्ष सुखें येकायेकीं । अनुभव ब्रह्म सकळीकीं । सेविजे तुतें ॥२४॥ तुझिया कटाक्षे वीण । काय असोनी तें निर्गुण । तें तुवां प्रलया आणून । कृतार्थ केलें माये ॥ २५ ॥ तुझ्या बोधाची चातुर्यता । कवण जाणेल पैं तत्वता । तूं चि होउनी विधिसुता । कळांभोज विकसीसी ॥ २६ ॥ अनुभवदशा गहन । परि ते ही व्यर्थ प्राप्तीवीण । कां जे प्रसन्नतासाधन । हातासी न चढे ॥ २७ ॥ निज प्राप्तीसी कारण । युक्ति असाव्या असाधारण । बोध उपपत्तीवीण । वृद्धीते न पवे ॥ २८ ॥ कांक्षा प्रत्योत्तर शिक्षा । स्वानंदप्रद तुझी दीक्षा । आत्मयासी या प्रत्यक्षा । प्रत्यक्ष करिसी ॥ २९ ॥ आशंका निवृत्ती चमत्कारें । आनंद वर्षविसी अमृतोत्तरें । परम उत्प्रेक्षा विस्तारें । प्रमय रूढविसी ॥ ३० ॥ अद्भुत-स्वभाव अलंकार । करिसी स्वसुखासी शृंगार । ग्रंथ तात्पर्याचा उद्धार । करिसी वचनें ॥ ३१ ॥ अभिनव फळप्राप्ति दृष्टांत । यया विस्तारीं सुख निवांत । प्रबोधिसी सशांत । अंतर्वेध चर्या ॥ ३२ ॥ चातुर्यासी निववीसी । अभिनवासी गौरविसी । कांहीं न होनीयेसी । प्रत्ययासी तूं ॥ ३३ ॥ योगियाचें हृदय सभ्र । प्रतिष्ठिसी तेथें परंधाम । येकाग्र ज्ञानज्योति निःसीम । आंगें चि होसी ॥ ३४ ॥ बोधाच्या कडोविकडी । जाणसी चित्कळा कोडी । सुखाची सुखाड वांकडी । वर्षसी घनमुखें ॥ ३५ ॥ योगियांचा निजविश्राम । प्रसिद्धतेनें आत्माराम । त्या रमविसी निःकाम । निजयोग विभवे ॥ ३६ ॥ श्रीरामवरदानसंवर्धनी । श्रीरामानुभवविळासिनी । श्रीराम चित्प्रकाशकरणी । आत्मचिद्रप्रभे ॥ ३७ ॥ आत्मत्व तुझेनि आत्मया । शांति तनुसी वाढवावया । स्वभाविक ज्ञानें सदया । क्षमा-नंदिनी होसी ॥ ३८ ॥ ऐसें कपींद्रमुखीचें स्तवन । प्रज्ञानुभव विस्तीर्ण । हृदयाचा करुनी श्रवण । अवधारिलें संतेनें ॥ ३९ ॥ तेणें परमतोषें तोषली । निरवधी सुखें उचंबळली । हनुमंतेसीं बोलती जाली । तें रहस्य

अवधारिजे ॥ ४० ॥ इति श्री भीमोपदेश । स्वरूप प्रांतीचा प्रदेश । सीतातत्वनें सारांश । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ तृतीय सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ३ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामानुचर मुख्य प्राण । तत्वता अमन अप्राण । स्वरूपें उमजलासी खूण । आधीं तें चि निरोपीं ॥ १ ॥ अनुभवामाजि नाना युक्ती । यथार्थ हे विकल्पमती । केवळ स्वानुभवस्थिती । प्रज्ञाविहीन ते ॥ २ ॥ होसी वित्पत्तीनें आगळा । ते जाण शाब्दिक खेळा । प्रचीतीचा जिव्हाळा । जागवी आधीं ॥ ३ ॥ विद्यासंपन्न सार्वभौम । चातुर्यनिधि परम । चिद्व्योम रवि सोम स्तोम । जेथें उपरमले ॥ ४ ॥ जाणिवेची चळवळ कांहीं । अणु हि न साहे पाहीं । तें तूं व्योम धाम देहीं । अनुभविलें कैसें ॥ ५ ॥ शास्त्रज्ञ महापंडित । वित्पत्तीनें करिती अर्थ । चुकोनी जिव्हाळा व्यर्थ । वाचाळ ब्रह्मज्ञानी ॥ ६ ॥ प्रज्ञावंत नवव्याकरणी । करतळामळ शब्दज्ञानी । अर्थकरकर निदानी । अहंकृतीसी येती ॥७॥ जाण निर्फळ ते विद्या । वित्पत्तीरूप अविद्या । वादप्रमाद सद्या । फळ अनर्थाचें ॥ ८ ॥ आत्मज्ञान म्हणिजे काय । विलक्षण कोठें आहे । बा रे सावधान होय । पुढती येथें ॥ ९ ॥ फार सूक्ष्म व्हावें ज्ञान । अनुसंधान ते गहन । येवजप्रतेचें आसन । चळों नये सर्वथा ॥ १० ॥ उपचार सूत्राग्रती । होय निज स्नेहाची पूर्ति । तरी प्राणाची प्राणज्योती । चिरंतन उजळे ॥ ११ ॥ अच्युत हृदय तें कैसें । दृष्टीवीण निजपैसें । पाहलें तेज अपैसें । विलोकन सांभाळीं ॥ १२ ॥ स्थिरावेना प्रज्ञाधर । आतुडेना निज विचार । तरी मग तो चि अंधकार । महा मोह जाण ॥ १३ ॥ प्रज्ञा ऐल तीरीं पाल्हाळ । मध्यें शून्याचें अंतराळ । पैल तीरीं

केवळ। विज्ञानं स्थिती ॥ १४ ॥ स्वयंभ भानूच्या प्रकाशें। सुवर्णाद्रि समतोयें। विस्मयापन्न कडोसे । भासती अभावाचे ॥ १५ ॥ ज्ञानरत्नसानुशिखरें। चातुर्याची सीमा पसरे । मूळ संकल्प साचोत्कारें । असत चि असे ॥ १६ ॥ तुझें तुज माजिं ज्ञान । विद्यमानी सनातन। तुजसीं भिन्न कीं अभिन्न। सांग मजला ॥ १७ ॥ त्या ज्ञानांत तूं कैसा । सांग उमजोन पाडसा । आतां अनुभवासरिसा। संवाद करीं ॥ १८ ॥ अमृत संजीवनी सुमनें । तसीं संतिचीं सुवचनें । ऐकोनिया मुख्य प्राणें । विलोकिलें हृदय ॥ १९ ॥ तवं तें निजानंदघन। अप्रांत स्थितीनें गहन । देखिले निज निधान । पुत्रें पितियाचें जेविं ॥ २० ॥ परम पुरुप रामाचें । अक्षयी धन निजाचें । हृदयीं रिघतां चि साचें । प्राप्त जालें कपीसी ॥ २१ ॥ हृदय पाहोनि चमत्कारें । धावया येत प्रश्नोत्तरें । तवं मध्यें चि विकल्प वारें । प्रश्नेसी चेतवी ॥ २२ ॥ हृदय सोडुनी येतां । ऐसी होतसे अवस्था । हृदयीं रिघोनी राहतां । शुद्धि चि नाडळे ॥ २३ ॥ समर्थ गुरु आज्ञा स्मरे । गजवजुनी निर्धारें। प्रचीतीसी ये जनीं खरें । चुबकळतसे सुखें ॥ २४ ॥ आनंदसिंधूच्या तळा । जातां निःशब्द जिव्हाळा । येतां अवस्थेसी लीळा । साक्षत्व गिरी वेघे ॥ २५ ॥ परिक्षुनी पाहे स्थिती । तव उभयांसी अंतर किती । धरांबरभेद पुढती । सावरीत दशा ॥ २६ ॥ आंगीं भरतां देववारें । मग नुरे पूर्व संस्कार । वदों लागेल तें निर्धारें । प्रचीतीसी ये जनीं ॥ २७ ॥ आंगीं नसतां तो संचार । युक्ति बोले वारंवार । तैसा तो आत्मसाक्षात्कार । नव्हे चि मारुतीचा ॥ २८ ॥ यथार्थ जिवें अवरोधला । प्राणस्पंद निघोनी गेला । अवरोधतेचा वारला । ताटस्त वेध ॥ २९ ॥ चमत्काराचा झळंब नसे। प्रचीतीच्या निज प्यासें। स्थितीसी येउनी तोयें । स्वभाविक बोले ॥ ३० ॥ आहे आहे कृपासरिते । होसी मम तारक माते । तुझेनि स्वानंदसिंधूनें । भरण येनसे वरिवरी ॥ ३१ ॥ तत्वता आत्मसाक्षात्कार । तुझेनि मज जाला साचार । मी पायवों परपार । भवाब्धीचा ॥ ३२ ॥ तुझिये कृपेचीं नौका । विवेकासी

पात्र करूनि विवेका । विवेक अभ्यंतर निका । घर दिधला ज्ञानें ॥ ३३ ॥ दश देहाचा एक देह । पाहतां मुळींच तो विदेह । तुर्या उन्मनी प्रत्ययें । विदेह संकल्प सरला ॥ ३४ ॥ ऐसें वाटतें प्रचीतीनें । हृदय दाटलें सुखानें । परि तें साक्षत्व कवण्या गुणें । येथें अनुमान असे ॥ ३५ ॥ स्वरूप प्रमाण सीमेसी । जातां निज निजध्यासीं । नुरे अनुसंधान पैसीं । काय बोलावें पुढें ॥ ३६ ॥ त्या स्वरूपाच्या ठायीं । साक्षत्व असेना कांहीं । मध्यें चि साक्षत्वाचें पाही । भान कवणा जालें ॥ ३७ ॥ येथें चि मज निवळ कीजे । परतोनियां बोधविजे । चिदानंद धणी जे । कृपेनें मज सांभाळी ॥ ३८ ॥ धन्य धन्य निज सभाग्यता । अद्वैतें जोडली निजसत्ता । माझिया दैवांसी आतां । पार कांहीं असेना ॥ ३९ ॥ सुरभीच्या वत्सासी । काय कांक्षा इच्छ्या पूर्तीसी । चिंतामणीच्या निवासीं । काय चिंतिलें न पाविजे ॥ ४० ॥ वर्धतां कल्पद्रुम छाये । अभिष्ट पुरती तरी संकट काये । अमृत सरितेसी पाहे । निर्भय वसति मळे ॥ ४१ ॥ जगदाव देव श्रीराम । सकळ योगियांचा विश्राम । तो निज जनक परम । होय साक्षात्कारी ॥ ४२ ॥ सकळ गतीची सद्गती । तूं निज जननी विश्रांति । उभयता तुही आर्यंती । शिरावरी माझिया ॥ ४३ ॥ परम पुरुष पराशक्ति । माया माहेर भक्ति मुक्ति । परिपाळ्णें विरक्ति । नित्य दशा दिधली ॥ ४४ ॥ अक्षयी संपदा निरंतर । स्वसुख संवर्धन थार । परंधाम माहेर घर । ठळे पुरती स्वइच्छ्या ॥ ४५ ॥ ऐसें बोले अंजनीनंदन । लक्षूनि रामसीतावदन । करीतसे अभिवंदन । पुढती पुढती ॥ ४६ ॥ श्रीराम म्हणे वायुसुता । प्रसन्न जाली चित्शक्ति सीता । काय तुज उणें आतां । स्वसुख संभापणीं ॥ ४७ ॥ भव विजय श्रीदुर्धर । भेद शतमुखहंत्री साचार । जाली प्रसन्नतेनें उदार । माझे स्वरूपीं मेळविलें ॥ ४८ ॥ मी तूं पणें वीण सहज । उमजविला निज उमज । तो तूं होसी आत्मज । आत्मा चि माझा ॥ ४९ ॥ देवाधिदेव कृपाळूपणें । बोलल्या स्वदावरी सुखानें । अमृतानंद भाग्यें । निववितें साक्षत्वीं ॥ ५० ॥ तें चि पुढें निरोपण । साक्षत्वातीत निज खूण ।

रुद्रावतार सगुण । पावेल विश्रांति ॥ ५१ ॥ इति श्री भीमोपदेश । सीता संभाषण सघोष । प्रगटला चिद्रत्नकोश । म्हणे मेरु अनंत ॥ ५२ ॥ तृतीय सूर्य द्वितीय कळा संपूर्ण ॥ २ ॥



श्री

## सूर्य ३ कळा ३

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सर्वात्मा मी स्वयें । सीता माझें चि होय हृदय । सीताउपदेशें प्रत्यय । ब्रह्मादिक देवीं ॥ १ ॥ सीता अनुग्रही जया । अनुभव पुसत ये तया । सकळ योग लागती पायां । वोधा निजवेधेंसीं ॥ २ ॥ समाधींचीं समाधानें । अक्षयानंद लक्षणें । चमत्काराच्या ऋद्धीनें । वोळगती सुखें ॥ ३ ॥ पाइकी करी निज विचार । प्रज्ञा प्रकाशी सारासार । स्वरूपाचा साक्षात्कार । वसोटा करी घरीं ॥ ४ ॥ सीतेचें दयेनें जाण । वेद ही जाला पवन । हें वोलिलें नव्हें स्तवन । प्रत्ययो पहावा ॥ ५ ॥ तवं सद्गुरु वसिष्ट तोषें । बोलता जाला स्वानंदवेशें । धन्य रुद्रा भाग्य चंडांशें । उदयो केला निल ॥ ६ ॥ योगी जया आराधिती । शिवादि सिद्ध सेविती । परमानंद अवाप्ति । ज्याच्या स्मरणें ॥ ७ ॥ तो परमात्मा श्रीराम । साधुजनाचा आराम । वोळला तुजवरी परम । संपन्न दयेनें ॥ ८ ॥ श्रीरामा चिच्छक्ति सीता । जे आत्मसाक्षात्कारसत्ता । जे अनुभवाची तत्वता । स्वानंद जननी ॥ ९ ॥ तियेचा अनुग्रह तुज । स्वात्मज्ञान वोधें सतेज । साक्षात्कारीं सूर्य उमज । हृदयाकाशीं आला ॥ १० ॥ अकळ श्रुतींचीं तात्पर्ये । प्रकाशलीं तें चित्सूर्यें । स्वयंभ तुझ्या चि प्रत्ययें । दिनमान करितो ॥ ११ ॥ तुझें हृदयींचें साक्षत्व । सोहं स्वरान्वित सत्व । तत्व शोभा महातत्त्व । जाणसी विद्यमानें ॥ १२ ॥ प्रर्चातनें देखसी सर्व । तें द्रष्टुत्व तुझें अपूर्व । साक्षत्वातीत अहं । क्षय न कळे तेणें ॥ १३ ॥ क्षुधा जवंवरी शरीरीं । मूर्च्छना

तीक्ष्ण बोध सुखसारें । अमृतगर्भ विचारें । पाहतां होती ॥ ३४ ॥ औषधाचें तीक्ष्ण । माजि कटुता पूर्ण । घेतां अमृताहून । परिणामा आणी ॥ ३५ ॥ बाळ्यासाठीं कळवळून । माता औषध दे दारुण । तात्काळ श्रम परिसंपूर्ण । आरोग्यतेसी आणी ॥ ३६ ॥ तैसी वसिष्ठदयेची थोरी । आत्मज्ञाना पालन करी । भवक्षयातें निवारी । ईक्षण मात्रें ॥३७॥ तैसीं वसिष्ठमुखसंभाषणें । अपरोक्ष ज्ञान साधन । भक्तीचें रहस्य गहन । अवधारिजे श्रोता ॥ ३८ ॥ माझे अरुप बोल ऐसे । पाहतां सारांश समरसे । कां जे प्रत्ययाच्या तोषें । तुह्मी ऐकतां ॥ ३९ ॥ इति श्रीभीमोपदेश । संशयासी निषेध तोष । स्वानंदाब्धि प्रमय कोश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४० ॥ तृतीय सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ३ कळा ४

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम तन्मय होतां । सरे भवमय तत्वता । कर्मसंश्रुति ममता । विकल्प सरे ॥ १ ॥ विरती संकल्प कोटी । सरती विकल्पसृष्टी । दृश्य ज्ञात त्रिपुटी । नाम उरेना ॥ २ ॥ स्वरूप ज्ञानें निवळ । होय प्रांजळ जन्ममूळ । विसांवलें सरे सकळ । जाण कल्पनेचें ॥ ३ ॥ जागृतीसी आलियां केवळ । सरे स्वप्न जात अखिळ । आपआपणास अकळ । तत्व निवळे ॥ ४ ॥ चक्षूची उघडी काया । दृश्य द्रष्टा नसे तया । दर्शनाची कासया । त्रुटी पडे त्या ॥ ५ ॥ दर्पणासी दिसों लागलें । पाहतां मुख ही तें चि जालें । दुजेवीण देखिलें । अभिनव आपणा ॥ ६ ॥ सुवर्ण जालें शरीर । तें चि अलंकारलें सुंदर । रत्नजात मनोहर । मिरवलें अपाडें ॥ ७ ॥ हे विज्ञान हातवटी । आपआपणा पाहे दृष्टी । परी दृश्य जात त्रिपुटी । स्पर्शेना येथें ॥ ८ ॥ सर्वांगें डोळस डोळा । अपरोक्ष ज्ञान जिव्हाळा । त्याचेनि सर्व जाणीव कळा । देखण्या जाल्या ॥ ९ ॥

ज्ञानासी दिल्हें ज्ञान । परतोनि घेतलें दर्शन । ज्ञानामाजि विज्ञान घन । आत्मा ऐसा ॥ १० ॥ ज्ञानाचें निवळले पण । प्रत्ययाचें आत्मदर्शन । अवगमलें विज्ञान घन । निजानुसंधानी ॥ ११ ॥ परब्रह्म तें निर्विकार । त्यासी आत्म्यासी नसे सिनार । ज्ञानयोगें साचार । आत्मत्व दाविलें ॥१२॥ आत्मत्वाची सखोलता । पाहतां पाहतां विशाळता । पार न लगे चि या अर्था । बृहद्ब्रह्म बोलिजे ॥ १३ ॥ परापर संधी । उपरमली बुद्धि । परब्रह्म त्रिशुद्धि । निजास्तिक्य म्हणिजे ॥ १४ ॥ जाणिवेचें विशाळपण । ज्ञानें गाळिलें पूर्ण । यालागी चिद्गगन । म्हणिजे तया ॥ १५ ॥ एवं श्रुतिमतें संकेत । अनुभव सिद्ध सिद्धांत । वस्तुता वेदांत धादांत । आत्मत्व परि शोधें ॥ १६ ॥ अहो वेद जन्हीं जाला । वेदनेवीण न कळे त्याला । अवेदकपणें गेला । विस्तार शून्य ॥ १७ ॥ जाण आपुलें जिव्हार । अक्षर ब्रह्म ओंकार । त्या प्रणव धरें उच्चार । अक्षत कवचें ॥ १८ ॥ जें जें अनुसंधान मूळीं । तें तें स्पष्ट कळे फळीं । हा परिपाठ सकळीं । रूढीनें पडिला ॥ १९ ॥ मुळींची फळ पैं जाण । निजांगें पाहतां गहन । रसना सुस्वाद आपण । आपला घेतसे ॥ २० ॥ आपसुवास केवळ । आपणेंचि प्राण प्रांजळ । घास घेणें अविकळ । लाभ सुखाचा ॥ २१ ॥ औषधयोगें अग्नि । तरुवराकार सुमनी । चित्र औषधाचें वन्हि । प्रकाशतें तया ॥ २२ ॥ तेविं आत्मा विज्ञान घन । अस्तिक्यतें जे विद्यमान । सन्निधानें साक्षत्व ज्ञान । प्रकाशलें तेणें ॥ २३ ॥ आम्लकटुत्व तीक्ष्ण । पाहतां बीजाचा चि गुण । परंतु जीवनेवीण । रस प्रसिद्धि नव्हे ॥ २४ ॥ क्षयाभिवृद्धि चित्कळा । तियेचा आत्मा चि जिव्हाळा । परी तो कर्ता नव्हे लीळा । रूढवीला कळेनें ॥ २५ ॥ निर्विकार गगन । व्यापकतेचें अयतन । पवनसंभव कारण । केलें तया ॥ २६ ॥ कां जे अवकाशें पुरवलें । सकळ कर्तव्यासी पावलें । तेणें कडुनि जाहलें । कारण तयाचें ॥ २७ ॥ द्रव्य देऊनि पदार्थ घ्यावे । पाहतां द्रव्याचे चि स्वभावें । परी तें द्रव्य प्रसवे । काय पदार्थासी ॥ २८ ॥ गांठीं असतां द्रव्य कोटी । पोटीं क्षुधेची पीडा मोठी । तेथें अन्नेवीण गोष्टी । द्रव्याचि न सरे ॥ २९ ॥

ज्ञान जगत्कारण होये । ज्ञानें वर्तविले आश्चर्य । परी प्रत्यक्ष ज्ञानाचें हृदय । कार्य ना कर्ते ॥ ३० ॥ माया कारण त्रिपुटी । ज्ञानें रूढविली वेटी । ज्ञान हि तिचे चि पोटीं । संभवलें जाय ॥ ३१ ॥ नामरूप सर्व कांहीं । नसोनि वस्तुचे ठायीं । रूढविलें असे पाहीं । त्याचीं अस्तित्व मायेनें ॥ ३२ ॥ ठेवावया स्थळ जालें । ठेवणार कोठुनी आले । तेणें ठेवणें ठेविलें । चोरीनें तें कैसें ॥ ३३ ॥ या चोरीचें संकट । स्थव्यवरी घालिती स्पष्ट । परि चोरट्याचें सपाट । होतसे तेणें ॥ ३४ ॥ तैसें निजांग निर्मळ । साक्षत्वाचा समूळ । साक्षत्वें घातला आळ । परी नीतीनें मानला ॥ ३५ ॥ न करितां व्यापकपण । व्यापासी जालें कारणें । पृथ्वी होती तरी संपूर्ण । सृष्टि वर्तली ॥ ३६ ॥ रत्न होतें तरी सोज्वळ । फांकले प्रभेचे .कीळ । होतें सूर्याचे मंडळ । तरी निघाले झळाळ रश्मीचे ॥ ३७ ॥ विंब होतें चंद्राचें । तरी झरे चालिले सुधेचे । हे गौण दृष्टांत परी तयाचें । रूप निवळावे ॥ ३८ ॥ तैसें आस्तिक्यतेचें स्थळ । पाहतां हृदय चि केवळ । विद्यमानी भाव सकळ । प्रचीतीसी येती ॥ ३९ ॥ आतां श्रवणासी ऐकवी । तो चि नयनातें दावी । नाना दृष्टांतें उगवी । स्वरूप विवरें ॥ ४० ॥ रिघोनी सूक्ष्म प्रज्ञेसी । कार्य कारण निश्चयासी । शोधूनि पाहे मानसीं । प्रांजळ तत्त्वे ॥ ४१ ॥ सूत्राचीं मणिमाळा । तेवि तत्त्वीं त्याचीं कुळा । विश्वसाक्षीनें लीळा । मुक्त होय सहजें ॥ ४२ ॥ साक्षत्व सूत्र जमाचें । पहावें रूप तयाचें । कीं लक्षण कर्तव्याचें । सूत्र त्यावरी वर्ते ॥ ४३ ॥ त्या कर्तव्यसूत्रे कडुनी । कर्ता भासला तो जनीं । जेंवि स्फटिकाच्या संस्थानीं । कृष्ण पीत योग ॥ ४४ ॥ वस्तुता तयाचे आंगीं । नसे चि वर्ण अंतरंगीं । गुणातिशय प्रसंगीं । आत्मा सगुण ॥ ४५ ॥ तया निर्धर्मासी धर्म । लाविलें निष्कर्म्यासी कर्म । जगत्कारण सुवर्म । कळलें नवजाय ॥ ४६ ॥ जगत्कारण ब्रह्म नव्हे । जे कां निर्दोष स्वभावें । मद्य अद्वैत वास्तवें । वस्तुना अपरोक्ष ॥ ४७ ॥ माया म्हणावी जगत्कारण । तरी ते अभावें चि संपूर्ण । मुळीं च लटिकें त्यापासून । होईल काय ॥ ४८ ॥ असत्यें सर्वहि केलें । बोलती मिथ्यावादी भले ।

कितेक म्हणती जालें । सत्याचे पासुनी सर्व ॥ ४९ ॥ ते हि तैसें चि सत्यवादी । घालिती अनुमान प्रमादीं । माया ब्रह्म अनादि । संग निवळेना तया ॥ ५० ॥ आतां असो हें सविस्तर । सांगा साक्षत्वाचा निर्धार । म्हणे वक्ता अति तत्पर । अवधानी असि जे ॥ ५१ ॥ इति श्री भीमोपदेश । अनुभव वक्ता परेश । जगत्कारण प्रकाश । म्हणे मेरू अनंत ॥ ५२ ॥ तृतीय सूर्य चतुर्थ कळा ॥ ४ ॥ श्रीरामसमर्थ ॥



श्री

## सूर्य ३ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अंतर्निग्राचें मूळ । परब्रह्म निर्मळ निश्चळ । अधिष्ठान नित्य निर्मूळ । मूळ जन्म चंधेचेनि ॥ १ ॥ जन्मली च नाहीं मुळीं । जन्म वंध्या ते अकाळीं । काळरूप विगाळी । स्फूर्तीनें अभासे ॥ २ ॥ चारी अवस्था रूप वृत्ती । चहूंचाचेची स्थिती । प्रणवाणि अर्धमात्रा प्रचीती । अंतर्कळा चि ते ॥ ३ ॥ या रूपें पाहतां ते समूळ । द्रष्ट्याचे अंगिची झळाळ । जेवि सूर्य होय तेजाळ । प्रभेचेनि जैसा ॥ ४ ॥ सभेमाजि वृद्धिक्षय । प्रातुर्भवी चित्सूर्य । तें मंडळ पहातां निरामय । तेथेंचि अभासे हें ॥ ५ ॥ पाहतां त्याची धरणी । वर्तली असत्य करणी । अद्वैतद्वैत उभारणी । अभिनवासी कारण हें ॥ ६ ॥ यपाचा विस्मयो करीत । ब्रह्मादिक जाले शांत । परकद्राचा काय येथें । पाड असे विचारीं ॥ ७ ॥ सद्गुरुकृपा स्वानुभवें । हें अव्हाटचक्र वारावें । ना तरी येथुनी स्वभावें । सुटिका नसे ॥ ८ ॥ भूर्लीमाजि सावधपण । जाण पा येईल कोठून । विष घेतलियां प्राण । सुरक्षित केवि असे ॥ ९ ॥ ऐसी माया अनावर । नसोनि लागली निरंतर । ज्यासी लागली तो विचार । कोण्हीच नेणती ॥ १० ॥ मुळासी काय योजावें । व्यक्तीसी आलें स्वभावें । विधाकारें संभवे । लक्षण तें न कळे ॥ ११ ॥ यासाठीं द्वैताद्वैत ।

सिद्धांतीं निवांडा नेमस्त । द्वैत ते माया अद्वैत । ब्रह्मासी बोलिजे ॥ १२ ॥ विद्यमानीं हृदय पहावें । ब्रह्म म्हणोनी नव जावें । अनुमानें देखावें । निश्चितार्थासी केविं ॥ १३ ॥ नभा ऐसें शुद्ध ब्रह्म । निर्विकार तें निष्कर्म । तया निर्मळीं संभ्रम । विकार जाणीवेचा ॥ १४ ॥ ऐसें हृदयीं जाणवलें । व्यापकतेनें विवरलें । समाधान घटावलें । अपरोक्षतेनें ॥ १५ ॥ अवचट विसराची भूली । सुषुम्नेनें जागृती नेली । पुन्हा आठवाची मोडली । वाट संपूर्ण ॥ १६ ॥ ऐसें समाधान गहन । साक्षत्वींचें सनातन । जेविं इंधनीं निर्वाण । प्रगट अग्नि ॥ १७ ॥ प्रळयाग्नीमाजि इंधन । तेविं समाधानीं संधान । हे अनुभवाची निज खूण । साक्षत्वीं सांपडे ॥ १८ ॥ साक्षत्व ब्रह्म ऐसें जाण । साक्षत्व तें शुद्ध ब्रह्मज्ञान । साक्षत्व तुर्या उन्मन । निजांगें सोज्वळ ॥ १९ ॥ साक्षत्व ज्ञेय इक्षुरसाळ । बोधमुखें सेवितां तात्काळ । आनंद माधुर्य गव्हाळ । घेटींतसे रसना ॥ २० ॥ होतां तृप्तीनें संपूर्ण । मिठी पडे रसना ज्ञान । ज्ञेय ज्ञाता अनुसंधान । अद्वैत होये ॥ २१ ॥ साक्षत्वाचा परिणाम । गोडीनें सेविजे विश्राम । साक्षी तो चि आत्माराम । जाण तूं मारुति ॥ २२ ॥ साक्षत्व मुळींहूनि नाहीं । साक्षत्वींच ऐसें पाहीं । पाहणें न पाहणें सर्व हि । नसल्याचि सरिसें ॥ २३ ॥ उपजल्यां नाहीं चोरें । गगनधन भांडारें । चोरून नेली निर्धारें । कैसें आश्चर्य पहा ॥ २४ ॥ संभवला नाहीं च काळ । तो भक्षूं लागला जीव केवळ । देखुनी जन्मवंध्येचें बाळ । आक्रोशें रडतसे ॥ २५ ॥ हें पाहणियाचें कारण । न पाहत जन्म मरण । दोहींचें साक्षी शरण । रिघाले तया ॥ २६ ॥ साक्षत्वाची गति पाहें । मती माजि रिघोनि राहे । तूं साक्षी च होसी स्वयें । आपणा विचारीं ॥ २७ ॥ अवघे चि तूं जाणतोसी । आपणासी कैसा नेणसी । तुझी तुजची तुजपासीं । ऐसी पडतसे ॥ २८ ॥ यथार्थ म्हणे हनुमंत । मज न कळे म्हणो निश्चित । भावें स्वामींचा शरणागत । जालों हें मध्यावया ॥२९॥ अरे जाणिवेचें आंग सोडीं । समाधान पूर्ण जोडीं । शरण आलासी तरी वेवढी । प्रतिज्ञा आली आम्हा ॥ ३० ॥ तुज वाटे हें थोरपण । गुरुत्वाचा

स्वाभिमान । कोणासी पाहिजे जाण । हेतु पतनाचा ॥ ३१ ॥ घाली गुरुत्वावरी पाषाण । जाली शिष्यत्व संपूर्ण । गुरुशिष्याचें निदान । तें सुख अनुभवीं ॥ ३२ ॥ तुज वाटे गुरु भिन्न । शिष्य तैसा चि आन । पाहतां एक अंतःकर्ण । उभयतांचें ॥ ३३ ॥ पंच भूतिक एक । मन बुद्धि विवेक । अवस्था गुण अनेक । वृत्ति एकपणें चि ॥ ३४ ॥ उल्लेखासी येतें स्मरण । तैसें चि परी तें विस्मरण । बोतक हृदयींचें ज्ञान । सर्वत्र एक चि ॥ ३५ ॥ विषय क्रिया इंद्रियें । सर्वत्र एक चि पाहे । द्रष्टा साक्षी तो हि होये । सर्वत्र एक चि ॥ ३६ ॥ मी बोलतां तूं ऐकसी । एकसंधान निश्चयेसीं । अर्थज्ञान मानसीं । एक उभयतांच्या ॥ ३७ ॥ म्यां जाणावें अभ्यंतर । मग करावा उच्चार । त्या शब्दार्थे विचार । तुवां करावा ॥ ३८ ॥ त्या विचाराचें अभ्यंतर । तुझें माझें निरंतर । स्थिरावोनि साचार । साक्षत्व निवारी ॥ ३९ ॥ साक्षत्व असतां तुज । अनुभवास नये निज । आतां उमजेवीण उमज । पूर्ण प्रज्ञावंता ॥ ४० ॥ विसरतां साक्षत्व सांग । होसी साक्षत्वीं निःसंग । कां जे तुझें निजांग । साक्षत्वासी आलें नसे ॥ ४१ ॥ नभ अवरोधेना घटीं । त्रिकाळ्ळ अबाध्य समसाटी । हें म्हणणें त्या सेवटीं । तयाचा चि सेवट ॥ ४२ ॥ अक्षय हृदय वस्तुता । आपण साक्षी नव्हे तत्वता । आतां साक्षत्वाची कथा । कवणें पुसावी ॥४३॥ तुवां साक्षत्वा न योनी । स्वानुभवासी उमजोनी । पुसिलें तरी काहणी । सांगेन साक्षत्वाची ॥ ४४ ॥ अर्भक सांतवनेसी । वंध्या संतति वैभवेसीं । कथा सांगोनी तयासी । तोषवावें ॥ ४५ ॥ भयानक वागुल आला । तो गिळील रे बा तुजला । जाणोनी राहे उगला । रुदन न करी ॥ ४६ ॥ तेणें राहे तें भयभीत । संकोचित असे पुसत । म्हणे वागुल आला येथें । मज गिळील कीं ॥ ४७ ॥ त्या बाळाचें समाधान । जननी करी सज्ञान । म्हणे दुसरा वागुल येऊन । तो वागुल मारिला ॥ ४८ ॥ तैसें परी हें अज्ञान । वारिलें ज्ञानें येऊन । मुमुक्षाचें समाधान । केलें गुरुमायेनें ॥ ४९ ॥ आतां तें चि अनुसंधान । वसिष्ठहृदय निर्वाण । घेऊनिया रघुनंदन । वदेल तें अवधारा ॥ ५० ॥

इति श्री भीमोपदेश । जाला परेचा प्रकाश । साक्षत्वाचा नाश निर्दोष । म्हणे मेरु अनंत ॥ ५१ ॥ तृतीय सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीगोविंदायनमः ॥ राम ॥



श्री

## सूर्य ३ कळा ६

॥ श्रीसीतारामायनमः ॥

श्रीराम मी सत्य स्वरूप । हा हि मज नसे चि संकल्प । माझा मज प्रत्यय अरूप । साक्षी स्वभावें ॥ १ ॥ हृदय बोधवी विज्ञान । ते मी स्वयंभू सुख सधन । सनातनी सत्ता गहन । दिसोनि आली ॥ २ ॥ सनातनी स्वरूपज्ञान । स्वभाविक नित्य उत्पन्न । नित्यानुभव अनुसंधान । निज प्रसन्नता ॥ ३ ॥ हे दैविकी चमत्कार । होती स्वभावसंस्कार । तैसा च आत्म साक्षात्कार । ईश्वर सत्तेनें ॥ ४ ॥ मूळमूर्ति अधिष्ठान । उत्सवमूर्ति सुखैकघन । अधिष्ठानीं सत्ताज्ञान । उत्सव मूर्तीचें ॥ ५ ॥ अभिन्न स्वरूपानुभव । परमात्मयाचा स्वभाव । परेश साक्षी निर्भव । स्वसुखकर्ता ॥ ६ ॥ त्याचें हृदय सनातन । अखंड मंडळ गहन । स्वानंदामृत घन । वोळले सुखें ॥ ७ ॥ प्रत्यक्ष विद्यमानीं पाहतां । आपआपणा आराधितां । आपली आपणा प्रसन्नता । सिद्धि वोळगती ॥ ८ ॥ आपुलें आपण करितां ध्यान । साक्षात्कारें भेटे सगुण । पाहतां ते मूर्ति कोठून । रूपासी आली ॥ ९ ॥ भावितां पदार्थ उपलब्धी । वोळल्या अष्ट महा सिद्धि । दैविक योग रिद्धि । निधी च प्रगटती त्या ॥ १० ॥ दैविक निजहृदय । पाहतां शुद्ध बुद्ध स्वयें । निरोपाधि ते अद्वय । निराश्रय सहजें ॥ ११ ॥ उद्गास पूर्ण साळमाळ । अखंड अरूप विशाळ । संकल्पाचा विटाळ । जाला चि नसे त्या ॥ १२ ॥ निज आस्तिक्यता सदोदित । कोंदाटलें अखंडित । प्रतिष्ठेचें शाश्वत । संत धिरावलें ॥ १३ ॥ तेथें साक्षी ना साक्षत्व । परब्रह्म तें निजतत्त्व । साक्षत्वाचें उपरमे सत्व ।

अभ्यंतर घेतां ॥ १४ ॥ वस्तुता दैविक स्थिती । साक्षात्काराची मूर्ति । इयेसी माया ह्मणती । वेदांतविदज्ञानें ॥ १५ ॥ माया ह्मणोनी तुच्छ न करीं । मायेमाजि अभिनव थोरी । ब्रह्मज्ञान भरोवरी । आत्मत्वीं रूढवी ॥ १६ ॥ इतुकें मायेचें विंदान । परंतु तें आत्मत्वेंवीण । कांहीं चि नसे प्रमाण । स्वतंत्रतेसी ॥ १७ ॥ निजांगें आस्तिक्यता । परब्रह्म तत्त्वता । ते चि आत्मत्वें पाहतां । दूर दर्शनें ॥१८॥ या आत्मत्वाचा उमस । तो मायेचा अध्यास । आत्मत्वीं च वहुवस । होत जात असे ॥१९॥ गगनीं निजांगें सघन । बाह्य दर्शनें पोकळ पूर्ण । विशाळ स्फूर्तीचें भान । आकाश म्हणविजे ॥ २० ॥ निरावकाशीं सावकाश । हा जाणिवेचा लेश । जाणिवेमाजि परेश । त्रिपुटी वर्तवी ॥२१॥ परा जाणीव गहन । तीमाजि ईश सनातन । घटें आवरिलें गगन । घटाकाश ह्मणवी ॥ २२ ॥ परेचें मंडळ विशाळ । माजि आक्रमिलें निराळ । तेणें संकेतें केवळ । साक्षत्व रूढलें ॥ २३ ॥ घटाचें साक्षी नव्हे गगन । घट नभ साक्षी न होन । जालें घटावकाश विद्यमान । साक्षत्व दर्शासी ॥ २४ ॥ घट नभ अचेतन । या दृष्टांतें वारिली खूण । जाणिवेचा घट पूर्ण । सचेतन तो ॥ २५ ॥ जाणिवेचा चौथा देह । पाहतां रूप निरामय । अव्यक्त तत्त्वासी आश्रय । तो चि जाला असे ॥ २६ ॥ भूतें अपंचीकृतें । पंचव्यक्ति अव्याकृतें । पंच तन्मात्रा समूळ तें । गुणसाम्य संभवें ॥ २७ ॥ गुणसाम्य जाणीव स्थिती । नित्य गुण क्षोभ प्रचिती । इतुकी साक्षत्व विख्याति । क्रमान्वयें पाहतां ॥ २८ ॥ साक्षत्वाकरितां साक्षी । बोलिजेत पूर्वपक्षीं । साक्षी ना साक्षत्व लक्षी । सिद्धांतिं पाहतां ॥ २९ ॥ आत्मा अद्वैत परिपूर्ण । कवणाचा साक्षी कवण । नसे चि क्षोभ ना गुणागुण । वृत्तीपरता सहज ॥ ३० ॥ नित्य पर्जन्याची वृष्टि । होय नभाचे पोटीं । परी ते अंकुर ना सृष्टि । विविधरूपें ॥ ३१ ॥ पंचभूतिक विजाति । पाउसें अंकुरे क्षिती । तेविं साक्षी साक्षत्व मती । जाणिवेच्या योगें ॥ ३२ ॥ जाणिवेनें होती जर्जर । आगें ह्मणविती निर्जर । आंम

१ दाम बांधेनें मार्जर । होऊनि लपती ते ॥ असें दुसऱ्या प्रतींत स्पष्ट आहे.

वाघेनें मार्जर । होऊनि पळती ते ॥ ३३ ॥ मुळीं मी ब्रह्म अहंकार । विस्तारला विश्वाकार । पाहतां सर्वही संसार । नाशिवंत हा ॥ ३४ ॥ इंद्रादि देवतापदें । क्षयान्वित यथार्थ वादें । ब्रह्माविष्णु रुद्रपदें । ते चि गती तयांतें ॥३५॥ दृश्य द्रष्टा दर्शन । ज्ञेय ज्ञाता ज्ञान । हे त्रिपुटी संपूर्ण । जाण नाशिवंत पैं ॥ ३६ ॥ विजाति स्वजाति स्वगत । मायेचा चि भेद समस्त । निर्गुणासी कांहीं हेत । असे चि ना पाहतां ॥ ३७ ॥ स्वरूपयोग अविच्छिन्न । नित्यमुक्त सनातन । बद्ध मुक्तांचे कारणें । असे चि ना तेथें ॥३८॥ हें विचारें निवळे । अविचारें ना कळे । लाऊनि आत्मज्ञान डोळे । बरें पहावें ॥ ३९ ॥ संकल्पासी न येतां पोटीं । घनानंद तळवटीं । दाटीत नभ त्रिपुटी । घनवटे तेथें ॥ ४० ॥ स्वानंदसिंधूचें भरण । साक्षात्काराचें अवतरण । येकाकी ब्रह्मस्फुरण । प्रगटोनि अटे ॥ ४१ ॥ हृदयींचा ठाव निदान । अनादि आनंद बुडोन । होय निरानंद सघन । अपरोक्षानुभव ॥ ४२ ॥ हें साधन येतां हाता । संकल्पें झकवे ज्ञाता । संशयगिरींच्या माथां । कोसळे भवाब्धींत ॥ ४३ ॥ संशयाचा गिरिवर । तो चि भावाब्धि साचार । मृत्तिकेचे नारीनर । रूढलीं नांवें ॥ ४४ ॥ पृथ्वीचा तळवट । सागर ह्मणावा स्पष्ट । तैसा च तियेचा उंचाट । पर्वत ह्मणावें तिया ॥ ४५ ॥ तेजाचा चि वैश्वानर । तेजाचा चि प्रभाकर । तेजाचा चि अमृतकर । रूपासी आला ॥ ४६ ॥ पदार्थांचें नामसंकेत । रूढीसी आले बहुत । नाना प्रकारें दृष्टांत । चालिले परस्परें ॥ ४७ ॥ असो या युक्ति बहुसाल । कैसें तरी कळावें सखोल । निजहृदयींची वोल । विचारें घ्यावी ॥ ४८ ॥ दृष्टांताच्या कोर्डी । नाना साहित्य परवडी । व्हावया आत्मज्ञान रुची । विस्तार हा ॥ ४९ ॥ कैसें तरी कोण्या प्रकारें । आत्मज्ञान निर्धारें । नुरिजे अज्ञान कावरें । ऐसें व्हावें ॥ ५० ॥ यास्तव कडोविकडी । मायेच्या घडामोडी । उगवावी साक्षकोडी । अघटित ते ॥ ५१ ॥ श्रीरामवाक्यें चमत्कारला । मारुति तोषें भरला । आनंद सिंधू तरी घाला । येकायेकीं श्रवणें ॥ ५२ ॥ श्रीरामकृपा होय जया । आनंदसिंधु त्याची काया । घसीस आला दया । सहजबोध

॥ ५३ ॥ स्वानंदीं स्वानंदु आटे । मारुति त्या चिन्हीं प्रगटे । निवळोनि सुख उत्कटें । बोलेल भीम तें ऐका ॥ ५४ ॥ इति श्रीभीमोपदेश । प्रगटला आदि पुरुष । दैविक प्रसन्नता ईश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ तृतीय सूर्ये षष्टमकळा संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीरामसमर्थ ॥

---

श्री

## सूर्य ३ कळा ७

॥ श्री सीतारामाय नमः ॥

श्रीराम गुरु सार्वभौमा । स्वरूपज्ञान सर्वोत्तमा । ज्ञेय विभव महिमा । गरिमा काय वर्णू ॥ १ ॥ करुणा कारुण्य जिव्हारा । परमानंद मूर्ति साचार । आत्मज्ञान प्रत्यक्षाकार । अवतार तुझा ॥ २ ॥ उपमा नाहीं ज्या सुखासी । तो तूं सच्चित्सुखाची राशी । स्वानुभवें प्रगटलासी । ज्ञानचंडांश-भूषणा ॥ ३ ॥ स्वरूपें चि तूं परिपूर्ण । कृपाळू जालासी आपण । माझिया मीपणाचें भान । तूं चि होसी सर्वस्वें ॥ ४ ॥ वन्हि जालियां काष्ट । काष्ट निदान तें स्पष्ट । तमीं सूर्य तेजिष्ट । येतां तम कैंचा ॥ ५ ॥ अंधचक्षूच्या सुवळा । येतां अवलोकनकळा । मग तो चि तो आंधळा । डोळस होय सुखें ॥ ६ ॥ अज्ञानामाजि तेविं । घेउनियां ज्ञानपदवी । आलासी तेव्हां जाणावी । दशाज्ञानें पाहली ॥७॥ ज्ञानदिवापतिपोटीं । पुरे अज्ञानतमपेटी । तेविं हृदय संपुटीं । तुझ्या मी रिघालों ॥८॥ अकळतत्व वियमान । तुझे कृपेचें आत्मज्ञान । बोळलें मज सनातन । अमृतकर कृपेनें ॥९॥ निज आराध्य सहजें । सुवर्म साधनाचीं बीजें । अश्रुत तत्व सतेजें । हृदयासी आलीं ॥ १० ॥ वेद हृदय अनागत । प्रणव गर्भ सदोदित । स्वसुख बोळलें शाश्वत । मूळ अनुक्रमें ॥ ११ ॥ स्वरूप पारिजाताश्रित । दिल्हे आमोदें हृद्गत । स्वानंदकंदा अमित । निववीलें मज ॥ १२ ॥ मोक्षनिकेतन नृपा । अभिनव सच्चित्कृपा । अकळ गुज स्वरूपा । पाववीलें मज ॥ १३ ॥

चिदानंद सागरीं । मी होऊनियां लहरी । हेलावत सुखें अंतरीं । अनुभव-दर्शनें ॥ १४ ॥ चिदंबर तुझें हृदय । माझा अनुभव चंद्रोदय । होऊनियां सदोदय । प्रकाशाविलें ॥ १५ ॥ माझें हृदय सनातन । तूं चि होऊनियां विद्यमान । स्वानुभव सुखैकधन । प्रतिष्ठिलें तुवां ॥ १६ ॥ निरसोनी अनादीची करणी । अकळ धरणा धरणी । चित्प्रकाश तरणी किरणी । केली प्रकाशमंत ॥ १७ ॥ स्वभाव प्रज्ञेचें कल्हार । अपरोक्ष आमोद सार । द्रवविलें जिव्हार । मुनि मिलिंद सेवितां ॥ १८ ॥ तवं हृदयामृत झरे । तल्लीन नयन चकोरें । सेविती सुखें अपारें । निवाली तृप्तीनें ॥ १९ ॥ सद्भाव स्वानंद सिंदुर । निगम काननीं दुर्धर । विचारोनियां अनिवार । उन्मनें मातला ॥ २० ॥ प्रणव दृश्यादृश्य । औट मात्रार्थ कोश । ज्ञेय गंधवटी शेष । खंदळीत तेणें ॥ २१ ॥ उल्लेखाचळ शिखरें । उलथीतसे मदभरें । गुणसाम्य मायाधरें । येकदशेनें चि झुगारी ॥ २२ ॥ त्रिगुण त्रिकुटाचीं पुरें । ज्ञेय गरुवती नगरें । अवचितां पदसंचारें । धूळीसी आणिलीं ॥ २३ ॥ अनुभव शुंडा अकळ । कवळुनिया अंतराळ । प्रचीति दैव वस्ती मूळ । निर्मूळ केलें ॥ २४ ॥ अनुभव स्वर्ग ना पाताळ । मोकळें केलें स्थळ । निर्मळ निश्चळ केवळ । स्वानंदजळ प्राशिलें ॥ २५ ॥ कायेवांण चढली पुष्टी । निजांग भद्रजाति कोटी । आत्मत्व विभांडिलें पोटीं । रिघोनी तयाच्या ॥ २६ ॥ मज मी नावरे वळें । सोहं स्वानंदसळें । एक्या चि पदउसाळें रगडिलें मज म्यां ॥ २७ ॥ स्वरूपानुभव प्राण । घेऊनि जालों अप्रमाण । निर्वाण मस्तीचा वारण । पट्टाचा तुझिया ॥२८॥ अनुभव प्रज्ञा वल्भान्वित । हृदयातें प्रगटवित । माधुर्य गरिमा हनुमंत । बोलतसे सुखें ॥ २९ ॥ श्रीबिज रहस्य आश्चर्य । जयबीज प्रकाशाचार्या । जयजय विजयसूर्या । स्वसुखाभिरामा ॥ ३० ॥ जयजय भवजित निर्जरा । जयजय अमित सुखपंजरा । जयजय जरावर्जित धरा । जयसागरा सुराच्या ॥ ३१ ॥ जय मतिमल्मलहरणा । जयजय सुखाब्धिभरणा । जयजय दीनोद्धारणा । दीनबंधु रामा ॥ ३२ ॥ जयजय जगदाद्यदेवा । जय निरतिशय सुखठेवा ।

जयजय भवहरसेवा । देई मनोरम्यगती ॥ ३३ ॥ बोध अमित स्फुराणें । चिद्गगन गति किराणें । घेईन अबोध विराणें । ऐसी गती दे मज ॥ ३४ ॥ माझिया अनुभवाची । दशा प्रशंसो विरंची । तैसा चि निजप्रज्ञेची । घाचस्पतियोगें ॥ ३५ ॥ जयजय वात्सल्य वत्सला । जयजय स्वभाव निश्चळा । जयजय अमृताची वेळा । फावली कृपा तुझी ॥ ३६ ॥ जयजय ज्ञेय गव्हरा । जयजय मोहमद संव्हारा । जयजय मुनि जिव्हारा । जय पावन परेशा ॥ ३७ ॥ जयजय सुजनपाळका । जयजय सन्मतिचाळका । जयजय तत्वमाळिका । चाळिती सूत्रें ॥ ३८ ॥ जयजय विश्वोद्भवरवी । जयजय द्वैत आदि कवी । जयजय अमनस्क अनुभवी । अमित निज तेजा ॥ ३९ ॥ जयजय जगदांतर भरणा । जयजय सच्चित्शरणा । जयजय उद्बोध करणा । कारुण्यजलधे ॥ ४० ॥ जयजय सिद्ध वेधाभरणा । जयजय जित संसरणा । जयजय पतितोद्धारणा । धुरीण धुर्या ॥ ४१ ॥ जयजय बोधकंठीरवा । जयजय बोधकर शिवा । जयजय प्रकाशकर ठेवा । प्रकाशमंडळा ॥ ४२ ॥ जयजय अनादिसिद्धवेद्या । जयजय प्रणवादि आद्या । जयजय सुप्रसन्न सद्या । कृतार्थ मज केलें ॥ ४३ ॥ जयजय निधानमंगळा । ईक्षणें हरिसी त्या अमंगळा । सर्व प्राप्तीची मूळ टीळा । मंगळायतन तनु ॥ ४४ ॥ तुझिये संपूर्णतेची दया । कृतार्थ करितसे हृदया । कारुण्यसिंधु सदया । अमृतें बोळवासी ॥ ४५ ॥ ईक्षणें पावन करिसी । बोध सुधानिधी देसी । स्वपदस्थायी करिसी । मिरासी आस्तिक्या ॥ ४६ ॥ गगन दिवाकर धुव्या । दिल्हा प्रकाश जिव्हाळा । अखंड मंडळमाळा । लळे पुरविसी ॥ ४७ ॥ अंतंगतत्रय । साक्षत्व अस्तवत ये । तुझिये दयेचा उदय । अभिनव सूर्या ॥ ४८ ॥ अभ्यंतर हसिताब्जकरें । प्रकाशलें हृदय सारें । स्वानंद धृति पै सारें । वर्षो लागलासी ॥ ४९ ॥ अनिर्वाच्य वाचिलें । देहरहित अर्चिलें । अमनासी आराधिलें । उन्मन विभवें ॥ ५० ॥ अप्रामाणेंसी केली मित्री । अविद्यासी घेतलें श्रोत्रीं । अरूप पाहिलें नेत्रीं । कृतार्थ जालों तेणें ॥ ५१ ॥ काया माया हरली । समूळ भ्रांति सरली । अक्षोभ शांति

भरली । तुझेनि निजहृदयीं ॥ ५२ ॥ देऊनिया निज मुद्रा । लंघूनि भवसमुद्रा । कृपा सच्चित्सुभद्रा । भेटविली जननी ॥ ५३ ॥ अनादि मोहप्रमादि । पडिलों होतों भवद्वंदीं । तारक शुद्धानें स्वच्छंदीं । विजयी केलें मज ॥ ५४ ॥ ते तुझे कृतोपकार । वाचेसी येती निरंतर । सुख पवनात्मज जिव्हार । सार गुरुस्तव अवधारा ॥ ५५ ॥ इति श्रीभीमोपदेश । रुद्रमति रविप्रकाश । रामस्तवन निर्दोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५६ ॥ तृतीय सूर्य सप्त कळा संपूर्ण ॥ ७ ॥ श्रीरामसमर्थ बलभीमायनमः ॥ श्रीराम ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ३ कळा ८

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम गुरुचक्रवर्ती । परात्पर तुझी कीर्ति । पावनदीक्षा सर्वार्थी । संपन्नचर्या ॥ १ ॥ सुखनिधान नवघना । स्वानंद उदधि सुलीना । मूळपुरुषा पावना । पारावार सुखा ॥ २ ॥ अप्रमेय तत्त्व द्योतका । प्रकाशविसी सूर्यादिकां । निज तेजाचा वैसका । अखंडोदय हृदयीं ॥ ३ ॥ स्वसंवेद्य सुख प्रमेयें । अवचट प्रसन्नता ज्ञेय । निदान प्रचीतीनें स्वयें । प्रत्ययासी येसी ॥ ४ ॥ सोहंभावाचें अभ्यंतर । सुरेखघन निर्विकार । साचोस्वरें उद्धार । केला स्वरूपाचा ॥ ५ ॥ निजांग विंब अमृतकर । सुखाब्धि संभव साचार । प्रसन्नतेचें माहेरघर । आत्मतेज परिस्थ ॥ ६ ॥ तुझी कुळवाडी संपन्न । सिद्ध योगी मुनि सज्जन । पाळिसी सुखें सनातन । अक्षय संपदेनें ॥ ७ ॥ अविनाश गतिदायका । निजवसुमति नायका । प्रणवमूळ गायका । ज्ञेय गंभीर गुणा ॥ ८ ॥ अधिष्ठान वेदविधाना । बोधदिवसपति नयना । गति शरणपयदना । अमित सुखोपरमा ॥ ९ ॥ चिदानंद विग्रह स्वामी । सोहं महास्मि उपरामी । प्रशमित तार अंतर्यामीं । निरवर्णिसी सुखें ॥ १० ॥

आनंदसरोवरकमळें । कारुण्यगर्भ पदतळें । प्रेम कोवळिकेचे फळे । सरळ आंगोळ्या ॥ ११ ॥ सच्चित्सुख पदसोज्वळ । पदीं प्रतिष्ठा सत्ता मूळ । त्रिकोणघोंटीं सुनीळ । गाळीव तेजाची ॥ १२ ॥ ज्ञाननभरभा गर्भ । पोटरिया सुखें स्वयंभ । शोभा जानुचक्रें सुप्रभ । मंडळें ज्ञानसूर्याचीं ॥ १३ ॥ निरावकाश सुखघन । चिद्गगन गजगहन । तयाची शुंडा सनातन । त्या परी उरुद्वय शोभा ॥ १४ ॥ अर्धमात्रा कटिप्रदेश । कटि अंबर स्वप्रकाश । ज्ञेय गरिमा सविशेष । कटिसूत्र मिरवलें ॥ १५ ॥ सकळ गुह्यांचें गुह्यस्थान । विश्रांतिही उपरमोन । संभवित सुखैकघन । नंदन अनुभव ते ॥ १६ ॥ अद्वैत सत्ता केवळ । विधि मूळ नाभी कमळ । तेथें संभव अविकळ । बोध चतुरानन ॥१७॥ आस्तिक्यतेचें निज हृदय । सत्ताज्ञान बोध प्रमये । विशाळ उदर ज्योतिर्मय । झळाळी ज्ञान वर्चसे ॥ १८ ॥ त्रिपद गतिदायका । त्रिवळी शोभा अनेका । विशाळ वक्ष पीठिका । स्वरूप प्रतिष्ठेची ॥ १९ ॥ ज्ञानविज्ञान करद्वय । अनुभव शक्तीनें अद्वय । स्वराज्य वरदानें विजय । भूषणमंडित ॥ २० ॥ प्रणव कंबुग्रीवा मूळ । धरी स्वानंद मुखकमळ । जे अमृत कर मंडळ । द्रावक सुखाचें ॥ २१ ॥ नयन ज्ञान इंदीवरें । विलोकन करूनि सुखसारें । प्रतिष्ठिसी साक्षात्कारें । दयेनें पूर्ण आत्मत्व ॥ २२ ॥ कैवल्य गति कारणें । विशाळ भाळ गहन । विभूषित लावण्य घन । शोभे बोध टिळका ॥ २३ ॥ प्रसन्नतेची प्राप्ति केवळ । स्वसुखाची सीग सोज्वळ । ते अनुभवदशा निवळ । बोलि चिन्हित त्या ॥२४॥ निजमनोरथाच्या सिद्धी । समाधि सायोज्य उपलब्धी । वेच श्रोत्राब्ज रिद्धी । प्रसवती प्रश्नेनें ॥ २५ ॥ द्वैताद्वैत विवर्जित । श्रोत्रद्वय प्रतिष्ठित । नित्य मुक्तता भूषित । भूषणाढ्य-सतेज ॥ २६ ॥ ईक्षणें कैवल्य प्रतिष्ठा । करिसी तूं सद्गुरु वरिष्ठा । प्रसन्नतेनें जन अदृष्टा । आस्तिक्यता देसी ॥ २७ ॥ प्रसन्नतेच्या मुखकमळें । शब्द कोवळिकेचे फळे । प्रसवसी अर्थ परिमळें । करुणासिंधु ॥ २८ ॥ अमृतगर्भ वाक्य दिव्य । स्वप्रकाशघनजिव्हाग्र । नित्यमुक्त चिन्मव्य । ज्ञेयरत्नें वरुषसी ॥ २९ ॥ ईक्षणामृतें अमर । करिसी जांवासी

निर्जर । सकळ श्रुतींचे जिव्हार । अखंडैक रसें देसी ॥ ३० ॥ कैवल्याची मूर्ति परम । लावण्य गरिमा निस्सीम । ते निजांगींची निष्काम । प्रिया अनुभविसी ॥ ३१ ॥ उपनिषदाचिं शिखरें । मुकुटीं रत्नें मनोहरें । चिदान्वित साक्षात्कारें । जिव्हारें निज तेजाचीं ॥ ३२ ॥ अलक्ष स्थितीचा कळस । स्वानंदाचा उत्कर्ष । नित्य भूषणाचा अवतंस । माथां मिरविसी सुतेजें ॥ ३३ ॥ कैवल्यजनका जगद्गुरु । मनोरथाचा सुर तरु । तुझे द्वारीं वसे भवतारु । पावन जगासीं करावया ॥ ३४ ॥ सकळ गतींची गती । ते हे कैवल्यजननी सती । मज बोळवी स्वरूपार्थी । सुखप्रद होय ॥३५॥ अपरोक्षार्थ प्रबोधी । प्रसन्न दैवतीं ऋद्धि सिद्धि । तुजमाजि निरवधी । सीता स्वानंद प्रद ॥ ३६ ॥ अमृतकंद चित्सोम । हे सोमकळा सुखें परम । वर्षे बोध क्रमें प्रेम । निववीतसे दयेनें ॥ ३७॥ अर्धनारी नटेश्वर । निर्द्वंदद्वंद मनोहर । सीताराम सुख शरीर । गुरुत्वें अभिवंदिली ॥ ३८ ॥ गुरुकृपा सनातन । वक्ता हनुमंत सज्ञान । श्रोता होय रघुनंदन । रहस्य तें अवधारा ॥ ३९ ॥ इतिश्रीभीमोपदेश । प्रज्ञा जिव्हार प्रसवे तोष । गुरुस्तवन हें चित्प्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४० ॥ तृतीय सूर्य अष्टम कळासंपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥ गोविंद ॥ गोपाळ ॥ मुकुंद ॥ माधव ॥ केशव ॥ राघव ॥



श्री

## सूर्य ३ कळा ९

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम आत्मबोध जिव्हार । ज्ञानमथित साचार । स्वसुख नवनीत सार । सेविलासां सर्वी ॥ १ ॥ ज्ञेय गर्भ रत्नाकर । सुमेरु रत्न सानु शिखर । अनुभव सुवर्णसार । अलंकारलें सुखें ॥ २ ॥ तेणें सन्मति अलंकृत । योगी मुनि सिद्ध विभूषित । ज्ञेय लावण्यनिधिमथित । भाग्यें अर्ह जालें ॥ ३ ॥ समाग्यतेचा अधिष्ठानी । मिरविसी विभुत्वें सज्जनीं ।

स्वराज्य वरदानें धणी । करिसी आश्रिकासी ॥ ४ ॥ तुझिये कृपेचा महिमा । अकळ होय निगमा । तेथें वर्णात्रयासी श्रीरामा । केवि अर्ह होसी ॥५॥ कैवल्य इंदिरावर सुंदरा । स्वप्रकाश कौस्तुभकंधरा । हृदयाब्धि मथितमंदरा । परतत्त्व प्रबोधी ॥६॥ मी मज माझें न कळे । सुषुप्ति प्रज्ञा हे वरळे । वाचा वचन ना कळे । वक्ता तो कवण ॥ ७ ॥ स्तवन करितो कासया । स्तवित्यासी जाणोनियां । जाणते तें होउनिया । पडतो प्रवाहीं ॥८॥ जाणत्याचे आंगींची जाणीव । पाहतां तियेसी नसे ठाव । कल्पूनि जाणत्याचा गौरव । उभय भागें चावळे ॥ ९ ॥ नेणोनी समर्थ अभ्यंतर । भाऊनि आश्रय साचार । दुर्बळें विश्वासधर । यार केली सर्वस्वें ॥ १० ॥ दीनबंधु म्हणोनी । निश्चित जाला मनीं । दीनानाथवचनीं । विस्वासें ठेला ॥ ११ ॥ होय तो पतितपावन । माझें करील परिपालन । ब्रीदावळीसी विश्वासोन । राहिला निश्चयेसीं ॥ १२ ॥ या ब्रीदाची महिमा । नेणे हर विष्णु ब्रह्मा । अत्यंत भक्ताचा प्रेमा । परम पुरुषासी ॥ १३ ॥ परमानंदाचे व्हळे । पुरवे ऐसा सभाग्य टीळे । कृपाब्धि प्रेमकल्लोळें । भाव आर्तासी निववी ॥ १४ ॥ तापत्रयें आहळली । विषयऊर्णे पोळली । नित्य भवदावानळीं । जळाली सर्वस्वें ॥ १५ ॥ कामक्रोधादि तस्करीं । नागविली परोपरीं । दुःखी होउनि संसारीं । विटली सर्वस्वें ॥ १६ ॥ मनापासूनि भवनावडी । जीवापासूनि तुझी आवडी । या चि अर्थें तुज तांतडी । धुंडीत आली मुमुक्षे ॥ १७ ॥ सुखाचा पडिला दुःकाळ । क्षोभला भव कल्पांतकाळ । यातायातीनें सकळ । पीडावली अंतरीं ॥ १८ ॥ भव दुःखातिशयें करूनि । भरली विरक्तीच्या वनीं । प्रवर्तली नाना साधनीं । तुझे प्राप्तीस्तव ॥ १९ ॥ भक्तीचा प्रेमा अंतरीं । नवविधा भजन परीं । नित्य अर्जव वैखरी । चाळा लागला नामाचा ॥ २० ॥ करुणाजळधे तुजला । धुंडीत मुमुक्षाचा मेळा । भक्तीच्या सन्मार्गें आला । उभा ठेला आर्जित ॥ २१ ॥ अमृताची धणी पुरे । ऐसीं तुझीं मधुरोत्तरें । बोधप्रद साक्षात्कारें । श्रवणीं घेती ॥ २२ ॥ ऐसिया मुमुक्षाच्या कोटी । तुज आराधिती आवडी । उपचाराच्या परवडी ।

निर्जर । सकळ श्रुतींचे जिव्हार । अखंडैक रसें देसी ॥ ३० ॥ कैवल्याची मूर्ति परम । लावण्य गरिमा निस्सीम । ते निजांगींची निष्काम । प्रिया अनुभविसी ॥ ३१ ॥ उपनिषदांचिं शिखरें । मुकुटीं रत्नें मनोहरें । चिदान्वित साक्षात्कारें । जिव्हारें निज तेजाचीं ॥ ३२ ॥ अलक्ष स्थितीचा कळस । स्वानंदाचा उत्कर्ष । निल भूषणाचा अवतंस । माथां मिरविसी सुतेजें ॥ ३३ ॥ कैवल्यजनका जगद्गुरु । मनोरथाचा सुर तरु । तुझे द्वारीं वसे भवतारु । पावन जगासी करावया ॥ ३४ ॥ सकळ गतींची गती । ते हे कैवल्यजननी सती । मज बोळली स्वरूपार्थीं । सुखप्रद होय ॥३५॥ अपरोक्षार्थ प्रबोधी । प्रसन्न दैवतीं ऋद्धि सिद्धि । तुजमाजि निरवधी । सीता स्वानंद प्रद ॥ ३६ ॥ अमृतकंद चित्सोम । हे सोमकळा सुखें परम । वर्षे बोध क्रमें प्रेम । निववीतसे दयेनें ॥ ३७ ॥ अर्धनारी नटेश्वर । निर्द्वंद्वद्वंद मनोहर । सीताराम सुख शरीर । गुरुत्वें अभिवंदिलीं ॥ ३८ ॥ गुरुकृपा सनातन । वक्ता हनुमंत सज्ञान । श्रोता होय रघुनंदन । रहस्य तें अवधारा ॥ ३९ ॥ इतिश्रीभीमोपदेश । प्रज्ञा जिव्हार प्रसवे तोष । गुरुस्तवन हें चित्प्रकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४० ॥ तृतीय सूर्य अष्टम कळासंपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥ गोविंद ॥ गोपाळ ॥ मुकुंद ॥ माधव ॥ केशव ॥ राघव ॥



श्री

## सूर्य ३ कळा ९

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम आत्मबोध जिव्हार । ज्ञानमथित साचार । स्वसुख नवनीत सार । सेविल्यासी सेवी ॥ १ ॥ ज्ञेय गर्भ रत्नाकर । मुवेच रत्न सानु शिखर । अनुभव सुवर्णसार । अलंकारलें सुखें ॥ २ ॥ तेणें सन्मति अलंकृत । योगी मुनि सिद्ध विभूषित । ज्ञेय लावण्यनिधिमथित । भाग्यें अद्व जालें ॥ ३ ॥ समाग्यतेचा अधिष्टानी । मिरविसी विभुत्वें सज्जनीं ।

स्वराज्य वरदानें धणी । करिसी आत्मिकासी ॥ ४ ॥ तुझिये कृपेचा महिमा । अकळ होय निगमा । तेथें वर्णावयासी श्रीरामा । केवि अर्ह होसी ॥५॥ कैवल्य इंदिरावर सुंदरा । स्वप्रकाश कौस्तुभकंधरा । हृदयाब्धि मथितमंदरा । परतत्त्व प्रबोधी ॥६॥ मी मज माझें न कळे । सुषुप्ति प्रज्ञा हे बरळे । वाचा वचन ना कळे । वक्ता तो कवण ॥ ७ ॥ स्तवन करितो कासया । स्तविलासी जाणोनियां । जाणतें तें होउनिया । पडतो प्रवाहीं ॥८॥ जाणत्याचे आंगींची जाणीव । पाहतां तियेसी नसे ठाव । कल्पूनि जाणत्याचा गौरव । उभय भागे चावळे ॥ ९ ॥ नेणोनी समर्थ अभ्यंतर । भाउनि आश्रय साचार । दुर्बळें विश्वासधर । यार केली सर्वस्वें ॥ १० ॥ दीनबंधु म्हणोनी । निश्चित जाला मनीं । दीनानाथवचनीं । विश्वासें ठेला ॥ ११ ॥ होय तो पतितपावन । माझें करील परिपालन । श्रीदावळीसी विश्वासोन । राहिला निश्चयेसीं ॥ १२ ॥ या ब्रीदाची महिमा । नेणे हर विष्णु ब्रह्मा । अत्यंत भक्ताचा प्रेमा । परम पुरुषासी ॥ १३ ॥ परमानंदाचे ळळे । पुरवे ऐसा सभाग्य टीळे । कृपाब्धि प्रेमकल्लोळें । भाव आर्तासी निववी ॥ १४ ॥ तापत्रयें आहळली । विषयऊर्ष्णे पोळली । नित्य भवदावानळीं । जळाली सर्वस्वें ॥ १५ ॥ कामक्रोधादि तस्करीं । नागविली परोपरीं । दुःखी होउनि संसारीं । विटली सर्वस्वें ॥ १६ ॥ मनापासूनि भवनावडी । जीवापासूनि तुझी आवडी । या चि अर्थे तुज तांतडी । धुंडीत आली मुमुक्षें ॥ १७ ॥ सुखाचा पडिला दुःकाळ । क्षोभला भव कल्पांतकाळ । यातायातीनें सकळ । पीडावलीं अंतरीं ॥ १८ ॥ भव दुःखातिशयें करूनि । भरली विरक्तीच्या वनीं । प्रवर्तली नाना साधनीं । तुझे प्राप्तीस्तव ॥ १९ ॥ भक्तीचा प्रेमा अंतरीं । *नवविधा भजन परीं । नित्य अर्जव वैखरी । चाळा लागला नामाचा* ॥ २० ॥ करुणाजळधे तुजला । धुंडीत मुमुक्षाचा मेळा । भक्तीच्या सन्मार्गे आला । उभा ठेला आर्जित ॥ २१ ॥ अमृताची धर्णा पुरे । ऐसी तुझीं मधुरोत्तरें । बोधप्रद साक्षात्कारें । श्रवणीं घेती ॥ २२ ॥ ऐसिया मुमुक्षाच्या कोडी । तुज आराधिती आवडी । उपचाराच्या परवडी ।

समर्पिती सर्वस्वें ॥ २३ ॥ संकल्पशून्य होउनी । भावें लागती तुझ्या चरणीं । बोध अभयंकर घेउनी । ऐकती मुखवाक्यें ॥ २४ ॥ तुझें हृदय एकसरें । तूं चि देता होसी उदारें । प्रसन्नतेच्या प्रबोध करें । सर्वस्वें देसी तया ॥ २५ ॥ ऐसी प्रसिद्धि ऐकोनि । निश्चयें विश्वास मानुनि । असतां तया लागुनि । उपेक्षणें काय ॥ २६ ॥ दृष्टांतें कडुनि यया । सुचविलें तुज सखया । अभ्यंतरींचें जाणोनियां । पुरवी व्हळे ॥ २७ ॥ वल्लभ परम चतुर । प्रिया तैसी च मनोहर । निवर्वोना तियेचे अंतर । तरी मग काय ॥ २८ ॥ साच चि ईश्वर जनक । जाळियाचि सकौतुक । पुत्रें इच्छिलें कांहीं एक । पुरवीना तें कायसें ॥२९॥ तैसा परमात्मा तूं श्रीरामा। तुझेनि न निववीजे आत्मा । तरी मग आम्ही दुर्गमा । घरपडीं जालों ॥ ३० ॥ गुरुत्वें जोडलासी सिद्ध । व्हळे पुरवी प्रसिद्ध । निजबोध शुद्ध बुद्ध । बोधवी आम्हा ॥ ३१ ॥ साक्षत्वीं निवळ केले । संकल्पासी दुन्हाविलें । नव्हे तें चि ऐसें निवारिलें । अज्ञानासी ॥ ३२ ॥ अभिमानाचा केला घात । भेदासी केलें सशांत । अभेदासी येकांत । सुखें चि प्रबोधिला ॥ ३३ ॥ नित्य मुक्तीसी दिल्ही मुक्ति । कृतार्थतेसी दिल्ही भक्ति । विरक्तीसी विरक्ति । दिधली कटाक्षें ॥ ३४ ॥ प्रबोधासी उद्बोध । दिल्हा सुखासी स्वानंद । निज वेवासी स्वच्छंद । चर्या दिधली ॥ ३५ ॥ प्रमाणाचें गेलें प्रमाण । नाये क्षित अप्रमाण । सर्व कर्तव्यास आण । वाहिली विचारें ॥ ३६ ॥ परेसि वहु दाविलें । विश्रांतीसी बोलविलें । वाच्यलक्षासी धाडिलें । निर्वाणदशेसी ॥ ३७ ॥ उन्मनीसी निवर्तविलें । समाधीसी वाटे लाविलें । उन्माददशेसी । धारिलें । सहज स्थितीनें ॥ ३८ ॥ सहजस्थिती साम्योपचारें । बोळविलें साक्षात्कारें । साक्षात्कारी तदनुसारें । निर्वाण पाववीलें ॥ ३९ ॥ ऐसें जाळियां हि वरी । दाटलोंसे कृत्योपकारीं । प्रेमसरिता निव्हारीं । प्रवाहे दुर्धर ॥ ४० ॥ यथोत्तर ते माझी प्रिति । तुझे ठायीं दाशरथी । मुक्तीची चाड नाहीं चित्तीं । तुजवांचुनी दयाळा ॥ ४१ ॥ दास्य करीन सर्वार्थी । अंकित तुझा परमार्थी । ज्ञानी न म्हणोत ते यदर्थी । गति

न वटे मज ॥ ४२ ॥ अरूप सावडा भक्त । ऐसें म्हणोत नित्य मुक्त । परी तुझें भक्तांचें युक्त । प्रेम देईं श्रीरामा ॥ ४३ ॥ बोलाची चाड नाहीं कांहीं । तुजसी बोलावें वाटे पाहीं । सर्वांचें सार हृदयीं । निवळ होय तुझें ॥ ४४ ॥ तुझें साजिरें श्रीमुख । कैवल्यासी देत सुख । नित्य राहोनी सन्मुख । मी अवलोकीन तें ॥ ४५ ॥ ऐसें करुणारसें द्रवत । सजलनयन हनुमंत । श्रीराम पदीं विन्यासित । मस्तक सद्भावें ॥ ४६ ॥ मुक्ति वरील प्रेमा । भक्ति विशेषें गरिमा । भावार्थ सुखाची सीमा । वसविली तेणें ॥ ४७ ॥ स्वानंद पेटभरणी । रवि कुलोद्भव करणी । कपींद्राच्या अंतःकरणीं । रिघाला श्रीराम ॥ ४८ ॥ शुद्ध भक्ताचें अभ्यंतर । स्वानंद घन दवळार । प्रचीतीनें परमेश्वर । वसों आला ॥ ४९ ॥ दशा वसुमती तनया । बोधस्वरूपें स्वकीया । अधिष्ठुनी भक्त हृदया । नांदों लागला सुखें ॥ ५० ॥ श्रीराम पद निज जीवनीं । बुडोनि गेला पावनीं । अनुर्वाच्य ते करणी । रघोद्भव विभूची ॥ ५१ ॥ तें चि पुढें निरूपण । निःशब्दाचें उद्धरण । करील जानकीजीवन । ते श्रोतीं अवधारिजे ॥५२॥ इति श्री भीमोपदेश । भक्ति सल्लाप संतोष । निःशब्दीं जाला प्रवेश । म्हणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥ श्रीराम ॥ गोविंद ॥ केशव ॥ माधव ॥ मुकुंद ॥ गोपाळ ॥



श्री

## सूर्य ३ कळा १०

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामाचा निजानुभव । स्वानंदाचा अमृतार्णव । कृपेनें कळवळी स्वभाव । निववावयासी ॥ १ ॥ मारुतीचा देखोनि सद्भाव । भरण भरले अभिनव । अद्वैत अतर्भाव । आणिता होय वाचेसीं ॥ २ ॥ याचक देखोनि सत्पात्र । उदारदानें पवित्र । तैसा जगदात्मा पत्र । देता होय मारुतीसी ॥ ३ ॥ निजात्मिक प्रीतिपात्र । केवळ प्राणमित्र सगोत्र ।

विपदेनें देखोन क्षेत्र । पती करी तयासी ॥ ४ ॥ अक्षयी संपदा निज । पुत्रासी पिता दे सहज । जेंवि सत्क्षेत्रीं बीज । कृषिवळांसी पेरितां ॥ ५ ॥ तयापरी आत्मज्ञान । निजहृदयींचें आपण । जगदीश्वर संपूर्ण । दे जगत्प्राण सुतासी ॥ ६ ॥ ह्मणे अवधानी बैस । अर्थांतरीं भावें पैस । स्वसुखामाजि ऐस । निवांत सर्वदां ॥ ७ ॥ व्यापकतेचें अवधान । सावरीं त्वरेनें संपूर्ण । अर्थाचा यावा गहन । हृदयीं सावरीं ॥ ८ ॥ श्रीरामकृपेचा जळधर । बोल्या सुखें निरंतर । मारुतिचित्तचातक स्थिर । सेऊं लागलें सुखें ॥ ९ ॥ उदार वरुषे घन । पुरतां चातकाची तहान । तऱ्हीं अपार वृष्टिज्ञान । प्रमयें वरुषे ॥ १० ॥ चातक निमित्त करूनी । जगाचिया जीवदानी । उदार वरुषे तोषोनी । निज प्रसन्नतेनें ॥ ११ ॥ अरे तूं सत्य स्वभावें । पुसों बैसलासी भावें । तरी ऐक आतां जीवें । प्रत्ययाच्या पूर्णे ॥ १२ ॥ ऐकतोसी ज्या अवधानें । तें अवधान तूं जाण । त्यामाजि तूं दुजेपणें । उरों नको सर्वथा ॥ १३ ॥ ऐकतां एक ऐकणें । आपणामाजि दुजेपणें । सवडी होतां ठाणें । भेदाचें बैसे ॥ १४ ॥ ऐकणें सोडून श्रोता । राहतां केंवि स्वभावता । पाहें विवंचुनी आतां । अनुमान न करीं ॥ १५ ॥ गुणाथिला गौरव । त्याचा कायसा नवलाव । निर्गुणाचा अंतर्भाव । घेई बा रे ॥ १६ ॥ घेऊं जासी निर्गुण । तें हि जाण दुजेपण । विचारितां विचार पूर्ण । मावावसी देयें ॥ १७ ॥ ह्मणोनी अस्तिक्यता निज । आपआपणासी उमज । निर्गुण प्राप्तीचें चोज । कोण कर्ता ॥ १८ ॥ सकळ तत्वार्थवेत्ता । जाणसी तूं उचिता । तुज तुझी कथा । कांहीं च न कळे ॥ १९ ॥ अनुसंधानबळें । उमस द्वैताच्या सळें । पैसावसी अंतराळें । तें सैराट धांव ॥ २० ॥ कोठें जावें कासयासी । जाणाराची गति कायसी । धांव धाळूनी अवकाशीं । वावरों नको ॥ २१ ॥ सैंधव तें सिंधुजळीं । विरोनी जाय तात्काळीं । तेंवि त्या अखंड मंडळीं । विरोनि जावें मन ॥ २२ ॥ हा खेचरीचा स्वभाव । ह्यातांसी येतां अभिनव । बोल्ली समाधि सर्व । अंतर्खेचरीयोगें ॥ २३ ॥ भूचरी मुद्राधन । लक्षावें दैनिक ज्ञान । अदृष्टाचें अधिष्ठान । लक्ष

लावावें तेथें ॥ २४ ॥ मन पवनाची धांव । सावरूनि धरी ठाव । ज्ञानाज्ञान स्वभाव । उरो नेदी तेव्हां ॥ २५ ॥ अपरोक्ष ज्ञानविज्ञान । उभयदृष्टीचें आंगण । स्वानंदाची सांठवण । संपूर्ण तेथें ॥ २६ ॥ तथा निरावकाशीं । राहतां चित्त लक्षेसी । उत्तमांग तोपी होसी । मुद्राधारी तूं ॥२७॥ चपळ वृत्तीचें तेज । सुरेनिजांगीं सहज । आनंदें बोळे उमज । मुद्रायोग चाचरी ॥ २८ ॥ दशा अपरोक्षवरी । कांहीं च असेना त्यावरी । ते मुद्रा अगोचरी । अनुभवी आतां ॥ २९ ॥ गोचर इंद्रियाचें धर्म । तेणें लागलें तुज कर्म । साक्षी होउनी निष्कर्म । माविसी तेणें ॥३०॥ निष्कर्म भावनेनें तुज । आलें कर्माचें चि व्याज । माजि जन्मांतर बीज । सहजें असे ॥३१॥ जें जें कांहीं भावावें । तें तें जन्म चि जाणावें । अपरोक्ष हि अनुभवावें । संभऊनि सुखें ॥ ३२ ॥ विवरतां अर्थांतर । भाव होय तदाकार । तोहीं संभव साचार । जाणावा महारुद्र ॥ ३३ ॥ केवळ जो स्वानुभव । तो हि स्वसुखसंभव । स्वानंदाचा समुद्भव । जाण रे तैसा चि ॥ ३४ ॥ कांहीं एकपणें स्मरे । द्वैतसंचारवारें । अद्वैताच्या निर्भरें । संचरे आंगीं ॥ ३५ ॥ अद्वैत शरसंधानें । भेदितां नभ सत्राणें । न खोचे च तें सप्रमाणें । त्रास पावे भेदितां ॥ ३६ ॥ तेविं मारुतीचें हृदय । वृत्तिरहित होये । धूम्र मावळोनी जाये । पोकळीमाझारी ॥ ३७ ॥ साभ्र ते निरभ्र जालें । निर्मळीं साक्षत्व गेलें । सहज चि अवसान वारलें । साक्षत्व समूळीं ॥ ३८ ॥ आत्मारामाचा बोध । मारुति हृदयशोध । अवधान सरोन सिद्ध । स्थिरावला सहजें ॥ ३९ ॥ प्राणरहितासी घाय । हाणतां दुखवेल काय । तैसें रुद्राचें हृदय होय । निर्विकार ॥ ४० ॥ अचल जाली वज्रकाया । सरोनि गेली मूळ माया । अक्षोभ सुखीं बुडोनियां । विराला मुख्य प्राण ॥ ४१ ॥ जेविं पंचाक्षरी देखतां । भूतनिवृत्ति स्वभावता । अवधानं घेऊनि तत्वता । पळाला संकल्प ॥ ४२ ॥ वृत्तीसी येणें न येणें । हें हि विसरला तेणें । अचेत समाधिठाणें । बैसलें देहीं ॥ ४३ ॥ कारुण्यासी कळवळा । आला कृपेसी जिव्हाळा । कळवळिला सावळा । स्वानंदघन ॥ ४४ ॥ ह्मणे मर्कट चर्या याची । खडतरता निजाची ।

मारुतीचें अभ्यंतर । जालें सत्स्वरूपीं स्थिर । हाव न पुरतां साचार । सुख-वृत्तीसी नये ॥ २४ ॥ गाड मूड सुखनिद्रा । पुरवल्यावीण सुभद्रा । जागृती न धरी कपींद्रा । बोध नरेंद्रा जाण तूं ॥ २५ ॥ प्रबोध विपिनांतरीं । सैराट तो वनविहारी । विचारतां त्या चमत्कारीं । निजेला सुमनसेजे ॥ २६ ॥ तूं पारिजातस्वरूपी । तव कृपा सुमनतल्पीं । पहुडला सुखें कपि । जागृतीसी आणी आतां ॥ २७ ॥ ऐसीं वसिष्ठाचीं वचनें । श्रुति सारांशनिधानें । जगदानंद विभूनें । ऐकोनी आश्चर्य कीजे ॥ २८ ॥ सीतेसी ह्मणे रघुनंदन । हा भीम भवकंदन । कर्ता विजयश्रीचा स्यंदन । तटस्त जाला कां ॥ २९ ॥ करिती देवादि अभिवंदन । कार्यकर्ता प्रसन्न-वदन । तुझा प्रबोधनंदन । दर्शनें अचेत जाला ॥ ३० ॥ याचें साक्षत्व उडालें । संकल्पमान बुडालें । प्रवृत्तिज्ञान दडालें । विज्ञानकोशीं ॥ ३१ ॥ सहज बोधितां आत्मसुख । जाला स्वरूपीं सन्मुख । हारपोनी गेला उल्लेख । सर्व कांहीं याचा ॥ ३२ ॥ निजानुभव चमत्कारें । करितां यासी प्रश्नोत्तरें । एकाएकीं या अवस्था भरें । तटस्त जाहला ॥ ३३ ॥ बोध जाला तुजपासुनी । यासी निष्ठा तुझे चि वचनीं । महावाक्य याचे श्रवणीं । तुंवा चि सांगितलें ॥ ३४ ॥ महावाक्य अर्थविवर । तत्त्वें तत्त्व अभ्यंतर । घेऊनि सुखें साक्षात्कार । पावला तुझेनि ॥३५॥ हनुमंतासी गुरुरूप । तूं चि होसी सीते सद्रप । कां जे निचळ केलें स्वरूप । तयाचें तुंवा ॥ ३६ ॥ जो ज्या गुरुचा शिष्य होय । तो त्या चि निष्ठेनें असे पाहे । सद्गतीसी कारण निश्चयें । अचळ गुरुभक्ती ॥ ३७ ॥ गुरुभक्तीसी चव्हती । ते सज्ञान मूढमती । कैंची तयासी सद्गती । गुरुप्रसन्नतेवीण ॥ ३८ ॥ गुरुप्रसन्नता नाहीं । त्यास अप्राप्त सर्व हि । देव हि तयासी पाहीं । फावेना कदां ॥ ३९ ॥ याकारणें गुरुभजन । घडलें ते कृतार्थ जन । ज्ञानाचें करूनि विसर्जन । गुरुभक्तीसी लागावें ॥ ४० ॥ गुरुभक्ति घडावया । सावध करीं कपीसी या । सहज स्थितीनें हृदया । चेतवावेसें ॥ ४१ ॥ तुझेनि व्हावी यासी सद्गती । ऐसें बोलतां कैवल्यपति । आश्चर्य जालें सभेप्रती । प्रश्न केला वल्लभें ॥ ४२ ॥ ह्मणे तूं परमात्मा

पूर्ण । तुझेनि होय जगदोद्धारण । तुझ्या आचरणीं च जाण । तरली सृष्टि ॥ ४३ ॥ तुझ्या नामाचा प्रताप । समाधि सिद्धाचा होय जप । अकळ गतीचें स्वरूप । हातासी ये सुखें ॥ ४४ ॥ तूं अधिष्ठान विभुदेवा । तुझा निजध्यास सदाशिवा । तूं सिद्धांत सिद्ध ठेवा । वेदांतगर्भींचा ॥ ४५ ॥ निजसंपत्तिनें संपन्न । जाले तुझेनि मुनिजन । सस्वरूप प्राप्तिनिधान । दैवें अवतरलासी ॥ ४६ ॥ दाविसी अभिनव लीळा । वेढा लाविसी सकळां । प्रशंसिसी वेळोवेळां । आवडीनें सर्वत्र ॥ ४७ ॥ ऐकोनि कश्यपाचें भाषण । तोषला जिवीं जगदेक्षण । प्रमत्त हेतु सिक्षण । बोलता होय कश्यपेसीं ॥ ४८ ॥ सर्वांतर प्रकाशघन । सर्व द्रष्टा सनातन । निर्विकार जेवि गगन । त्याहून परप्रतिष्ठा ॥ ४९ ॥ अगा ये सर्वज्ञ ऋषि । तुज न कळे तें काय निश्चयेसी । माझें अभ्यंतर चि घेसी । आक्षेपवचनें ॥ ५० ॥ सर्व सर्वज्ञ शिखामणी । अद्वैतप्रभा तुझेनि । प्रबोधांबर करणी । स्वच्छ प्रकाशलें ॥ ५१ ॥ श्रीरामाचें संभाषण अमृत । मथित बोध स्वस्थित । अवधान देउनी सुनिश्चित । अवधारिजे श्रोता ॥ ५२ ॥ इति श्री भीमोपदेश । वसिष्ठरामसंवादतोष । भीमसमाधि निर्विशेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ तृतीय सूर्य एकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

श्री

## सूर्य ३ कळा १२

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम मी माजि लीन । स्वानुभवें सुखैकघन । अहंपणें अणुप्रमाणें । उमसों नेणें ॥ १ ॥ माझें अभ्यंतर ग्यां चि स्वयें । शोधुनी केलें निरामय । हाहि उमस न साहे । शुद्धत्वाचा ॥ २ ॥ आनंद गाभा गाळीव । स्वरूप ज्ञानें स्वमेव । गुरु कृपा अभिनव । ऐसी प्रत्यया आली ॥ ३ ॥ प्रत्यक्ष सद्गुरुनें बोधिलें । सुखें हृदय विसांवलें । मी परमात्मा हें

उरलें । नाहीं मज भान ॥ ४ ॥ माझ्या मीपणा ठाव नसे । थोरपणा कोण पुसे । स्वानंदाचा हि न सोसे । संग मजला ॥ ५ ॥ निःसंग मी निर्विकारी । मज कांहीं च नाहीं उरली उरी । शुद्ध बुद्ध सर्वापरी । केलें श्रीगुरुलें ॥ ६ ॥ साच चि स्वरूप ज्ञानी । विरला स्वानंदजीवनीं । मग तयासी परतोनी । प्रवृत्ति च नसे ॥ ७ ॥ ज्ञानी जो परनिष्ट । जो अक्षोभ चित्तें वरिष्ट । स्वसुखें दशा उत्कट । पूर्ण निर्मत्सरी ॥ ८ ॥ विकल्पद्वेषनिंदा । न करी च जो कां कदा । निर्वैर सुखें सर्वदा । वर्ततसे जनीं ॥ ९ ॥ मत्त स्वमत नुमसे । भेदाभेद हि न भासे । आपलें परावें ऐसें । न दिसे जन ॥ १० ॥ हे सज्जन हे दुर्जन । भावी च ना अंतःकर्ण । समूळ कल्पनेचें रान । देखिलें नाहीं डोळा ॥ ११ ॥ स्वरूपावांचुनी । पाहेच ना निजनयनीं । अंतर्निष्ट आत्मज्ञानी । असे सम दृष्टीचे ॥१२॥ कश्यपा तूं ब्रह्मनिष्ट । स्वरूप दर्शनें उत्कट । निरोपम दशा वरिष्ट । चिन्हीत तुझ्या आंगीं ॥ १३ ॥ मजवरी सुखें चोळ्लासी । दयेची दीक्षा देसी । दया संपन्न तेजोराशी । सत्वारूप समर्था ॥ १४ ॥ तुजप्रती लडिवाळ्पणें । लाटिकेपणाचीं वचनें । शिशु चि क्रीडास्वभावानें । वंजित जनकासी ॥ १५ ॥ तूं जगज्जनक होसी । विश्व संभवलें तुझे कुशीं । तितुक्याचें हृदय जाणसी । स्वरूपदर्शनें ॥ १६ ॥ तरी ऐक गा मुनिनाथा । सर्वार्थसंपन्न समर्था । सांगेन गुरुत्वाची कथा । कांहीं एक अवधारीं ॥ १७ ॥ जयासी वाटे गुरु मी ऐसें । तो जाड्यवृत्तीसी आला दिसे । मीपणें ब्रह्मांडा ऐसें । ओझें तया मस्तकीं ॥ १८ ॥ गुरु अहंतेचा शीण । शिष्य कर्तव्याचे पाषाण । पडतां फुटोनी समाधान । भवसिंधूंत रिघे ॥ १९ ॥ शतचूर्ण मस्तक । गुरुपणा ऐसें घातक । गुरुत्वें भ्रष्टला तो एक । सज्ञानपणें ॥ २० ॥ अज्ञानासी सुटिका घटे । सज्ञानाकंठीं पाश पडे । कर्मबंध न विघडे । पायीं पडे भवबेडी ॥ २१ ॥ ऐसें गुरुत्वाचें लक्षण । वसे सज्ञानापासीं पूर्ण । या कारणें मजला शोधून । पाहसी कृपाळूपणें ॥ २२ ॥ आपुला शिष्य पाहतां । इतराचा अंकित होतां । क्षोभ न पवे ज्याच्या चित्ता । तो यथार्थ सद्गुरु ॥ २३ ॥ विश्वरूपें

सद्गुरु जया। तो सद्गुरु जाण ऋषिराया। तयाचे अंतरीची माया। निःशेष गेली ॥ २४ ॥ तया देवरूपी वाटे जन। आंगीं बाणले समाधान। उंच निंच अनुसंधान। असे चि ना तया ॥ २५ ॥ स्त्रीपुत्रमोहममता। बाधों लागली ज्याच्या चित्ता। अज्ञानसंभव तत्वता। त्यापासूनि होय ॥ २६ ॥ देवऋषि महासभेसीं। सीतामुखें बोधकपीसी। मी सिंहासननिवासी। हे प्रतिष्ठा मज नसे ॥ २७ ॥ मी चिदानंदघन। देखे अनुरेणु तृण। विखुरल्यां अमृताचे कण। गोडीसी न पालटती ॥ २८ ॥ अमृतरूपी महातेज। व्हान थोर तारा समाज। प्रकाशतां तेज सहज। सारिखेंच असे ॥ २९ ॥ तेविं मी आत्मासुखैकघन। सर्वांतर्यामीं वसोन। आरितकीं सनातन। उरला चि असे ॥ ३० ॥ इंद्रादिकांचीं शरीरें। मृत्तिकेचीं माहेरघरें। तेथें कोण व्हान कोण थोर। काय म्हणावें तया ॥ ३१ ॥ मृत्तिकेचें सैन्य निर्मिलें। हस्ति घोडे नांव ठेविलें। तेसें दृश्य उभारलें। कल्पनेचें सर्व ॥ ३२ ॥ मृत्तिकेमाजि भेद नसे। ऐसें जाणोनी विश्वासें। वर्तती जगदाभासें। महामहंतसे ॥ ३३ ॥ महाविराटपर्यंत। दृश्यरचना अंतवंत। विचार पाहतां शाश्वत। येथे कांहीं च नसे ॥ ३४ ॥ शरीराचा जो चालक। अनेक देहीं द्रष्टा एक। तयाचा पाहतां विवेक। परत्री जय ॥ ३५ ॥ तो सच्चित्सुखैकघन। अंतरात्मा विद्यमान। कोण्या मुखें बोलिला जाण। तरी तो आपण च कीं ॥ ३६ ॥ ऐसी जयासी नाहीं समता। तेथें कश्यपा वसे अहंता। सीतेनें बोधितां हनुमंता। मज अत्यंत सुख ॥ ३७ ॥ विज्ञान सिंधूचें सखोल। ऐकोन श्रीरामाचे बोल। कश्यपमुखाचळासी डोल। येतां स्वानंदवळें ॥ ३८ ॥ कश्यप म्हणे रघुराया। आक्षेपे केली इतुकी दया। निजहृदयसिंधूसी या। भरण भरिलें तुवा ॥ ३९ ॥ तुझें वगुतुल्य अमृतमय। साक्षात्काराचा चंद्रोदय। माझ्या हृदयसिंधूसी विस्मयें। चालिले चित्कल्लोळ ॥ ४० ॥ दया संपन्न सर्वेशा। ब्रह्मादिक मानिती तुझी आज्ञा। कोण करूं शकेल अवज्ञा। पंचानन आराध्य तूं ॥ ४१ ॥ चिच्छक्ति तुझी हे वैदेही। स्वरूपप्रद दीक्षा पाहीं। जग इजवांचुनी नाहीं। पावनकर्ते दुजें ॥ ४२ ॥

ऐसें कारयपमुखवचनीं । संतोपला श्रीराम मनीं । अनिर्वाच्य सुख अवधानीं । असावें श्रोतीं ॥ ४३ ॥ उपदेशक्रमें करून । जाला तृतीय सूर्य संपूर्ण । प्रत्येक प्रस्थानें प्रशंमून । प्रमय आलें परिपाका ॥ ४४ ॥ सुवर्णाचे कुंभ सोज्वळ । माजि निर्मळ गंगाजळ । त्यामाजि तें सूर्यमंडळ । बिंबलें प्रमेनें ॥ ४५ ॥ तेवि सभासद हृदयीं । आत्माराम आणि वैदेही । या व्यापक प्रमेनें पाहीं । निवळा डोळस हो ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । अक्षयीं ठेवा कोश । अनुभव दशा सामरस्य । म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ द्वादश कळा युक्त तृतीय सूर्य संपूर्णमस्तु ॥ श्रीराम ॥

---

श्री

## सूर्य ४ कळा १

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामसमर्थ विश्वंभरा । विश्वोत्धार प्रभाकरा । आत्मपरायण परंपरा । पावन तुझेनि ॥ १ ॥ आत्मबोध कौस्तुभ कंधरा । विश्वोद्भव दामोदरा । आत्मसंति माहेरा । जगदीशा जगद्गुरु ॥ २ ॥ परतत्त्वनिधान अंजना । आदिदेव निरंजना । स्वानंद परिपाळणरंजना । जगद्राय जगद्गुरु ॥ ३ ॥ विश्वसंभव वसुमती । तुझेनि प्रतिष्ठा आत्मस्थिती । आत्मप्राप्ति कृपा विश्रांति । पुरातन प्रमया ॥ ४ ॥ भवाब्धि बोध पाथेय । स्वपद दान प्रत्यय । स्वरूप साक्षात्कारें सदय । उदार चक्रवर्ती ॥ ५ ॥ गुण-गांभिर्यसंपन्ना । प्रगट हृदयस्थ निधाना । जगदानंदकारणा । करुणामूर्ति ॥ ६ ॥ कृपाईक्षणे तात्काळ । करिसी भवमोचन सकळ । स्वरूपदीक्षेनें प्रबळ । स्वसुखीं ठेविसी ॥ ७ ॥ तुझिये दयेची प्रसन्नता । प्रबोध दिवस्पति सत्ता । सायोज्यसंभव तत्त्वता । प्रसवसी बोहरें ॥ ८ ॥ तुझेनि ब्रह्मचर्य नितांत । आदिपुरुष सुखान्वित । स्वरुपानुभवें सदोदित । संभवला सुखें ॥ ९ ॥ ज्याचेनि स्मरणें सत्वर । आदि विधीचा होय उद्धार । त्याचा कारणसंस्कार । पावन केला ॥ १० ॥ आत्मसंभव विधि

जनीं । आत्मप्राप्ति निवासिनी । विश्व हृदयनळिणी । जीवनें वर्धविसी ॥ ११ ॥ निज जीवन जीवना । जानकीजीवन कृपाघना । आत्मोपदेशपावना । सद्गुरु अनंता ॥ १२ ॥ भवभीम भयंकर । तुझेनि वोसरला संस्कार । भीम प्रचीतीचा शंकर । पावन जाला ॥ १३ ॥ तो हा भीमोपदेश स्वयें । भवविजयध्वजप्रत्ययें । संतामुखें स्वरूपान्वयें । उपदेशिला भर्ग ॥ १४ ॥ माझिया हृदयासी प्रत्यक्ष । प्रकाशित कृपाकटाक्ष । अंतरसाक्षी अलक्ष । योग प्रतिष्ठिला ॥ १५ ॥ सर्व साक्षत्वविहीन । सर्वाधिष्ठान मुख्य प्राण । आत्मानुभव नयन । प्रकाश गभस्ती ॥ १६ ॥ ज्याचेनि आत्मज्ञानी डोळस । प्रांजळ जाले योगाभ्यास । तो स्वसिद्धावतंस । पावन केला ॥ १७ ॥ मी माझें सर्व कांहीं । कर्तव्यासी आलें सर्वहि । ते विदेह देह दशा पाही । विचारितां तुझे ॥ १८ ॥ सकळ सृष्टीचें बीज । वेद प्रकाशी निज तेज । ते तुझें हृदय सहज । चोज संभविलें ॥ १९ ॥ अन्नें प्राणप्रतिष्ठा । प्रवीण होती सर्व चेष्टा । तेविं तव हृदय श्रेष्ठा । जीवन स्वरूपीं ॥२०॥ जीवनावांचुनी जनीं । कार्य प्रतिष्ठीना कोण्ही । प्रभेवीण नयनीं । न्याहळेना कांहीं ॥ २१ ॥ अवकाशें वीण, प्रवृत्ति । कांहीं च न घडे जगती । तेविं तुझिया हृदयस्थिती । होय जगत्कारण ॥ २२ ॥ जन्मविलें जें तत्त्व । तें चि विस्तारलें साक्षत्व । हृदय आस्तिक्य सत्त्व । संपूर्ण तत्त्व आद्या ॥ २३ ॥ प्रणवाचें निज हृदय । परात्पर तत्त्वप्रमय । सत्ता ज्ञान सदोदय । विज्ञान स्वयंभा ॥ २४ ॥ जे जें कांहीं प्रकाशे । तें तें तत्त्वसृष्टीसी दिसे । द्रष्टा होऊनि सावकाशें । तूं चि देखसी तया ॥ २५ ॥ नवल तुजमाजि एक । एक चि होसी तूं अनेक । तूं चि तुजमाजि विवेक । करूं प्रवर्तसी ॥ २६ ॥ तूं चि तुजमाजि चुकसी । तूं चि तुज उमगिसी । तूं चि तुज भेटोनि होसी । परम कृतार्थ ॥ २७ ॥ काय हें लाघव न कळे । निजकरें निज डोळे । झांकोनी स्वभाव आंधळे । दाविसी जगीं ॥ २८ ॥ हें अभिनव तुझें लाघव । जाणो न शकती ब्रम्हादि देव । तूं अकर्ता विश्वोद्भव । तुजवरी हें आश्चर्य ॥ २९ ॥ आश्चर्य मानावें कवणें । कवण

आहे तुजवीण । अभिवंदन तुज कारणें । लाघविया देवा ॥ ३० ॥ आपआपणांत दंगा । वाउगा कलह झगझगा । अनुभवगर्भ योगा । पात्र करिसी पुढती ॥ ३१ ॥ अनादिसिद्ध तुझी प्रकृति । वर्णवे कवणाप्रती । सावचित अंतरस्थिती । तुज प्रसन्न करावें ॥ ३२ ॥ पृथ्वीपासूनि विस्तार । रूढी पावोनि होती जर्जर । पृथ्वीसी मिळोनि साचार । नित्य नूतन होती ॥ ३३ ॥ तैसीं शरीरादिकें । अद्भुत कार्ये अनेकें । घटामोडीनें कौतुकें । ऐक्य तुजसी ॥ ३४ ॥ पृथ्व्यादि पंचतत्त्वें । पंच भूतिक कर्तृत्वें । रजतमादि सत्त्वें । कारणें होतीं ॥ ३५ ॥ जीवनावरील तरंग । होती जाती सवेग । तैसें तुजमाजि जग । होत जातसे देवा ॥ ३६ ॥ हें तुझें साक्षत्वज्ञान । ज्ञानभानूचा नयन । तूं द्रष्टा चि परी सनातन । हृदय तुझें देवा ॥ ३७ ॥ तुझें रूप करावयासी । कवण कर्ता आहे सृष्टीसी । तूं चि जेथें प्रगट होसी । तेथें रूप होय सहजें ॥ ३८ ॥ नमो आस्तिक्य भरणा । स्वसुखवर्धनकरणा । अनुभवमूळ आचरणा । करीं आस्तिक्य पीठ ॥ ३९ ॥ स्तवनें तोषला हृदयस्थ । कृपेनें बोळला अनंत । ग्रंथक्रमें चि अत्यद्भूत । प्रसिद्धीसी आला ॥ ४० ॥ ग्रंथीचें मूळ अनुसंधान । कश्यपरामसंभाषण । अनुभवाचें अवधान । द्यावें महा सज्जनीं ॥ ४१ ॥ भीमोपदेशविस्तार । अनुभवामृत सागर । होऊनि स्वानंदजळचर । खोली घ्यावी येथींची ॥ ४२ ॥ पुढती हे चि प्रार्थना । कश्यगभस्ति निधाना । पामाळ होऊनि साधना । साधावें श्रोतीं ॥ ४३ ॥ इति श्री भीमोपदेश । कळालावण्यप्रकाश । सारांशसारअवतंस । म्हणे मेरु अनंत ॥ ४४ ॥ चतुर्थ सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ राम ॥ कृष्ण ॥ वासुदेव ॥



श्री

## सूर्य ४ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सभा सुप्रसन्न । सभासद ज्ञानी सुमान । कैवल्य सृष्टीचे पावन । प्रभूवर्य ते ॥ १ ॥ एक एक ऋषी अपरोक्षज्ञान । कुबेर अक्षयी

अर्थघनें । बोध व्यवसाय प्रचीतीनें । प्रसन्न होती ॥ २ ॥ उक्षावधी उजळले दीप । समानतेनें तेजस्वरूप । तैसें चि सारिखे रूप । ऋषी-श्वरते ॥ ३ ॥ चहूं वेदांचें हृदय । जिव्हाग्रीं वसतें होय । शास्त्रसंपन्न प्रमेय । साहित्य तैसें चि ॥ ४ ॥ चिदानंद वैरागर । श्रीराम जगाचें अभ्यंतर । साक्षात्कार हिरे दुर्धर । ऋषिवर्चसे ॥ ५ ॥ एकेकाच्या सामर्थ्य आंगीं । ब्रह्मांड स्थिर्तनें जगीं । प्रसिद्ध सत्ता विभव योगी । सर्वाढ्यतेनें ॥ ६ ॥ बृहस्पतीची प्रज्ञा किती । कुंठित सहस्र मुखमती । जेथें अटक श्रुति स्मृति । ते चर्चा होतसे ॥ ७ ॥ आत्मप्रचीतीचे बोल । येती अर्थेसी सखोल । स्वानंदाची च वोल । संपूर्णतेनें ॥ ८ ॥ बोलें अबोल करिती । विश्रांतीनें डोळविती । उन्माद बोध भद्र जाती । ससुख मतांगते ॥ ९ ॥ अखंड उन्मनीच्या मदें । अनुवादती स्वानंदें । परार्थ संपदापदें । प्रसिद्ध उक्ती ॥ १० ॥ स्वसुखाब्धि श्रीराम । सकळांचें अंतर्याम । त्या अनुभवसिंधूचे सोम । ऋषि प्रकाशमंत ॥११॥ श्रीराम कृपेचा गंभीर । बोळला स्वानंद जळधर । ऋषि हृदय चिदंबर । संपूर्ण केलें ॥१२॥ स्वानंदाच्या बोधधारा । एकार्णवीं त्या सैरा । वृष्टी होतसे जिव्हारा । प्रगट करीत ॥ १३ ॥ संपूर्णतेचे प्रमाण । बुडाले संपूर्ण अवधान । स्थिरावलें महा मौन । सहज वस्तुता ॥ १४ ॥ शब्देंवीण अर्थ विवर । श्रवणें वीण अभ्यंतर । निःशब्द चर्चा साचार । होतसे तैसी ॥ १५ ॥ अभ्रें आच्छादिला भानु । प्रभा तैसी च समानु । दिवसपतिलोचनु । प्रतिष्ठिता होय ॥ १६ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । लंघुनियां महा कारण । अप्रांतीं निरावर्ण । वसविलें ठाणें ॥ १७ ॥ जागृतीच्या रात्रीं निशि । ते चि प्रतिष्ठा स्वप्नासी । दुणावले सुषुप्तीसी । अद्वैतपणें ॥ १८ ॥ तुर्येचा भास सरला । उन्मनीचा दावा विराला । दशेचा प्रांत लागला । स्वभावतेनें ॥१९॥ सहजस्थितीनें सांभाळिलें । अवचट निधान लाधलें । महा गडदांत उदेलें । महातेज ते ॥ २० ॥ ऐसें जालें श्रीरामसभेसी । चैतन्य पाहलें चक्षूसी । चिदानंदघन दैवांसी । प्राप्त केलें अवधानें ॥ २१ ॥ सावरिला सुखयाचा सहज । बुझों लागलें निज चोज । उमजाचाहीं उमज । बैसला

अगस्ती । सप्रेम जाले ॥ १० ॥ अनिवार सात्विकांचें भरण । आत्मानुभव आवरण । स्वबोध चर्चा आचरण । स्वानुभवाचें ॥ ११ ॥ अगस्ति स्वसुखरत्नाकर । कश्यपबोध महोदधि सार । विश्रांतिधनुष्कोटिकर्तार । ऐक्यासी आले ॥ १२ ॥ प्रेमें कडकडित उठोनी । मिठी पडली आलिंगनीं । अनिर्वाच्य सुख विद्यमानी । जाहले तटस्त ॥ १३ ॥ दशा प्राची सूर्य उदेला । तव अद्भूत पश्चिमेसी तैसा चि आला । अद्भूतोपम भेटला । माध्यान्हीं सूर्य सूर्यासी ॥ १४ ॥ तैसें उभय ऋषिराज । महा तेजस्वी सतेज । अभिनव चंद्र सहज । ऐक्यासी आले ॥ १५ ॥ कीं हे विज्ञान गिरिवर । दैविक आत्मसाक्षात्कार । स्वरूपराम-साचार । सेविला तिहीं ॥ १६ ॥ कीं विज्ञान प्रळयकर । विश्वासी कर्ते निर्विकार । साक्षत्व विहीन अंतर । ऐक्यासी आले ॥ १७ ॥ कीं हे स्वबोधाचे समुद्र । कीं हे आनंद नृप सुभद्र । कीं हे निर्वाण कल्पांत रुद्र । निमग्न जालें सुखें ॥ १८ ॥ अगस्तिकश्यप स्वसुख मिठी । भेटले निजरूपाच्या भेटी । स्वात्मसुखाच्या गोष्टी । करील कवण ॥ १९ ॥ या चि वेधें तटस्त सभा । श्रीराम स्वयंभ सुखगाभा । उभारला वेधनभा । सारिले तेणें ॥ २० ॥ निःशब्दामाजि निज । विसावला सुख उमज । निशब्दाचे चि चोज । वर्तलें सहज ॥ २१ ॥ पराकाष्ठा महा स्थिति । अचेतता सभेप्रती । हृदयस्थ तो दाशरथी । सीतेसह सुलीन ॥ २२ ॥ निजध्यास बोध हृदयीं । वोसणला पडे प्रवाहीं । विश्वरूप मुखें पाहीं । वक्ता होय सुखें ॥ २३ ॥ श्रवणाची चाड नसे । तेथें मनना कोण पुसे । हें निजध्यास पिसें । साक्षात्कारा वरील ॥ २४ ॥ क्षणामाजि अभिनव स्थिती । दृढावल्या आत्मप्रचीति । सरोनी अचेत वृत्ती । सहज स्थितीसी आले ॥ २५ ॥ पाहल्या नयनाच्या पंक्ती । अवधानें सुचित्त होती । श्रवणसुखें वोसंडती । अवस्थातीत ॥ २६ ॥ सरलें अवस्थेचें गाढ । वारलें निःशब्द दुर्वाड । लाधलें स्वानंद घवाड । चर्चेनें पुढती ॥ २७ ॥ निज विवराचा विवर । आत्मसाक्षात्कारीं घर । प्रवर्तला विश्वोद्धार । प्रबोध स्थितांचा ॥ २८ ॥ वाहिली अमृताची वेळ ।

सावधान जाले सकळ । श्रीरामहृदयस्थ केवळ । अवधानीं वर्तला ॥ २९ ॥ परममुखें विनयान्वित । हनुमंत जाला सद्गदित । सीतेप्रति, निजहृद्गत । निवेदिता होय ॥ ३० ॥ हृदयामृत माधुर्ये । वाचा रूढली आश्चर्य । संप्रज्ञाति समाधि तूर्ये । वरी आला सहज ॥ ३१ ॥ स्वानंदाचा सुरवाड । स्वबोधयक्ता स्वयें जाड । अनुभवाचे पुरे कोड । गोड बोलणें कपीचें ॥ ३२ ॥ संभापणाचें कारण सरे । प्रचितीचें प्रमाण विरे । त्याहिवरी सप्रेम भरें । बोलता होय भीम ॥ ३३ ॥ प्रेम मूर्तिमंत अवतरे । सुखाचें जिव्हार, चमत्कारें । गुरुसेवनाचे उरे । आर्त अतिशयें ॥ ३४ ॥ गुरुमुख सुधाकर । निरीक्षणें वारंवार । निवाले नयन चकोर । धन्य ते गुरुभक्त ॥ ३५ ॥ गुरुचरित्रमाळा । अखंड जयाच्या गळां । गुरुध्यान जिव्हाळा । जगविला स्वानंदें ॥ ३६ ॥ गुरुसंभापण सर्वदां । स्वानंदें सेवी गुरुपदा । त्यासी च अद्वैत संपदा । प्राप्त होय सुखें ॥ ३७ ॥ निःशब्दासी बोबडी पडे । स्वानंदासी वेध घडे । तन्हीं गुरुनिष्ठा न मोडे । अद्वैतबोधें ॥ ३८ ॥ गुरु मानसपूजनीं । राहिला जो निज सुमनीं । कृतार्थ तो चि तो ज्ञानी । गुरुभक्तीनें आगळा ॥ ३९ ॥ मातापिता इष्ट जात । विद्या धन कुळदैवत । गुरुवांचुनी न मनी चित्त । तो चि कृतार्थ जाणिजे ॥ ४० ॥ साच चि सद्गुरु सीता । जोडली सद्गति हनुमंता । पदीं ठेऊनियां माथा । प्रार्थितसे प्रेमें ॥ ४१ ॥ तें चि पुढें निरूपण । हनुमंताचें संभापण । श्रोतीं देउनियां अवधान । सुखे चि अवधारिजे ॥ ४२ ॥ इति श्री भीमोपदेश । अकल्मष भीम तोष । अनुभवाचा घर कळस । झणे मेरु अनंत ॥ ४३ ॥ चतुर्थ सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥



श्री

## सूर्य ४ कळा ४

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामसीता समत्वें । सद्गुरु स्वरूप आत्मत्वें । मूळ पितरें प्रचीत सत्वे । फावलीं मज ॥ १ ॥ स्वरूप साक्षात्कारीं योग । निःसंग द्वंदसंयोग ।

ऋषीचे बोल । देउनियां सुखाचे डोल । बोलतसे सप्रेमें ॥ ४१ ॥ विश्व हृदयाभिरामा । परंधाम अंतर्यामा । परप्रचीती विश्रामा । महिमा न कळे तुझा ॥ ४२ ॥ प्रज्ञेचा पवाडु नाहीं । तें तुझें हृदय पाही । परब्रह्मासी त्या कांहीं । लाग नसे युक्तीचा ॥ ४३ ॥ जेथें विज्ञान प्रलये । वितळोनी गेले निश्चयें । अनुभव तर्क विस्मयें । गळित जाले पुंज ॥ ४४ ॥ दृष्टांत द्राष्टांत संमती । निःशेष जाल्या उपपत्ती । तुझी कृपा होय पुरती । तरी च हृदय तुझें कळे ॥ ४५ ॥ विलोकितां हृदय अवंतीं । बोसरे जाणिव विस्पती । उन्मेष कैंचा निश्चिती । पवाड कैंचा तेथें ॥ ४६ ॥ तें तुझें निज हृदय । मारुतीसी बोललें स्वयें । जाणवल्याचि प्रत्ययें । पाहिला सुनिश्चळ ॥ ४७ ॥ केली जन्मांतर सुकृतें । आजि फळलीं तें कर्पातें । स्वरूपयोग विश्रांतीतें । पावला सहज ॥ ४८ ॥ सद्गुरुची कृपा जरी होय । तरी ब्रह्म प्रत्ययासी ये । अवचट सुखाच्या विस्मये । वेध होय ऐसा ॥ ४९ ॥ कल्पकोटी अर्जितां तुज । समाधान वाणे हें सहज । निजांग गभस्तींचें तेज । चिन्हित होय सर्वांगीं ॥ ५० ॥ नित्यानंद सुखें तरला । देहभाव नसे चि त्याला । विदेह दशेचा केला । विनियोग तेणें ॥ ५१ ॥ निर्विकल्प महा समाधी । अनुभवित कृतबुद्धि । तुझी कृपा कृपाब्धि । योगविश्रामधामा ॥ ५२ ॥ ऐकोनी अत्रींचें संभापण । आनंदला रघुनंदन । ह्मणे तुझें कृपेचें महिमान । तूं चि प्रशंसिसी ॥ ५३ ॥ दंडकारण्यासी प्रवेशतां । आश्रमासी आलों आम्ही समर्था । ते वेळे तुंवा अनुग्रहिलें तत्वता । महाबोध स्थितीनें ॥ ५४ ॥ ब्रह्मानंद साक्षात्कारें । बोलिलासी जें मधुरोत्तरें । वसिष्ठकृपा निर्धारें । प्रत्ययासी आली मज ॥ ५५ ॥ तुझा विजय अनुग्रह । तो सायोज्य सत्तेचा संग्रह । दुर्भेव दशास्य विग्रह । निवर्तला जेणें ॥ ५६ ॥ ऐसें बोलता स्वानंदकंद । अत्रीसी जाला परमानंद । तो अत्रिरामसुखसंवाद । अवधारिजे श्रोता ॥५७॥ इति श्री भीमोपदेश । महा समाधीसी प्रवेश । आनंदसिंधु स्वप्रकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५८ ॥ चतुर्थ सूर्य चतुर्थ कळा ॥ ४ ॥ श्रीराम ॥



श्री

# सूर्य ४ कळा ५

॥ श्रीरघुनाथायनमोनमः ॥

श्रीरामसमर्थ स्वरूपा । आत्मप्रलय अरूपा । समाधान निर्विकल्पा । आनंद कल्पतरु ॥ १ ॥ स्वरूप विष्णुतत्व गहन । अनुभवसिद्ध आख्यान । केवळ सुखाचें प्रस्थान । होसी श्रीरामा ॥ २ ॥ सच्चित्सुख संस्थान । गुणत्रय प्रतिष्टा पूर्ण । प्रधानसूत्रें संपूर्ण । सृष्टि उभारिली ॥ ३ ॥ या प्रवृत्तीहूनि पर । तूं असती निरंतर । तुझ्या स्वरूपाचा पार । न कळे कवणा ॥ ४ ॥ देवऋषि सिद्ध सर्व । तुझ्या अंशाक्रमें आहे । जाले तयासी अपूर्व । सन्मानें प्रशंसिसी ॥ ५ ॥ जाणावेचा पयमान । आक्रमूं शके चिद्गगन । तैसें इतराचें अनुसंधान । स्वरूपीं तुझ्या ॥ ६ ॥ स्वसुख जीवनायतन । सर्व व्याप्ति नारायण । स्वानंद सिंधु सनातन । देव देवोत्तमा ॥ ७ ॥ प्रकृति पुरुष मूळबीजें । कार्यकारण सृष्टिव्याजें । स्वानंदजीवनीं सहजें । प्रादुर्भवती ॥ ८ ॥ तेणें तें जगत्कारण । संभवे त्रिपुटीकरण । ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । होय प्रसिद्धि ॥ ९ ॥ हे श्रुत्यर्थ भावनिदान । मानसिक भावपूर्ण । मनन होतां सज्ञान । वेदवल्लावले ॥ १० ॥ अकल्पित हृदयांबरीं । स्वानंद सिंधूच्या लहरी । जगत्कारण भरोवरी । होत जातसे ॥ ११ ॥ सूर्याचे रश्मीपासूनि । मृग तोय भासे जनीं । तैविं अज्ञान विस्तारूनी । आलें स्थूळपर्यंत ॥ १२ ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन । सृष्टि उभारली संपूर्ण । हें हि तुझें चि जगद्भान । विज्ञानसूर्या ॥ १३ ॥ रज्जूवरील उरग । तयाचें रज्जू चि होय आंग । कां जें रज्जूवांचूनि सांग । न भासे चि तो ॥ १४ ॥ पुरुष चि स्वप्नांतरीं । पर्वत नद्या नर नारी । कांहीं न होनि विस्तारी । विस्तारला जाय ॥ १५ ॥ तैसें तुज सत्तावरी । विश्वरूपाची पसरी । चिदानंद शरीरीं । तूं चि जालासि सर्व ॥ १६ ॥ तूं सच्चिद्घन जिव्हाळा । तूं स्वानंदाची चित्कळा । आत्माराम तुझी लीळा । परीक्षी ऐसा कवण ॥ १७ ॥ अगोचर

स्वरूपता । विज्ञानशक्ति महासत्ता । विश्वसंभव जगन्माता । सीता प्रलक्षतेनें ॥ १८ ॥ तियेच्या अनुग्रहें पूर्ण । त्रैलोक्य होतसे पावन । वस्त्रमलिनता जीवन । संस्कारें जाय ॥ १९ ॥ अग्नियोगें धातूचे मळ । जाऊनि होती ते निर्मळ । कृपाळू जगन्माता केवळ । कल्मषहर बोधें ॥ २० ॥ नित्यानित्य अंतःकरणीं । भरी साधन सिद्ध भरणी । स्वरूपधारणा धरणी । गर्भेचि उजळी ॥ २१ ॥ ज्ञेय गंधवती जाली लीला । सीता स्वरूपें चित्कळा । तियेचा वल्लभ तूं भूपाळा । सर्वोत्य होसी ॥ २२ ॥ व्यक्तीसी आलें जें जग । तें तुज सुखाब्धी वरील तरंग । पावोनियां भवभंग । तुजसींच मिळे ॥ २३ ॥ जेथें स्पर्शलीच नाहीं माया । अभंग ते तुझी काया । तुझ्या अनुग्रहें वज्रदेहा । क्षयातीत केलें ॥२४॥ हा अक्षय भवहंता । यथार्थ जाला आतां । कृपापद्मकरें हनुमंता । समर्था सावध करीं ॥२५॥ चिरकाळ असतां हे समाधी । प्रबोधासी पात्र नव्हे कधीं । निरवधीदया त्रिशुद्धि । बुद्धीवरी आणी यया ॥ २६ ॥ ऐसें बोलतां अत्रिऋषि । कृपेच्या चि अतिशयेसीं । करें कुरवाळुनी कपीसी । सावध केलें श्रीरामें ॥ २७ ॥ मूर्धा घ्राणूनि सुखें । श्रीराम बोलतसे हरिखें । म्हणे आत्मप्रचीतीच्या उल्लेखें । ऊठवेस कपींद्रा ॥ २८ ॥ कवळुनियां कृपाकरें । वात्सल्यरस अत्यादरें । श्रीरामें भीम साक्षात्कारें । हृदयीं धरिला ॥ २९ ॥ आनंदें द्रवलें कपींचें चित्त । लोटलें आनंदाश्रु अमित । वाष्पें दाटला सद्गदित । काया सजळ जाली ॥ ३० ॥ प्रेमातिशयें दुर्धर । रोमांचित वपु निर्धारें । गदगदां कांपतसे भरें । सात्विकें तेणें ॥ ३१ ॥ विघरोनी जातसे गार । तैसें विरतसे जिव्हार । पाठी थापटूनि कृपाकर । म्हणे ऐक गा रुद्रा ॥ ३२ ॥ निद्राळू जाल्यां शरीरीं । उपचार आश्चर्य कोण करीं । शून्य अवस्था टाकीं वरी । होई सप्रचीत सुखें ॥ ३३ ॥ अक्षय निधान लाधलें । ते भोगितां चि होय भलें । उगेंचि गौरव शोभलें । तयाचें व्यर्थ जाये ॥ ३४ ॥ परम मनोहर जाया । दैवें जोडली जया । ते उपभोगेंसी जया । जाय तरी बरवें ॥ ३५ ॥ तैसें हें मोक्ष निधान । स्वसुखाचें आयतन । प्रचीतीचें संभाषण । अवस्थेनें राहों नये ॥ ३६ ॥ संभाषणीं

निपजलें सुख। संभाषणीं स्वरूप सन्मुख। अवस्थारोधें विन्मुख। तेथें न व्हावें ॥३७॥ विश्रांतीचे चि अवतार। बोधाचेचि सूर्य ऋषीश्वर। यांच्या जिव्हाग्रीं साक्षात्कार। नृत्य करीतसे ॥ ३८ ॥ अमृतोपम यांचीं भाषणें। तोष वसुमति निधानें। शेष प्रश्नेचीं प्रस्थानें। महत्सुख यांचेनि ॥ ३९ ॥ क्षणभरी सहवासें जाये। तरी आनंदाची वृष्टि होये। भीमश्रवणीं निज सोये। होय घेता सहज ॥ ४० ॥ निद्रिस्त उमजत उमजे। रामवाक्यासी तेथें समजे। लजोनि वेध सहजें। सावध होय सप्रेमें ॥ ४१ ॥ म्हणे आहे आहे जी स्वामी। शून्य अवस्था सन्मुख ऊर्मि। पुढती पुढती तेणें मी। कां अवरोधतसे ॥ ४२ ॥ श्रीराम म्हणे तूं सात्विक होसी। विसरेंचि गळो निजासी। आतां द्वावी धारिष्टासी। नव्हे अळका अवस्थेचा ॥ ४३ ॥ अवस्थातीत हरिख। साक्षीचा हि साक्षी देख। सहज स्थितीचें जें सुख। त्यासी पार चि नसे ॥ ४४ ॥ एवं अवस्थातीत भीम। करूनि टेविला सप्रेम। सहज स्थितीचा उपक्रम। तो रुद्रानुवाद अवधारा ॥ ४५ ॥ महा प्रचीतीच्या सुखें। रुद्र बोलेल जें निजमुखें। तें चि होऊनि उल्लेखें। सादर श्रवण कीजे ॥ ४६ ॥ महा अद्वैत प्रचीती। केवळ स्वरूपाची स्थिती। तुम्ही अनुभवाच्या मूर्ति। तेथे काय म्यां प्रार्थावें ॥ ४७ ॥ इति श्री भीमोपदेश। स्वरूप प्रचीतीचा तोष। अभ्रांत सुखाचा संतोष। म्हणे मेरु अनंत ॥ ४८ ॥ चतुर्थ सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥

---

श्री

## सूर्य ४ कळा ६

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम आत्मसुख संभव। स्वरूपान्वय स्वानुभव। निर्भव दशेचा स्वभाव। आंगें परब्रह्म ॥ १ ॥ निरोपाधि स्थितीचा योग। संकल्परहित अंतरंग। बोध तत्वमसि प्रसंग। सद्गुरु सरूपें ॥ २ ॥ अध्यात्मज्ञान सुप्रचीति। शिष्यवात्सल्य संपत्ति। चतुर्विध प्रकार स्थिति। सफळ

पुरुषार्थे ॥ ३ ॥ अद्वैत सुख निरंतर । द्वैतेवीण अनुग्रह सार । अनुभव अभिन्न निर्धार । अवचट सुखेंसी ॥ ४ ॥ जयजय कल्याण कल्पतरु । आत्मप्रसन्नता वर सद्गुरु । भवदुःखनिर्घासी तारु । जोडलासि दैवें ॥ ५ ॥ मी भवदुःखयोगें जर्जर । जन्ममरण खेद संस्कार । जीर्ण काया नल्पनांतर । धरित होता ॥ ६ ॥ नाना विपत्ति महा दुर्घटें । भोगित होतो महा संकटें । मृत्यूचे आघात अवचटें । वाजत होते निजांगीं ॥ ७ ॥ कलिकल्मष संकल्प । दुराशा क्षोभित विकल्प । नित्य दारिद्रियोग कल्प । गेले नेणों किती ॥ ८ ॥ मनसोपसर्ग अठवी । योगतेच्या योगें परामवी । कल्पित सन्मान संभवी । गर्वित दुराग्रहें ॥ ९ ॥ भावितसु तर्कविद्या । माजि संपूर्ण अविद्या । तेणें अभिमानें अद्या । तुज विसरलों ॥ १० ॥ तुज नेणोनि तत्त्वता । तपाद्य मी याची अहंता । देंभें चि रानमरीं होतां । सीणलों किती ॥ ११ ॥ मी विरक्त मी अनुष्ठाता । मी पवित्राचरणें पुरता । माझी सामर्थ्यवल्गत्यता । कवणासी च नसे ॥ १२ ॥ नेणोनि तत्त्वता ब्रह्मस्थिति । मिरवी ब्रह्मचर्यउद्धती । मी शास्त्रसंपन्न हे मती । होती मजला बहु ॥ १३ ॥ मी नव व्याकरणीं प्रवीण । मी वेदांतज्ञानें संपन्न । मी काव्य कौशल्य ज्ञान । सर्व जाणता ॥ १४ ॥ ऐसे जाणींवेचे फुंज । दुर्गतीदायक सहज । अज्ञानयोगें होते मज । सद्गुरुवर्या ॥ १५ ॥ मी अनादि सिद्ध अज्ञानी । मी असतां भवबंधनीं । चांग तुंवा कृपाकरुनि । येथूनि सोडविलें ॥ १६ ॥ या अव्हाट चक्रापासूनि । मज मुक्त केलें मोक्षपाणी । नित्य कृपेच्या ईक्षणीं । कृतार्थ केलें मज ॥ १७ ॥ निजपदयोगें पदवी । देऊनि योग्यता वरवी । स्वरूप राज्यानुभवी । केलें तुंवा ॥ १८ ॥ शिवविष्णु विधिमति । जेथें न पवती श्रुतिस्मृति । शेष प्रज्ञा वाचस्पति । दुन्हावले युक्तीनें ॥१९॥ ऐसें अतर्क्य तें स्वरूप । मजला केलें आपेंआप । मी अज्ञान संकल्पें अल्प । परी अगाध केलें तुंवा ॥ २० ॥ माझें स्वरूप मजपासीं । असोनि चुकलों होतों त्यासी । परी तुंवा त्या स्वरूपासी । भेटविलें दयाळा ॥२१॥ निजकृपेच्या संस्कारें । भवाब्धींत तारिलें निर्धारें । या चि तुझिया कृतोप-

कोरें । दाटलों जीवीं ॥ २२ ॥ अज्ञान भवजळावृत्तीं । सरतां भ्रमण अघातीं । कृपेनें चि तुंवा स्वहस्तीं । काढिलें मज ॥ २३ ॥ भवभ्रम हा बहुतर । होता अनादि दुर्धर । चिरंजीवि वज्रशरीर । मी वळाव्य ऐसा ॥ २४ ॥ नेणोनि स्वरूपताज्ञान । ब्रह्मादिपदें थोर भाऊन । साधन संग्रहीं पूर्ण । कर्माव्य या अर्थे ॥ २५ ॥ सुकृत धनाच्या रासी । कल्पना हृदयकोशीं । संग्रह करितां सायासीं । जन्म गेले ॥ २६ ॥ तें संचित द्रव्य अमित । हा भ्रम भाऊनि निश्चित । आपुल्या मनीं सावचित्त । सन्मार्गे होतों ॥ २७ ॥ निस्पृह स्थितीनें अयाचित । भ्रांति धन ठेऊनि बहुत । कृपणता अति जीवित । क्षेमें मर्धविलें ॥ २८ ॥ ऐसें परोपरीं अज्ञान । मज माजि होतें संपूर्ण । आत्मबोध सूर्य जाण । तुंवा तें निवर्तविलें ॥ २९ ॥ दुर्बळ अज्ञान घोसरे । सबळ अज्ञान नावरे । तें हे योग्यता भ्रांतिभरें । भारवाही होतों ॥ ३० ॥ सुकृत लेश चमत्कारें । तात्काळ अल्प पा पसरे । परी तें महापापें व्योमाकारें । अल्पपुण्यें न जाती ॥ ३१ ॥ घरांतील तम दीपें जाय । परी सृष्टींतील न जाय । तेथें अगत्य सूर्योदय । जाला पाहिजे ॥ ३२ ॥ अल्प रोग औषधें जाय । क्षयरोगासी रसायन होय । या भवरोगासी निश्चयें । देशिका दया तुझी ॥ ३३ ॥ तुझे कृपेसी उपमा नाहीं । वाचा खुंटली आठवे पाही । तुझ्या कृतोपकारा कांहीं । पार चि न लगे ॥३४॥ कदाचित अदृष्टाचिये योगें । नदींत बुडतां ठाव लागे । परंतु समुद्रीं बुडतां न लागे । ठाव तयासी ॥ ३५ ॥ तैसे अल्प जनीं उपकार । करूनि तयासी उपचार । निस्तरिजेत प्रत्योपकार । सरिता पूर जेविं ॥ ३६ ॥ नाना जन्म दरिद्र सरे । अक्षय संपत्ति अवतरे । ऐसिया दात्यासी निर्धारें । काय घावें कल्पित ॥ ३७ ॥ अदृष्टविधीचीं अक्षरें । दुःखदायक संस्कारें । जन्ममरण फेरे । प्रवर्तवीत होतीं ॥ ३८ ॥ तीं अक्षरें पुसोनी स्वहस्तें । प्रारब्धमुक्त केलें निरुतें । ऐसिया विधात्यासी उचितें । काय घावें कवणा ॥ ३९ ॥ अनादि सिद्ध अज्ञान । देऊनियां निज स्मरण । करीत आला प्रतिपाळण । कृपाळूपणें चि ॥ ४० ॥ प्रशंसेचें

घोरपण । विष्णु ऐसा हा प्रस्थान । त्याचे कृपेसी प्रमाण । कोण करूं शके ॥ ४१ ॥ काय ह्मणावें तिये कृपेसी । परिपाळ्यं दुःखाच्या राशी । तुझिया कृपेच्या प्रकाशीं । सरलें तें दुर्घाट ॥ ४२ ॥ विषाचा वाहतां झरा । प्राशन करूनि ह्मणे मरा । मरतां नव्हे पार्थमोरा । हा आशीर्वाद देत ॥ ४३ ॥ तैसें तें परिपाळण । अज्ञान सिद्ध संरक्षण । तुझिये कृपेनें संपूर्ण । कळों सरलें समर्था ॥ ४४ ॥ देऊनियां स्वरूपज्ञान । अविनाश प्रतिष्ठा पूर्ण । स्वानंदसुख सनातन । परिपाळिलें तुंवा ॥ ४५ ॥ जगीं जगनिदानकर्ता । प्रशंसिला मृत्युहंता । मरण मारीना तत्त्वता । उपजलें मारी ॥ ४६ ॥ ज्यापासूनि इतुकें होतें । त्याचें निर्मूळ न करी पुरतें । संभवविलें तितुकें स्वहस्तें । निदानासी आणी ॥ ४७ ॥ तो संव्हारकर्ता हें विख्यात । त्याचि निदानीं होय प्रवृत्ति । निदान क्रिया तयाप्रती । आतुडली नाहीं ॥ ४८ ॥ साच तुझे कृपेचें निदान । निवारी संभवमरण । विश्वनिदानाचें निदान । करूं जाणसी तूं ॥ ४९ ॥ यापरी प्रांजळ ज्ञान । उत्पत्ति स्थिति निदान । तुजपासीं च असे जाण । सद्गुरु समर्था ॥ ५० ॥ मी अहं जालों तुझे कृपेसीं । हे योग्यता मजपासीं । कोठूनि आली कैसी । तें मज न कळे ॥ ५१ ॥ पूर्ण तुझें कृपाळूपण । यथार्थ होसी पतित-पावन । या भींदाच्या तेज सुभान । प्रकाशला जगीं ॥ ५२ ॥ दीनोद्धरण दीनबंधु । भक्तवत्सल कृपासिंधु । अनाथ नाथ नित्य संभु । आहे कृपेचा तुजसी ॥ ५३ ॥ तूं सर्व हृदयस्थ देवा । अरिमित्र कैंचा तेव्हां । उंच नीच या लाघवा । वरपडा नव्हेसि तूं ॥ ५४ ॥ कपिमुखींचें गुरुस्तवन । ऐकोनी तोषला करुणाघन । पुढती कपिमुखीचें निरूपण । अवधारिजे श्रोतीं ॥ ५५ ॥ इति श्री भीमोपदेश । पूर्वपश्चात्तापतोष । वोसरला विकल्प अशेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५६ ॥ श्रीरामसमर्थवळ-भीमायनमः ॥ ॥



श्री

# सूर्य ४ कळा ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम स्वात्मसुखप्रद । स्वानंदवर्धन संवाद । सावन विस्तारें विद्वद । बोध संपन्नता ॥ १ ॥ देवा श्रीसद्गुरुराया तुज । सेवींन ऐसें वाटे मज । भडस पुरवीं हे सहज । कृपाळूपणें ॥ २ ॥ तुझिया कृपेच्या मार्गे । चिंतिलें न पविजे कवणें । इंद्रसदनीं स्वभावानें । संपत्तीसी उणें काय ॥ ३ ॥ कल्पद्रुमापासीं सहज । काय कल्पिलें न पविजे चोज । त्रिभुवनपति तूं मज । तेविं जोडलासी ॥ ४ ॥ अमरावतीसी उधानें । कल्पतरूचीं विस्तारानें । चिंतामणीचीं सदनें । गोठणी सुरभीचीं ॥ ५ ॥ ते संपत्तीचा तूं दाता । तेणें तुज सेविजे समर्था । हरिहरांची सत्ता । प्रसिद्ध तुजपासूनि ॥ ६ ॥ तेथें माझे मनोरथ ते किती । तुज अशक्य काय दाशरथी । स्वरूपज्ञानें माझे चित्ती । सर्वदा राहे ॥ ७ ॥ माझें हें चि अपेक्षित । जाणसी तूं मनोगत । तुजवांचूनि समर्थ । हृदयज्ञाता कैंचा ॥ ८ ॥ वसुमतीवरी जें होय । तें तियेचें चि निश्चयें । आन आन पदार्थी काय । आनान धरा ॥ ९ ॥ जीवनावरी जितुकें । जीवनाचे तरंग तितुके । कल्लोळाकृति कौतुकें । भिन्न तोय नव्हे ॥ १० ॥ सूर्याचे रश्मि जात । जन्हीं जाल्यां कां अनंत । तन्हीं तेजीं भेद समस्त । असे चि ना की ॥ ११ ॥ अनंत वायूच्या चळ्का । तितुका हि वायु चि कां । वायूसि भेद अनेका । प्रसरें नये ॥ १२ ॥ संपूर्णपणें आकाश । अनेक अवकाश कोश । पाहतां नभासी अशेष । भिन्नता नसे ॥ १३ ॥ तत्त्वता महत्तत्त्वज्ञान । मूळींचें येक अहंकरण । तयापासूनी त्रिगुण । अनेकपणें मिश्र ॥ १४ ॥ मूळींच्या शुद्ध सत्त्वासी । वास्तव्य सर्व सृष्टीसी । वसतां अनेक कुक्षीसी । भिन्नता न घडे ॥१५॥ तत्त्वता सोहं स्मरण । परमात्म स्वरूपें पूर्ण । अनेक देहीं वसोन । असे अभेद स्थिती ॥१६॥ तैसें तुझें व्यापकपण । विश्वहृदयीं सनातन । चळे विश्वांतःकरण । तुझिया चि योगें ॥ १७ ॥ जे जे उल्लेखासी

आले । तें तें तुझेनि निपजलें । किंवा सर्व प्रतिष्ठिलें । तूं चि होऊनि सर्वत्र ॥ १८ ॥ निजहृदयींचें ज्ञान । पाहतां अंत न लगे जाण । तया ज्ञानाचें चि श्रवण । त्वक् चक्षु जाला ॥ १९ ॥ घ्राण आणि रसना । ज्ञान होऊनि रस नाना । कर्मेंद्रियें पंचप्राणा । प्रतिष्ठित जालें ॥ २० ॥ विषयउपभोग सर्व । ज्ञानें चि जाले हे अपूर्व । सृष्टीचे कार्यभागीं अई । ज्ञान चि एकलें ॥ २१ ॥ ज्ञानावांचूनि जनीं । रूप चि नव्हे कोण्ही । सर्व हि ज्ञानाचिपासुनी । प्रगट जालें ॥ २२ ॥ तें ज्ञान तुझें हृदय । ज्ञानें चि ज्ञान निचळ होये । त्या ज्ञानाचा साक्षी स्वयें । अनंतरूप ॥ २३ ॥ अनंतदेहीं अनंतरूप । देहीं देहातीत अरूप । पाहतां परमस्व स्वरूप । आस्तिक्यता तुझी ॥ २४ ॥ यापरी तूं समर्थ स्वामी । वससी विश्व अंतर्यामीं । माझे मनोरथ स्वधर्मी । तूं चि पुरविता ॥ २५ ॥ जगद्गुरु श्रीरामचंद्रा । प्रसन्न होई स्वसुखसमुद्रा । भजन दीक्षेची मुद्रा । घावी मज ॥ २६ ॥ तरी च सार्थकाचें जिणें । सर्वस्वें तुज समर्पण । काया वाचा आणि मनें । अर्चावें तुजला ॥ २७ ॥ अनंत नेत्रें पहावें तुज । अनंत करें अर्चावें सहज । अनंत वचनें गुज । तुझें चि बोलिजे ॥ २८ ॥ अनंत वदनें तुझें चरित्र । अनंत गद्यपद्यें विचित्र । अनंत प्रौढीनें पवित्र । गायन करावें म्यां ॥ २९ ॥ सप्रेम सद्गदित भावें । प्रार्थितां कर्पानें जीवें । बोळ्या कृपाघन अभिनवें । दिल्हे अनंत वर ॥ ३० ॥ अनंत कृपेचे अनंत वर । भजनीं सर्वकाळ तत्पर । नामसंकीर्तन सार । नव विधा प्रकारें ॥ ३१ ॥ बोळ्या अकल्पित कृपाकरें । सर्वस्वें दिधलें कृपाकरें । स्वरूप देऊनि साक्षात्कारें । भजनें गौरविल ॥ ३२ ॥ भक्तीचें निज जिव्हार । हृदयींचे सप्रेम दुर्धर । होऊनि पुल्कांकित शरीर । श्रीराम आलिंगी रुद्रासी ॥ ३३ ॥ श्रीरामभीमआलिंगन । उभयता जाले स्वानंदघन । दोघे स्वानंदसिंधूपूर्ण । भेटले हरिहर ॥ ३४ ॥ दोघे स्वरूप साक्षात्कारी । महाप्रस्थानें सृष्टीवरी । भक्तीच्या रहस्यें वरीवरी । ऐक्य होती परस्परें ॥ ३५ ॥ व्हावयासी विश्वोद्धार । गुरुशिष्ययोगें हरिहर । परंपरेनें निर्धार । रुद्रासी आणिती ॥ ३६ ॥ स्वरूपज्ञानें लपंडाई । खेळ्यें जाणती विश्वहृदयीं ।

या दोघा वांचूनि तिजा नाहीं । विश्वीं पाहतां ॥३७॥ विज्ञान स्वरूपी बोध । दोघे जण हे अनघ ।ययाच्या तिरें सैघ । विश्व विस्तारलें ॥ ३८ ॥ विश्वकाम कल्पद्रम । दोघे हि विश्वाभिराम । स्वरूपदर्शनें परम । व्यक्तीसी आले ॥ ३९ ॥ एक शिव एक केशव । दोघास हि स्वरूपानुभव । स्वरूप ज्ञान विभव । सारिखें चि दोघांचें ॥ ४० ॥ अज्ञान विवर्तक दोघे हि । कल्पांत रुद्र समदेही । यांच्या सामर्थ्यासी नाहीं । तुळणा जगीं ॥ ४१ ॥ अविद्यायोगें सृष्टि । कौतुक दाखविती दृष्टीं । उठऊनि विघ्नकोटी । शमविती तैसें चि ॥ ४२ ॥ एक पळतां पुढें निःसंग । दुजा स्वयें करी पाठिलाग । महा मोहक क्रिया जग । भुलवावया करिती ॥ ४३ ॥ नाटक अविवेचे खेळ । मनोहर काया केवळ । मोहिती परस्परें अकळ । अभ्यंतर जाणोनी ॥ ४४ ॥ ते हे दोघे स्वरूपें प्रगट । बोधासी आले उत्कट । देवभक्तपणें अवचट । आले गुरुशिष्यतेसी ॥ ४५ ॥ निजबोध परवडी । स्वानंदाच्या कडोविकडी । सायोज्य कौतुकाची कोडी । घालिती परस्परें ॥ ४६ ॥ महा वाक्याचें विवर । गुरुशिष्य रहस्य निर्धार । प्रगट करिती जिव्हार । साक्षात्काराचें ॥ ४७ ॥ करूनि स्वामीसेवक व्याज । अवतारी वर्तले सहज । दोघांचें अंतरींचें हें गुज । कवणासी न कळे ॥ ४८ ॥ ब्रह्मयासी न कळे स्थिती । वरकडासी काय कळे हे गती । चित्त चोरटे अनुभविती । स्वरूपासी दोघे ॥ ४९ ॥ त्रिगुणाचा कळह जगीं । लाऊनि दिधला ययानीं । दोघे गुणातीत होउनि । स्वरूपीं रतले ॥ ५० ॥ नित्य मुक्त हे दोघेजण । होती जीवन्मुक्त यांपासून । जीव कोटी त्यासंपूर्ण । येहीं चिताराव्या ॥ ५१ ॥ जगदाध हे आदिदेव । विष्णु आणि सदाशिव । उपदेश क्रमासी ठाव । येथून जगीं ॥ ५२ ॥ विष्णु पासूनि ज्ञान संतती । परंपरा आली जगतीं । तैसी च शिवापासूनि विख्याति । ज्ञान परंपरा ॥ ५३ ॥ दोघे सायोज्य सार्वभौम । प्रगटतेसी आले रामभीम । सत्यान्वय अनुक्रम । अवतारी दोघे ॥ ५४ ॥ जाला श्रीराम वरप्रसाद । भीमासी जाला परमानंद । तो रामभीम सुख-संवाद । स्वानंदकंद अवधारा ॥ ५५ ॥ अनुभवामृत भोक्ते । तुम्ही

वक्तयाचे वक्ते । अनुसंधान वचन मुक्तें । कटाक्षें वर्ततां ॥ ५६ ॥ अद्वैतज्ञान निरोपम । चाळवितां अवधानें परम । त्या चि कृपेनें कल्पद्रुम । ग्रंथीं अवधान चावें ॥ ५७ ॥ इति श्री भीमोपदेश । हरिहरयोग परेश । पावन करिता जगास । ह्मणे मेरु अनंत ॥ ५८ ॥ चतुर्थ सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥ ॥



श्री

## सूर्य ४ कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामनित्यात्म सुखस्थिति । परब्रह्माची प्रचिती । परात्पर निज विश्रांति । भक्तीच्या रहस्यें ॥ १ ॥ निवाले निजनयन पाहतां । वेधले श्रवण ऐकतां । विसांवले भाव तत्त्वता । निजध्यास योगें ॥ २ ॥ वोळलीं सर्व सुखाचीं सुखें । आनंदला तोप हरिखें । अमृतोपम सुख मुखें । वचनें आलीं ॥ ३ ॥ सायोज्य सुखाचा ठेवा । हृदयींचा एकसरें आधवा । निज अपत्याच्या कणवा । देतसे परायोगें ॥ ४ ॥ अतर्ज्ञान सप्रचीत । वचनांतरीं सुख अनंत । अनुभव दर्शनें अखंडित । देत ऐश्वर्य निजाचें ॥ ५ ॥ परमानंदाचें निधान । प्रसन्नतेसी आलें आत्मज्ञान । सुखावरी सुख गहन । कृपेपासूनि देतसे ॥ ६ ॥ सहज स्वानंदाचे योग । वोळले कैवल्य अंतरंग । स्वभावस्थितीनें निःसंग । अनुग्रहिलें मज ॥ ७ ॥ मी माझें निज अभ्यंतर । सहज चि होतसे विवर । गुरुप्रसादें साचार । स्वराज्यारूढ जालों ॥ ८ ॥ अद्वैत छत्रपति श्रीरामा । तूं प्रसन्न जालासी आह्मां । अद्वैतें चि अंतर्यामा । प्रतिष्ठिलें तुंवा ॥ ९ ॥ आत्मस्फूर्तीचा पसर । जो कां होता विश्वाकार । तो मुरडून अभ्यंतर । विवरीं रिघालों ॥ १० ॥ हें साधनेविण घडलें । द्वैताद्वैत विघडलें । स्थिरावलें लक्ष जडलें । स्वरूपासीं ॥ ११ ॥ साक्षत्वाचे द्रष्टुत्व पूर्ण । सहज जालें आत्मार्पण । अनिर्वाच्य समाधान । निवळलेंसे सुखें ॥ १२ ॥

ब्रह्मस्फूर्तीची डाहळी । आली सफळित अंतराळीं । ज्ञान कल्पांत ते समूळीं । निर्मूळ जाली ॥ १३ ॥ उल्लेख झरा आटला । सुखीं सानंद घनवटला । साक्षात्कार प्रगटला । उतटला उद्बोध ॥ १४ ॥ मी माझें निजस्फुरण । ययासी जाले वोळखण । प्रचीतीचें निज अनुसंधान । सामावलें सुखें ॥ १५ ॥ तत्त्वता हे तुझी कृपा । कैवल्य अयोध्येच्या नृपा । सद्गुरु जाल्यासी स्वरूपा । मुक्त भेटे सहज ॥ १६ ॥ जयासी नाश नाहीं कल्पांतीं । जें सदोदित आथंतीं । त्या स्वरूपासी भ्रांति । जाली होती बंधनाची ॥ १७ ॥ आकाश बांधतां न ये पदरीं । वायूच्या पल्लवें सर्वोपरी । वोथेंनि तयासी व्यापारीं । वाटे वर्तविलें होतें ॥ १८ ॥ कल्पनेचा केवढा विस्मय । द्वैतासी अद्वैत आश्रय । तया अद्वैताचा प्रत्यय । द्वैतयोगें घडला ॥ १९ ॥ काय ह्मणावें हें कैसें । अद्वैत स्फूर्ति सावकाशें । विश्वाभास प्रकाशे । आपुली च स्फूर्ति ॥ २० ॥ निजांग पाहतां निर्मळ । नसे दृश्य त्रिपुटीचा मळ । तेथें आत्मा मी हें सोज्वळ । स्नान होतसे ॥ २१ ॥ द्वैताद्वैत संधी पूर्ण । मायामुळें क्षोभे मीपण । स्वरूपीं कांहीं च नसोन । माया रूढली कैसी ॥ २२ ॥ जेथें दुजयाचा विटाळ । एकपणासी नाहीं सळ । तेथें विश्वाकारें अखिळ । हेतु कोठूनि आला ॥ २३ ॥ जगद्बंधु कृपाघना । आत्मसुखाच्या निधाना । माया कल्पित भावना । प्रवाहीं पडतों ॥ २४ ॥ हा स्वरूपाचा विसर । हा प्रवृत्तीचा विस्तार । सर्व चि स्वरूपज्ञानें सार । समाधान होतें ॥ २५ ॥ स्वभावें चि प्रवृत्ति पवाडे । स्वभावें चि निवृत्ति आवडे । अनादि सिद्ध दोहींकडे । मी पडतसें प्रवाहीं ॥ २६ ॥ मी शोधूनि मज पाहतां । मीपण न दिसे तत्त्वता । निःसंगपणें चि समता । सहज वोळे ॥ २७ ॥ मी मज न शोधितां । कोहंएकपणें असतां । संकल्प विकल्पें ममता । अभिवृद्धि होय ॥ २८ ॥ शोधूनि पाहिलियावरी । ममतेसी नसे चि उरी । द्रष्टा नि नाटळे अभ्यंतरीं । तेथें द्रष्टृत्व कैचें ॥ २९ ॥ द्रष्टा नाटळे जया । तो चि द्रष्टा जाण सखया । अपुल्या अभावें माया । क्षोभवितो ॥ ३० ॥ निजभावें हि मायाक्षोभ । निज अभावें हि अक्षोभ । हा भावाचा महा

लोभ । विवर कीजे ॥ ३१ ॥ सांगतां सांगणें चि सरे । ऐकतां ऐकणें वोसरे । दोन्हीं जाऊनियां उरे । तो केवळ द्रष्टा ॥ ३२ ॥ हें द्रष्टुत्व ज्ञान जाण । युक्तीचें अवतरण । महा संशयासी कारण । होंये येणें चि ॥ ३३ ॥ याकारणें अपरोक्ष ज्ञान । जालें पाहिजे निवेदन । आत्मनिवेदनें निर्वाण । होय द्रष्टुत्वासी ॥ ३४ ॥ मुळींहूनि द्रष्टा नसे । द्रष्ट्यासी निवळलें ऐसें । या चि संधीसी सावकाशें । निवळ व्हावें ॥ ३५ ॥ सावकाश निज निवळे । तेणें अवचट तें उफाळे । निरावकाशें वितुळे । समूळ द्रष्टा ॥ ३६ ॥ द्रष्टुत्वा आंगीं परापर । ब्रह्ममाया उभय धर । त्या द्रष्टुत्वासी साचार । पुढतीं शोधावें ॥ ३७ ॥ मायापदार्थ भरोवरी । द्रष्ट्यावीण कोण करी । द्रष्टा स्वतंत्र अभ्यंतरीं । कीं अवांतर पाहे ॥३८॥ स्वतंत्र त्यासी साचार । नसे चि कांहीं विचार । अवांतरासी संस्कार । सर्व कांहीं ॥ ३९ ॥ अवांतरेपासीं आस्तिक्य नसे । स्वतंत्र आंगें आस्तिक्य असे । स्वतंतर अवांतर ऐसें । आपणासी निवळे ॥ ४० ॥ जितुकें कांहीं स्फूर्तीसी आलें । तितुकें अवांतर जालें । स्फूर्तीचें अधिष्ठान पाहिलें । तरी तें चि स्वतंत्र ॥ ४१ ॥ आतां स्फूर्तिरूप आपण । किंवा स्फूर्तीचें अधिष्ठान । ऐसें आपणासी निवळोन । पाहे स्वतंत्र तूं ॥ ४२ ॥ पाहण्यासरिसा जासी । उगा चि प्रवाहीं पडसी । कांहीं न होतां अससी । तो तूं उगाचि कीं ॥ ४३ ॥ सकळ ज्ञानाचें ज्ञान समाधानाचें समाधान । उगें चि असणें प्रमाण । साक्षात्काराचें ॥ ४४ ॥ उगें चि असाया काय घेसी । जनीं पृथा चालिली ऐसी । ह्मणोनि उगें असणीयासी । तुळणा नसे ॥ ४५ ॥ उगें असावें कवणें । हा कोरून संशय काढणें । जनीं या चि अल्पज्ञानें । भांबावले किती ॥ ४६ ॥ आपणें चि आपणा नावरे । उगा चि विकल्पे वावरे । स्थिरावेना निज निर्धारें । ऐसा चंचळ ॥ ४७ ॥ चंचळाचें मानखंडण । निश्चळीं होय सनातन । चंचळ निश्चळ हें भान । सरिसें चि जाय ॥ ४८ ॥ सद्गुरुकृपा स्वरूपज्ञान । उगें चि असतां समाधान । उगें चि असायासी आण । घातली आपुली ॥ ४९ ॥ स्फूर्तीचें जालें

मढें । प्रमाणाचें रचिलें थडें । त्यावरी सामर्थ्याचें केवढें । चालिलें प्रमाण ॥ ५० ॥ अचिंतां अर्चकासी पावे । अभिष्ट पुरवी जीवें । हें दैवक चि स्वभावें । चालिलें असे ॥ ५१ ॥ भाविल्याचा भाव सफळ । निज प्रसन्नता केवळ । थडें कांहीं च न करी निवळ । वरा हनुमंता ॥ ५२ ॥ निर्विकार निज हृदय । त्यावरी दैविक स्वयें । अव्यंतर मायामय । तरंग उंठती ॥ ५३ ॥ अंतरिक्षीं अभ्र पडळें । काय निर्मिलीं अंतराळें । तेवि अभ्यंतरासी निवळें । निर्विकार तूं ॥ ५४ ॥ ऐसें कैवल्य अयोध्यापति । निजानुभव स्थिति । कृपेने हनुमंताप्रति । बोलता होय रहस्य ॥ ५५ ॥ परम सज्ञान कपींद्र । केवळ अनुभव सुखाचा समुद्र । आक्षेप वृत्तीनें श्रीरामचंद्र । हृदयासी घेतसे ॥ ५६ ॥ सद्गुरूसी बोलणें होये । तें प्रचीतीचें अवतरण स्वयें । कां जें प्रश्नोत्तर अमृतमय । प्रसाद-येती ॥ ५७ ॥ स्वरूपस्थिति उगें असावें । नातरी सद्गुरूसी बोलावें । उगें चि असण्यापरीस जाणावें । बोलणें चि अधिक ॥ ५८ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रचीतीचा निज निष्कर्ष । निष्प्रपंच आत्मप्रकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५९ ॥ चतुर्थ सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ ७ ॥



श्री

## सूर्य ४ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सद्गुरु संभाषण । होय स्वानंद सुख तोषण । प्रचीतीचें निज भूषण । धरावें श्रवणीं ॥ १ ॥ टाकूनि परतंत्रक मतिभांव । सद्गुरु राव्यासीं सदैव । राहोनी निजसेवेचें विभव । लाहावें सुखें ॥ २ ॥ सद्गुरु कृपा माहेरघरीं । सुखशांति विश्रांति उपचारीं । नित्य स्वरूपता शृंगारी । परम तोषें ॥ ३ ॥ निवृत्ति परतत्त्व विसावे । सद्गति कृतार्थतेसी पावे । सद्गुरुसमेसीं स्वानुभवें । प्रकटीत होइजे ॥ ४ ॥ सद्गुरु सभेसीं संत मंडळी । सद्गतीच्या चर्चानुमेळीं । प्रचीति कल्पलता पाल्हाळीं । सुमन

फळीं लिगडे ॥ ५ ॥ टाकूनि परचिंतना सर्व । सद्गुरु सेवेसी व्हावें अर्ह । सद्गुरु कृपेनें पूर्व । लाहावी पूर्वदशा ॥ ६ ॥ निवृत्तीपर चिंतना । न भाऊनि त्या निर्गुणा । गुरुसेवेच्या समाधाना । सहसां सोडूं नये ॥ ७ ॥ श्रुतिशास्त्रविदासि अकळ । तो अर्थ होय कृपेनें प्रांजळ । ऐसा सद्गुरु कृपाळ । उदार स्वरूपदानें ॥ ८ ॥ ईश्वराचेनि दिघले न वचे । तें अक्षयी ठेवणें निजाचें । तें गुरुसेवेचेनि साचें । प्राप्त जालें सुखें ॥ ९ ॥ परम साक्षात्कारीं साधन । गुरुसेवारूप निज धन । सकळ प्राप्तीचें निधान । सन्निधान स्वामींचें ॥ १० ॥ सद्गुरु सन्मुख उभे । कर जोडूनि सप्रेम वालभें । राहूनि आज्ञा प्रमाणीं निजलाभें । स्वरूप न्याहळावें ॥ ११ ॥ निजप्राप्तीचें अयतन । सद्गुरूचें सुहास्यवदन । लावण्याचें विभूषण । दृष्टी माजि ठेवावें ॥ १२ ॥ कूर्मावलोकन अमृतेक्षण । स्वानंदाचें सुखवर्धन । साक्षात्काराचें सदन । सर्वांग साजिरें ॥ १३ ॥ स्वरूपानुभव संभाषणें । निवालें हृदय सुखें तेणें । हृदय सुखाब्धीसी प्रीतीनें । कल्लोळ चालती ॥ १४ ॥ सद्गुरुस्वरूपें तत्त्व साचार । सद्गुरुदर्शनें ब्रह्म साक्षात्कार । सद्गुरुवचनें अगोचर । दशा आंगीं निवळे ॥ १५ ॥ जैसे अजातपक्ष पक्षी । पांखा खाले पक्षिणी संरक्षी । तियेच्या वियोगें मग तयासी । मरणांत दशा ॥ १६ ॥ तैसें सद्गुरुकृपेवीण । वर्धमान नव्हे ब्रह्मज्ञान । सद्गुरु सहवासें चि संपूर्ण । साक्षात्कारासी ये ॥ १७ ॥ चिंतने वांचूनि तत्त्वता । अवचट अचिंत्य ये हाता । कल्पनेवीण अकल्पिता । पाविजे सहज ॥ १८ ॥ कामे वीण दशा कामधेनु दुभे । चिंतनेवीण तत्त्व चिंतामणि लाभे । ऐसीं सद्गुरुची कृपा सुलभें । सद्‌व्रतीसी आणी ॥ १९ ॥ क्षुधितासी सर्व सिद्धीनें । उपचारी अन्नपूर्णा प्रीतीनें । महातृपितासी स्वभावतेनें । लाभे अमृतसिंधु ॥ २० ॥ अपरोक्ष तत्त्वार्थ अकळ । ते हृदयींच संभवती प्रांजळ । ब्रह्मदशेचे योग सकळ । निवळ होती ॥ २१ ॥ नाना दुर्घटें भवसंकटें । न बाधिती सद्गुरु निकटें । नासती जन्ममरण उत्कटें । सद्गुरुकटाक्षें ॥ २२ ॥ सुकृताच्या निजपरवडी । उभवी सत्कीर्तीची गुढी । स्वानंदासी सुरवाडी ।

सद्गुरुकटाक्षें ॥ २३ ॥ चिंतितां पदार्थ जात कांहीं । समृद्धीनें वोळे सर्वही । सद्गुरुकृपा लक्ष्मी पाही । पुरवी सर्वस्वें ॥ २४ ॥ दुर्लभ तें सुलभ होये । अखंड स्वरूपीं धारणा राहे । अवरोधेंवीण महाविस्मयें । अवतरे समाधी ॥ २५ ॥ सद्गुरुबोध सुरतरुछाया । नित्यसुखें निववी हृदया । नित्योपभोग काया । महा पुष्टीतें पावे ॥ २६ ॥ अवचट महत्सुखें होतीं । लाभावरी निजलाभप्राप्ति । सद्गुरुसहवासें सद्गति । यदर्थी संशय नसे ॥ २७ ॥ सद्गुरु सगुणरूप दृष्टी । बैसतां कृतार्थतेच्या पाठीं । मोक्षपाइकी करी परिपाटी । बोळगणा विवेक ॥ २८ ॥ निजनिर्धार सहजें । विज्ञान निवळे निज तेजें । सहज स्थितीच्या उमजें । उमजे अंतःकरण ॥ २९ ॥ गुणभूत अवस्था सरे । जिव्हार नित्यानंदें पसरे । सद्गुरु कृपाकर अवतरे । प्रत्यक्ष आंगीं ॥ ३० ॥ निज लावण्य कल्पितां मनीं । ये प्रत्यक्षतेसी विद्यमानी । सांगतां नृपतीची काहणी । सिंहासनीं बैसला ॥ ३१ ॥ समर्थ पंक्तीचा महिमा । दुर्लभ अनुभविजे गरिमा । पाविजे पद निरोपमा । सभाग्य योग्यतेनें ॥३२॥ निज जनकाची संपत्ति । प्रशंसितां पुत्रें सन्मती । त्या धनाढ्यपणाची ख्याति । प्रत्यक्षतेसी आली ॥३३॥ जगद्गुरु आत्माराम । जगाचा मायबाप सुगम । जगदानंदकर परम । जीवीं प्रत्यक्ष होये ॥३४॥ अद्वैत संपत्ति विभाग । देऊनि संरक्षी निजजग । स्वरूप जागरें अव्यंग । जागवी स्वरूपीं ॥ ३५॥ सर्व देहीं त्याचें वसणें । सर्व काळीं स्वरूप धरणें । सर्व कांहीं तो चि त्यावीण । दुजा कवण असे ॥ ३६ ॥ माझ्या अंतरीं आत्माराम । स्वसुखाभिराम विश्राम । निजात्म प्रचीति परंधाम । सुधर्में प्रगटे ॥ ३७ ॥ आत्माराम रूपें श्रीअनंत । नित्यात्मबोधें अनुग्रहीत । कृपा नित्यात्मसुख देत । पदवी आपुली ॥ ३८ ॥ श्रीराम अनंत मौनि प्रसादें । दोंदिल जालो मी स्वानंदें । तेणें सुखाचेनि नांदे । सद्गुरु सहवासीं ॥ ३९ ॥ अनंत स्वरूप संपत्ति । देऊनि स्वराज्य विश्रांति । सायोज्यतेचा चक्रवर्ती । मेरु सुखी केला ॥ ४० ॥ अनंत विश्रांतीचे बोल । अनंत परमार्थ सखोल । अनंतावगाहनें बोल । तेयींची ध्यावी ॥ ४१ ॥ अध्यात्म प्रचीति निरूपण । प्रचीति निजसुखें उणखुणें । मज सुखें

घोळवितां तें श्रवण । केलें पाहिजे अत्यादरें ॥ ४२ ॥ इति श्री भीमोपदेश । सद्गुरु सन्निधान विशेष । साक्षात्कारी परम पुरुष । म्हणे मेरु अनंत ॥ ४३ ॥ चतुर्थ सर्ग नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥

---

श्री

## सर्ग ४ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम नित्य आत्मबोध । स्वरूपाचा सत्य शोध । देहात्मबुद्धीचा निषेध । स्वभावतेनें ॥ १ ॥ नित्य सत्त्वाची उजळणी । सन्मतीची बुझावणी । स्वरूपयोग मरणी । नित्यात्मसुखाची ॥ २ ॥ चतुर्विध अवस्था साक्षी । सोहं ब्रह्मास्मि लक्षी । पक्षपात त्या अलक्षी । वेध होय सुखें ॥ ३ ॥ ऐसा प्रचीतिचा प्रयोग । करूं जाणसी तूं सांग । सुखिया दयेनें निजांग । वस्ती आतुटली ॥ ४ ॥ निजांगीं जगदांग प्रभा । भासली भूतात्मशोभा । गुणत्रयाच्या क्षोभा । तियेनें प्रकाशिलें ॥ ५ ॥ गुणसाम्य गुणउद्भव । होय कल्पना अभिनव । विश्वाकारें नांवें सर्व । दाविलीं अतर्कलेनें ॥ ६ ॥ गुणी गुणाचा प्रवेश । मिश्र होऊनि सावकाश । नाना व्यक्तींचे जिनस । देखिले डोळा ॥ ७ ॥ व्यक्तीनें देखिली व्यक्ति । सभास दिसोनि आटा युक्ति । परी अव्यक्त स्मरणशक्ति । देखणी कळा ते ॥ ८ ॥ एऱ्हवीं चर्मचक्षूसी काय । विलोकिती चित्प्रभा आहे । जाणते कळेवीण न होय । रूप सहसा ॥ ९ ॥ अकल्पित ज्ञानतरूसी । फळें चतुर्विधा आलीं कैसीं । तितुकियांचीं रूपें प्रकाशी । देखिलीं कवणें ॥ १० ॥ अंडज जारज स्वेतज । चौथें जाणिजे उद्विज । या खाणीचें रूप सहज । जालें चित्कळेनें ॥ ११ ॥ जाणीव निजांगीची प्रभा । अनुभव निजांग गाभा । आनंद विराला उभा । अनुभवेंसीं ॥ १२॥ स्वरूपासी नसे चि वेध । नसे चि गुणाचा अवरोध । निर्गुण दर्शनें बोध । अपेक्षा नसे ॥ १३ ॥ ऐसें अखंड दंडायमान ।

सहज आस्तिक्यें आपण । त्यासी कांहीं स्मरण विस्मरण । लागलें चि नसे ॥ १४ ॥ वेधेवीण प्रबोधिलें । वेधेवीण निज वेधिलें । शोधें वीण शोधिलें । प्रांजळ हृदयासी ॥ १५ ॥ गगनासी प्रक्षाळिलें । विमळासी परि शुद्ध केलें । साक्षात्कारासी ठेविलें । पुनीत करूनि ॥ १६ ॥ ऐसिया बोध दीक्षा रीती । अकल्पित दशास्थिती । तुझे कृपेनें दाशरथी । आतुडल्या मज ॥ १७ ॥ लिहिलें तें वाचावें । वाचिलें तें विवरावें । विवरिलें तें धरावें । सद्ध जीवीं ॥ १८ ॥ ऐसे कर्तव्याचे प्रसंग । तुझे अक्रिय करणें सांग । तेथें युक्तीचा कांहीं लाग । लागे चि ना ॥ १९ ॥ केलें तें अनुभविजे । घेतलें तें देइजे । जगन्मय सेजे सहजें । निजेला संकल्प ॥ २० ॥ म्हणोनिया संकल्पशून्य । अवकारोसी शब्दशून्य । औट मातुका चतुःशून्य । यापरतें केलें ॥ २१ ॥ प्रणवाचें निज वीज । निज उल्लेखांत समज । स्वरूप साक्षात्कारीं उमज । वीज भर्जिलें ॥ २२ ॥ स्थूळ देह तत्त्वें पंचवीस । रजो गुणाचा अध्यास । विस्तारला बहुवस । विश्वाकारें ॥ २३ ॥ घडामोडी सकळ कांहीं । होतसे स्थूळ देहीं । स्थूळ देहावांचूनि नाहीं । वासनेसी थार ॥ २४ ॥ धांव स्थूळ देहापर्यंत । आला मूळींचा विश्व हेत । स्थूळदेहीं विकारवंत । नाश पावला ॥ २५ ॥ या स्थूळ देहाचेनि जनीं । निवळलें ज्ञान अंतःकरणीं । तत्त्वें प्रांजळ होऊनि । साक्षत्व रूढलें ॥ २६ ॥ वासनेचा आशय पुरला । स्थूळ भोगसंकल्प विराला । पदार्थ ज्ञान निजदृष्टीला । प्रांजळ जालें ॥ २७ ॥ अंतरज्ञान असतां पोटीं । स्थूळेवीण दिसेना दृष्टी । अंतररसना परिपाटी । कल्पित रसेवीण ॥ २८ ॥ स्थूळ रसनेवांचूनि । पदार्थ रुचेना भोजनीं । पंचविषय रूढी करूनि । इच्छा न पुरे सूक्ष्म ॥ २९ ॥ नाना अक्षरें घडामोडी । वदनेवीण न होय रूढी । शंकानिवृत्ति कडोविकडी । प्रश्नोत्तरें नव्हे ती ॥ ३० ॥ सूक्ष्म भवतरूचें फळ । जाणिजें स्थूळ हें केवळ । ध्येय ध्यान निवळ । स्थूळाचेनि रूढलें ॥ ३१ ॥ चांग स्थूळ देहा आलासी । म्हणोनि मज फावलासी । आनंद विग्रह तेजोरासी । ज्ञान सूर्य भूषणा ॥ ३२ ॥ तुझ्या बोधें सरली माया । तुझ्या ईक्षणें

निवाली काया । तुझ्या कृपेनें श्रीरघुराया । पावन जालों मी ॥ ३३ ॥ प्रर्चालीच्या निजभावें । बोलतां हनुमंत सभावें । कौशिक ऋषीनें अभिनवें । केला आक्षेप सभेसी ॥ ३४ ॥ म्हणे स्थूळ देह प्रशंसा केली । जें अंतरज्ञान तोपलें स्थूळीं । तरी अंतर ज्ञानेंवीण समूळीं । स्थूळ अचेतन तें ॥ ३५ ॥ काष्टयंत्रा ऐसीं स्थूळें । संभवीत अंतर्ज्ञानयोळें । स्थूळाचे आंगींचे डोळे । अंतर्ज्ञानेंवीण काय ॥ ३६ ॥ या स्थूळ सूक्ष्माची सवडी । चळावळ चलणाची प्रौढी । प्रांजळ करूनि त्या रोकडी । माझी आक्षेप निवृत्ति ॥ ३७ ॥ ऐसें बोलतां विश्वामित्र । भरद्वाज प्रत्योत्तर दे विचित्र । कौशिकें भरद्वाज युक्ति पवित्र । स्थूळ सूक्ष्म योग ॥ ३८ ॥ तुम्ही सर्वज्ञ शिखामणी । अर्थ त्रिभुवनीचे धनी । तुमच्या युक्ति प्रयुक्ति वचनीं । प्रकाशलीं तत्त्वें ॥ ३९ ॥ अभ्यंतरींचें प्रमय । जितुकें कांहीं जाहलें आहे । तितुकें चि तुमचें हृदय । प्रसवलें असे ॥ ४० ॥ निज प्रत्ययाचे प्रकाशक । तुमच्या जिवीं अनंत विवेक । तुमची प्रज्ञा महा कौतुक । प्रसवती होये ॥ ४१ ॥ कृपाळूपणें तुम्ही उदार । कृपेनें करूनि माझा उद्धार । श्रवणावधानी अंगीकार । केला निजप्रज्ञेसी ॥ ४२ ॥ तुम्ही शरणागत वत्सळ । कृपेनें रक्षितां केवळ । अनाथनाथ कृपाशीळ । पतितपावन विरूदें ॥ ४३ ॥ म्हणोनी सलगी करितसे । क्षणक्षणा अवधान मागतसे । यदर्थी सत्ता करितसें । लडिवाळपणें ॥ ४४ ॥ श्रीरामसभेचे तुम्ही श्रोते । देवऋषि सिद्ध सर्वार्थे । मी किंचित तेथें वेडतें । आर्द होईन यगत्त्वें ॥ ४५ ॥ समर्थगृहीं अर्चनवेळा । मिळाला संपन्न द्विजमेळा । तयांसि प्रार्थूनि दुर्बळें लीळा । निजगृहा आणिले ॥ ४६ ॥ जें तुम्ही कृपेनें येऊन । करावें गृहावलोकन । समर्थ तुमचें आगमन । पावन होईन सर्वस्वें ॥ ४७ ॥ इति श्री भीमोपदेश । स्थूळसूक्ष्माचा उपक्रमांश । विज्ञानपर स्वप्रकाश । म्हणे मेरू अनंत ॥ ४८ ॥ चतुर्थ सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीरामसमर्थ ॥

श्री

# सूर्य ४ कळा ११

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम समर्थ उदारा । जगद्गुरु करुणाकरा । परम सद्गतिदातारा । तुज अभिवंदन ॥ १ ॥ अभिवंदन निर्वाण । साक्षात्कारें वांचविलें पूर्ण । तें प्रचीतीचें अनुसंधान । अंतरीं वसे ॥ २ ॥ योगियाच्या मानसदीपा । कैवल्य साकेत नृपा । अभिनव तुझी कृपा । मज बोलविते ॥ ३ ॥ जीवनासी आले अंवेव । डोळस जाले पल्लव । ऐसे कल्पतरु सजीव । वर्तविले सर्वस्वें ॥ ४ ॥ अभिनवाची वृष्टि केली । सृष्टि दया तुझी पांघुरली । सुखें चि वर्तों लागली । अंतरिक्षीं पाहा ॥ ५ ॥ दैविक योग उदेला । निराश्रयें आश्रयो जाला । कांहीं नसतां चि आला । अपेक्षित पदार्थ ॥ ६ ॥ ऐसी अघटित स्थिती । स्वर्द्दासी आणिली प्रवृत्ति । असो तेथें लाभालाभ किती । काय म्हणोनि बोलावें ॥ ७ ॥ स्वभाव स्थितीनें पाहतां । प्रकाशकारण सविता । उदयें सृष्टीसी वर्तविता । होय सत्तात्मक ॥ ८ ॥ तो चि महा प्रकाशमंत । सर्वकाळीं असतां उदित । तरी प्रवृत्तीचेनि लोक जागृत । व्यवसायें सीणते ॥ ९ ॥ म्हणोनी निशा योगनिद्रा केली । संसाराची वाट मोडिली । स्थिति स्वरूपाची दाविली । क्षण येक सकळां ॥ १० ॥ जितुका प्रवृत्तीचा विसर । तितुका स्वरूपाचा धर । याकारणें निरंतर । प्रवृत्तीसी विसरावें ॥ ११ ॥ प्रवृत्ति सरतां पाहीं । निवृत्ति यावी न लगे कांहीं । तम गडद जातां सर्व हि । प्रकाशता च असे ॥ १२ ॥ मायेचा आभास जातां । अखंडित ब्रह्म तत्वता । जीवाचें स्वरूप पाहतां । सनातन असे ॥ १३ ॥ जीवासी वृत्ति संस्कार । कैसा जाला न कळे विचार । जीव वस्तुता निर्विकार । देहयोगें विकारी ॥१४॥ हें प्रश्न न घडे मज । उमजऊनि या गुरुराज । भीम आक्षेपासी सहज । आलीं श्रीराम प्रत्योत्तरें ॥ १५ ॥ तुझ्या आक्षेपाचें अभ्यंतर । तुज निवळे साचार । त्यांचूनि आक्षेप सार । करीत पवण ॥ १६ ॥

तरी तुझ्या चि प्रचितीनें । बोलिजेल सभाव सिर्तानें । ऐक यथार्थ सावधानें । श्रुति अंजनेया ॥ १७ ॥ भरद्वाज ऋषीनें पाहीं । साक्षात्कार आणिला देहीं । पाहतां यथार्थ चि तें हि । प्रचितीसी आलें ॥ १८ ॥ कल्पित होय संसार । स्वप्न भोजनें वांचेना शरीर । कल्पनेंत कल्पना सार । विश्वरूपें फळली ॥ १९ ॥ सुरवर ऋषीश्वर शरीरें । पुरुषार्थी नृप विस्तारें । मनोहराकृति विचारें । सृष्टि भरली असे ॥ २० ॥ जरी कांहीं व्यक्ति नसती । तरी सभा आणि सभापती । पट्टाभिषेक महासंपती । उपदेशक्रम कैंचा ॥ २१ ॥ याकारणें महाऋषि हृद्गत । तितुकें हि यथार्थवत । ज्याचे स्वरूप दर्शनें समस्त । सिद्धि आज्ञा पाळिती ॥ २२ ॥ वनासी जातां प्रयागीं । ऋषींनीं कृपा केली मजलागीं । राजयोग दीक्षा प्रसंगीं । निज वोळखिलें मज ॥ २३ ॥ विपत्तियोगें विस्फाळित । अथवा गुणक्षोभें आविर्भूत । असतां अंतरीं स्थिति गुप्त । चतुर परिक्षिती ॥ २४ ॥ तैसा चि सद्गुरु विश्वामित्र । परम चतुर समर्थ । अंतर्ज्ञान योगविचित्र । दर्शनें आगळा ॥ २५ ॥ इदं ब्रह्म इदं क्षात्रं । उभयसत्तेने विचित्र । ब्रम्हांडकर्ता महापवित्र । सिद्धीचा सार्वभौम ॥ २६ ॥ सूक्ष्म तत्वज्ञानी समर्थ । जाणे करतळामळ परमार्थ । स्थूळादिक सूक्ष्मी कर्तव्यार्थ । हेहि यथार्थ बोलिला ॥ २७ ॥ अंतरीं चैतन्याची चळवळ । तरी देहीं कळा सकळ । सचेत जाणिवेविना स्थूळ । काष्ठऐसें तें ॥ २८ ॥ एक अंतर्कळे पोटीं । विस्तारल्या अपारसृष्टी । वास्तव स्थूळ सूक्ष्म दृष्टी । अन्वयें पहावी ॥ २९ ॥ दृष्टीसी पाहील तो द्रष्टा । दृष्टीनें पाहील तो खोटा । दृष्टीच्या चि येऊनि पोटा । पोटीं दृष्टि घोटावी ॥ ३० ॥ कौशिक भरद्वाज हृदय । समाधानें भवाचा विजय । संबोधूनि ऋषि प्रमय । तोषविलें श्रीरामें ॥ ३१ ॥ कौशिक म्हणे आत्मा होसी । विशेष वसिष्ट तुतें उपदेशी । विश्रांतीसी तुजपासी । काय उणे राघवा ॥ ३२ ॥ आत्मपरायण भरद्वाज । यापासीं साक्षात्कारी तेज । जेवि नक्षत्रामाजि सतेज । अमृतकर महा ॥ ३३ ॥ याची प्रचीति तूं चि होसी । तुझा प्रत्यय आम्हां सर्वांसी । नित्यानंद हृदयासी । चेतविसी बोधें ॥३४॥

ऐसें गाधेय मुखें बोले । नेत्रीं आनंदाश्रु चालिले । देखोनि भरद्वाजासी जालें । परम समाधान ॥ ३५ ॥ दोघे संपन्न सर्व प्रकारें । कुळदीप उजळिले चमत्कारें । विश्रांतीचे अक्षोभ झरे । बळावले बोधप्रवाहें ॥ ३६ ॥ गंगा यमुनेचे वोघ । तैसे ऋषींचें अंतरंग । श्रीराम कृपा अभिनव योग । मिळाले भागीरथींसी ॥ ३७ ॥ श्रीराम-कृपेच्या प्रयोगीं । पावन प्रसिद्धता जगीं । निजात्मबोध अनुरागी । ऐक्यतेसी आले ॥ ३८ ॥ राजीव नयन हृदयांत । स्वानंद जीवनें अप्रांत । प्रलयें उचंबळोन कृतार्थ । नयनद्वारा चालिला ॥ ३९ ॥ अष्टभाव भरें सप्रेम । विसांवलें अंतर्याम । रहस्य वचनें परम । बोलती परस्परें ॥ ४० ॥ कौशिक म्हणे भरद्वाजा । तूं स्वरूप सुखाचा राजा । अयोध्याधीश तुझा वोजा । आर्जविला वरिष्ठा ॥ ४१ ॥ कैपक्षी ज्याचा रघुराज । त्याचें सिद्धी गेलें सर्व काज । विश्रांतिसदनीं मोक्षध्वज । उभविला तेणें ॥ ४२ ॥ भरद्वाज म्हणे कौशिका । कवण तुकेल तुझिया तुका । स्वसुख प्रचीति कौतुका । निववीसी आपणें ॥ ४३ ॥ श्रोतयांसी माझी प्रार्थना । द्यावें अनुभव अवधाना । श्रीराम कपिसंवादश्रवणा । अधिकारी तुम्ही चि ॥ ४४ ॥ ईश्वरें नृत्य करावें । तेथें एक विष्णूनें चि पहावें । विष्णु नट नाट्य लाघवें । ईश्वरें चि पहावें ॥ ४५ ॥ तुम्ही सद्गुरु श्रीराम रूप । तुम्ही श्रोते मूर्तप्रताप । तुमचा महिमा तुम्ही च सद्रूप । अवधारिजे ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । सुखें घटावला अवकाश । त्या प्रचीतीनें निरावकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ चतुर्थ सूर्य येकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ श्रीरघुनाथायनमः ॥



श्री

## सूर्य ४ कळा १२

॥ श्रीदाशरथिरामाय नमः ॥

श्रीराम सद्गुरुनाथा । चरणीं ठेवीन मी सुखें माथा । पतितपावन कथा । सांगिजे मजकारणें ॥ १ ॥ पतित कियेनें असतां । केविं निस

पावनता । पतन क्रियेसी उर्ध्वता । घेती येते ॥ २ ॥ अकल्पित चि जाण । पर्वता एवढा पाषाण । कदाचित आकाशांतून । येतां भूमीसी आदळे ॥ ३ ॥ भूमीवीण कोठें पडेल । तैसी पावनगति केवळ । पतितासी उद्धरी कवळ । निजयोग देऊनि ॥ ४ ॥ काष्ठासी वन्हीनें आपुलें । तेज देऊनि प्रकाशिलें । तयासी काष्ठपण उरलें । पाहतां कोठें तन्हीं ॥ ५ ॥ पाषाण तरले सागरीं । श्रीराम कीर्तीची एवढी थोरी । पतितासी भवाब्धी-माझारीं । न तारितां कीर्ति नुरे ॥ ६ ॥ पतित एक पावन एक । कळावा हा उभय विवेक । आतां ऐक निश्चयात्मक । आक्षेप निवृत्तीनें ॥ ७ ॥ पूर्वीचा आक्षेप तैसा चि आहे । जे जीवासि वृत्ति संस्कार काय । पतित पावन या चि निश्चयें । तें हि अवधारीं ॥ ८ ॥ पतित होय देह संस्कार । पावन देहातीत निर्धार । पतितपावन विचार । प्रांजळ निवळे ॥ ९ ॥ हस्तें डोळे झांकूनि । पाहतां काय दिसेल जनीं । जनीं दीपकासी मालवूनि । तमीं काय पहावें ॥ १० ॥ तुझें स्वरूप समाधान । पाहतां जीवें अनुसंधान । जीवासी कैंचें पतन । नित्यत्वें असतां ॥ ११ ॥ नित्य आस्तिस्यता शाश्वत । जीव स्वरूपें अखंडित । व्यापक सन्निधान समस्त । प्रपंच वसला ॥ १२ ॥ जाणिवेसी म्हणती जीव । नेणतां ते निर्जातर्भाव । जाणीव अंतःकरण स्वभाव । जीवासी संस्कार नसे ॥ १३ ॥ स्वरूप चि तें निरावेव । जाणीवेचा योग स्वभाव । जाणीव जगलीं म्हणोनि जीव । व्यापकासी म्हणावें ॥ १४ ॥ सर्व अवस्थे निराळा । पाहतां जिवाचा जिव्हाळा । उदासठाव मोकळा । निराभास संपूर्ण ॥ १५ ॥ तेथें जीव ऐसा संकल्प । असे चि ना कांहीं विकल्प । म्हणोनियां निर्विकल्प । म्हणती तया ॥ १६ ॥ जीवासी वृत्तीचा संस्कार । जाला चि नाहीं निरंतर । देह संस्कारीं आगर । भावना रूढली ॥ १७ ॥ देह संस्कार कवणासी । म्हणसी तरी ऐक निश्चयेंसी । देहात्मबुद्धि अज्ञानासी । अनादि सिद्ध असे ॥ १८ ॥ अज्ञान जाहला कवण । ऐसें विचारितां सज्ञान । पाहे ना आपणा आपण । म्हणोनि अज्ञान तो ॥ १९ ॥ निर्विकार महा स्वभाव । तेथें पाहण्यासी कैंचा ठाव । ऐसें जाणसी

स्वानुभव । तो तूं कवण सांग पा ॥ २० ॥ तूं काय ब्रह्मस्वरूप । किंवा कांहीं एक संकल्प । ऐसें निवळोनि आपेंआप । उत्तर देई मजला ॥ २१ ॥ प्रतिज्ञा करूनि येथें । बोलों आलासी परमार्थे । पावोनि॰ समाधान पुरतें । धरीं आक्षेप करिसी ॥ २२ ॥ दर्पणें दाखविलें मुख । नवल दर्पणीं देख । दर्शीसी बोळखीचें सुख । विशेष जालें ॥ २३ ॥ अनादि सिद्ध स्वभाव । सावेव आणि निरावेव । निरावेवीं प्रतिष्ठिला जीव । हे हि घडेना ॥ २४ ॥ आत्मत्वें नित्य आस्तिक्यता । आत्मत्वें चि ज्ञानाची प्रकाशता । आतां या चि आत्मत्वीं तत्वता । उभय रूपें होतीं ॥ २५ ॥ करी व्यापकाच्या रूपासी । ज्ञान होय निश्चयेंसी । रूप करितां तेणेंसी । अभिन्न होय ॥ २६ ॥ रूप करावयासी आपुलें ज्ञान । तें कवणाचें कवण । तें आपुलें चि अंतःकरण । विचमार्गी पाहतां ॥ २७ ॥ आपण आणि अंतःकरण । उभयतारूपें स्मरण । अंतःकरण जाय निरसोन । आपण तयाचा साक्षी ॥ २८ ॥ आपणा माजि दोनी रूपें । मीपण आणि निःसंग स्वरूपें । आत्मस्फुरण सत्य संकल्पें । स्वभाविक होये ॥ २९ ॥ सत्यावरील संकल्प । म्हणोनि म्हणावा सत्यसंकल्प । सत्य ब्रह्म माया संकल्प । निवाडा ऐसा ॥ ३० ॥ सत्यसन्निधानीं असतां । संकल्पासी संस्कार सत्यता । संकल्पा अंतरीं तत्वता । रूढलें आत्मज्ञान ॥ ३१ ॥ आत्मज्ञानी आत्मा स्वयंभ । ज्ञान आत्मत्वासी ये अक्षोभ । हे जीभ नृप सम्यक । होऊनि अनुवादे ॥ ३२ ॥ नृसिंहाचा अवतार । आणूनि दाखवी खेळकार । वेश लटिका परी साचार । एकाचें उदर फोडी ॥ ३३ ॥ ज्ञानी आत्मत्व अवतरले । ज्ञानाचें उदर फोडिलें । घट जाता उरलें । तें साचार नभ ॥ ३४ ॥ ज्ञानातीत सुवर्म । आत्मत्वापर परब्रह्म । या कडोविकडीनें निर्गम । करीं वृत्तिसंस्काराचा ॥ ३५ ॥ देहबुद्धी एवढें पाप । कोठें चि नाहीं पाहतां संकल्प । पतित देहबुद्धि अल्प । उद्धरिली पावनें ॥ ३६ ॥ पंचभूतपवनहेतु । त्या पांचिभूति-

कासी निर्हेतु । केले भवार्णवासी सेतु । सद्गुरु वसिष्ठें ॥ ३७ ॥ बुडतें तारीतसे सहज ॥ आतां बुडवावया काय काज । अनंत ब्रह्मांड समाज । राहिलें अंतरिक्षी ॥ ३८ ॥ एवढें वसुंधरेचा भार । कराग्रीं ठेविला हें विवर । धराधरासी आधार । असे कासवाचा ॥ ३९ ॥ हें ज्ञानें वर्तविलें चोज । ज्ञानीं सत्ता असे सतेज । सत्तेचा प्रताप सहज । विश्व वर्ततसे ॥ ४० ॥ ज्ञानापासूनि जालें अज्ञान । अज्ञानांत निवळलें ज्ञान । उत्पत्ति स्थिति निदान । ज्ञानाचे चि आंगीं ॥ ४१ ॥ आपुलिया हृदयीं आठव । तैसा चि विसराळू स्वभाव । ज्ञानाज्ञान अभिनव । ज्ञानाची घडामोडी ॥ ४२ ॥ ज्ञानी पैस अपार । पावे तेणें निरावकाश थार । ज्ञानें प्रबळोनि अपरांपर । पार टाकी ॥ ४३ ॥ ऐसा ज्ञानाचा अभिप्राव । तुज निरोपिला सर्व । ज्ञानयोगें तूं ज्ञानी जीव । ऐसें ज्ञानें चि तुज गमे ॥ ४४ ॥ ज्ञानाज्ञान परिशुद्धि । जाली संकल्पाची अवधी । या बोलण्याची संधी । सहज चि सरली ॥ ४५ ॥ या प्रचीतीच्या विवरें । मारुतीसी निजनिर्धारें । प्रबोधिलें श्रीरघुवीरें । प्रांजळ आत्मज्ञान ॥ ४६ ॥ अभिनव त्या सूर्यकरें । शर्वरीसी केलें ईश्वरें । मग त्या प्रभातकाळीं आदरें । वर्ते जागृति रूप तें ॥ ४७ ॥ जाला मायानिशीचा वोहट । उदेला प्रत्यय रवि स्पष्ट । अज्ञान तम बाधा वाट । चुकेना निजपदाची ॥ ४८ ॥ सप्रचीत रामवचनीं । विरोनि गेला तो पावनी । चतुर्थ सूर्य किरणीं । अस्तवेना प्रभा ॥ ४९ ॥ चतुर्थ सूर्याची द्वादश कळा । स्वयंभ अनुभवाचा जिव्हाळा । नित्यात्मबोध उजाळा । द्वादश कळा जाणिजे ॥ ५० ॥ पुढें अध्यात्म निरूपण । स्वानुभवाचें सदन । संत अवधान संपन्न । नांदोत तेथें सुखें ॥ ५१ ॥ इति श्री भीमोपदेश । शोधिलें ज्ञानाज्ञान कोश । असंग प्रचीतीनें विशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५२ ॥ द्वादशकळा ॥ १२ ॥ चतुर्थ सूर्य संपूर्ण ॥ श्रीराम ॥ समर्थ ॥



श्री

# सूर्य ५ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम निजतत्वनिधाना । हृदयप्रकाशसंपन्ना । तुझिये दयेनें आत्मज्ञाना । पात्र जालों मी ॥ १ ॥ निजानंद विभवें पूर्ण । अनुभविलें सनातन । सचित्सुखें परिपाळण । केलें सर्वगत ॥ २ ॥ सुमति हिरण्यगर्भ ठेवा । दिधला स्वयंभजीवा । जिवा शिवयोग बरवा । जाला ब्रह्म प्रत्ययें ॥ ३ ॥ तुझे कृपेचें महिमान । स्वरूप साक्षात्कारीं ज्ञान । आनंदविभव संपूर्ण । पाहिलें डोळां ॥ ४ ॥ आत्मज्ञानाची भडस । पुरली वासना बहुवस । संतोषाचा उत्कर्ष । सामावला सुखें ॥ ५ ॥ आतां अद्वैत प्रचीतीनें । असतां स्वभाव स्थितीनें । उल्लेखासी प्रवृत्तीनें । कारणें चि नसे ॥ ६ ॥ ऐसें निःशेष सहजें । जालें तवकृपेच्या तेजें । मनोरथ प्राप्तीचीं काजें । सिद्धी गेलीं ॥ ७ ॥ जाली स्वसुखाची अवाप्ति । विश्रांतीसी आली विश्रांति । परी तुझे भक्तीची स्थिति । भडस पुरेना ॥ ८ ॥ गुरुभक्तीनें अकळ । ब्रह्मादिकांसी न कळे कळ । ऋषि सिद्ध मुनि सकळ । गुरुभक्तीसी नेणती ॥ ९ ॥ त्रिपत्तीच्या योगें प्रौढता । आत्मज्ञान प्रशंसिता । चढोनि योग्यतेच्या माथां । शास्त्रज्ञ जल्पती ॥ १० ॥ निज प्रशंसा च करितां । जन्म गेले अज्ञानता । सद्गुरुसेवा सुलीनता । मार्ग चि नेणती ॥ ११ ॥ अंतरीं निधान चुकलें । बाह्याकारें भरंगळलें । विश्व प्रवाहीं पडिलें । या चि रीतीनें ॥ १२ ॥ माझ्या आंगीं तें चि होतें वारें । परंतु दया करूनि दातारें । देऊनि निजात्मता निर्धारें । सुखी केलें गज ॥ १३ ॥ जेथें बाधीना विकल्पवारा । दिधला स्वसुख कृपेचा निवारा । आणिलें स्वरूप प्राप्तीच्या घरा । हातीं धरूनि मज ॥ १४ ॥ काय वर्णू तुझी दया । कृपेनें निवारिली माया । अभेद स्वरूपीं सखया । अक्षय वस्ती दिधली ॥ १५ ॥ जीवीं आटवलें अवचटें । समर्थी पुरातनें वाटे । थांट न मानावा वरिष्ठें । मी शरणागत ॥ १६ ॥ सद्गु

परम कृपाळा । दिल्हा तुंवा स्वरूप निव्हाळा । परि अकस्मात अंतर्कळ्य । चुकों नका भांबावतों ॥ १७ ॥ जाऊनि समाधान स्थिति । येते क्षणएक महाविस्मृति । गुणाचा क्षोभ होऊनि चित्तीं । विकृतीसी येते ॥ १८ ॥ अंतर्कळ्य चुकायासी कारण । कांहीं च न दिसे प्रमाण । उमजोन पाहतां समाधान । निरंतर असे ॥ १९ ॥ कळतां न कळतां सहज । विकल्पाचें वर्ततें चोज । सावध होता उमज । ठाईं पडतो ॥ २० ॥ अकल्पित महामोह स्थिति । भ्रमाची महाउद्धति । अकळ ममता विकृति । वसते हृदयीं ॥ २१ ॥ याचा कायसा विचार । असतां मायेचा संस्कार । प्रशस्त नसे वारंवार । पुसावेंसें च वाटे ॥ २२ ॥ याचें प्रश्नोत्तर मजला । सुखी करावे दयाळा । निर्दोष आत्मजिव्हाळा । द्यावा अनुग्रहें ॥ २३ ॥ तत्वमसि बोध प्रांजळ । जीव शिवपदें केवळ । ब्रह्मदशा निवळ । पुढती घ्यावी ॥ २४ ॥ कृषीवळें सेत कीजे । एकदां फळ भोगिजे । पुढती काय न पेरिजे । फळभोगार्थ तें ॥ २५ ॥ जगीं व्यवसायाची रीति । घावें घ्यावें पुढती पुढती । तेविं चि नित्यात्मस्थिति । प्रीति वेव्हारिजे ॥ २६ ॥ साधन-संपत्तीच्या द्वारें । पिकवावी सुमति निर्धारें । स्वरूपप्राप्ति साक्षात्कारें । होय आनंद सभाग्य ॥ २७ ॥ आत्मव्यवसायें प्रवीण । अविनाश संपत्तीनें संपन्न । तुजवीण आहे कवण । दुजा सृष्टीसी ॥ २८ ॥ चिद्रत्नाचा तूं व्यवहारा । अलंकार चिंतामणि पुरा । सच्चिन्सुखाच्या भांडारा । महा प्रतिष्टा तुझी ॥ २९ ॥ निजात्मभूषणें देसी । प्रचीतीनें विश्व अलंकारिसी । बोधवी मज निश्चयेंसीं । परात्परतत्त्व ॥ ३० ॥ दिल्हा कैवल्य हिरा हातीं । याची प्रचीति मी नेणे पुरती । परीक्षार्थ कवणाप्रति । दाखऊं आतां ॥ ३१ ॥ देवा विज्ञान रत्नाकरा । आत्मरत्न जो हरी दातारा । तुझी परीक्षा जगदांतरा । स्फूटीनें वर्ततसे ॥ ३२ ॥ पुसों जावें ज्याप्रति । तेथें हीं तुझी च प्रचीति । तुज वांचूनि त्रिजगतीं । दुजा नाढळे कोण्ही ॥ ३३ ॥ माझा हि आत्मा तूं चि होसी । ह्मणोनि पुसों आलों प्रचीतीसी । मीपण घेऊनिया तेजोरासी । आत्मप्राप्ती हिरा दिधला ॥ ३४ ॥ तो मी पाहोनि पुढती पुढती । सुखावतसें निज चित्तीं । तरी

याची परीक्षा विवरमती । प्रकाश मज द्यावा ॥ ३५ ॥ ऐसें प्रार्थितां आत्मयासी । कृपेचें भरण आलें सुखाब्धीसी । श्रीरामकृपावचनें भीमासी । प्रचीत आली ते अवधारा ॥ ३६ ॥ इति श्री भीमोपदेश । स्वरूप साक्षात्कारीं संतोष । प्रचीतीचा संवाद विशेष । ह्मणे मेरु अनंत ॥३७॥ पंचम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ५ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामकृपेचा उदधि । बोधें उचंबळला निरवधि । स्वानंद लहरीनें त्रिशुद्धि । भीमाचळ आक्रमिला ॥ १ ॥ कृपेनें प्रमाण टाकिलें । अप्रांताचें भरण भरलें । भीम वज्राचळासी घेतलें । हृदयीं अवातीनें ॥ २ ॥ नित्य बोधामृतनिधि । माजि स्वसुख समाधि । सखोल्लता निरवधि । स्नपन जाहलें तया ॥ ३ ॥ साच शिवलिंग सुखाचें । अभिषेचिलें रामें साचें । सुख नित्यानुभवामृताचें । जालें अभिषेचन ॥ ४ ॥ श्रीरामें कृपेच्या निश्चयेसी । अवलोकितां अंजनेयासी । अमृतघन दया ऐसी । पातली वेळा ॥ ५ ॥ अमृताच्या अघणी । शर्करा पाक करणी । तैसी अभिनवदशा भरणी । भरली सच्चित्सुखें ॥ ६ ॥ ईक्षणें अवलोकितां ऐसें । घेतलें जिव्हार सामरस्यें । मननासी ठाव चि नसे । आणिलें निदानासी ॥ ७ ॥ या प्रचीतीनें अभ्यंतर । सत्व घेऊनियां साचार । ठेऊनि मस्तकीं कृपाकर । अनुग्रहीत पुन्हा ॥ ८ ॥ घडणारें अलंकार केला । तो पुटीं घालूनि पाहिला । त्यासी अधिक तेज पावयाला । पुढती घातला पुटीं ॥ ९ ॥ स्वयंभाचे तेजप्रकाशे । चोप देऊनि स्वप्रकाशें । मदा तेजाच्या उल्हासें । देतसे पुन्हा चोप ॥ १० ॥ दिव्य रंगाच्या अनुमळें । चित्रकारें चित्र लिहिलें । तें पुढती सुरेख केलें । सुवर्णाच्या रसें ॥ ११ ॥ कां मनोहर कारागिरें । पाषाणमूर्ति

विश्वाकारें । करूनि सुंदर चमत्कारें । सुरेखिल्या त्या ॥ १२ ॥ अभिनव विश्व अलंकरणें । अंतर्कळा जगत्कारण । नित्यात्म बोधभरण । अनुभवासी अलंकारी ॥ १३ ॥ हिरण्यगर्भ मूळसंभव । प्रचीतीनें तें अभिनव । शृंघारूनि स्वानुभव । विश्व संभविता केला ॥ १४ ॥ ऐसें नित्यात्मबोध सुत । नित्य प्रसव अनस्यूत । त्या अनंतापासूनि अनंत । रूढीसी आलें विभवें ॥ १५ ॥ तो सद्गुरु दीक्षेनें साचार । लीला करी विश्वोद्धार । स्वरूपदर्शनें साक्षात्कार । अनुग्रही भीमासी ॥ १६ ॥ म्हणे अरे तूं कवण । पूर्व घृत न होई पाषाण । साक्षीनें प्रांजळ ज्ञान । अवधारीं आतां ॥ १७ ॥ नसती माया तुज बाधी । जालें समाधान अवरोधीं । होऊनियां स्वात्मसिद्धि । पुन्हां अंतर ते ॥ १८ ॥ अभेद होऊनि साक्षात्कार । पुन्हा बाधी भवसंस्कार । विश्रांतीचें अभ्यंतर । त्याहोनि विक्षेपासी येसी ॥ १९ ॥ प्रत्यक्ष निधानापासीं । उभा ठाकोनि निश्चयेसी । प्रत्यक्ष निधान न पाहसी । अभावें भ्रमसी कैसा ॥ २० ॥ द्रव्याच्या राशीवरी बैसोनी । म्हणसी द्रव्य दिसेना नयनीं । जीवन-प्रवाहीं रिघोनी । म्हणसी जीवन कोठें ॥ २१ ॥ स्वानंदभद्रीं आरूढोनी । सांगसी दरिद्रकाहणी । प्रत्यक्ष भ्रमत्यासी असोनी । निजतत्व तुजपासीं ॥ २२ ॥ नव्हे अनुमानाचें सांगणें । प्रत्यक्षासी केविं प्रमाणें । उमजल्यासी जे प्रचीतीनें । ते प्रचीत काय जाली ॥ २३ ॥ निद्रेच्या भरें चावळसी । तूं जागा चि बरळतोसी । जगाचिये भ्रांतीसी । पात्र होसी कां पा ॥ २४ ॥ ऐसें बोलतां दृढोत्तर । म्हणिजे तयासी न्याय निष्ठुर । परम गूढ साचार । शिकवणूक ऐसी ॥ २५ ॥ पुत्रासी पितियानें बुद्धि । शिक्षावें चि लागे त्रिशुद्धि । जन्हीं प्रज्ञावत सद्बुद्धि । असलियां तो ॥ २६ ॥ जैसें अंतरीं वर्तलें । तैसें मारुतीनें विचारिलें । अरुपपण दिसोनी आलें । यदर्थीं त्याचें ॥ २७ ॥ विश्वासियाचें अंतःकरण । सात्विकभावें अरुपपूर्ण । मावळे तितुकें सज्ञान । वचनें प्रगट करी ॥२८॥ उत्पन्न जाले जे उल्लेख । तयाचे कवण करी लेख । तितुके सामाऊनि स्वसुख । प्रतिष्ठी बळिष्ठें ॥ २९ ॥ हें प्रज्ञावंताचें धारिष्ट । अवगमलें जें

अवचट । नमनितां ते इष्ट अनिष्ट । उत्कट सुख व्यावें ॥ ३० ॥ असतां स्वराज्य संपत्ति । अपार द्रव्याचे व्यय येती । ते उपद्रव मानूनि चित्तीं । कां कष्टी व्हावें ॥ ३१ ॥ विनियोगें स्वभाव स्थिति । परिचारेसीं भोगावी संपत्ति । युक्त मार्गू आडियाप्रति । यावें अपार द्रव्य ॥ ३२ ॥ सात्र सद्गुरु श्रीराम । भीमासी प्रतिष्ठिलें सार्वभौमें । कांहीं विचारासी अनुक्रमें । उरविला नाहीं ॥ ३३ ॥ आला सुवर्ण मागावया । परीसा चि दिधला तया । चिंतिला पदार्थ मागतिया । दिधला चिंतामणि ॥ ३४ ॥ कल्पित जात अपेक्षितासी । केले कल्पतरु निवासी । मागों आला गोक्षीरासी । तयासी कामधेनु दिधली ॥ ३५ ॥ ऐसिये कृपेनें रघुपति । उदार नृपचक्रवर्ति । दाता स्वरूपसंपति । जगतीसी विख्यातीनें ॥ ३६ ॥ माता कृपेनें चि निष्ठूर । बाळकासी करी उपचार । आत्मवत्सलेचें जिव्हार । तेथें सांगणें न लगे ॥ ३७ ॥ बाल्दीक्षेनें हनुमंत । कृपेचे उपचार घेत । जाणीव टाकूनि अश्रांत । सुखींच राहिला असे ॥ ३८ ॥ सांप्रति प्रबोधील श्रीराम । ते विश्रांति सुख परम । अवधारिजे निरोपम । प्रमथासी एथ ॥ ३९ ॥ तुम्ही अध्यात्म परीक्षवंत । आत्मप्रतिष्ठावंत संत । आत्मप्रचीतीनें अनंत । योग्यता तुमची ॥ ४० ॥ अनंत तुमचें कृपाळूपण । अनंत तुमचें समाधान । देऊनि अनंत अवधान । अवधारिजे श्रोतीं ॥४१॥ इति श्री भीमोपदेश । सद्गुरुची कृपा विशेष । उगवला प्रचीतीचा दिवस । म्हणे मेरु अनंत ॥ ४२ ॥ पंचम सूर्य द्वितीय कळा संपूर्ण ॥ २ ॥



श्री

## सूर्य ५ कळा ३

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम प्रचीतीचा उदय । साक्षात्काराचा दिवस होय । प्रकाशकरें भीम हृदय । पूर्ण प्रकाशिलें ॥ १ ॥ ऐक रे ऐक सात्विका । घेसी विश्रांतीची बैसका । आक्षेप करिसी निका । आत्मप्राप्ती लाभें ॥ २ ॥

पात्रीं भरलें आहे पूर्ण । वरी वरी घेसी मागोन । तृप्तीनें न धासी सज्ञान । शिरोभूषणा ॥ ३ ॥ निरावर्ण उदर गंभीर । स्वानंदें साठविलें अंबर । पुढती अपेक्षिसी अपार । स्वबोध परवडी ॥ ४ ॥ सद्भावानें संकोचोन । होऊं जाणसी अणूप्रमाण । सानेपणेंचि महा सांठवण । होसी चिदंबराची ॥ ५ ॥ ब्रह्मबोधाचीं महा थार । भीमराया तुझें चि उदर । निज जीवलगा जिव्हार । तूं माझें चि होसी ॥ ६ ॥ माझें हृदईंचें गुज । संतोषें सांगेन मी तुज । तुज वांचुनियां मज । कोण आहे सखया ॥ ७ ॥ माझा निजाचा सोयरा । इष्ट मैत्र सखा विवरा । निजात्मबोधईश्वरा । भक्तीनें सेविसी ॥ ८ ॥ तूं मज कीं तुज । तुजमजवीण नसेचि गुज । अनुक्रमें चि समज । तत्वमसि आतां ॥ ९ ॥ तत्वमसिचें विवरण । तत्त्वं असि ऐसें जाण । सोहं स्वभावें निर्गुण । प्राप्ति जेणें होये ॥ १० ॥ आतां त्रिपदाची विचारणा । ऐक देउनी अवधाना । सावध निजांगश्रवणा । जागवी अर्थजागरें ॥ ११ ॥ चकोरांचें नयनीं निढार । प्राशीतसे चंद्रकर । तैसें स्वबोधअभ्यंतर । श्रवणें घेईं ॥ १२ ॥ मायाब्रह्मत्रिपद साक्षी । अंतर्विवेक हा परीक्षी । जीव शिव अलक्षीं । विवर येणें ॥ १३ ॥ सत्पद चित्पद आनंद । या चि क्रमें त्रिपद संवाद । अवधारीं तूं स्वानंदकंद । हृदय तोषका ॥ १४ ॥ ज्ञानें अंतर्भावनारूढ । बोध प्रौढता आरूढ । द्यावीं अवधान वाड । विश्रांतिनिधी ॥ १५ ॥ श्रीराम कृपेनें द्रवोनी । त्रिपद महावाक्य उकलुनी । सांगता जाला वचनीं । भीम ऐकतसे ॥ १६ ॥ बोधीं सुरवाडला बोध । विश्रांतीसी आला वेध । प्रचीती स्वतः सिद्ध । पवाडा जाला ॥ १७ ॥ शांतीची दुणावली स्थिती । आनंदासी अभिवृद्धि होती । श्रीराम संभाषणें निवती । नित्य स्वात्मसुखें ॥ १८ ॥ प्रलयानें उघडिले नयन । समाधी जाली सावधान । उन्मनीनें साच श्रवण । वोढविला सुखें ॥ १९ ॥ साक्षात्कारासी जाला तोष । केला सायोज्य सुखीं प्रवेश । बोध सूर्यवंशपरेश । हृदय मोकळें करी ॥ २० ॥ स्वरूप अक्षयी निधानें । काढिलीं कृपेचीं वचनें । आत्मबोधामृतघनें । वर्षों लागला ॥ २१ ॥ भीम सावचित्त श्रवणीं ।

माया ठेउनी श्रीरामचरणीं । श्रीरामें सप्रेम करूनि । हृदईं धरिला ॥२२॥ कृपाकरें कुरवाळुनी । सांगे वेदबीज श्रवणीं । म्हणे या चि अर्थें तूं उमजोनी । समाधानी राहे ॥ २३ ॥ ब्रह्म साक्षी आणि माया । त्रिपद व्याख्या आणि हृदया । सत्पद ब्रह्म चित्पदासीं या । साक्षत्वेंचि जाणें ॥ २४ ॥ आनंदपद केवळ माया । आनंदावांचूनि नये दया । आनंदाविना सखया । लोभकैचा ॥ २५ ॥ आनंदींच काम संस्कार । आनंदींच रचलें जगडंबर । आनंदींच हा संसार । वृद्धीतें पावला ॥ २६ ॥ आनंदींच संभवे शरीर । आनंदींच देहाचा विसर । आनंदींच प्रमाद घोर । असती गुणाच्या योगें ॥ २७ ॥ गुणरहित आनंद केवळ । तो स्वसुख दाता निवळ । गुणरहित तत्त्व अकळ । त्या आनंदे अनुभविलें ॥ २८ ॥ गुणाचा संस्कार जेथें नाहीं । ते माया आनंदविग्रही । सोहं भावें हृदयीं । नांदतसे आतां ॥ २९ ॥ निखिळ आनंदमय माया । गुणसाम्य म्हणावें तिया । तेथुनी गुण क्षोभूनियां । आनंद विक्षेपिती ॥ ३० ॥ स्वभावें माधुर्यजळ । औषधीयोगें होय प्रचळ । षड्रसयोगें केवळ । दाविती दीक्षा ॥ ३१ ॥ तैसे आनंदीं त्रिगुण । त्रिविधा अहंकरण । त्रिविधा जगउत्पन्न । विस्तारासी येती ॥ ३२ ॥ मिश्रगुणें आनंद सबळ । ज्यातीय गुणें जिनस प्रांजळ । सत्वगुणें तो निवळ । स्वरूपीं निवळे ॥ ३३ ॥ रजोगुणें तो चि प्रबळ । होय व्यक्तीरूपें सकळ । विषयासक्तीनें केवळ । उपजे मरे ॥ ३४ ॥ तमोगुणें प्रमादी होये । षड्रिपुरूप अतिशयें । महा आघात मृत्युमय । प्रबळे जगीं ॥ ३५ ॥ एवं आनंदाची दशा । सुखात्मक जाण परेशा । सुखातिशयें संतोषा । खेदासी पात्र करी ॥ ३६ ॥ सुखीं दुःख लागलेंचि आहे । येथें सांगणें न लगे पाहें । सुखात्मक वृत्ति निश्चयें । जाण हे मूळमाया ॥ ३७ ॥ आनंदपदाचा विवर । कर्ता साक्षी होय ईश्वर । तो चित्पदाचा निर्धार । अवधारीं भीमा ॥ ३८ ॥ चिप्पद ऐसें प्रांजळज्ञान । ज्ञान साक्षीचें रूप जाण । साक्षी सदानंदघन । द्रष्टा उभय दृष्टीनें ॥ ३९ ॥ सत्पद आनंदपद परार्था । चिप्पद होय रूपकर्ता । या वांचुनी परार्था । रूप चि नव्हे पा ॥ ४० ॥ हृदय घेउनी आपुलें । साक्षीनें सद्रूप

शोधीलें । तेथें अखंडतेचें टाळलें । अनुसंधान ॥ ४१ ॥ अखंडतेचें अनुसंधानीं । गगन गेलें हारपोनी । ब्रह्म स्फुरण आटोनी । जालें अनुर्वाच्य ॥ ४२ ॥ एवं सत्पद विवरें । सदेसी भावना पुरे । चित्पद ही न स्फुरे । आनंदपदेसीं ॥ ४३ ॥ ऐसा केवळ अनुभव । त्रिपुर्टातीत अभिनव । हा आनंदाचा चि घटाव । जाण वा रे ॥ ४४ ॥ सूक्ष्म मायेची गति । जाणिजे अनुभवाची स्थिती । अशेष जालियां वृत्ती । अनुभवासी ठाव नसे ॥४५॥ श्रीराम मुखींचें निरूपण । महावाक्याचें व्याख्यान । श्रोतीं देऊनियां अवधान । प्रांजळ अवधारीजे ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । त्रिपदबोध उत्कर्ष । विचारें स्वरूप समावेश । म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ पंचम सूर्य वृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥



श्री

## सूर्य ५ कळा ४

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम सदोदय सुखें । उदेला अनंतमुखें । अनंत साक्षत्व उल्लेखें । नित्य प्रकाशला ॥ १ ॥ सद् चिद आनंद पदें । तिन्हीं एक चि विद्वदें । अंतर्भाव विविधकंदें । मुळें त्रिगुणाचीं ॥ २ ॥ त्रिगुणापर आत्मस्थिति । सचित्सुखीं प्रचीति । आनंदें चि दोहीं चि विख्याती । रूढली रूपें ॥ ३ ॥ आनंददशा निरावर्ण। परा अभ्यंतर सुख स्फुरण । सद्वृत्ती ब्रह्माभिमान । प्रणवगर्भीचें ॥ ४ ॥ उल्लेख अर्धमात्रा गहन । इतिमात्र अनुसंधान । परारूप निरंजन । आदिदशा ॥ ५ ॥ ऐसी हे आनंदपदवी । भवसंरक्षण संभवी । आदिशक्ति हे महादेवी । मूळमाया केवळ ॥ ६ ॥ इये चि अस्तिक्यता घन । निजांग ब्रह्मदशा गहन । ब्रह्मानुभवनंदन । वर्धला पोटीं ॥ ७ ॥ ब्रह्मज्ञान नपुंसक । नव्हे चि प्रवृत्ति निवृत्तीसी कारक । ब्रह्मात्मबोध विवेक । प्रवीण प्रसवली ॥ ८ ॥ ब्रह्मदशा शांति विश्रांती ।

कन्या प्रसवली ते सती । त्रिगुण विस्तारें जगतीं । जालि जियेपासुनी ॥ ९ ॥ स्वानंद अकृती अंगना । ब्रह्मत्व दशेनें नवीना । विश्वाभास प्रसवे यौवना । विरहित जाली ॥ १० ॥ त्यास्तव चिदपदमुळीं । तियेचें चि हृदयअकाळीं । काळरूप ज्ञान समूळीं । साक्षत्वासी आलें ॥ ११ ॥ यौवन दशेवरील वृद्धपण । अतृप्तीनें क्षोभले त्रिगुण । नित्यात्मता स्वानंद-घन । तारुण्य वोसरलें ॥ १२ ॥ नित्य तृप्तीचे पुरवील भोग । भाउनी विक्षेपित जग । सर्वज्ञपणाची सीग । वागवी देहीं ॥ १३ ॥ सत्पदाचें बाळपण । केवळ स्वसुखाचें सदन । ते निर्विकार दशा भाऊन । झरे चित्पदवृद्ध तें ॥ १४ ॥ निर्विषय स्थितीनें सहज । भोगील आत्मरतीचें गुज । ब्रह्ममुख तारुण्य सतेज । संपदा आठवी ॥ १५ ॥ या चित्पदीं त्रिगुण विस्तार । पृथकाकारें संसार । ब्रह्मा विष्णु शिवकुमर । चिदानंदीं संभवले ॥ १६ ॥ आनंदाची जीवनकळा । तेणें सजीव चित्पदबाळा । जेवि निद्रेनें सकळां । अवस्था सजीव ॥ १७ ॥ आनंदपद निद्रारूप । चित्पद जागृति स्वरूप । उभय एकीभूत संकल्प । त्यातें प्रसवल्या ॥ १८ ॥ अभिनव मुळींचा प्रसव । उभया पोटीं संभवे जीव । तो चित्पद दशेचा राव । जिवात्मा विख्यातीनें ॥ १९ ॥ साक्षी ह्मणावें तयासी । त्रिपदें आली तयापासीं । व्यापक ज्ञान सुखेसीं । संभव तयाचा ॥ २० ॥ अनेक वृत्तींचीं भाजनें । साक्षत्व ज्ञान रविप्रभेनें । व्यापकपणें अनेकपणें । अनेक जीव बिंबलें ॥ २१ ॥ निर्बिंब स्थिति चित्पद । चित्पद प्रकाशी स्वानंद । आनंद जीवनीं जीवकंद । चिदाभास जाले ॥ २२ ॥ हें ब्रह्मास्मि अहंकरण । जाणिजे केवळ मीपण । चित्पदप्रभेपासून । संभवले ॥ २३ ॥ सूर्याची प्रभा जीवनीं । जीवनता भासे तेज मेदिनी । एवं त्या साक्षीपासुनी । जाले अज्ञान जीव ॥ २४ ॥ प्रवृत्तीचें साक्षत्व ज्ञान । प्रवर्तलें चित्पदापासून । आतां स्वरूपज्ञानें विज्ञान । चित्पद अवधारी ॥२५॥ चित्पद विवर जालियां । अणुही नुरे चि माया । रज्जूवरील सर्पाची काया । न बाधी कळतां ॥२६॥ स्वरूपवस्ती सनातन । चित्पद मिरासी विस्तीर्ण । स्वानंद उपलब्धीनें आपण । नांदतसे सुखें ॥२७॥

चित्पदासी स्वरूपयोगें । अक्षय संस्कार लागे । कां जे निरंतर जागे । तेणेंसीच तें ॥ २८ ॥ काष्ट अग्नि संस्कारें । अग्नीच होय निर्धारें । दीप वायूच्या झडत्कारें । गगनीं मिळे ॥ २९ ॥ तैसी निर्विकार स्वभावता । चित्पदासी आली व्यापकता । सर्वांतीत सर्व गतता । चित्पदीं सद्धळे ॥ ३० ॥ जीवनासी ये फळ माधुर्यता । तेवीं चित्पदीं ते सद्ता । अनुभवासी येऊनि तत्वता । मुक्तींचा आनंद ये ॥ ३१ ॥ हा स्वरूप संभव साचार । सत्पदप्रद निर्विकार । सदपद आत्मसाक्षात्कार । चित्पदीं रूढला ॥ ३२ ॥ चित्पद महा विस्तीर्ण । सांटविलें निरावर्ण । तेणें आपें आप उतटोन । पुरे विनुळले ॥ ३३ ॥ चित्पद स्फूर्ति जेव्हां सरे । तेव्हां आनंद चि अवतरे । आनंदा वांचूनि न सरे । साक्षत्व ज्ञान ॥३४॥ सुषुप्तीनें जागृती सरे । तैसें आनंदीं ज्ञान मुरे । निर्विकल्प दशा अवतरे । प्रत्यक्ष देहीं ॥ ३५ ॥ निर्विकल्पावरील सहजस्थिति । जाणिजे ज्ञानाची जागृती । हे सद्पता आइती । ज्ञानी सायोज्यता ॥३६॥ चित्पदीं त्रिपदापर । केवळ सत्पद विवर । महानुभव सार । निवळला चित्पदीं ॥ ३७ ॥ निजात्मरत्न सदोदित । तें चित्पद जाण तूं शाश्वत । आत्मज्ञान रत्न श्रीमंत संत । परीक्षा करिती ॥ ३८ ॥ त्रिपद ज्ञान जया प्रांजळ । स्वरूपदर्शनें तें निर्मळ । भव कल्मष विटाळ । जाला चि नाहीं तया ॥ ३९ ॥ निर्दोष आत्मस्थितीचे संत । वरी नित्याचरणें येशवंत । भवनिवृत्त प्रतापवंत । दयावंत निजबोधें ॥ ४० ॥ त्रिगुण विवरें गुणवंत । तत्वज्ञानें महाबुद्धिवंत । स्वरूपदानें महा कीर्तिवंत । परीक्षवंत महा ॥ ४१ ॥ तुज प्रबोधिलें जें ज्ञान । तें बरें प्रत्यया आणून । करीं संतासी निवेदन । परिक्षितील ते ॥ ४२ ॥ अगस्त्यादि महा ऋषी । संत चि दाटले श्रीरामसभेसी । परिक्षूनि आत्म प्रचितीसी । घेईं बरें ॥ ४३ ॥ तें निवळल्यासी निज जीवीं । विश्रमल्यासी अनुभवीं । ते आत्मप्राप्तीची पदवी । निवेदी संता ॥ ४४ ॥ ऐसें श्रीराम अनुवादतां । संतोष जाला हनुमंता । ह्मणे सर्वत्र समानता । तुजवीण कैंची ॥ ४५ ॥ तूं चि विश्वरूपें देवा । बोधिसी मज कृपार्णवा । सत्पदाची व्याख्या जीवा । माजि निवळ व्हावी

॥ ४६ ॥ ऐसें प्रार्थिता कपींद्र । कृपेनें उचंबळला सुखसमुद्र । चिदा-काशीचा चैतन्य चंद्र । सांगेल तें अवधारा ॥४७॥ इति श्री भीमोपदेश । चित्पदव्याख्याविकाशें । स्वानंदभरण सावकाश । ह्मणे मेरु अनंत ॥४८॥ पंचम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥ राम ॥ राम ॥

---

श्री

## सूर्य ५ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सत्पद अनंत । स्वरूप अस्तिक्यें शाश्वत । चित्पदरूपी हनुमंत । अनुभवीतसे ॥ १ ॥ चित्पदबोध हृदयीं । कवळुनी राम सत्पद पाही । देहभाव विसरोन देही । केवळ अनुभवीतसे ॥ २ ॥ जैसा कृपणाचा ठेवा । चिंतीत जीवाच्या चाणवा । भूमिहृदय करूनि जीवा । सह सांटवीतसे ॥ ३ ॥ तें नित्य निक्षेप स्थान । आठवीतसे जीवापासून । तेंवि अंजनीगर्भ निधान । चिंतित श्रीरामपदासीं ॥ ४ ॥ श्रीराम सत्पद सनातन । त्रिपदापर व्यापकपण । निराकार निःसंग निर्गुण । निरंजन सहजें ॥ ५ ॥ निःप्रपंच निराश्रय । निर्ममता निरामय । मायातीत अप्रमेय । अतींद्रीय सहजें ॥ ६ ॥ अलक्ष अरूप अपार । अमन असंग अगोचर । अमित अभंग आकार । असेचिना तयासी ॥ ७ ॥ चित्पदाची स्फूर्ति करितां । रूप जालें हें तत्वता । निर्भव अनुभव समता । घोंविला ज्ञानें ॥ ८ ॥ अविनाश स्थिति सद्पता । स्वरूप विश्रांती वास्तव्यता । ते सत्पदाची स्वभावता । मजला दिल्ही ॥ ९ ॥ स्वरूपदानें कीर्तिवंत । संत शिरोभूषण कृपावंत । तुजवांचूनि मज इत्थंभूत । दुसरें न दिसे ॥ १० ॥ देहीं इंद्रियांच्या कळा । वर्तती अभिनव लीळा । ते सदन्न वेळोवेळा । मुखें चि सेविजे ॥ ११ ॥ तृप्ति व्हावयाचें मूळ । वदनेवीण नसे चि केवळ । तेंवि अखिल सृष्टीचा प्रांजळ । प्राण होसी सर्वज्ञा ॥ १२ ॥ रूप ईक्षणीं मनोहर । चक्षुवीण नसे इतर । विश्व शरीरासी साचार । नयन निजांगें ॥ १३ ॥ शब्द

सुदीर्घी विख्याती । श्रवणेंविण नव्हे स्थिति । जगाचा श्रवण तूं प्रचीति । तुझेनि मजला ॥ १४ ॥ सर्व शरीरें संभविता । या पितामहाचा तूं पिता । तुजवीण वरिष्ट पाहतां । दुजा कोण जगीं ॥ १५ ॥ अद्वैत संपत्तीचा ईश्वर । आत्मसाक्षात्कारीं शरीर । तो मी होउनिया वनचर । तुजला सेवितसे ॥ १६ ॥ संत तुझ्या चि सुखाच्या मूर्ति । साधु तुझी च स्वरुपें होती । ब्रह्मादि जितुकिया व्यक्ति । तितुकीं तुझींच रूपें ॥ १७ ॥ भक्तीच्या रहस्यें पाहतां । विश्व तुज व्यापकता । तेणें अनुभवें नित्यात्मता । विश्वरूप दर्शन ॥ १८ ॥ हा अभेदभक्तीचा अंतर्भाव । भूतमात्रीं येक चि देव । भिन्न शरीराचे लाघव । त्यावरीच स्फुटलें ॥ १९ ॥ भूमीवरी अनेक सस्यें होतीं । तितुकीं भिन्न नव्हे सुमती । तेवि आत्मयावरी भिंती । विस्तार व्यक्तीचा ॥ २० ॥ हे अंतरात्मदृष्टी देखे । भक्तीचें रहस्य पाविजे सुखें । परी ज्ञान उपदेश ज्या मुखें । तें पद चि वरिष्ट ॥ २१ ॥ तुवां उपदेशिलें जें मज । तें गुज बोलावें वाटे सहज । परी तुज वांचुनी उमज । मज नये चि पा कोठें ॥ २२ ॥ संभवली जननी वाळ्य । तियेचा कृपेचा जिव्हाळा । इतर वनितांला कळवळा । तितुका नये चि कीं ॥ २३ ॥ तैसें तुज पासुनी केवळ । स्वरूपें संभवलों मी अकळ । तूं चि संरक्षी कृपाळ । निजात्मजननीये ॥ २४ ॥ तूं तारक जननी माझी होसी । कृपासरिते निश्चयेसीं । विस्तारी सत्पदस्थितीसी । निजमुखें प्रांजळ ॥ २५ ॥ तुझिये मूर्तीचें निरूपण । केवळ आत्मप्राप्तीचें दान । हृदयपद्मीं सांठऊन । सुखी होतसे मी ॥ २६ ॥ स्वरूपप्रद सत्तात्मकें । वाक्यें विस्तारीसी कौतुकें । तैं नित्यात्म सुखानें तुकें । मज सिकवण ॥ २७ ॥ परम उदार स्वभावता । मनोरथ सिद्धींचा तूं दाता । अनंत अवधानें अनंता । जालासी जगीं प्रसिद्ध ॥ २८ ॥ आतां दिधलें ते घावें चि लागे । दातेपण दे सवेगें । मागतेपण माझें प्रसंगें । घेईं तूं संपूर्ण ॥ २९ ॥ स्वरूपात्मज्ञानें धनिक । मी तुझा असे याचक । देणें घेणें निजकौतुक । तुझें चि सकळ ॥ ३० ॥ येथें

कर्तव्याचें सांकडें । पाहें आत्मत्वें न पडे । मी तुझें चि तूं माझें रोकडें । स्वरूप होसी समर्था ॥ ३१ ॥ चित्पदाची व्याख्या प्रांजळ । उमजविली मज केवळ । आनंदपद व्याख्या समूळ । प्रचीतीसी आली ॥ ३२ ॥ सत्पदव्याख्या सांगतां । अनुसंधान राहिलें ताता । ते स्वरूपता शाश्वतता । पुन्हा प्रांजळ व्हावी ॥ ३३ ॥ ऐसा सच्छिष्य अग्रणी । स्वानुभव शिरोमणी । सद्गुरूसी प्रार्थना करूनी । प्रसन्नवचनें ऐक्य ॥ ३४ ॥ बोध त्रिपद प्रकाशक । त्रिपदातीत दशा निष्कळंक । कपीसी विलोकुनी सम्यक । कृपेनें अनुग्रहीत ॥ ३५ ॥ तुझें ऐकणें जालियां वाढ । न लगे वगत्रुत्वाचें कवाड । जाड शब्द प्रज्ञा पवाड । प्रमेयें चालती ॥ ३६ ॥ ग्राहीक जालियां महा संपन्न । कृपण व्यवसायी नव्हे प्रवीण । दिल्हे कोटी गुणें आपण । तें चि पुढती लाभे ॥ ३७ ॥ गुरूनें शिष्यासी स्वसुखें । बोधिला अनुभव स्वमुखें । तो परतोनी ऐकतां हरिखे । लाभे अनंत गुणें ॥ ३८ ॥ आतां श्रवणमुख पसरीं । अवधानें चातकांबरीं । जीवन अर्थाची धरी । वृष्टी सांठवी ॥ ३९ ॥ श्रीरामकृपेनें जाला उदार । श्रोतयां सुखें टाकिला पार । जाली घनवृष्टी गंभीर । आर्त चातकाबरी[1] ॥ ४० ॥ जाणोनी प्रेमळ अभ्यंतर । प्रसन्न जाला रघुवीर । मारुतीसी सत्पदें साचार । बोधिलें प्रसन्नतेनें ॥ ४१ ॥ निरोपम अद्वैत बोध । स्वरूपता स्वतःसिद्ध । ते सत्पद व्याख्या प्रबुद्ध । सिद्ध अवधारा तुम्ही ॥ ४२ ॥ स्वरूपासी अवधान संधी । न साहे स्वबोध अवधी । वेध समाधी उपाधी । निरोपाधी न संभवे ॥ ४३ ॥ ऐसें अपरोक्ष समाधान । अवधानें घोण अवधान । तुम्ही अनुभवाचे नयन । तेथें काय विनवावें ॥ ४४ ॥ स्वभाव दशेचा जिव्हाळा । अवधानें अपत्यासी सांभाळा । अभंगकृपेचा लळा । परिपाळण करावा ॥ ४५ ॥ इति श्री भीमोपदेश । अद्वैत बोधाचा कळस । दशा उत्कट स्वप्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४६ ॥ पंचम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ श्रीरामसमर्थ ॥



[1] चातकापरी ( पाठांतर )

श्री

## सूर्य ५ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम प्रबोध जिव्हार । प्रगट स्वरूपदर्शाचा अवतार । निजानुग्रहें कृत उद्धार । विश्वेश्वराचा ॥ १ ॥ विश्वनाथासी उपदेशिलें । हृदयीं अस्तिक्य तें संचलें । पाहतां दिल्हें ना घेतलें । ऐसें तें अभंग ॥ २ ॥ अद्वय अक्षय अनंत । स्वबोधें जाला हनुमंत । अद्वैत स्वरूपें सप्रचीत । पुसतसे सप्रेमें ॥ ३ ॥ तत्पद व्याख्या विवर । श्रीरामसंभाषण मनोहर । श्रवणीं सर्वांग सुंदर । वेधला सर्वस्वें ॥ ४ ॥ अद्वैत अनुभव मूर्धा । आनंद सुधासिंधु नुसधा । समाधीचा कळस सिद्धा । प्रबोधित सुखें ॥ ५ ॥ संपूर्ण करूनि अवधान । वोडविला निजांग श्रवण । सांठवावया निजात्मधान । श्रीराममुखीचें ॥ ६ ॥ स्वरूपांवर विस्तीर्ण । मारुतीचें हृदय गहन । एवढी करूनिया सांठवण । श्रवणार्थी वैसला ॥ ७ ॥ प्रज्ञावंत आणि प्रेमळ । शुचिष्मंत आणि कृपाळ । निष्टेनें आगळा केवळ । ईश्वर चि तो ॥८॥ पात्र ऐसिये परीचें प्रशस्त । तयाचा दाता समर्थ विख्यात । यापरीं श्रीरामहनुमंत-- । संवाद होतसे ॥ ९ ॥ विवेक पवमान पुत्रा । परमार्थे आहे सत्पात्रा । क्षेत्रविचारें तूं परत्रा । न पवसी च कीं ॥ १० ॥ क्षेत्रीं त्रिपदाची रूढी । येथें बहुविवज्ञान प्रौढी । क्षेत्रज्ञाची धडपुडी । प्रचीति नेणती ते ॥ ११ ॥ क्षेत्रज्ञाचा हि विवर । क्षराक्षर उत्तम निर्धार । सारासार दढोत्तर । जाणोन निवळावें ॥ १२ ॥ पुरुषत्रय साक्षी । चतुर्थ साक्षीचा हि साक्षी । या चौघांसी जो परीक्षी । तो अलिप्त द्रष्टा ॥१३॥ क्षर जाणोनियां जीव । अक्षर अनुभविती शिव । मायेमधील अनुभव । जाण तयाचा ॥ १४ ॥ क्षराक्षर जीवशिव । तत्वमांडणी अभिनव । उभय उपाधी स्वभाव । निवळ व्हावा ॥ १५ ॥ येथें चि पाहिजे त्यागात्याग । जहदजहद्दुर लक्षणें सांग । जाणोनी जीवाची उपाधी त्याग । करावा साधकें ॥ १६ ॥ त्याग जालिया जीवोपाधी । अत्याग उरे

निरोपाधी । तो ब्रह्मांश निरवधी । घटाकाशा ऐसा ॥ १७ ॥ जीवाची अविद्या उपाधी । त्रिगुण क्षोभित बुद्धि । महाकारण अवधी । परियंत असे ॥ १८ ॥ चहूं देहाचीं साक्षत्वें । महत्तत्वात्मक सत्तातत्वें । स्थानमान अवस्था तत्वें । शोधावे देह च्यारी ॥ १९ ॥ साक्षत्वें सर्व वोसरे । द्रष्टा मात्र केवळ उरे । निजावधान सोहं स्फुरे । ज्ञानघन तो ॥ २० ॥ सोहं अस्तिक्याची वृत्ति । ते चि बीजरूप प्रवृत्ति । त्या सद्‍वृत्तीपासूनी निवृत्ति । होती अनंत कल्पना ॥ २१ ॥ हें चि जाणिजे मुळींचें क्षेत्र । जाणिजे मूळमाया विचित्र । दिसे ब्रह्मदशा चि स्वतंत्र । परि हे विजाती ॥ २२ ॥ हे ब्रह्मदशेची भावना । भावोनी निर्विकार गगना । ब्रह्म आणिती अनुसंधाना । खेचर अवस्थेनें ॥ २३ ॥ ब्रह्मासी करूनि निर्विकार । क्षत्रज्ञासी करिती अहंकार । क्षेत्रज्ञानाचा संस्कार । तैसा चि असे तया ॥ २४ ॥ तत्वें जाणोनिया विकार । पुढें योजिती तदाकार । आपणासी चुकोनी वारंवार । लक्षासी आणिती ब्रह्म ॥ २५ ॥ स्वरूपेसीं होऊनि भिन्न । होऊं पाहती ते अभिन्न । समूळ स्वरूपज्ञान । चुकले ते ॥ २६ ॥ आपुले वृत्तीसी आपण । मानुनी जाले आन । हा विजाती संस्कार जाण । लागला तयासी ॥ २७ ॥ प्रत्यक्ष पाहतां देहीं । माझें अंतःकर्ण ह्मणतो पाहीं । परंतु मी चि अंतःकर्ण कांहीं । ह्मणवीत नाहीं कीं ॥ २८ ॥ अनादि सिद्ध क्षेत्र भेद । पदें सद्‍चिद आनंद । स्वजाती विजाती भेद । स्वगतेंसी ॥ २९ ॥ या असत्पद करूनी । सत्पद रूढलें जनीं । ते सत्पद आकाशस्थानीं । ब्रह्म ह्मणती तया ॥ ३० ॥ जाण ययाचा विचार । मूळमाया संस्कार । भीमासी सत्पदविचार । श्रीराम निरोपीळ ते अवधारा ॥ ३१ ॥ इति श्री भीमोपदेश । हृदयींचे कल्पनाकोश । निजात्म शुद्धीनें निस्तोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ३२ ॥ पंचम सूर्य षष्ठम कळा संपूर्ण ॥ ६ ॥ ७ ॥ ७ ॥

श्री

# सुर्य ५ कला ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनादि क्षेत्रपति । भोगी क्षेत्रीं निजसंपत्ति । भवसंस्कार मोह विपत्ति । निरसीत आत्मतेजें ॥ १ ॥ क्षेत्रमात्रात्मक ओव्हात । नाना कल्पना हेतु जात । दुराग्रह कांटवण समस्त । दुर्वृत्ति तृणांकुरि तें ॥ २ ॥ त्रिगुण विस्तारें सेंव । अकुव्हित झाडुर अघ । वासनात्मक महा-योघ । प्रवाह भवजळाचे ॥ ३ ॥ नाना विकल्प वनस्पती । जिनस सांगावे ते किती । नाना सद्वृत्तीरूप पिकती । पिकें अपाडाचीं ॥ ४ ॥ नाना दुष्कर्माचीं वीजें । वरी वरी अंकुरतीं सहजें । महा संकल्प सव्याजें । पिकती अराम ॥ ५ ॥ लक्षचौन्याऐसी योनी । क्षेत्रीं पिकल्या च्यारी खाणी । नाना उपचार करणी । वाणी च्यार योगें ॥ ६ ॥ क्षेत्रीं अनेक क्षेत्र होती । तितुके तयाचे क्षेत्रपति । कोण्हीं क्षेत्राचा उद्धार करिती । कोण्ही बुडविती क्षेत्रातें ॥ ७ ॥ ऐसी हे अनादि क्षेत्रवृत्ति । चालिली दुस्तर प्रवृत्ति । राबती सर्वस्वें पुरुषार्थी । कुळवाडी तिथे ॥ ८ ॥ त्रिगुण विभागें क्षेत्र । वांटून घेतले स्वतंत्र । तिथे क्षेत्रज्ञ परत्र । व्यवसायें प्रवीण ॥ ९ ॥ समान त्रिविधा क्षेत्रीं । येक वेळेसी भोग घेती पात्रीं । येकमेदर ते प्राधान सूत्रीं । प्रमाणें वर्तती ॥ १० ॥ तया क्षेत्रज्ञापासूनी । त्रिविधा संतति होउनी । परस्परें मोह जनीं । लोभें वाढविला ॥ ११ ॥ अपार ते अनिवार । परस्परें दुराशा संसार । दायादि मत्सरें अपस्मार । लागलासे कव्हो ॥ १२ ॥ परम वृद्ध तो वडिल । त्यासी न मनिती कोण्ही प्रबळ । स्वरूप ज्ञानें निवळ । राहिला तो स्वरूपीं ॥ १३ ॥ तयाचे पोटीचे अहंकार । वर्तती मुखें राज्यधर । संततीसी समर्पुनी वेव्हार । विलासले साक्षत्वीं ॥ ॥ १४ ॥ साक्षत्व सुखाच्या परवडी । येकवटी महाजोडी । संततीचेनि कुळवाडी । क्षेत्रासी वाहती ॥ १५ ॥ एकाची कुळवाडी निकी । विचारयोगें विलोकी । सत्वसंपत्तीनें पिकी ।

फळ घेत उत्तम ॥ १६ ॥ एकाची कुळवाडी मध्यम । तो पिकवीतसे धर्माधर्म । साक्षत्वसुखें कर्माकर्म । संपत्ति भोगी ॥ १७ ॥ एकाची कुळवाडी अधर्म । तो पाप चि पिकवी परम । परी एक तयाचें उत्तम । अनुतापासी आणी ॥ १८ ॥ पापातिशयें प्रवृत्ति । नाना प्रमाद घात होती । मृत्युरूप कराळकृति । वाजती अघात मूळाचे ॥ १९ ॥ असो या तिघांची परवडी । यांपासूनी परंपरारूढी । मिश्रगुणें विस्तार प्रौढी । सर्वत्र असे ॥ २० ॥ त्रिगुणविभागें क्षेत्रधर्म । निरोपिला कांहीं एक क्रमें । आतां गुणसाम्यानुक्रम । ऐक हरिश्रेष्ठा ॥ २१ ॥ सत्पद निवळ व्हावया । सांगाची लागली माया । माया कळल्या वांचुनियां । मायातीत कैसें कळे ॥ २२ ॥ माया चि ब्रह्मादिकांसी अकळ । मायेनें वेढा लाविले सकळ । माया तयाची च केवळ । तयासी बाधी ॥ २३ ॥ पाहतां ते आपुली वृत्ति । तियेसी न पाहतां चित्तीं । ह्मणती अकळ माया स्थिति । अभिनव ऐसें ॥ २४ ॥ गुणसाम्य गुणक्षोभपर । गुणाऐलीकडे विस्तर । ते चि विस्तारली विश्वाकार । क्षेत्रें होऊनियां ॥ २५ ॥ तें क्षेत्रें आणि क्षेत्रनायक । ऐसें उभयाचा विवेक । ऐसा अयोध्यापरिपाळक । निरोपीत तें अवधारा ॥ २६ ॥ इति श्री भीमोपदेश । अनादि क्षेत्र सविशेष । त्रिगुणक्षोभ जीवेश । ह्मणे मेरु अनंत ॥ २७ ॥ पंचम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥ श्री गोविंद ॥



श्री

## सूर्य ५ कळा ८

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम सगुण साम्य अधिष्ठित । अनंत क्षेत्रीं जीव अनंत । यमन्या अनादि सिद्ध स्वरुप । सायोज्य सुखें ॥ १ ॥ क्षेत्रीं पाहतां अप्रकाश । अन्तर्यामीचा प्रकाश । साक्षत्व वृत्तीनें तोष । पंचकोश

यसवी ॥ २ ॥ अविद्या ज्यातीप क्षेत्र । दैविक योगें स्वतंत्र । पिकऊं नेणतां परत्र । पतन पावतसे ॥ ३ ॥ येथें त्रिगुणाचे संस्कार । प्रतिक्षणीं भेद विकार । आपुल्याचि कर्में संसार । सिंधुंत बुडती ॥ ४ ॥ करूं नेणतां प्रपंच । विपर्यी वर्तती अज्ञाच । नेणोनी कांहीं उंचनींच । वर्तती भ्रमें ॥ ५ ॥ असोनी विचाराचे डोळे । अविचारें होती आंधळे । अविवेच्या पाशजाळें । पावती बंधन ॥ ६ ॥ हा रजोगुणाचा समंध । विशेप तमोगुणें होती बद्ध । तामस क्रियेनें विरुद्ध । पावती दुःखें ॥ ७ ॥ नेणोनी आप आपणा । मौढ्य अवलंबिती मना । विषय शोभीत वासना । कल्पनेचें रान घेती ॥ ८ ॥ दुकळले ते विपयासक्ती । नित्य बराडी विषय सेविती । जीव जीवासी भक्षिती । हें चि कर्तव्य तया ॥ ९ ॥ तेथें अरिवर्गाचें पिकलें । मदमत्सराचें राज्य जालें । अविवेचें वळावलें । महासंस्थान ॥ १० ॥ भेदाचा प्रवाह पडिला । दुस्तर्काचा उदय जाला । भाग्यराशि उदेला । अभाग्याचा ॥ ११ ॥ दरिद्राचा उगवला दिन । अपमानाचें जालें भूषण । गौरविला दुराभिमान । पट्टीं बैसविला ॥ १२ ॥ कुकर्माचा वाहिला होरा । प्रतिष्ठिलें त्या जन्मांतरा । नित्य मरणाचा व्यवहारा । पेठेसी प्रतिष्ठिला ॥ १३ ॥ एवं तामसाचीं प्रमादें । अनादि हेतु दुःख द्वंद्वें । विस्तारलीं महाखेदें । अति विरुद्धें तियें ॥ १४ ॥ यां उभयांची प्रवृत्ति । दुःखदायक मूढींची वृत्ति । परि पाळिली संतती । भ्रमें अज्ञानाची ॥ १५ ॥ आतां सत्वाची होय विख्याति । ते सभाग्य प्रपंच रीति । सात्विकें कर्में होतीं । सद्गतिदायकें ॥ १६ ॥ शांति दया पवित्रता । नीतिन्याय स्वभावता । सन्मार्ग सत्क्रिया समता । सर्वत्र वसे ॥ १७ ॥ नित्य नेम सद्भावभक्ति । नित्याचरण महा विरक्ति । सन्मार्ग चित्तशुद्ध मुक्ति । अपेक्षित क्रिया ॥ १८ ॥ अध्यात्मीं नित्य विवर । श्रवणीं प्रीति साचार । मननीं नित्य विचार । नित्य निजध्यासें ॥ १९ ॥ सज्जनाचें नित्य अर्जव । स्वधर्मी प्रवृत्ति अभिनव । अनुष्ठान जप अंतर्भाव । वेध सगुणीं ॥ २० ॥ इंद्रियनिग्रह अनुताप । निरसलास सर्वस्व संकल्प । ऐसा सद्भाव स्वरूपें । सत्वीं निपजे ॥ २१ ॥ सत्वक्षेत्रयोगें पावन ।

जाले अनंत तपोधन । सिद्ध साधु मुनिजन । सज्जनवृंदें ॥ २२ ॥ औट हात क्षेत्रभूमि । पिकविली बीजें ब्रह्मास्मि । स्वरूपयोगें अंतर्यामीं । सुखी जाले ॥ २३ ॥ दैवें आलिया या क्षेत्रासी । पूर्वार्जित कर्में अशेषीं । पापसंचित किटे[1] ऐसी । सुकृतें अर्जवी ॥ २४ ॥ कर्मसंस्कार बाकी फिटे । ऐसा सत्कर्में रहाटे । भवबंधन अवचटे । तुटे तयाचें ॥ २५ ॥ सूक्ष्म विचाराच्या बळें । पिकवावीं आत्मसुखाचीं फळें । स्वानंद उपभोग मेळें । सुलीन व्हावें स्वरूपीं ॥ २६ ॥ तरी गा जाण सत्वनिधी । करीं तूं साधनाची शुद्धि । पिकवी सत्क्षेत्र उपलब्धी । लाहे अक्षय सुखाची ॥ २७ ॥ सनकादिकीं महासिद्धि । जीवापासूनि कृतबुद्धि । शोधूनि सत्क्षेत्र त्रिशुद्धि । पिकविलें बोधें ॥ २८ ॥ क्षेत्र पिकवावयाची रीति । ऐक सांगेन तुजप्रति । जें कपिलादिकीं महास्थिति । पिकविलें क्षेत्र ॥ २९ ॥ प्रचीति संभवसुखें । निरोपील श्रीराम मुखें । अवधान करूनि हरिखें । अवधारिजे श्रोतीं ॥ ३० ॥ इति श्री मीनोपदेश । गुणत्रय क्षेत्र प्रकाश । साधन संपत्तीनें परेश । ह्मणे मेरु अनंत ॥ ३१ ॥ पंचम सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ५ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम क्षेत्रज्ञ महास्थिती । क्षेत्रमात्र आत्मप्रवृत्ति । प्रत्यावृत्तीनें नित्य प्रचीति । भवावृत्ति चुके ॥ १ ॥ क्षेत्रसंभव प्रकृतिचेन । क्षेत्रोद्धार पुरुषज्ञान । स्वरूपसाक्षात्कारें सुलीन । क्षेत्रज्ञ स्वरूपीं ॥ २ ॥ या क्षेत्र अधिकारें करूनी । कृतार्थ जाले ज्ञानी । महास्थितीनें साधनीं । क्षेत्र परिशुद्ध केलें ॥ ३ ॥ आदिनाथ मच्छेंद्र मुनि । दत्तात्रय गोरक्ष आदि मुनि । ऋषि तापसी सज्जनीं । वाहिलें हें क्षेत्र ॥ ४ ॥ ब्रह्मादिक सुरवर ।

[1] फिटे ( पाठांतर )

करिती क्षेत्राचा उद्धार । महात्मीचा विवर । होय क्षेत्रयोगें चि त्या ॥५॥ सद्गुरुपासीं घेऊनि क्षेत्र । बीज भरणें निजमंत्र । नित्यानित्य बोव विचित्र । क्षेत्रासी कामविजे ॥ ६ ॥ जेथें कांहीं च पिकेना । स्वभाव क्षेत्रींचा जाणा । कामाविळें तरी नाना । भवासक्ति पिके ॥ ७ ॥ पेरिल्यावीण तृणादिकें । भूमीसी पैसावती अनेकें । तेविं वाउगें चि पिके । कर्म या क्षेत्र भूमीसी ॥ ८ ॥ याकारणें विचारवंतें । पडी पडूं देऊं नये क्षेत्रातें । क्षेत्राचें सर्वस्व प्रभूतें । देणें हें चुकेना ॥ ९ ॥ क्षेत्रापासूनि निपजलें । तें त्याचें त्यासी पावलें । ऐसें पाहिजे आणिलें । क्षेत्र रकमेसी ॥ १० ॥ नाहीं तरी क्षेत्राचा सारा । अनादि सिद्ध वाढेल वरा । तितुका थावयासी विचारा । आस्तिक्य कैचें ॥ ११ ॥ त्यास्तव नित्यानित्य साधन । पिकवावें क्षेत्र निधान । जेणें करिता इरसाळधन । पावे क्षेत्रपतीसी ॥ १२ ॥ मनपवन धुरेचे बैल । अष्टभाव वरकडील । शमादि षट्क समबळ । साहीं सरिसे चि ॥ १३ ॥ हें प्रबळ पेटउनी खोड । सोळा बैलाचा नांगर अखंड । धैर्य धरूनियां सूत्र प्रचंड । नांगरावें क्षेत्र ॥ १४ ॥ उलथुनी संकल्पाच्या पेंडी । वृत्तिकाशा काढाव्या प्रौढी । विकल्पाच्या पाळव्या रूढी । समूळीं उपडाव्या ॥ १५ ॥ उखळून संकल्पाचे खूट । भरून भवजळ वोहट । परिशुद्धीनें चोखट । दुग्ध करावें तें ॥ १६॥ विवेकाचा हव्यवाट । लाऊनि दरय केर सगट । कडकडाटें ज्वाळा उत्कट । भस्म करावें अहिचण ॥ १७ ॥ उपरी नित्या नित्य विचार । कुळवावें क्षत्रसार । तपश्चर्या अपार । नित्यानुक्रमें ॥ १८ ॥ कल्पांतरूटींची काळवट । अनादिभूमी आंतुवट । दैविक घनवृष्टि उत्कट । तिंवली तेणें ॥ १९ ॥ बोल जिरेनी आंगीच्या आंगीं । शांतीनें मृदत्वासी ये वेगीं । म्हणोनि प्रसिद्धि यालागी । क्षमा ऐसें म्हणती तिया ॥ २० ॥ वैराग्यविवेक मुमुक्षता । फाळ तीक्ष्ण महासत्ता । बोधतीं फणीनें तत्वता । पेरिजे निजबीज ॥ २१ ॥ गुरुकृपाचाडें तें श्रवण । सोहं वाक्य बीज सघन । विचार मुष्टीसी धरुन । सत्वें चि पेरावें ॥ २२ ॥ लाभावरी निजलाभ । व्हावया तो परम सुलभ । स्वधर्म मोघण्यानें स्वयंभ ।

मोधावें स्नेह मूळ तें ॥ २३ ॥ विसयाची फांसाटीं धरूनि । पांघरवाची बीजश्रेणी । विरक्तीची परिपूर्ति करूनी । कुडावें क्षेत्र तें ॥ २४ ॥ धोरणीच्या पाणदी लाऊनी । घालावा परिपाट घालणी । नित्यावलोकनें मननीं । दिनरात्री राखावें ॥ २५ ॥ संकल्प सांजवेळा । सांभाळावा वृत्ति गोमेळा । वासना काल्वदी वढाव्या । राखाव्या अवंशी ॥ २६ ॥ पाहटे संकल्प कुशावळ । चारिती सेत तें कुटिळ । निर्वात बुद्धीची अकळ । नित्य कोंपीसी असावें ॥ २७ ॥ निजस्नेह घालुनी डोळां । राखावा तो सस्य जिव्हाळा । मग त्या पिकाची लीळा । बळें प्रबळोनि ये ॥ २८ ॥ लसलस शांतीनें कोमळ । एकेक अक्षोभतापाहाळ । एकी अनेक दशामूळ । घोंवावें पीक तें ॥ २९ ॥ पानोवानीं फुटतां कोंब । पुष्टीनें झांकोळलें नभ । भूमी आछ्यादिलें शुभ । समृद्धि त्या पिकाची ॥ ३० ॥ कांडो-वांडीनें सकळें । स्वभाव निश्चयासी आलें । निजानंदघन शोभलें । सुश्यामवर्ण ॥ ३१ ॥ विशेष सद्वृत्ति उजगरा । हरितवर्ण गाभारा । आनंदाचा चि उभारा । घनवटलें संपूर्ण ॥ ३२ ॥ सद्बुद्धीच्या लोंव्या पोटीं । उतटला पोटरा पुष्टी । पशेलें कडधान सृष्टी । सुचविला सुकाळ ॥ ३३ ॥ निजप्राप्तीच्या सुखें । चीक भरींव होतें हरिखें । सणसर्णात चौधारमुखें । लोंवटें निढारलीं ॥ ३४ ॥ चित्रविरूप तेणें । पैसावलें पिंजरवर्णें । तें नवलक्ष्मीकारणें । शोभा आली ॥ ३५ ॥ अलंकृत ते वसुमती । घनीं वसली नित्य संपत्ति । कृशिवळांच्या मनोरथीं । आनंद वर्षविला ॥ ३६ ॥ निजप्राप्तीचा उदय जाला । अमृताचा होरा वाहिला । सुकृताचा योग फळला । दैविक बळें ॥ ३७ ॥ अखंडैक रस स्वानंद । योंव्या खाऊन जाला तुंद । त्या कृषिवळांसी संवाद । न घडे निजवद्याचा ॥ ३८ ॥ सुमनीं साक्षत्वाचे घाटे । पुष्पित स्नेह मूळ घाटे । गोधुम निजधान्य उत्कटें । मुक्त वाटिण्य घरीं ॥ ३९ ॥ समृद्धीची सवगणी । करूनी मंडटी प्रमाणी । निजभ्यासें मिळूनी । उपणालें पीक ॥ ४० ॥ फोल जाऊनी सहज । उरला सार तो सतेज । राशी मरूनी शेप गुज । बोध गाडियावरी आणिलें ॥ ४१ ॥ सांठवितां अनुभव सदनीं ।

रसना जाली । निल सुखें चाखों सगळी । अखंडैकरस ॥ ११ ॥ सुमन परवडीनें पूर्ण । प्रज्ञा चि ते पैसावोन । विविध परिमळें जाण । रूटीसी आली ॥ १२ ॥ हें अवकाशें घडलें । अवघ्राण संभवलें । तेणें सावकाश सेविलें । सुवासासी ॥ १३ ॥ शब्दरूढीसी अंतःकरण । स्पर्श प्रसिद्धीसी मन । रूप दर्शासी जाण । बुद्धि पैसावली ॥ १४ ॥ रसप्रशंसाकरण । चित्त पैसावलें आपण । सुगंध योग्यतेचें निधान । घ्राण व्यापकतेनें ॥ १५ ॥ तो चि जाणावा अहंकार । करण पंचवृत्ति उधार । ज्ञानेंद्रियें साचार । तो चि रूढला ॥ १६ ॥ कर्मेंद्रिय स्थितीनें । होय पंचक व्याप्तीनें । वाचा होउनी वदनें । औकाश रूढवीं ॥ १७ ॥ कर होउनी सत्तात्मक । व्यापकतेनें चि होय द्योतक । पदार्थज्ञान ग्राहक । महा चमत्कारें ॥ १८ ॥ पैस पाहोनी अपार । अपेक्षित करी संचार । हे पद गतीचा निर्धार । हृदया चि पासुनी ॥ १९ ॥ विषयभूक्तीची व्यापकता । तृप्तीनें पाउनी सत्ता । होय अवसरोचित भोगिता । आत्मप्रिया सुखें ॥ २० ॥ तें शिश्न विश्वकारण । पैसावलें अवकाशें जाण । विश्व मलोत्सर्ग करणें । गुद औकाशें चि त्या ॥ २१ ॥ आतां पंचप्राण वृत्ती । देह सचेतनता प्रवृत्ती । औकाशें चि सर्वार्थी । पोसले पंचप्राण ॥ २२ ॥ आकाशासी करूनी प्राशन । नासिकीं वसवासे प्राण । हृदयावकाश स्थान । उदान पोसला ॥ २३ ॥ हृदयीं मूळ नाभिस्थानं । पैस धरूनी समान । रूढला तैसा चि अपान । गुदाधारें ॥ २४ ॥ अवकाशसंधानें सकळ । व्यान संचरे केवळ । एवं अवकाशें निवळ । प्राणोपजीविका ॥ २५ ॥ अवकाशें चि रूढला शब्द । अवकाशें चि शब्द प्रसिध्द । तैसें चि रूप विविध । रस गंध समृद्धि ॥ २६ ॥ एवं पंचवीस तत्वीं । पैस धरूनी साक्षत्वीं । आद्यंत सृष्टि सत्वीं । जगती पैसें ॥ २७ ॥ तो निज हृदयीचा पैस । वृत्तिज्ञानाचा उमस । तेणें करितां होय साभास । अवकाशपणें ॥ २८ ॥ वृत्तीचा नसतां उमस । जाणिजे तो निराभास । जीव म्हणावें तयास । जाण पुरुषोत्तमा ॥ २९ ॥ या जीवाची अंतरस्थिती । पाहतां स्वरूप आवर्ती ।

होय विश्वाकारें । जीवरूप वृत्ति संस्कारें । तो चि जाला असे जनीं ॥ ३६ ॥ क्षराक्षर पुरुषद्वय । जाण तयाचें चि हृदय । उभय वृत्तीचा विस्मय । भेद दाविला तेथें ॥ ३७ ॥ सद्वृत्तियोगें ज्ञानसंपन्न । असद्वृत्तियोगें अज्ञान । त्रिगुणाश्रित जगद्भान । जाण तूं निज जीवासी ॥ ३८ ॥ तें चि जीवाचें प्रांजळ ज्ञान । पुढें होईल निरूपण । देऊनियां नित्यावधान । अवधारिजे श्रोतीं ॥ ३९ ॥ इति श्री मीमोपदेश । मूळमाया आदिपुरुष । निरोपिली सविशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ४० ॥ पंचम सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीदीन ॥ दया ॥ पर ॥ मूर्ति रामाय नमः ॥

---

श्री

# सूर्य ५ कळा ११

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम शिवाचें अभ्यंतर । व्यापकपणें निरंतर । घटमठीं वसे अंबर । सर्वत्रीं तैसा ॥ १ ॥ अचंचळीं मूळमाया । मूळींची स्फूर्ति जाणीव काया । गुणसाम्येंसी विवंचुनीयां । साक्षीसी पहावें ॥ २ ॥ स्वभावरूप द्रष्टा साक्षी । गुणक्षोभ स्वभाव लक्षी । भूतोद्भव परिक्षी । निज अभ्यंतर ॥ ३ ॥ त्या मूळ पुरुषाचें ज्ञान । स्वरूपाकारें निर्गुण । प्रपंचाकारें सगुण । विस्तारलें जगीं ॥ ४ ॥ मूळ स्फूर्तीचा उगम । पाहतां सकळांसी सुगम । परि विवेकें अंतर्याम । शोधितां निवळे ॥ ५ ॥ आत्मप्रचितीनें परम । होय स्वयंभाचा सुगम । हृदये चि परंधाम । जाण सर्व प्रकारें ॥ ६ ॥ मूळ स्वरूप शुद्धि व्हावी । हे अमोघ ऊर्ध्वीवरवी । सर्वज्ञा तूं स्वानुभवी । होईं साक्षत्वापर ॥ ७ ॥ साक्षत्वीं स्वरूप देखिलें । शिवव्यापकपण बोलिलें । तेणें चि विश्व जिवविलें । या अर्थे जीव म्हणावें ॥ ८ ॥ सत्वांशक्रमें जाण । जगलें विश्व अंतःकरण । विश्व उपेगी जीवन । सावकाशें चि त्या ॥ ९ ॥ अवकाशें श्रोत्र वाटला । सावकाशें नेत्र रूढला । व्यापकतेनें निवटला । त्वचेचा पदर ॥ १० ॥ निजपेसें चि पैसानन्दीं । सर्वत्र

रसना जाली । नित्य सुखें चाखों लागली । अखंडैकरस ॥ ११ ॥ सुमन परवडीनें पूर्ण । प्रज्ञा चि ते पैसावोन । विविध परिमळें जाण । रूढीसी आली ॥ १२ ॥ हें अवकाशें घडलें । अवघ्राण संभवलें । तेणें सावकाश सेविलें । सुवासासी ॥ १३ ॥ शब्दरूढीसी अंतःकरण । स्पर्श प्रसिद्धीसी मन । रूप दर्शासी जाण । बुद्धि पैसावली ॥ १४ ॥ रसप्रशंसाकरण । चित्त पैसावलें आपण । सुगंध योग्यतेचें निधान । घ्राण व्यापकतेनें ॥ १५ ॥ तो चि जाणावा अहंकार । करण पंचवृत्ति उधार । ज्ञानेंद्रियें साचार । तो चि रूढला ॥ १६ ॥ कर्मेंद्रिय स्थितीनें । होय पंचक व्यासीनें । वाचा होउनी वदनें । औकाश रूढवीं ॥ १७ ॥ कर होउनी सत्तात्मक । व्यापकतेनें चि होय धोतक । पदार्थज्ञान ग्राहक । महा चमत्कारें ॥ १८ ॥ पैस पाहोनी अपार । अपेक्षित करी संचार । हे पद गतींचा निर्धार । हृदया चि पासुनीं ॥ १९ ॥ विषयभूक्तीचीं व्यापकता । तृप्तीनें पाउनी सत्ता । होय अवसरोचित भोगिता । आत्मप्रिया सुखें ॥ २० ॥ तें शिश्न विश्वकारण । पैसावलें अवकाशें जाण । विश्व मलोत्सर्ग करणें । गुद औकाशें चि त्या ॥ २१ ॥ आतां पंचप्राण वृत्ती । देह सचेतनता प्रवृत्ती । औकाशे चि सर्वार्थी । पोसले पंचप्राण ॥ २२ ॥ आकाशासी करूनी प्राशन । नासिकीं वसलासे प्राण । हृदयावकाश स्थान । उदान पोसला ॥ २३ ॥ हृदयीं मूळ नाभिस्थानं । पैस धरूनी समान । रूढला तैसा चि अपान । गुदाधारें ॥ २४ ॥ अवकाशसंधानें सकळ । व्यान संचरे केवळ । एवं अवकाशें निवळ । प्राणोपजीविका ॥ २५ ॥ अवकाशें चि रूढला शब्द । अवकाशें चि शब्द प्रसिध्द । तैसें चि रूप विविध । रस गंध समृद्धि ॥ २६ ॥ एवं पंचवीस तत्वीं । पैस धरूनी साक्षत्वीं । आद्यंत सृष्टि सत्वीं । जगती पैसें ॥ २७ ॥ तो निज हृदयींचा पैस । वृत्तिज्ञानाचा उमस । तेणें करितां होय सामास । अवकाशपणें ॥ २८ ॥ वृत्तींचा नसतां उमस । जाणिजे तो निराभास । जीव म्हणावें तयास । जाण पुरुषोत्तमा ॥ २९ ॥ या जीवाची अंतरस्थिती । पाहतां स्वरूप आयती ।

तें चि अवधारीं महामती । अवधान देऊनियां ॥ ३० ॥ इति श्री भीमोपदेश । जीवाचें रूप सावकाश । स्वरूपें पाहतां निःशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ३१ ॥ पंचम सूर्य एकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ श्री एकादश रुद्राय नमः ॥



श्री

## सूर्य ५ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम स्वरूप द्रष्टा केवळ । मूळ पुरुष स्वरूपें निर्मळ । शिवरूप ज्ञानें प्रांजळ । देखिला हृदयीं ॥ १ ॥ त्रिगुणाच्या संस्कारें । भूत पंचीकृत विकारें । वासनामय विस्तारें । आक्रमला देहीं ॥ २ ॥ होऊनि घटाचें आवरण । घटाकारें निरावरण । रूढीसी आणिलें अंतःकरण । योगें जीवासी ॥ ३ ॥ जीवाची अविद्या उपाधी । महामोहक प्रसिद्धि । पाहतां जीव निरोपाधी । उपाधीनें वेष्टिला ॥ ४ ॥ विपासी देऊनी विरपण । सत्तेनें वेचिला प्राण । ऐसें जयाचें भोळेपण । काय सांगावें ॥ ५ ॥ निर्विकार महास्थिति । उदासपणाची रीति । विसरोनी ज्ञानाची संपत्ति । प्रवृत्तीसी भुलला ॥ ६ ॥ विसरोनी निज योग्यता । नांदऊनि ज्ञानाची सत्ता । भवापदा भोगितां । होय विसराळूपणें ॥ ७ ॥ निर्भयाची महादशा । भयें आतुडे यमपाशा । ऐसी क्षोभित दुराशा । पिसें विसराचें ॥ ८ ॥ विश्वासें चि शत्रूचे करीं । ग्रीवा देऊनी घात करी । निजघात तो न विचारी । एवढा उदार ॥ ९ ॥ सामर्थ्य असोनियां आंगीं । न वेचीं निदान प्रसंगीं । अमृत असोनी निजांगीं । भोगी मरणासी विषें ॥ १० ॥ क्षर प्रकृतीच्या संस्कारें । भोगितसे मरणांतरें । आपण अक्षर विचारें । उमजे चि ना कीं ॥ ११ ॥ मृत्युरूप माया संस्कार । आपणें चि वर्धविला संसार । स्वइच्छेनें वारंवार । मरणावृत्ति करी ॥ १२ ॥ ऐसा कल्पनेचा अभ्यास । करीतसे अपुला नाश । निजांग अविनाश ।

विसरला कैसा ॥ १३ ॥ अग्नीमाजि गगन । जळेना तापेना जाण । परि व्यापतेनें दहन । त्रिया आंगीं यसवी ॥ १४ ॥ तेवि स्मृति संस्कार । निजांगीं नसोनी साचार । परी आंगींच त्यास विकार । रूढीसी आणिला ॥ १५ ॥ घट ध्वंसें नभ ध्वंसे । तेवि चित्प्रकाशीं जीव यींश । वृद्धि क्षय मूळ हेस । अमास दावीं ॥ १६ ॥ हा अज्ञानाचा स्वभाव । नेणोनी जीवयी जीव । याकारणें दुर्भव । दुर्दशा भोगी ॥ १७ ॥ याचि जीवासी म्हणावें क्षर । संकल्पें विकारला विकार । विकल्पवृत्तिनें थोर । पतन दुःखें भोगी ॥ १८ ॥ हा त्रिगुण क्षोभ अहंकार । गुणक्षोभाचा विस्तार । नाना देह संस्कार । ययाच्या पोटीं ॥ १९ ॥ उत्पत्ति स्थिति संव्हार । हाचि होय विश्वाकार । स्थूळ शरीरें अपार । धरिलीं येणें ॥ २० ॥ ब्रह्मांड स्थूळाकृति । अनंत कोटी जीव व्यक्ति । त्रिगुणयोगें विशाळ स्थिति । पुरयला सर्वत्र ॥ २१ ॥ पिंडीं अनंत ब्रह्मांडें । रूढीसी आणिलीं प्रचंडें । म्हणती वितंड वादवेंडें । परी ऐसें चि आहे ॥ २२ ॥ पिंडीं निवळला विचार । ब्रम्हांड पैस धरूनी थोर । अनंत ब्रम्हांडें विस्तार । दृष्टीसी आणिला ॥ २३ ॥ अनंत ब्रम्हांडा पैलीकडें । निज आस्तिक्यता निवाडें । पैसावली ज्ञान उजियेडें । अगोचर दृष्टी ॥ २४ ॥ यास्तव पिंडामाजि ज्ञान । स्वरूपें वसे सनातन । त्या ज्ञानाचें अधिष्ठान । जीव होय पिंडाचा ॥ २५ ॥ ब्रम्हांडामाजि पिंड । भूतान्वयें अखंड । ज्ञानान्वयें पिंड । प्रकाशक ब्रह्मांडाचें ॥ २६ ॥ असो तया घडमोडी । पिंडीं प्रचीत रोकडी । ब्रह्मांडीं पदार्थ परवडी । विस्तारलीसे ॥ २७ ॥ पिंड ब्रह्मांड व्यापून । पुढें पैसावलें जीवाचें ज्ञान । जीव शिवपदें घेटून । घनवटलें सुखें ॥ २८ ॥ स्वरूपाची प्रतिष्ठा । जीवआत्मज्ञानियाचा श्रेष्ठा । साक्षत्वातीत द्रष्टा । अक्षररूपी ॥ २९ ॥ हे स्फूर्ति जवंवरी आंगीं । तवंवरी भासे उभयांगीं । स्फूर्ति विराळिया निजांगीं । अनिर्वाच्य सहजें ॥ ३० ॥ अक्षर म्हणावयासी कवण । अनुभवेंसी अवसान । निदानासी निदान । महामौन स्थिति ॥ ३१ ॥ गुरुकृपेच्या संकेतें । उत्तम ऐसें म्हणावें त्यातें । तुज निरोपिलें गा निरुतें । पुरुषत्रय रूप ॥ ३२ ॥

जीवशिवस्वरूप येणें चि जालें । मायेचें आख्यान निरोपिलें । सत्यदेह प्रतिष्ठिलें । मूर्तीचें अहंकरण ॥ २३ ॥ त्या अहंकारातीत । सत्पद सदोदित । आतां महावाक्य सुनिश्चित । अवधारी पुढें ॥ २४ ॥ पंचम सूर्य प्रभा घन । जालें अद्वैत निरोपण । विचाराचे लाउनी नयन । पाहिलें तुवां ॥ २५ ॥ प्रचीतीचा मिळे श्रोता । तरी सुखें अनुवादे वक्ता । तुझेनि तोषलों हनुमंता । अवधानीं प्रबळ तूं ॥ २६ ॥ आतां पष्ठम सूर्य कांति । अद्वैत प्रचीत उपशांति । सावधानें मारुती । अवधारी सुखें ॥ २७ ॥ इति श्री भीमोपदेश । क्षराक्षरस्वरूप निर्दोष । परब्रह्म उत्तम पुरुष । म्हणे मेरु अनंत ॥ २८ ॥ पंचम सूर्य द्वादश कळा संपूर्ण ॥ १२ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ६ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामा परमपुरुषा । कृपेनें सांभाळिलें परेशा । भवातिशयाची दुर्दशा । निवारिली वोधें ॥ १ ॥ जन्मांतर दुःख संकल्प । निवारिले सर्व विकल्प । स्वरूपयोग निर्विकल्प । मजला केलें ॥ २ ॥ आदिदेवा श्री अनंता । निवर्तविली माया ममता । दिल्ही स्वरूप समता । कृपाळूपणें ॥ ३ ॥ अज्ञान भवमोचन । कर्ता होसी तूं सुलोचन । आत्मसाक्षात्कारी दर्शन । दिल्हें सद्गुरुरूपें ॥ ४ ॥ उदार तुझी प्रसन्नता । स्वरूप देउनी तन्मता । सुखी केलें मजला आतां । काय चिंता भवाची ॥ ५ ॥ समर्थाचा होतां आश्रय । तया परकटाचें काय भय । आज्ञा मस्तकीं वाहे । प्रीतीनें जग ॥ ६ ॥ कृतांत तुझा आज्ञाधर । सेवितसे तुजें शंकर । इंद्र चंद्रादि किंकर । सेवेचे आर्तीं ॥ ७ ॥ ब्रह्माविष्णु तुजें अर्चिती । वेद मुकला चि प्रशंसितां । विधिदारण प्रकृति । तुझपा आहेत ॥ ८ ॥

दैविक तुझेनि वर्ततसे । सत्ता सामर्थ्य रूढी होतसे । तुझेनि जगीं प्रकाशतसे । कर्तव्य तितुकें ॥ ९ ॥ तत्वोपदेश माव्य । तुझेनि चालिलें जगीं लीव्य । स्वरूपज्ञान जिव्हाव्य । विश्वहृदयस्थ तूं ॥ १० ॥ तुझें अधिष्ठान पाहतां । अखंडीत तूं अनंता । कार्य ना कारणकर्ता । कांहीं च नव्हेसी ॥ ११ ॥ तें तुझें विस्तीर्णपण संत । निविड एकजिनसी शाश्वत । अखंडतेचा पाटा अभ्रांत । समान सारिखा ॥ १२ ॥ विश्वाभासाचें मूळ । नसे चि तुजमध्यें समूळ । तूं सत्यसनातन निर्मूळ । निःप्रपंचरूपें ॥१३॥ कैचें जग कोण केळेसी । जालें होतें हे कथा नेणसी । कैचें भवबंधन कोणासी । बंधमोक्ष कल्पना ॥ १४ ॥ ऐसियापरी निर्मळ । तुझें स्वरूप गा केवळ । सृष्टीचा आभास सकळ । तुजमध्यें असे चि ना ॥ १५ ॥ आकाशाची आदि निर्वाण । निःसंगता निरावरण । अद्वैतस्थितीनें संपूर्ण । तुझी स्वभावता ॥ १६ ॥ तया स्वरूपाघरीं शुद्ध । नसे बद्ध मोक्षता संभव । निरोपाधी ह्मणाया वेध । असेना वृत्तीचा ॥ १७ ॥ निजांग निर्गुण निर्मळ । नाहीं अनुभवासी स्थळ । सोहंभावना चळवळ । तेथें नसे चि कांहीं ॥ १८ ॥ हा तुझिये हृदयीचा पवाड । सांपडला विचार निवाड । आत्मबोधाचा उजियेड । आला निजदृष्टीसी ॥ १९ ॥ अखंड स्वरूपें साचार । माझे हृदयीं निरंतर । प्रकटिला आत्मसाक्षात्कार । आत्मोपदेशें ॥ २० ॥ ज्ञान त्रिपुटिरहित । उपदेशिलें अखंडित । निजप्रतिष्ठा अनंत । केली सद्गुरु अनंता ॥ २१ ॥ स्वरूपतेवरी निर्धार । केला माझा निजउद्धार । परब्रह्म निर्विकार । प्रतिष्ठिलें तुंवा ॥ २२ ॥ माझ्या स्वरूपाची नित्यता । तुझेनि प्रचित आली आतां । मी अनुभव ना अनुभविता । भिन्न नसे अनुभाव्य ॥२३॥ स्वरूपाची अखंडता । निवळली हृदयीं तत्वता । अभ्र जाउनी स्वभावता । गगनाची उरली ॥ २४ ॥ तैसें स्वरूप माझें मज । भेटविलें देउनी उमज । आठव विसराचें चोज । असेचि ना कांहीं ॥ २५ ॥ आठव विसर वृत्तीच्यामुळें । ते वृत्तीसी मी नातळें । जैसीं दृश्य जात सकळें । नातळे नभ ॥ २६ ॥ तैसें तुझें स्वच्छ स्वरूप । अकारातीत अरूप । कर्तव्याचा संकल्प । असे

स्वरूपज्ञानें तुजपासीं । वस्ती केली स्वयंभ ॥ १२ ॥ न सांगतां चि अकळ । तुज कळों लागलें सकळ । ब्रह्मनिष्ठ होसी केवळ । अंतर्निष्ठेनें ॥ १३ ॥ सनातन स्वरूपज्ञान । तुज प्रसन्न जालें आपण । सांगावें त्यापूर्वी उमजोन । राहिलासी तूं ॥ १४ ॥ या चि साठीं सांगणें घडे । तें तुवां जाणितलें निवाडें । मज समान तुझें एवढें । अवधान जाहलें ॥ १५ ॥ आतां कृपाळूपणें सांगणें । अळंकारासी चोप देणें । लडिवाळ स्वरूप स्थितीनें । होसी सप्रेम प्रीतीनें ॥ १६ ॥ तुझी अंतर्निष्ठा पाहतां । मज सुखी केलें तत्वता । तुझें श्रोतव्य हनुमंता । तें चि वक्तृत्व माझें ॥ १७ ॥ माझें वक्तृत्व ब्रह्मार्पण । व्यापकपणें तें संपूर्ण । तुझ्या श्रोतृत्वांत वसोन । असो स्वभावतेनें ॥१८॥ ऐकोन श्रीराम मधुरोत्तर। बोलिला भीमचमत्कारें । ह्मणे तुझे चि कर्तव्य निर्धारें । मजला बोलवी ॥ १९ ॥ एकपणीं स्वभावस्थिति । सनातन आत्मप्रचिती । केल्या आक्षेप कवणे रीतीं । हे कांहीं न कळे ॥ २० ॥ बोलों सिकविलें अपत्यासी । तितुकें बोलेल पित्यापासीं । चालों सिकविलें तयासी । तो तैसा चि चालेल ॥ २१ ॥ जीवन प्रवाहीं चालविलें । तें वाहेल त्या चि डोलें । येथें चालविल्यावरी आलें । सर्व कांहीं ॥ २२ ॥ न कळतां कळतां मज । आला पुसावयाचा उमज । तो लडिवाळपणें तुज । पुसावा वाटे ॥ २३ ॥ तूं कृपेचा केवळ सिंधु । जगद्गुरु अनाथ बंधु । पतितपावन हा प्रसिध्दु । महिमा तुझा ॥ २४ ॥ तत्वमसींच्या विवरें । मज बोधवावें उदारें । सप्रेम बोलोनी अत्यादरें । अभिवंदन केलें ॥ २५ ॥ सद्गदीत करुणास्वरें । कृपा भाकितसे त्या अवसरें । दयाब्धी संतोष अपारें । भरितें दाटलें ॥ २६ ॥ ऐक सर्वज्ञ प्रेमळा । प्रज्ञावंताची हे लीळा । प्रज्ञा विशेषें जिव्हाळा । जगऊं जाणसी ॥ २७ ॥ नित्यअवयासी अद्वैत । ऐसा चि असावा प्रज्ञावंत । पुढती पुढती तुझेनि चित्त । यदर्थी तोषयावें ॥ २८ ॥ तुवां आक्षेपिलें पूर्वी । निजतत्वाची पदवी । खंडित अखंडित केवीं । कैसा प्रकारीचें ॥ २९ ॥ तत्व जाणियां खंडित । बोध घडेना अखंडित । अखंडितासी नित्यान्वित । बोध घडे नि ना कीं ॥ ३० ॥ अखंडित अमृता

स्वयंप्रभेनें निर्मळ । पाहिलें डोळां ॥ ४६ ॥ तुझिये कृपेच्या बळें । अनुभव निधान सर्वळें । गाथलों संकल्प सांजवेळे । निरोदय रवि ॥ ४७ ॥ आतां ते चि दयेनें पूर्ण । सांगिजे तत्वमसि लक्षण । हनुमंतें प्रार्थितां दीनोद्धरण । सांगेल तत्वमसि विवरा ॥ ४८ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रार्थिला जगदाधीश । गुघन पर्वता तोश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४९ ॥ प्रथम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥



श्री

## सूर्य ६ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामतत्वमसि मूळ । तत्व वस्तू चि केवळ । सद्गुरुरूपें प्रांजळ । विश्वासी बोधिता ॥ १ ॥ प्रणव अभ्यंतर प्रमय । त्रिपुटीतीत निजप्रत्यय । त्रिपदद्वया निरोदय । आत्मस्वरूप ॥ २ ॥ हृदयस्थ स्वरूपें स्वयें । विस्तारला साक्षत्वान्वयें । भूमीजळ योग विस्मयें । जेवि बीज विरुढे ॥ ३ ॥ तैसा हा आदि विश्वबीज । ज्ञानस्वरूपी सतेज । विश्वाकारें निजउमज । विस्तारला ॥ ४ ॥ मूळीं दळीं पुष्पीं फळीं । दाविली रूप नव्हाळी । शोभा आणिली आगळी । आपआपणांत ॥ ५ ॥ नाना कळा सूत्रें विचित्रें । नाचविली देहयंत्रें । विश्वलाघवी मूळमंत्रें । विश्वासी चेष्टवी ॥ ६ ॥ विचित्र होऊनियां जग । त्रिगुणें क्षोभवी सवेग । सत्तेनें चालवी प्रसंग । योगक्षेमाचा ॥ ७ ॥ विपत्तीसी वारूनि अर्व । प्रसन्न होऊनि अपूर्व । सांभाळिसी दयेनें सर्व । प्रकारें जगासी ॥ ८ ॥ जगद्गुरु मूळपुरुषा । बोध तत्वमसि प्रकाशा । महावाक्य प्रतिष्ठा ईशा । बोधवीं मज ॥ ९ ॥ कवणें कवणासी कैसें । प्रबोधिलें तत्त्व कोण्या उद्देशें । तत्त्व भिन्न किं अभिन्न ऐसें । कळलें पाहिजे ॥ १० ॥ ऐकोनी भीमआक्षेपवचन । संतोषला कृपानिधान । ह्मणे पुसों जालासी सज्ञान । शिष्य शिरोमणी ॥ ११ ॥ तत्व पारंगत होसी । विदित हृदय तेजोराशी ।

तयाचें अंतर्याम। ह्मणे हा अवधानी परम। पवाडला सुखें ॥ २ ॥ सर्वांग श्रवणा ऐकें। स्वसुखाचेनि कौतुकें। बोलिजेल रहस्य तितुकें। तें चि होऊनि राहें ॥ ३ ॥ कासियासी अर्थ ऐकावा। श्रोता चि अर्थरूप व्हावा। तेविं स्वयंभ प्रत्यय यावा। स्वानंदेसीं ॥ ४ ॥ जैसा शब्द अर्थ घन। अर्थ न करितां चि अर्थ पूर्ण। तैसें प्रचीतीनें श्रवण। व्हावा तो शब्दार्थ ॥ ५ ॥ हनुमंत ह्मणे तुझी दया। अर्थरूप करी ह्रदया। मी सर्वस्व लागलों तव पायां। तेव्हां चि पावन मी ॥ ६ ॥ अभिवंदनी कृतार्थ मी। कोण विवरेल ब्रह्मासि। मीपणाच्या अभावें ऊर्मी। प्राप्तीची न साहे ॥ ७ ॥ मीपण निरसिलियां सहज। निःशब्दासी आलें गुज। अवचट प्राप्ती पदांबुज। आंतुडले मजला ॥ ८ ॥ वरी विशेष कृपेनें। स्वामीचीं बोधामृतवचनें। नित्य तृप्तीसी पारणें। होतसे स्वसुखें ॥ ९ ॥ सद्गुरु अमृत ईक्षणीं। पुरतसे सायोज्याची धणी। निल स्वानंद भरणी। भरतसे ह्रदयाब्धिसी ॥ १० ॥ जाला निजदैवांचा उदय। तुझा अनुग्रह मजला होय। स्वसुखसिंधूसी विस्मयें। कल्लोळ चालिले ॥ ११ ॥ अवधान करूनियां वाड। राहें निःशब्दे चि अर्थी जाड। वडामोडीनें पवाड। प्रमयवचनीं ॥ १२ ॥ अरे तत्पद ह्मणिजे ब्रह्म। परि तो त्वपदाचा चि अनुक्रम। आत्मदृष्टीनें परम। परदृष्टी पवाडे ॥ १३ ॥ आधीं आत्मतेसी सांभाळीं। तो पावे निल सुखाची नव्हाळी। आत्मविसरें समूळीं। चुकीनें अप्राप्ती ॥ १४ ॥ तो आपणासी चुकला। तो सर्वस्वासी मुकला। अज्ञाच स्थितीनें आंचवला। स्वात्मसुखासी तो ॥ १५ ॥ असो तत्पदाच्या विचारें। तूं तुज चि विवर वा रे। मागि दिघेनी निर्धारें। अवलोकी तत्पद ॥ १६ ॥ पैल तें दुरूनि दिसतें। पाहणारें एकासि सांगावें तें। बरा पाहें त्या पैलिकडे ते। ते चि तें शाश्वत ॥ १७ ॥ ऐसें श्रुतीचे संकेतार्थ। स्वरूपलक्षणे ध्वनितार्थ। कल्पनेच्या योगें परमार्थ। आस्तिक्य प्रतिष्ठा ॥ १८ ॥ आपुले कल्पनेंत आलें। जाणावें तें परोक्ष जालें। जाणिजे तें अवगमलें। अपार जन्हीं ॥ १९ ॥ ह्रदय सिंधूंत बुडी। देऊनि आस्तिक्यता न काढी। तंवरी बाह्यदृष्टीची प्रौढी। जाणिजे गौण ॥ २० ॥ सर्वज्ञ

स्वरूप । बोधाचा कायसा संकल्प । खंडितासि माया कल्प । विकल्प चि असे ॥ ३१ ॥ आत्मबोधा चि कुंठित । करावयासी युक्ति वक्तव्य । आक्षेप देखोनी उचित । तोषली निजवृत्ति ॥ ३२ ॥ ऐसा आक्षेप जो करूं जाणे । तो सर्वज्ञ शिरोभूषण । प्रकाशाया सूर्यप्रभेने । प्रसिद्ध संत सृष्टीसी ॥ ३३ ॥ सर्वज्ञ सूर्याचा ईश्वर । अनुभव दीक्षेचा दातार । स्वरूप ज्ञान रत्नाकर । स्वसुख कल्पतरु ॥ ३४ ॥ आजि बोधाचें सार्थक जाहलें । आजि स्वरूपतेसी कृतार्थ केलें । आजि स्वसुखासी दिधलें । स्वराज्यसुख ॥ ३५ ॥ आजि अनुभवाचें पिकलें गुज । सायोज्यतेसी आलें तेज । आजि निःशब्दासी बोज । लागलीं वक्तृत्वाची ॥ ३६ ॥ ज्याकारणें इतुकें काजे । तें प्रयोजन जालें सहजें । आजि साक्षात्कार ध्वज । उभविलें तुंवा ॥ ३७ ॥ भीम आक्षेपाच्या हरिखें । श्रीराम सुखावला आत्मसुखें । भीमासी प्रशंसुनी स्वमुखें । सांगे तत्वमसि ज्ञान ॥ ३८ ॥ तत्वमसि कळायास्तव । जाल्या ग्रंथी कोटी संभव । गुरुशिष्य बोधविभव । नाना साधनें ॥३९॥ सत्वसंपदा सद्भाव । भक्तीची सुखें अभिनव । तपश्चर्या तीर्थें सर्व । हटयोग प्रवर्तले ॥ ४० ॥ व्रतें तपें दानें सृष्टी । सन्मार्ग सत्क्रिया कोटी । तत्वमसि कळाया साटीं । उपाय प्रवर्तला ॥ ४१ ॥ अलभ्यलाभ अनायासीं । विवरतां ते तत्वमसि । आतां अवधारीं निश्चयेसी । तत्वमसि अभ्यंतर ॥ ४२ ॥ इति श्री भीमोपदेश । आक्षेपें चि जाला तोष । परा अभ्यंतर सावकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४३ ॥ द्वितीय कळा २ ॥ राम ॥ राम ॥ राम ॥



श्री

## सूर्य ६ कळा ३

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम महावाक्य बोधक । स्वरूप ज्ञानाचा शोधक । उद्बोधें जगवेधक । भेदक भ्रांतीचा ॥ १ ॥ अवधानीं वसतां भीम । जाणोनी

तयाचें अंतर्याम । ह्मणे हा अवधानी परम । पन्नाडला सुखें ॥ २ ॥ सर्वांग श्रवणा ऐकें । स्वसुखाचेनि कौतुकें । बोलिजेल रहस्य तितुकें । तें चि होऊनि राहें ॥ ३ ॥ कासियासी अर्थ ऐकावा । श्रोता चि अर्थरूप व्हावा । तेविं स्वयंभ प्रत्यय यावा । स्वानंदेसीं ॥ ४ ॥ जैसा शब्द अर्थ घन । अर्थ न करितां चि अर्थ पूर्ण । तैसें प्रचीतीनें श्रवण । व्हावा तो शब्दार्थ ॥ ५ ॥ हनुमंत ह्मणे तुझी दया । अर्थरूप करी हृदया । मी सर्वस्व लागलों तव पायां । तेव्हां चि पावन मी ॥ ६ ॥ अभिवंदनी कृतार्थ मी । कोण विवरेल ब्रह्मास्मि । मीपणाच्या अभावें ऊर्मी । प्राप्तीची न साहे ॥ ७ ॥ मीपण निरसिलियां सहज । निःशब्दासी आलें गुज । अवचट प्राप्ती पदांबुज । आंतुडले मजला ॥ ८ ॥ परी विशेष कृपेनें । स्वामीचीं बोधामृतवचनें । नित्य तृप्तीसी पारणें । होतसे स्वसुखें ॥ ९ ॥ सद्गुरु अमृत ईक्षणीं । पुरतसे सायोज्याची धणी । नित्य स्वानंद भरणी । भरतसे हृदयाब्धिसी ॥ १० ॥ जाला निजदेवांचा उदय । तुझा अनुग्रह मजला होय । स्वसुखसिंधूसी विस्मयें । कल्लोळ चालिले ॥ ११ ॥ अवधान करूनियां वाड । राहें निःशब्दें चि अर्थी जाड । घडामोडीनें पवाड । प्रमयवचनीं ॥ १२ ॥ अरे तत्पद ह्मणिजे ब्रह्म । परि तो त्वपदाचा चि अनुक्रम । आत्मदर्शनें परम । परदर्शी पवाडे ॥ १३ ॥ आधीं आत्मतेसी सांभाळीं । तो पावे नित्य सुखाची नव्हाळी । आत्मविसरें समूळीं । चुकीनें अप्राप्ती ॥ १४ ॥ तो आपणासी चुकला । तो सर्वस्वासी मुकला । अज्ञाच स्थितीनें आंचवला । स्वात्मसुखासी तो ॥ १५ ॥ असो तत्पदाच्या विचारें । तूं तुज चि विवर बा रे । माजि रिघोनी निर्धारें । अवलोकीं तत्पद ॥ १६ ॥ पैल ते दुरूनि दिसतें । पाहणारें एकासि सांगावें तें । वरा पाहे त्या पैलिकडे तें । तें चि तें शाश्वत ॥ १७ ॥ ऐसें श्रुतीचे संकेतार्थ । स्वरूपलक्षणें ध्वनितार्थ । कल्पनेच्या योगें परमार्थ । आस्तिक्य प्रतिष्ठा ॥ १८ ॥ आपुले कल्पनेंत आलें । जाणतें तें परोक्ष जालें । जाणिजे तें अगम्य । अपार जन्हीं ॥ १९ ॥ हृदय सिंधूंत बुडी । देऊनि आस्तिक्यता न काढी । तंवरी वादवर्णाची प्रौढी । जाणिजे गौण ॥ २० ॥ सर्वज्ञ

स्वानुगमीं जन । जाणती आत्मरत विज्ञान । परोक्ष ज्ञानें प्रमाण । तिसुके शास्त्रीय ॥ २१ ॥ आत्मज्ञानाची सखोलता । नेणोनियां तन्वता । परोक्ष दर्शनें पाहतां । ब्रह्मज्ञानी म्हण ॥ २२ ॥ मूर्तांसी धरूनि प्रमाण । पाहती निराकार निर्गुण । गगन आनित्यता धरून । मग परिस्थिती ॥ २३ ॥ गगनासारिखें उदास । पार नसे अप्रांतास याचादर्शनें स्वरूपास । भिन्नपणें देखती ॥ २४ ॥ नेहटुनी जाणीव डोळ्यां । पाहती निर्मळ निश्चळ्या । द्रष्टेपणाचा सगळा । भेद तया चि पासीं ॥ २५ ॥ अद्वैतासी त्या द्वैतदृष्टी । पाहोनियां नभाचे पोटीं । जाणिवेचीं उभराटीं । दृष्टि धरिती ॥ २६ ॥ रिघोनी अंतराळाचे पोटीं । परतोनी पाहती सृष्टी । ते नव्हे परात्री दृष्टी । मडामोडी वृत्तीची ॥ २७ ॥ आपणांत रिघोनी आपण । पाहतयासी निःशेषपणें । पाहो जाणे तें देखणें । परतले दृष्टीचें ॥ २८ ॥ ब्रह्मास्मीचें स्फुरण । मूळींचे मूळीं परतोन । पाहतां कांहीं एक पण । तुमसे चि तेथें ॥ २९ ॥ परतले दृष्टि अगोचर । तें चि जाण तूं उत्तरोत्तर । तत्पदाचा निर्धार । आतां कवणेपरीं ॥ ३० ॥ कल्पांपासूनि होय निर्धार ॥ त्या तत्पदासी म्हणावें ईश्वर । ज्ञान घन ब्रह्माकार । त्याची स्वभावता ॥ ३१ ॥ त्या तत्पद ईश्वरासी । जाणावें कैसें मानसीं । तरि तेहीं विवंचनेसीं । ऐक आतां ॥ ३२ ॥ गाळींव सुरा व्योमाकार । पाहतां आपुलें अभ्यंतर । तें चि जाणिजे निरंतर । जगाचें हृदय ॥ ३३ ॥ संपूर्णता आणि सत्ता ज्ञान । सर्वगत तें अधिष्ठान । आकाश पाताळ व्यापून । त्याहीं परतें असे ॥ ३४ ॥ हा ज्ञानामाजि अवकाश । ज्ञानी गमे निरावकाश । तें ज्ञान आपुलें विशेष । ब्रह्मज्ञान त्यामाजि गमे ॥ ३५ ॥ ब्रह्माकारें अपार पाहा । पैसावला तो भेद महा । संस्कार जाणिजे हा । मायामय ॥ ३६ ॥ तत्पदाचें निजहृदय । पाहतां भेद चि दिसोनि ये । केवळ तत्पदासी प्रत्ययें । अवधारीं आतां ॥ ३७ ॥ तत्पद शुद्ध सदोदित । मीपणाचे त्रिपुटीतीत । द्रष्टा साक्षी ना इत्थंभूत । भावना चि नसे ॥ ३८ ॥ ऐसें तत्पद अमळ । प्रत्ययासी आणी तूं केवळ । या चि अर्थे बरा निवळ ।

अवधानी आतां ॥ ३९ ॥ ऐसियापरी श्रीरघुराजें । प्रांजळज्ञान - सतेजें । कपी सत्तमाप्रति सहजें । सांगिजेल तें अवधारा ॥ ४० ॥ इति श्री भीमोपदेश । अपरोक्ष सूचना संतोष । परापरशोधविशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ षष्टम सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥



श्री

## सूर्य ६ कळा ४

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामतत्पदसंकेतें । अपरोक्ष हृदय निरुतें । प्रचीतीनें हनुमंतातें । बोधिता जाला ॥ १ ॥ अगा जे वेदीं प्रशंसिलें । शास्त्रीं प्रसिद्धीसीं आणिलें । परंपरेनें अनुग्रहिलें । विधिं यया ॥ २ ॥ ते तत्पद परब्रह्म । प्रसित्यतेचें परंधाम । अनंत सित्व अंतर्याम । अनुभविती ॥ ३ ॥ योगी उपरमोनि योगा । अनुभविती निजांगा । संगातीत अंतरंगा । पावले मननें ॥ ४ ॥ उपदेशाचा अनुक्रम । अंतरप्रचीतीचें वर्म । तत्वं असि परम । अनुभवि पाहें ॥ ५ ॥ कां जे प्रसित्यतेनें जगीं । उपदेशित आले त्या लागी । शब्दयुक्ति प्रज्ञा आंगीं । अस्तित्यता गहन ॥ ६ ॥ स्थूळ देहाच्या विवरें । सारूनि तच पसारे । जाग्रतीच्या चि निर्धारे । वासनेंत रिघोन ॥७॥ वासनेचीं पंचवीस तत्वें । पाहोनि साक्षत्व सत्वें । उपरमोनि साक्षत्वें । त्यागावें भवस्वप्न ॥ ८ ॥ अवस्थेतीत सुघटाव । सरोन पदार्थ आठव । पदार्थाभाविनी अंतर्भाव । घ्यावा कारणीं ॥ ९ ॥ कारणीं जगत्कारणें । विरुदली स्वानंदजीवनें । सुखाब्धींत बुडोनि तेणें । निर्मुळें करावीं ॥ १० ॥ अंतर्सुखाचिया वोवरींत । अवस्थातीत अश्रांत । प्रवेशोनि सुखें निवांत । निजावें निजांगतल्पीं ॥ ११ ॥ बाह्य वृत्तीचा नलगे वारा । ऐसा निवांत सुखनिवारा । अवस्थेतीत वनचरा । तेथ पवाडिजे ॥ १२ ॥ निर्विकल्प समाधी मंदिर । वसवावें सुखें साचार । प्रवृत्तीचें देउनि द्वार । भोगावें निवृत्तिसीं ॥ १३ ॥ असंप्रज्ञात सहा

समाधि । जंवचरि भोगिली नाहीं स्थिती । तंवंवरी अद्वैत उपलब्धी । जाण व्यर्थ चि ते ॥१४॥ धरूनि अद्वैत अनुसंधान । केलें ग्रंथ कोटी कथन । समाधि उपलब्धि वांचुन । व्यर्थ तितुकें ॥ १५ ॥ नाहीं स्वसुखाचा जिव्हाळा । नाहीं सहज स्थिति चिन्कळा । तो जाणिवेचा चि चाळा । वाचाळ जाणिजे ॥ १६ ॥ स्वरूप साक्षात्कारीं ज्ञान । जो सुषुप्तींत सावधान । निर्विकल्प समाधि सुखघन । सर्वदां सेवी ॥ १७ ॥ प्रत्यक्ष देहीं देहातीत । स्वरूप अनुभविना संत । तंवचरि वाउगा चि आक्रांत । करी विस्पर्त्तांच्या सोसें ॥ १८ ॥ स्वरूपीं उपरमलें मन । प्रचीतीसि आलें उन्मन । निरंतर समाधान । चळेना त्याचें ॥ १९ ॥ कारणीं सर्व देह विसर । कारणीं सर्व संगापर । कारणीं सर्वस्व विकार । निर्विकार होती ॥ २० ॥ प्रत्यक्ष निद्रेमाजि जग । हारपोनि जाय सवेग । ते निद्रेचि भूमी धरूनि सांग । साक्षी व्हावें निद्रेचें ॥ २१ ॥ निद्रारूप येक अवस्था । ते आपुलीच वृत्ती पाहतां । तेणें साक्षत्वें तत्वता । वृत्ति नव्हे चि कीं ॥ २२ ॥ येवं वृत्तीचें जात्य लक्षण । जागृतीचें पदार्थ ईक्षण । सुषुम्नायोगें परिक्षुन । बरें पाहावें ॥ २३ ॥ जागृती करितां स्वयें जागृत । निद्रे करितां होय निद्रिस्त । तो आपण केवि निभ्रांत । जीवीं वोळखावा ॥ २४ ॥ निद्रा जागृतीसी जाणे । तो द्रष्टामूळ वृत्तिगुणें । शून्य अवस्थेंत तेणें । बुडी दिधली ॥ २५ ॥ तिहीं अवस्थेंत समान । चौथी अवस्था पैं जाण । चतुर्थावस्था सत्य । निरंतर मह्मीं ॥ २६ ॥ जगत्कारणाची कारण । चतुर्थावस्थेसि जाण । अज्ञान विश्वकारण । प्रसवली ते ॥ २७ ॥ विश्वाभासाचें केवळ बीज । नसे प्रवृत्ति निवृत्ति उमज । त्या शुन्य अवस्थेत सहज । निजजागृतीसीये ॥ २८ ॥ निज जागृतीच्या निर्धारें । महां शून्यांत संचरें । शून्य अवस्थेंत चमत्कारें । घे निर्विकार समाधि ॥ २९ ॥ ऐसें प्रबोधितां तत्पद । मारुतीसी घटावला आनंद । कारणी स्वानंदकंद । रिघाला सुखें ॥ ३० ॥ तेणें स्वानुभवें अंकुरेल । घेउनि स्वानंदाचि बोल । सहज स्थितिनें सखोल । सांगेल भीम प्रचिती ॥ ३१ ॥ तत्पद बोधितां अकळ । स्वसुखें जाला अचळ । राहिली देहिची चळवळ । बेधला तादत्म्यतेनें ॥ ३२ ॥ समान

स्वरूपीं संचरणें । तटस्ततेचें आचरण । नित्य मुक्तता भरण । भरलें देहीं ॥ ३३ ॥ महा समाधीच्या भरें । भीम स्थिरावला निर्धारें । जाणोनियां श्रीरघुवीरें । सावरिलें ते वेळे ॥ ३४ ॥ स्वानंद सिंधुत ह्मतिकारण । स्वभावें जातां विवरोन । प्रचीतीच्या हस्तीं धरून । काढिला वरी ॥ ३५ ॥ ऐसिया प्रचीतीचे बोल । बोलावया कवण अक्षेपिल । आत्मसुखाचे च्याडेनें सखोल । हृदयें कळवळिला ॥ ३६ ॥ स्वानंद सिंधुत सहज । बुडोनि गेलियां कपिराज । मग बोलवयासि आत्मगुज । पात्र कैंचें मजला ॥ ३७ ॥ अवस्थारोधें वज्रकाया । थापटुनि बोधकरें तया । ह्मणे अवस्था वेध सखया । कां वेधसी तूं ॥ ३८ ॥ अवस्थावेध तरी नसावा । देहाच अभास सर्व जावा । स्वभाव स्थितीनें व्हावा । आनंद घटाव ॥ ३९ ॥ या चि उमजें तूं उमज । तत्पद निवेदीन तुज । गुरुत्व हें सहज चोज । निजतेजें अनुभवीं ॥ ४० ॥ ज्ञान सतेज जागृती । देउनि आणिला बोध प्रचीति । श्रवणीं बैसला मारुति । तें चि आतां अवधारा ॥ ४१ ॥ इति श्रीभीमोपदेश । कारण सुखीं प्रवेश । निर्विकल्प समाधि प्रकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४२ ॥ पद्मम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

---

श्री

## सूर्य ६ कळा ५

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीरामस्वरूपीं निमग्न । जाला निजांग देऊन मुख्यप्राण । असंप्रज्ञात समाधीनें पूर्ण । घुमारला आंगीं ॥ १ ॥ शब्दानुविधि महास्थिति । श्रीरामबोध सत्ताप्रचीती । स्वरूप दशानुवेध विश्रांति । पावला सहज ॥ २ ॥ निर्विकल्प समाधि दृढाव । तटस्ततेचा वेधस्वभाव । महत्सुखाचा तोष घटाव । घटावला देहीं ॥ ३ ॥ आनंदाविर्भूत शरीर । महद्भुतें घेतलें निजविव्हार । गिळिली वाचा देहसंस्कार । निःशेष उडाला ॥ ४ ॥

अंतर्सुखाचें भरण भरे । निष्कंप कांपो लागे जेवि शरें । पिंजारली रोमावळी पांघुरे । चिदंबरसुखें ॥ ५ ॥ सहज आणि वेध अवरोध । देहीं अवतरे रुद्र प्रसिद्ध । सौम्यदर्शनें भ्यातुर प्रबुध । रामस्तवनें उठे ॥ ६ ॥ सच्छंदें महा गर्जवी नभ । गुर्गुरी भयानक अक्षोभ । महा मूर्छित दर्शनें स्तंभ । अचेत क्षितिवरी पडे ॥ ७ ॥ बोधें निर्वेध जाला भीम । राहिला निश्चळ जैसें व्योम । काया काष्ठापरीं निष्काम । स्तंभावली सुखें ॥ ८ ॥ जें जन्मीं देखिलें नव्हतें । जें ऐकिलें चि नाहीं सुखनिरुतें । तें श्रीरामकृपेनें कर्पातें । प्राप्त जालें अवचट ॥ ९ ॥ विसरला वाह्यसभेची प्रौढी । विसरला तारतम्याची रुढी । विसरला देहभाव गाढी । दशादेहीं प्रवर्तली ॥ १० ॥ महा सुखाच्या अतिशयें । साष्टांगभावें दंडवतस्वयें । निजसंस्कार भक्तिच्या निश्चयें । रामपदीं जडला ॥ ११ ॥ मिठी पडली स्वरूपसंयोगें । विराला निःशेष अंतरंग । श्रीरामकृपेच्या अनुरागें । लक्षिला नयनी ॥ १२ ॥ कळवळिलें कृपेचें अभ्यंतर । कृपा पद्मकरें वारंवार । पाठि कुरवाळुनि अभयंकरें । कर मस्तकीं ठेवी ॥ १३ ॥ आठवी निजबोध मेळा । क्षणें हा प्रसन्नदर्शनाचा उमाळा । न संटेचि हृदईं लीळा । अभिनव हे ॥ १४ ॥ या स्वरूपदर्शनाची कवणपरी । सांटवण नसे अंतरीं । अग्नि संपर्कें क्षीर वरिवरि । प्रमाणासि टाकी ॥ १५ ॥ तैसा हा महत्सुखाचा उत्त । ताटस्थतेनें अविर्भूत । यासि आवरितां काहींयेक हेत । असे चि ना येथें ॥ १६ ॥ सद्गुरुबोध आंगीं भरला । तो आनंद सिंधुत रिघाला । सावरील कवण त्याला । कवण्या युक्तीनें ॥ १७ ॥ कां भूत प्रयोगिलें जेणें । भूत निवृत्ती करावी तेणें । अज्ञान निवृत्ति कारणें । प्रेरिलें ज्ञान अद्भुत ॥ १८ ॥ जंवरी अज्ञान लेश असे । तंवरी ज्ञानातिशय दिसे । अज्ञान निरासें नुमसे । ज्ञानाचा लेश ॥ १९ ॥ ऐसें आठऊनि अभ्यंतर । सुषुम्नेचा धरूनि धर । तटस्थ वेध जिव्हार । घेता जाला स्मरणें ॥ २० ॥ सूर्योदय जालियांवरी । नसे चि अंधकारासि उरी । तैसें आत्माराम जागे घरी । बोधें कपींद्रासि ॥ २१ ॥ आंगोआंगीं सुखें संचरोनि । ज्ञानसूर्यकर स्पर्शोनि । कपीचक्षु कमळें विकसुनि ।

दर्शन दिधलें ॥ २२ ॥ अगा ऐकतोसि मम हृदया । स्वरूपावबोधें वेधुनियां । अचेत दर्शनें काया । कां अवरोधिली ॥ २३ ॥ हें अवचट दर्शेचें वारें । अवरोधी काष्ठाकारें । महदद्भुत झडपणीचें संचरे । अद्भुत वेध आंगीं ॥२४॥ आतां सर्वज्ञा उमज । हा अवराध कासया तुज । सहज स्वरूपें चि समज । निर्बुजों नको येणें ॥२५॥ सहज स्थितीचें सुख अपार । संप्रज्ञात समाधी साचार । सद्गुरु भजनेंसिं साक्षात्कार । महत्सुखें होती ॥२६॥ ऐसें अनुग्रहितां श्रीरामें । उमजला रुद्र सप्रेमें । नयनीं पाझर चालिले सुधर्में । चमत्कारला चित्तीं ॥ २७ ॥ जैसा सुषुप्तीचा अवचट । जागृतीसी आठव ये स्पष्ट । सद्वतीत मानसें उत्कट । भीम श्रीरामासि वंदी ॥ २८ ॥ श्रीरघुवीर ह्मणे महारुद्रा । तत्वमसि विवरें ज्ञानचंद्रा । तत्व प्रतीतीनें सुखसमुद्रा । बोलें भरणभरी ॥ २९ ॥

श्लोकः—ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनां ।
नैवास्ति किंचित्कर्तव्यं अस्तीचेन्नसतत्ववित् ॥ १ ॥

सस्वरूपदर्शनें शाश्वत । वर्धला देहसंस्कारें क्षोभित । गुरुकृपेनें वाक्यसंकेत । आत्मत्व लाधला ॥ ३० ॥ ते तूं ह्मणतां वचनें । भिन्न नसे परोक्षपणें । आस्तिक्य स्वभाव स्थितीनें । चमत्कारला सुखें ॥ ३१ ॥ तूं आहेसि कैसा पाहे । विचार घेतां कांहीं च न राहे । मीपण जाउनि निवांत होय । प्रत्यय असिपदाचा ॥३२॥ हे ज्ञानाची कडसणी । ज्ञान त्रिपुटी येकपणी । कडोविकडीनें जाणोनि । उगव करावा ॥ ३३ ॥ ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान । तत्वमसींत रूप जाण । ज्ञातात्वंपद होऊन । ज्ञेय तत्पद जाणे ॥ ३४ ॥ ज्ञान तें चि असिपद स्थिति । स्वानंदघन आत्मप्राप्ती । असिपदीं महा विश्रांती । होय निजानुभव ॥ ३५ ॥ त्वंपदीं जीवशिव रूढले । तत्पदीं आत्मत्वें निवळले । क्षराक्षर भाव गेले । तत्पदयोगें ॥ ३६ ॥ तत्पदींच साक्षात्कार । जीव होय सुखें चि ईश्वर । तत्पदीं असिपद उद्धार । अभिन्नयोगें ॥ ३७ ॥ येवं तत्पद आणि त्वंपद । सोहंभावें निर्द्वंद्व । आत्मानुभवें स्वानंद । असिपदीं जाला ॥ ३८ ॥ स्वानुभवाचें निजतेज । ज्ञान ईश्वराचा उमज । तत्वमसि जीवशिव निज । ज्यासिं रूढले ॥ ३९ ॥

प्रचीतीच्या निजसुखें । प्रतिक्षणी जाण उल्लेखें । महावाक्य निवळसुखें । निवळ होईं मारुती ॥ ४० ॥ येथें कृपा वसुमति नृप । बोधुनि तत्वमसी रूप । सांगतां जाला स्वरूप । केवळ निजस्थितीनें ॥ ४१ ॥ केवळ अनुभव निरूपण । देऊन अवधानाचा श्रवण । अवधारिजे सावधान । श्रोतीं सादर ॥ ४२ ॥ इति श्री भीमोपदेश । तत्वमसि अल्याविशेष । निरोपिलें तत्व सारांश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४३ ॥ षष्टम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥



श्री

## सूर्य ६ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामस्वरूपाचें ज्ञान । श्रीराम प्रचीत निधान । श्रीराम तत्वता अवधान । सायोज्यतेचें ॥ १ ॥ अविनाशरूप अस्तिक्यता । इति सुख स्वयें वस्तुता । अनुभव सुख अखंडता । सहज स्थितीनें ॥ २ ॥ अर्थ आणि अर्थज्ञान । पाहतां द्वैत अनुसंधान । येथें अभिनवाचें कारण । आत्मारामीं स्वयंम ॥ ३ ॥ नसतां द्वैताद्वैत संधी । नित्य स्वरूपीं निरावधी । स्वबोध आत्मउपलब्धि । अभेद आश्चर्ये ॥ ४ ॥ ज्ञान त्रिपुटीरहित । स्वरूप स्वभावें अद्वैत । अभेद प्रचीति अनुभवीत । ज्ञान अभिनव तें ॥ ५ ॥ अरूप रूपासी दंखें । आले अपरोक्ष ज्ञानडोळे । दृश्य त्रिपुटीतीत सोहळे । पुरले द्रष्टेविण ॥ ६ ॥ चक्षुचक्षूतें चि पाहे । गुरुईक्षणें चि ऐसें होये । आत्माराम नित्यात्मा पाहे । नित्यानुभव ज्ञानें ॥ ७ ॥ उपदेशक्रम अद्वैत । सद्गुरुचें करणें अद्भुत । बोधक बोध आत्महृत । भेदातीत बोधविलें ॥ ८ ॥ ऐसी बोधाची अभिनवता । बोधविलें हृदयस्था । आपआपण अनुभविता । बोधवी आपआपणा ॥ ९ ॥ अभेद ज्ञानाचा बोध । अभेद अनुभव सिद्ध । अभिन्न अवधारिता वेध । असे सद्गुरु कृपेनं ॥ १० ॥ निजवेधें वेधली वृत्ति । अचट सरली प्रवृत्ति । निःसंगानुभव निवृत्ति ।

स्थिरावली ॥ ११ ॥ आत्मसमाधान केवळ । निरतिशय सुख जालें निवळ ।
विरोनी गेलें तात्काळ । महा अद्वैत वेधें ॥ १२ ॥ महाअद्वैतवेधामाझारीं ।
स्वानुभवाची ल्हहरी । स्वानंदसिंधुभीतरी । सामावली दशा ॥ १३ ॥ ऐसा
अनुभव जयासी । देहीं वर्ततां स्थिती कैसी । अवधारीं गा निश्चयेसीं ।
भवांतक भीमा ॥ १४ ॥ भवभयउपशमन । तुझ्या नामाचें चि महिमान ।
तुझ्या स्वरूपाचें चि ज्ञान । तूं चि अनुभविसी ॥ १५ ॥ महा अद्वैत
भीम प्रचीति । प्रशंसितां होय भवशांति । काळदमन तुझी विख्याति ।
बोध सृष्टि भर्गा ॥ १६ ॥ माझे हृदयींचें ज्ञान । प्रचीतींचें समाधान ।
अनुभव स्वानंदघन । प्रगट भीमाकृती ॥ १७ ॥ स्वरूपानुभव शाश्वत ।
तो तूं प्रत्यक्ष हनुमंत । अद्वैत बोध सिद्धिसंत । सिद्धशिरोभूषणा ॥१८॥
महाअद्वैत अवधानीं । राहोनी स्वरूपानुसंधानीं । माझ्या हृदयासीं
तोपउनी । घेसी अद्वैतबोध ॥ १९ ॥ पाडसाचे झटे लागतां । धेनुसी
पान्हा ये अवचितां । सप्रेम तूं अक्षेपिता । अद्वैत ज्ञान प्रगटे ॥ २० ॥
अद्वैत ज्ञानासी अधिकारी । होसी त्रिगुण त्रिपुरारी । भवसंकल्प शंबरारी ।
तव कटाक्षें चि वारला ॥ २१ ॥ कल्पना काळांतकरूपें । प्रगटलासी
आत्मस्वरूपें । गुरुदीक्षा कृत संकल्पें । प्रशंसिली तुवां ॥ २२ ॥ तूं
जगद्गुरु होसी स्वयें । जगदाथ तुझें हृदय । स्वानंदघन निजप्रत्ययें ।
बोळ आतां मारुती ॥ २३ ॥ सुखें वेधलासी निर्वाण । जालासी
स्वरूपाचा प्राण । स्वरूप अनुभवें आपण । आपणांत रिघसी ॥ २४ ॥
तुझिये प्रचीतीनें जगतरे । आनंद सर्वत्र अवतरे । भवाब्धीचें उतरें । तोय
अनिवार ॥ २५ ॥ संकल्प असतवे अकळ । होय विकल्पाची सांजवेळ ।
अद्वैत अखंड मंडळ । अनुभव प्रगटे ॥ २६ ॥ अद्वैत सुखीं च राहतां ।
विश्व तरेना महंता । विश्वासी प्रबोधीं आतां । निज दीक्षेनें ॥ २७ ॥
सत्‌चित्सुखाच्या भरें । निजजागृतीसी अवतरें । स्वरूपीं करीं चेहरें ।
दीक्षेनें जगासी ॥ २८ ॥ जन्मासी आलियाचें सार्थक । कीजे अध्यात्म
विवेक । निज प्रचीतीनें निश्चयात्मक । जगासी तारावें ॥ २९ ॥ स्वयें

तरोनी जग तारी । तो परमात्मा अवधारी । मी तयाचें दास्य करीं । देहधारी होउनी ॥ ३० ॥ त्याचा सहवास त्यागे गोड । पुरे अद्वैताचें कोड । ऐसें बोलतां सुख वाड । सुरवाडे दशा ॥ ३१ ॥ त्याच अक्षरतीसी येउनी । हें सुख भोगिना जनीं । तरी तेणें जन्मा येउनी । जननी कष्टविली ॥ ३२ ॥ नरदेहीं गुरुकृपा होय । प्रगटे प्रचीतीनें हृदय । अनुभव वचनें प्रमयें । विचारें कळती ॥ ३३ ॥ दुर्लभ तें सुलभ होय । ऐसा या देहीं च आहे उपाय । महावाक्य विचार स्वयें । सर्वहीं कळे ॥ ३४ ॥ आतां या चि निजप्रत्ययें । बोल मजसीं निज निश्चयें । ऐसा करुणासिंधु कृपातिशयें । गौरवीतसे कपीसी ॥ ३५ ॥ अवचट सुखाच्या विस्मयें । तटस्थ जाला होता तो स्वयें । वाक्य दिवाकर उदयें । जागृतीसी आणिला ॥ ३६ ॥ निजांग स्नानें सप्रचीत । नित्य बोधान्वित जागृत । सुखाच्या अतिशयें लागत । पदीं श्रीरामाचे ॥ ३७ ॥ त्राहें त्राहें पुढती पुढती । कृतार्थ जालो म्हणे मारुती । तुझ्या प्रचीतीच्या उक्ती । निवांत करिती सुखें ॥ ३८ ॥ जननीचे आंगीची तृप्ती । स्तनपानें बाळासी प्रचीति । तृप्ति पावोनि पुरती । तुंदिल होय सुखें ॥ ३९ ॥ तैसें तुझें कृपाळूपण । केलें अनुभवाचें परिपाळण । वर्धविलें बोसंगा घेऊन । तारक जननीयें ॥ ४० ॥ ते लडिवाळ माझें बाळ । बोलामी गौरविसी सखोल । ऐकसी देउनी सुखाचे डोल । कौतुक जनका ॥ ४१ ॥ माझे अल्प बोल बोबडे । आधीं च वनचर मी वेडें । नेणे युक्ति बुद्धि निवाडें । नसे बोलाची चातुरी ॥ ४२ ॥ ते जरी तुज आवडती । तरी मी बोलेन यथामती । कृपेने ऐक श्रीरघुपती । म्हणतसे कपींद्र ॥ ४३ ॥ इति श्री भीमोपदेश । अद्वैत ज्ञान सघोष । निर्वाळलें ज्ञान चित्प्रकाश । म्हणे मरु अनंत ॥ ४४ ॥ पथम सूर्य पथम कळा संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीराम ॥

श्री

## सूर्य ६ कळा ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सत्स्वरूप स्थिति । विज्ञान स्वयंभ प्रचीति । अद्वैत ज्ञान अद्वैती । आचार्तासी आलें ॥ १ ॥ डोळा ज्ञानाचें अधिष्ठान । डोळा आत्मा चि निजांगें पूर्ण । ज्ञान अपरोक्ष ईक्षणें । स्थितिलय दावी ॥ २ ॥ आत्मत्व स्वयंभ धरा । नित्य आस्तिक्य उभारा । महा अद्वैत जिव्हांरा । रिघोनी पाहतां ॥ ३ ॥ सच्छिष्या आंगीं सनातन । सद्गुरूचें स्वरूप ईक्षण । देऊन सत्स्वरूप ज्ञान । ऐक्यतेसी आणिलें ॥ ४ ॥ अखंडांत प्रचीतिनें । पाहतां उन्मन विश्रांतीनें । विरोनी स्वानंद सिंधूंत तेणें । प्रचीतीनें असे ॥ ५ ॥ जैसें निराळ कोण्ही एक । प्रसवे अमृतघन सुखात्मक । व्यापक होऊनी महा कौतुक । सांठवी हृदयीं ॥ ६ ॥ अंतराळ दुभलें क्षीरें । वदनेविण प्राशिलें जिव्हारें । महाअद्वैत निर्धारें । प्रचीति ऐसी ॥ ७ ॥ गुरुकृपामृत धाराधर । अद्वैत प्रचीति धरांबर । निरंतर सुखें अपार । वर्षों लागला ॥ ८ ॥ अवधान चातक होउनी । घेसी श्रवणाच्या वदनीं । परी अद्भुत करणी । दिसे चातकाची ॥ ९ ॥ दोनी च्यारी अवचट । सेविता जीवन थेंबुटे । त्या चातकाचें उतटे । हृदय तृप्तीनें ॥१०॥ नवल तुझें चातकपण । सुखामृत सगळा घन । वृष्टि करिया सहित पान । करुनी न धासी ॥११॥ ऐसें अप्रांत सुख सहजें । तुज प्राप्त जालें उमजे । तेणें अनुभवें चि चोजें । बोल आतां प्रचीती ॥१२॥ स्वसुखाच्या अतिशयेसीं । जरी तूं न बोलता राहसी । तर्‍हीं तूं कृतार्थ जालासी । यथार्थ कळलें ॥ १३ ॥ बोलतां अद्वैत प्रचीति । कदापि नय जाय मारुती । बोलतां न बोलतां आत्मस्थिति । संचली च असे ते ॥ १४ ॥ स्वानंदीं मज्जोनी सहज । उपशमला राहें उमज । ऐसे चि जालें पाहिजे गुज । सज्जन हृदयीं ॥ १५ ॥ सहज स्थितीनें बोलविलें । तरी सहज स्थितीचें जाहलें । साक्षेपें निर्माहिलें । तरी ते खोटें ॥ १६ ॥

पर्जन्याचा अतिशय होतां । जाण तुंबळती सरिता । युक्तीनें आवरितां । त्या आवरतील काय ॥ १७ ॥ सद्गुरुबोध जलधर । वर्षला हृदयभूमीसी अपार । अनुभवबोध निरंतर । वाहती सुख जीवनें ॥ १८ ॥ सायोज्यतेचा अंतर्भाव । सुखाचा ठेवा अभिनव । अधिष्ठान कैलासराव । सदाशिवरूप ॥ १९ ॥ महाअद्वैत अंतरस्थितीनें । वदनामृत गोडीनें । प्रसवलीं सुखाचीं वचनें । प्रचीतीनें स्वयंभ ॥ २० ॥ निजानुभवाच्या सुखें । अक्षरें चि उठिलीं हरिखें । कृपेच्या अतिशयें मुखें । अवतरलीं काय ॥ २१ ॥ श्रोता हनुमंत निजांगें । वक्ता आत्मारामयोगें । प्रमय अभेदां तरंगें । दोघे स्वयंभ जाले ॥ २२ ॥ वगतृत्वाची सरली चाड । श्रोतव्यें दिधलें कवाड । महाअद्वैत जाड । आलें निःशब्दासी ॥ २३ ॥ एवं श्रोता अद्वैत । महामौन्य रूढीसी येत । सभा अवघी तटस्त । महा अद्वैत वेधें ॥ २४ ॥ कारुण्य सिंधूची गरिमा । परवेधक बोध सीमा । श्रीरामवचनाचा महिमा । महा अद्वैत ॥ २५ ॥ निजप्रचीतीच्या तोषें । स्वसुखाविर्भूत आवेशें । बोलतां भीमासी परेशें । पार टाकिला ॥ २६ ॥ महाअद्वैत श्रीरामप्रचीति । देखोनी स्वानंदाची स्थिती । चमत्कारें परा चित्तीं । लज्जित जाली ॥ २७ ॥ संकोचोन सरली परा । आटला उन्मेशझरा । श्रोतव्य वक्तव्य जिव्हांरा । घेतलें तेणें ॥ २८ ॥ सहज स्थितीच्या आश्रयें । उन्मनी सुखावली विस्मयें । अकळ जागृतीच्या प्रत्ययें । नयनासी आली ॥ २९ ॥ अनुभव विश्वोद्भव रवी । अनुभव हृत्कमळें विकासवी । नेत्रजळें सजल जीवीं । आनंदाश्रू लोटती ॥ ३० ॥ पुलकांकित प्रेमभरें । नयन सरोवरींचे झरे । अष्टभावें अवतरे । सभामंडळ तें ॥ ३१ ॥ नित्य बोध सिंहासनीं । स्वरूपानुभव कारणीं । ज्ञानगभस्ती किरणीं । प्रकाशी बोध विश्वा ॥ ३२ ॥ श्रीरामकृपेच्या जागरें । भीम-अवधान अवतरे । म्हणे करुणासिंधु निर्धारें । प्रसन्न जालासी मज ॥ ३३ ॥ स्तवनाचें सरलें काज । प्रचीतीनें सावरिलें मज । तुझें हृदगींचा उमज । उमजलों तेणें ॥ ३४ ॥ आतां बोलतां तें गुज । मज काय न सरे काज । तुझ्या कृपेच्या तेजें सहज । बोलविलें तरी कां न

बोलें ॥ ३५ ॥ जगासी बोलविता कवण । क्रियेसी आलें जग कोठून । ऐसें विचारितां सज्ञान । रिघाले हृदयीं ॥ ३६ ॥ त्या हृदयाची घेतां शुद्धि । सुखें निवाले निरोपाधि । समाधिसुखें त्रिशुद्धि । पावन जाले ॥ ३७ ॥ तें हृदय घेऊन सखोल । लाधलों स्वानंदाची बोल । बोलासी बोलविती बोल । कृपेनें तुझिया ॥ ३८ ॥ अप्रांत सुखाच्या विश्रामा । प्रसन्न जालासी रघोत्तमा । सुखें परिपाळिलें आम्हा । अद्वैतबोधें ॥ ३९॥ तुझिया वचनामृतें धालों । तुझ्या कृपाकटाक्षें निवालों । मी प्लवंग परी अवतरलों । चिदानंद घन ॥ ४० ॥ सर्वोत्तमा दीनदयाळा । तरलों भवसिंधु लीळा । तुझा वगत्रुत्वजिव्हाळा । नित्य सुखासी वर्धवी ॥ ४१ ॥ करुणामृत कल्लोळें । बोल कृपेच्या सुढाळें । माझ्या अवधानाचे ळळे । कवण पुरवील ॥ ४२ ॥ जें बोलतां नये बोलासी । तें बोलिका तूं चतुर होसी । आजि कृपेनें बोलवासी । करी वर्षाव बोध ॥ ४३ ॥ इति श्री भीमोपदेश । फोडिली निःशब्द मांदुस । वाक्य रत्नाचा तो प्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४४ ॥ षष्टम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ श्रीरघुनाथाय नमः ॥ श्रीसदाशिवाय नमः ॥



श्री

## सूर्य ६ कळा ८

॥ श्रीकौसल्यात्मजाय नमः ॥

श्रीराम अभिनव स्थिति । तुझिये कृपेसी विख्याति । बोलविसी वनचराप्रति । महा अद्वैत गुज ॥ १ ॥ पाहतां मी शाखामृग एक । पाटेखाइर केवळ रंक । तुझे कृपेचें कौतुक । करिसी ईश्वर सुखें ॥ २ ॥ रंक पावतां सिंहासन । त्यासी च प्रशंसिती जन । गुरु अनुग्रहें सज्जन । गौरविती आत्मत्वें ॥ ३ ॥ तुझे कृपेचेनि बळें । फाटिलीं विकल्पाचीं गुळें । जाळिलीं ज्ञानानळें । दृश्यजात ॥ ४ ॥ तुझिये अंतरींची दशा ।

देऊनि मज परेशा । स्वरूपानंद विशेषा । लाधलों उपपत्ति ॥ ५ ॥
अमृततृप्तीनें उदर । देतसे सुखाचे ढेकर । तैसे तुझे कृपेचे उद्गार । येती
मजला ॥ ६ ॥ हृदयीं स्वानंद सागर । हेलावत सुख अपरांपर ।
अनुभवाचे निरंतर । हेलावे टाकित ॥ ७ ॥ तैसें तुझे कृपेचें भरण ।
स्वानंदघन कारण । हृदयासी येतसे स्फुरण । उद्बोध गर्जे ॥ ८ ॥
उद्बोधीं प्रबोध रूढे । उद्बोधीं युक्ति विरुढे । उद्बोधीं महातेज चढे ।
वाग्वल्लीसी ॥ ९ ॥ पदरीं अर्थ असतां अपार । देईल घेईल अनिवार ।
तयासी कांहीं विचार । करणें चि नलगे ॥ १० ॥ तेवि गुरुकृपेनें
साचार । ज्ञान निज हृदयीं थार । मग त्या प्रबोधें निर्धार ।
कीजेत भरोवरी ॥ ११ ॥ देतां घेतां अधिक वाढे । वृत्तींसी तोटा
होय निवाडें । नित्य उपजीविका घडे । तरी च बरें ॥ १२ ॥
गुरुकृपेनें अर्थसंपन्न । उदारचक्रवर्ती भूषणें । अनुभव वक्ता प्रवीण ।
पंचानन तो ॥ १३ ॥ जाला प्रबोध जीर्णोद्धार । उदेला आत्मसाक्षात्कार ।
निःशब्दाचें अभ्यंतर । उल्लेखासी आलें ॥ १४ ॥ औट मातृकामुख ।
भरला अखंडैकरस । विश्वहृदयें समरस । प्रचीति आली ॥ १५ ॥
अनिर्वाच्य बोध संगती । परा होउनि पश्यंति । मध्यमावैखरी स्थिति ।
प्रज्ञा वल्लवली ॥ १६ ॥ जय जय आदि पुरुषा श्रीरामा । केवळ
निजांतर्यामा । परात्पर परंधामा । वसविलें हृदयीं ॥ १७ ॥ विश्रांतिधाम
उदारा । तुझिये कृपेचा लाधलों थारा । सुखें चि बोलविसी त्वरा ।
तितुकें चि बोलेन ॥ १८ ॥ देहींच विदेह स्थिति । शब्दीं निःशब्द
प्रचीति । गुणीं च निर्गुणप्राप्ति । कळली अकळ ॥ १९ ॥ मी वाचा
ना वाचक । परि तुझा जालों याचक । तेणें कृपेनें कांहीं एक ।
बोलासी आणिलें ॥ २० ॥ बोलिल्यावीण हृदय न कळे । वास्तव
बोलविसी आगळे । अनुभव सिंधु कल्लोळें । टाकिली सीमा ॥ २१ ॥
स्वामी तत्त्वमसि अभ्यंतर । निवळलों तव कृपेनें सार । केवळ
स्वरूप निर्धार । बोलेन तुझिये कृपेनें ॥ २२ ॥ मी वक्ता च जालों
नाहीं । मज वाचा चि नसे कांहीं । तेवें वचनमाला सर्वही ।

स्फूर्तीचा अभाव ॥ २३ ॥ वक्ता वचन अर्थ ज्ञान । वर्तलें अद्वैत अनुसंधान । तैसें चि चालिलें निरूपण । अद्वैत प्रचीतीनें ॥ २४ ॥ माझें द्रष्टुत्व भजला । बोधउन बोधवीतसे अद्वैताला । अद्वैत जिव्हाळा भला । लाम जाला स्वयंभ ॥ २५ ॥ बोलासी आलें तितुकें बोलें । स्वरूपज्ञान बोलविलें । अवचट घेउनि आलें । सुख अक्षर ब्रह्म ॥ २६ ॥ प्रणवाचीउकळी फुटली । भेदुनी त्रिशून्य पोकळी । चालिली अद्वैत उसाळी । भिजवीत सुखें ॥ २७ ॥ शिखा भेदुनी शिखेसी । राहे चिदाकाश कोदीं । येथें अनुभवाच्या निश्चयेसीं । दिवस उगवला ॥ २८ ॥ अद्वैतबोध उजियेडें । उजळले निज तेज हुडे । स्वयंम सुखाचे चोखदे । कडे वेधला बोध ॥ २९ ॥ हें श्रवणाचें सोपान । निज बोधामृत पान । वक्ता हृदयीं रिघोन । चेतवी प्रणवा ॥ ३० ॥ प्रणवाची अकळ कळ । लाधली अकलतृप्ति केवळ । अनुभवदशा निवळ । पवाडल्या बोधीं ॥ ३१ ॥ विश्रांतीनें स्वरूपांवरीं । निघाला बोध नृप स्वारी । आत्मानुसंधान परिवारीं । शोभला वैभवें ॥ ३२ ॥ भेद निवर्तक बोधाचे दळ । चालिलें अद्वैत तें अकाळ । दुमदुमूं लागलें मंडळ । स्वरूपतेचें ॥ ३३ ॥ विज्ञान अवधानपर । बैसले ब्रह्मास्मि स्वार । प्रचीत तुरंगीं अपार । घेती अवधान मंडळें ॥ ३४ ॥ ऐसिया प्रबोध दळभारीं । आत्माराम साक्षात्कारीं । चालिला भव शत्रुवरी । महा प्रौढीनें ॥ ३५ ॥ देखोनी निजबोध वाहिनी । जाली भवाची विदारणी । रिघतां सुतेज किरणीं । पळोनी जाय महातम ॥ ३६ ॥ तैसें हृदय सप्रचीत । बोधें प्रवर्तले अनंत । अभ्रांत प्रचीतीनें निवांत । राहिले स्वरूपीं ॥ ३७ ॥ सरली बोध चमूची धांव । रूढला सत्यानुभव । मारुतीवचनें राघव । महा आनंदला ॥ ३८ ॥ तव भरद्वाजें सप्रचीत । स्तऊनि श्रीरामासी अनंत । म्हणे तुझिया कृपेनें अमित । तरले भवसिंधूसी ॥ ३९ ॥ पावन अवतार जगतीं । विश्व उद्धार विख्याति । तुझिया बोधाची पाहतां स्थिति । बोलिली नव जाय ॥ ४० ॥ प्रचीतीसी निजबोध । कर्ता होसी तूं अगाध । वेधिलें सभेसी प्रसिद्ध । अमृतपूज्य-वचनें ॥ ४१ ॥ तुझी वचनें ऐकतां । सनकादिकांसी विश्रामता । सिद्ध

कपिलादि तत्वता । सुखायोनि राहिले ॥ ४२ ॥ प्रचीतीच्या उघडपणें । जाला सर्वांग द्रष्टा तेणें । स्वरूप चि होउनि अवधानें । ऐको लागला ॥ ४३ ॥ सरोन साक्षत्वाची चळ्वळ । निश्चळ जाले ऋषि सकळ । विश्रांती माजि केवळ । विरोनि गेले सुखें ॥ ४४ ॥ वाल्मिकें निज प्रबोधिलें । तें चि प्रत्ययें उगवलें । विश्वगुरुरूप देखिलें । स्वरूप वस्तीनें ॥ ४५ ॥ स्वरूपवस्तीनें साचार । निर्विकार चराचर । ऐसें वोधिलें जगदांतर । आत्माभिरामा ॥ ४६ ॥ जगदांतरीं ब्रह्म प्रचीति । एका चि वचनें वोधिली जगती । महावाक्य सत्ता स्थिति । वोधीं वसे तुझ्या ॥ ४७ ॥ भव निवर्तक दुर्धर । वोधीं महातेज साचार । वचनें भव निवृत्ति थोर । वोधमहिमा हे ॥ ४८ ॥ जाणोनि सत्याचें अभ्यंतर । माझ्या सद्गुरुनें साचार । ग्रंथ शतकोटी विस्तार । केला स्वरूप ज्ञानें ॥ ४९ ॥ नसतां तुझा सत्यावतार । भविष्ये चि केला विश्वोद्धार । काय सांगिजे तो निर्धार । अनुभवा आलासी ॥ ५० ॥ नित्य स्वरूप अपार । ब्रह्मादिकांसी न कळे पार । तो तूं श्रीरामा अगोचर । भविष्ये प्रगटलासी ॥ ५१ ॥ धन्य भाग्याची उजळली रेखा । वोधें पात्र केलें स्वसुखा । स्वरूपपर उल्लेखा । वोधें विनयोगिलें ॥ ५२ ॥ भरद्वाज प्रत्ययवचनें । सभा डोलायमान सुखानें । म्हणती यथार्थ प्रचीतीनें । वोलिलासी ऋषिवर्या ॥ ५३ ॥ तंव गौतम म्हणे भरद्वाजा । हा कैवल्यक्षेत्रींचा राजा । विश्वमोचन भक्तिकाजा । अवतरला सुखें ॥ ५४ ॥ अद्वैत प्रचीतीनें वोलसी । अद्वैत सुखें चि डोल्सी । तया अद्वैत प्रचीतीसी । वोल मजसी आतां ॥ ५५ ॥ ऐसे विचारितां अहल्यावर । भरद्वाज ह्मणे तुझा निर्धार । तूं चि अनुभविसी साचार । या चि सभेसीं ॥ ५६ ॥ वर्तलें अद्वैत चोज । ऐसें श्रीराम वोधाचें तेज । समाधि सुखीं सहज । सभेसी मज्जविलें ॥ ५७ ॥ इति श्री भीमोपदेश । अद्वैत संपत्ति विलास । सायोज्यता ये विश्रांतीस । ह्मणे मेरु अनंत ॥ ५८ ॥ पद्मं सूर्य अष्टम कला संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ६ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामी अद्वैत दशा । जाण प्रचीतीनें ज्ञेय विदुषा । सकळार्थ तत्वप्रकाशा । कारण होसी तूं ॥ १ ॥ सकळ सारांश ज्ञान । तुझें हृदयींचें विद्यमान । ज्ञानें स्वरूप अनभऊन । असरी निरंतर ॥ २ ॥ संपूर्ण सद्न परवडी । प्रत्यक्ष घेत असतां गोडी । कैसी आहे म्हणोनि पुसणें प्रौढी । हे काय स्वभावता ॥ ३ ॥ स्वात्मसुख समुद्रांत । नित्य होत्साता सुस्नात । सुख स्थिति आणि शुचिष्मंत । विचारावें लागतें ॥४॥ काळ कर्मणेस्तव पुसणें । कीं माझी योग्यता परीक्षणें । कीं काय सुखाच्या विस्मयानें । स्वभाविक आक्षेप ॥ ५ ॥ ऐसे सुतर्क आक्षेपावरील । भावती भाव बहुसाल । ऐसे प्रश्न करूं जाणतें सखोल । हृदय तुझें ॥ ६ ॥ सुतार्किका परम वृद्धा । तूं ब्रह्मवेत्ता प्रसिद्धा । ब्रह्मदेवें योग्यता प्रबुद्धा । जाणोनी कन्या अर्पिली तुज ॥७॥ ज्येष्ठ सुताते सरस्वती । सकळार्थविद विपश्चि । तियेची भगिनी अहल्यासती । परम सज्ञान ॥ ८ ॥ ते अहल्येचा तूं भर्तार । विज्ञान संपन्नसाचार । स्वरूप विश्रांतीचा उद्धार । तुझेनि जगती ॥ ९ ॥ केवळ अनुभवाचा ठाव । जाण गौतमा तुझा स्वभाव । मजवरी दयेनें चि अभिनव । योव्लासी आक्षेपें ॥ १० ॥ अनुभव सिंधूचें जीवन । साच तुझें अंतःकरण । स्वानंदाचें सुखायतन । हृदय तुझे ऋषिराया ॥ ११ ॥ तरी गा ऐक आतां ऋषिवर्या । प्रबोधांबर वास्तव्य सूर्या । जगत्साक्षिणी अवस्था तुर्या । पाहाती शोधुनी ॥ १२ ॥ विश्वाभारा हृदयीं स्थान । येथें विश्वोद्भव निदान । या साक्षत्वातीत समाधान । तेहीं हृदयीं असे ॥ १३ ॥ ब्रह्मांडापरीस प्रौढी । अग्नि स्फुलिंगीं प्रभा गाढी । यीं घटाकाशांत असे वाढी । विशाळपणें ॥ १४ ॥ वीजीं तरुवराचें निर्ळाणपण । सांठवलें असे जाण । तैसें हृदयांत पदार्थज्ञान । संपूर्णतेनें ॥ १५ ॥ ज्ञानाची परवटी पाहतां । साक्षत्व प्रौढीनें तत्वता । अवस्था-

त्रययोगें सत्ता । प्रपंच उभारे ॥ १६ ॥ अनंतकोटी ब्रह्मांडें । सत्तेमाजि महाप्रचंडें । वाढलीं अनेक प्रकारीं वंडें । प्रवृत्ति उल्लेखीं ॥ १७ ॥ निवृत्ति उल्लेखीं निवळ । प्रवळे स्वरूपज्ञान केवळ । त्या स्वरूपदर्शनें अकळ । डोळ येती स्वसुखाचे ॥ १८ ॥ प्रवृत्तीचें मूळ धरूनी । तुवां आक्षेप घेतला वचनीं । निवृत्तीच्या सुखें उन्मनी । टोल देतसे सुखाचे ॥ १९ ॥ प्रवृत्ति निवृत्तीचा साक्षी । होसी प्रज्ञावंत परीक्षी । साक्षत्व रहित स्वपक्षीं । विसांवतां वरें ॥ २० ॥ सोहं स्वस्थिति पक्षद्वय । अलक्षलक्षें दशा अद्वय । चिदाकाशीं निजप्रलयें । पक्ष गळोनी जाती ॥ २१ ॥ पूर्वपक्ष आणि सिद्धांत । जाणिजे या पक्षद्वयातीत । तूर्येचें हृदय सदोदित । प्राविजे प्रचीतीनें ॥ २२ ॥ साक्षत्व सूर्याच्या पोटीं । वसती कोटी संकल्प सृष्टी । तैशा चि स्वानंदाच्या कोटी । असती तूर्ये माझारीं ॥ २३ ॥ तूर्या साक्षीचें सभास्थान । वसती विश्वाकारें भावपूर्ण । निर्विकल्प दशा गहन । ऐश्वर्य सभेचें ॥ २४ ॥ प्रवृत्तीचे गुण परिवार । निवृत्तीचे साक्षात्कारी विचार । उभय संवाद अपार । दाटल्या द्वारीं ॥ २५ ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ । प्रवृत्ति संस्थान परिपाट । अधिकार विशेष घनदाट । उभे वैसले तिष्ठती ॥ २६ ॥ स्वानुभविक विचार । स्वानंदबोध साक्षात्कार । अधिकार विशेष साचार । श्रेष्ठ सभासद ॥ २७ ॥ स्वभाव स्थितीच्या आसनीं । हृदयस्थ वैसला अधिष्ठानीं । साक्षत्वज्ञानें अवलंबूनी । द्रष्टा होय सभेचा ॥ २८ ॥ तयाचा स्वभाविक डोल । आस्तिक्यतेनें हृदय सखोल । क्षेत्र संस्कारें बोल । बोलवी स्वभावें ॥ २९ ॥ दशानिर्विकार तयाची । ज्ञानें संभवी साक्षत्व प्राची । त्या उल्लेख स्थिति उदयेंचि । सर्वत्र प्रकाशी ॥ ३० ॥ प्रीति विवेकानुसारें । निवृत्ति रूप अवतरे । तैसा चि अविवेक संस्कारें । क्षोभे बहुविध ॥ ३१ ॥ याकारणें विवेकनिधीं । विचार आपुला करावा विशुद्धि । अविवेक मार्गे कधीं । पाऊल न घालावें ॥ ३२ ॥ विचाराची अंतरस्थिति । निरंतर निज प्रचीति । नित्य स्वरूपता आवृत्ती । अनुभवावी सुखें ॥ ३३ ॥ बोलतां चालतां सर्व काळ । असावें विश्रांतिपर केवळ । स्वभावें प्रवृत्तीचें

प्रबळ । जालियां डळमळूं नये ॥ ३४ ॥ साक्षत्वीं आस्तिक्य स्थिरता । सुखें धीर धरूनी पुरता । चढोनी स्वानंदाच्या माथां । निर्विकल्प असावें ॥ ३५ ॥ समाधि दुर्गाचा हुडा । वसवावा स्वसुखें गाढा । त्यासी प्रवृत्ति सुखदुःख वेढा । आक्रमूं न शके ॥ ३६ ॥ निजबोध निर्वाण बाण । बोधाचें सैन्य बळसंपन्न । अक्षयसुख अंगत्राण । आंगीं वसे ॥ ३७ ॥ अनुभवाचें दुर्ग अवघड । त्यामाजि स्वयंभ सुखाचा गड । निजानंदाचा अगड । वेष्टित अक्षोभतेनें ॥ ३८ ॥ अक्षय सुखाची संपत्ति । आस्तिक्यता उपभोगास्थिति । उद्बोधधान्य परिपूर्ति । अपार संग्रह ॥ ३९ ॥ अक्षोभसुखाचा झरा । वाहे विश्रांतीचा उजगरा । काळभंजन रणमारा । बोध सेनापति प्रबळ ॥ ४० ॥ ऐसें स्वराज्य प्रबळ । तयासी काय करील भवदुर्बळ । सर्वात्मसुखें सर्व काळ । सर्वातीत घेतसे ॥ ४१ ॥ साक्षत्व दुर्येच्या जिव्हारीं । वसवावी कैवल्यपुरी । आत्मसुखाच्या निर्धारीं । संपन्न व्हावें ॥ ४२ ॥ हें स्वराज्यकर्तानिपुण । गौतम ऋषि श्रेष्ठ जाण । तुझें अक्षय समाधान । प्रबुद्ध चूडामणी ॥ ४३ ॥ साहित्ययंत्रकळेनें । शोभती गुणधर्मवृत्तीनें । प्रवाह चाले प्रवृत्तीनें । देहीं स्वभाविक ॥ ४४ ॥ दृढ जालें नाहीं आत्मज्ञान । तेणें साक्षत्वें शोभती गुण । तें कर्तयासी आक्रमून घालिती प्रवाहीं ॥ ४५ ॥ रूढलियां आत्मप्रचीति । प्रवृत्तिस्वभाव निवृत्तीसी येती । स्वभावें चि चाले निवृत्ति । स्वानंदाच्या गजरें ॥ ४६ ॥ स्वानंद उपलब्धी अवचट । जाणिजे गुरुकृपा उत्कट । तुवां साक्षात्कारें नीळकंठ । आत्मा चि केला आपुला ॥ ४७ ॥ सकळ आत्मसुखाच्या जोडी । अनुभवदशेच्या कोडी । ते तुज प्रसन्नता रोकडी । सद्गुरु शिवाची ॥ ४८ ॥ शिव सुखाचें सुख केवळ । शिव ज्ञानाचें ज्ञान निर्मळ । शिव आनंदाचें राउळ । वसविलें सिद्धीं ॥ ४९ ॥ त्या शिवाचा अंतर्भाव । नित्यानुभवें अभिनव । मूर्तिमंत तूं भूदेव । मत्सनिष्ट श्रोत्रि ॥ ५० ॥ काय आहे तुज न कळेसें । विचारिलें मज यास्तव्यरसें । स्वानंद उदधी विलासें । दोल देसी प्रत्ययाचे ॥ ५१ ॥ स्वानंदाच्या डोळे निश्चयेसीं । मन डोलउनी

बोलसी । बोला आंतील सरोल देशी । बोलप्रचीती चि ॥ ५२ ॥ ऐसें भरद्वाज ऋषि बोले । गौतम सुतात्म्या डोलें डोले । म्हणे तुजसी फलग तुळे । श्रेष्ठा आत्मविद्या ॥ ५३ ॥ अनुभवाच्या टेवी संपूर्ण । भरद्वाज ऋषि संभाषण । बोध फडोविराडी ऐकोन । तोषला जगदीश ॥ ५४ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रांजळ तुर्येचा प्रदेश । प्रबोधला चिदाभास । म्हणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ पष्टम सूर्य नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥

---

श्री

## सूर्य ६ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसभासाक्षात्कारीं । आनंदविग्रह ऋषेश्वरीं । अध्यात्मचर्चा निर्धारीं । प्रवळली दशा ॥ १ ॥ सभा सत्पात्र लक्षणें । प्रवृत्ति प्रसिद्धीनें म्हणणें । हें अनंत बोध लक्षणें । संपन्न आत्मदशा ॥ २ ॥ महासुखाचा सागर । अद्वैत वक्ता ऋषेश्वर । जो अग्नीचा चि अवतार । महा तपस्वी तेजें ॥ ३ ॥ ज्याचे तप तेजें दुर्धर । कृतांत कांपतसे निरंतर । विज्ञान हृदय अपार । सुखें चि भरला ॥ ४ ॥ सामर्थ्याची च मूर्ति केवळ । आंगीं प्रभा बाळ रवि किळ । क्रोधाग्नि सत्ता केवळ । जमदग्नि प्रख्यातीनें ॥ ५ ॥ विरक्तीची महा उग्र मूर्ति । ईश्वरावतार तो जगतीं । भार्गवाचा पिता विख्याति । महा ऋषींची ख्या ॥ ६ ॥ कश्यपाप्रति तेणें तोषें । प्रश्न केला आत्मविद्रूपें । स्वरूपानुभव उदेशें । रूढला हा भव ॥ ७ ॥ भवसंकल्पमूळीं । नव्हता चि स्वरूप स्थळीं । मध्यें चि जाहला सकळीं । बोलाचि प्रौढता ॥ ८ ॥ स्वरूप असतां निरंतर । कैंचा मायेचा तेथें संस्कार । ऐसें हि बोलती अपार । अपरोक्ष ज्ञाते ॥ ९ ॥ आत्मा असतां आस्तिक्यतेनें । वेष्टला माया ममतेनें । तरी आत्मा निर्गुण त्रिगुणें । क्षोभतो कैसा ॥ १० ॥ आत्मा माया ब्रह्म ज्ञान । हें निवडूनियां

च्यारी प्रश्न । माझिये अंतःकरणें जाण । आक्षेपासी आणिले ॥ ११ ॥ जमदग्नीनें कश्यपासी विचारितां । जाला वाल्मीक ऋषि बोलता । म्हणे अध्यात्म ज्ञान विचारितां । अपार असे ॥ १२ ॥ अविगत आत्मा म्हणोनी । अध्यात्म म्हणती जनीं । आधि म्हणिजे चिंता समजोनी । पाहची मूळीं ॥ १३ ॥ भवरोग आधिव्याधी । हे चि मायेची प्रसिद्धी । आत्मा स्वरूप निरोपाधि । उपाधिस्त भासे ॥ १४ ॥ उपक्रमें चिया वचनीं । मायेची स्वभावता लावणी । सुचऊनि वाल्मीकमुनि । प्रत्योत्तर देतसे ॥ १५ ॥ अमृतगर्भ मधुरोत्तरें । वाल्मीक वदन सरोवर सारें । प्रचीत रसाचीं कल्हारें । विकासलीं आमोदें ॥ १६ ॥ कोवळीकेचें निजजिव्हार । स्वरूपानुभवें निरंतर । तत्वाचा समूळ विवर । दिसतसे माजी ॥ १७ ॥ वाल्मीक म्हणे ऐक जमदग्नी । तूं स्वरूपानुभव विद्यमानी । तुझ्या आत्मज्ञानें त्रिभुवनीं । निवास केला ॥ १८ ॥ साक्षात्काराचें महासत्त्व । जाण ऋषिवर्या तुझें महत्व । तुझेनि ज्ञानें मूळींचें साक्षत्व । ज्ञान प्रकाशलेंसे ॥ १९ ॥ आत्मज्ञान जगदंतरा । स्वरूपानुभव परपारा । सच्चित्सुखाच्या माहेरा । स्वानंद निलया ॥ २० ॥ उद्बोधभानु निजांगें । प्रकाशसी तत्व अष्टांगें । गुणातीत अंतरंगें । स्वरूप सिद्ध तूं ॥ २१ ॥ स्वानंदघन तुझी चर्या । ब्रह्म ज्ञानाग्नि ऋषिवर्या । साक्षत्वीं वर्तविसी तुर्या । निरावरण सुखें ॥ २२ ॥ तुझा स्वबोध सनातन । तुझा अनुभव पुरातन । तूं आत्मतेजें गहन । वर्तसी जगीं ॥ २३ ॥ चहूं निगमाचा उगम । प्रश्न होय तुझा परम । चहूं साक्षीचें अंतर्याम । प्रगटे जेणें ॥ २४ ॥ चहूं मात्रेचें अभ्यंतर । निवळत चाळिला विवर । चहूं महावाक्याचा धर । धारणेसी आणिला ॥ २५ ॥ चहूं वर्णाचें आत्मज्ञान । व्हावया प्रांजळ च्यारी अभिमान । च्यारी आश्रम पावन । होती जेणें ॥ २६ ॥ चौदेहाची चौपुटी तत्वें । स्थान मान च्यारी साक्षत्वें । गुण चत्वार आत्मत्वें । रूढला प्रश्न ॥ २७ ॥ जैसें दिव्य रसायन । सेविल्यां तात्काळ दावी गुण । तैसि नवलपरा महिमान । हृदयासी आलें ॥ २८ ॥ निद्रिस्तासी जैसें जागृत । जागृतां आपुनि परी मार्गस्थ ।

विश्रांति । त्या वैदिक स्थितीची विख्याति । वेदांत योगें ॥ ४ ॥ भूतभविष्यवर्तमान । नाढळे दृश्यद्रष्टादर्शन । उपक्रम उपसंव्हारस्थान । नसे चि पाहतां ॥ ५ ॥ नसे शास्त्र ना संमती । नसे दृष्टांत द्राष्टांत विप्पत्ति । द्रष्टा साक्षी ना प्रचीती । नसे पृथक्त्वें ॥ ६ ॥ नाहीं प्रकाश अंधकार । सूर्य चंद्र ना अंबर । उल्लेख रचना विस्तार । कांहीं च नसे ॥ ७ ॥ नसे चि प्रमय ना तो वक्ता । नसे चि अवधान प्रचीती श्रोता । जेथें शब्दनिःशब्दवार्ता । आढळे चि ना ॥ ८ ॥ जेथें पूर्वपक्ष ना सिद्धांत । उपदेश न द्वृत । केवळ स्वरूप हा संकेत । असे चि ना कांहीं ॥ ९ ॥ जेथें गुरुशिष्य उपपत्ति । ब्रह्म अद्वय प्रचीतिस्थिति । जाण जमदग्नी निश्चिती । आदि स्वरूपाची ॥ १० ॥ स्वरूप या अर्थे बोलवें । परंतु बोला आलें तें नव्हे । बोले वीण न संभवे । प्रचीति त्याची ॥ ११ ॥ त्या अपरोक्ष ब्रह्मस्थिति । वेदांतविद अनुभविती । उपदेश क्रम पद्धती । तयापासूनि ॥ १२ ॥ जे कां अनुभवी पुरुष । ते आंगें चि स्वरूप सावकाश । तयाच्या प्रचीतीनें परेश । अवतरला जनीं ॥ १३ ॥ तुझे अंतरस्थितीचा स्वानंद । जो स्वसुखामृता मूळकंद । तो हा जगदाद्य मुकुंद । शोभे सायोज्यभद्रीं ॥ १४ ॥ रामचंद्र स्वरूपाचें ज्ञान । अनुभविती संतसज्जन । तेणें चि प्रचीतीनें प्रगटोन । कथिती आत्मस्थिति ॥१५॥ अपरोक्ष दशेचा पाठार। निगमाचळाचें शिखर। पंचतत्त्वाचें तत्त्वसार। तेथें प्रतिष्ठिलें ॥१६॥ ब्रह्मज्ञान दशापूर्ण। ज्ञानप्राचीसी स्वानंदघन । स्वयंभ प्रभेचा सुभान । उगवला अखंड ॥ १७ ॥ तया प्रभाकराच्या किरणीं । जग मृगजळ दिसोनी । भुलविले सर्व प्राणी। विषयमृगतृष्णेनें ॥ १८ ॥ घोर प्रवाह कल्पनेचा । विश्वाकारें उभार दृश्याचा । अंतर्भाव स्वरूपाचा । आच्छादिला तेणें ॥ १९ ॥ ब्रह्मीं मायेची प्रसक्ति । अणु हि नसे चि अहंस्फूर्ति । तया परब्रह्माची प्रचीति । कवण घेता ॥ २० ॥ ब्रह्म प्रचीतीसी आलें । हें चि जाणत्रें गुणायिलें । मूळभेदें चि वळविलें । कारण त्रिपुटीसी ॥ २१ ॥ अजन्मा जन्म जाला । कोठूनि आत्मसंस्कार आला । ऐसें पाहतां विचाराला । ठाव चि नाहीं ॥ २२ ॥

बोधासी करूनी कारण । भेदाचें जालें प्रमाण । बोधभेद अवतरणें । मायेचे चि जाणिजे ॥ २३ ॥ ब्रह्म माया आत्मज्ञान । पूर्वी तुवां केले चारी प्रश्न । या पदार्थ परवडीचें भान । द्रष्टा चि उठे ॥ २४ ॥ द्रष्टा कैंचा कीं कवण । मूळीं च आहे ह्मणऊन । अनुमानज्ञानें सज्ञान । रूढीनें बोलती ॥ २५ ॥ द्रष्टा प्रत्यक्षाकारें आपण । ऐसें नेणोनी वर्म जाण । परोक्षपणें शब्दज्ञान । प्रवाहीं पडिले ॥ २६ ॥ द्रष्टा तूं चि जाण स्वयें । चहूं प्रश्नीं तुझें चि हृदय । अवधारी आत्मप्रत्ययें । चहूंप्रकारें ॥ २७ ॥ गुणातीत आस्तिक्यता । तुझ्या चि हृदयीं पाहतां । तुज चि प्रत्यय येईल आतां । एवं प्रकारें ॥ २८ ॥ अनुभवासी कारण । चहूंप्रकारें ब्रह्म स्फुरण । त्या ब्रह्मस्फूर्तीमाजि संपूर्ण । असती प्रमेयें ॥ २९ ॥ ब्रह्मविद ब्रह्मानुभवी । प्रतिष्ठित ब्रह्मपदवी । वेदादि आदि कवी । अनुभविती स्वयें ॥ ३० ॥ तो तूं वेदाचा अंतर्भाव । स्वरूपाचा शुद्ध अनुभव । त्या तुजपासीं च लाघव । मायेचें चि वसे ॥ ३१ ॥ आपुलें जें अंतःकरण । तें चि मायेचें रूप जाण । ते अंतःकर्णातीत आपण । निजांगें चि ब्रह्म ॥ ३२ ॥ आपणें चि आत्मा स्वतःसिद्ध । कवणें करणें न लगे बोध । आपुलें आपणें चि सिद्ध । ज्ञान जाणावें ॥ ३३ ॥ भेदाभेद अंतःकरण । भेदें क्षोभविलें अज्ञान । अज्ञानभेद सनातन । निजवृत्ति माया ॥ ३४ ॥ या वृत्तीच्या योगें सहज । प्रतिष्ठिलें द्रष्टेपण तुज । साक्षी तुझा तूं उमज । तया परता ॥ ३५ ॥ साक्षीचें आस्तिक्य अभ्यंतर । अर्चातीरीं येतां निरंतर । जाणावें परब्रह्म जिव्हार । तुझें चि कीं ऋषि ॥ ३६ ॥ ब्रह्मविद तूं बोध संपन्न । सर्व जाणता ऋषि सज्ञान । थोर कृपेचें तुझें महिमान । कृपा केली मजवरी ॥ ३७ ॥ तुझे कृपेचा उदय । तेणें अरूपाचें रूप होये । नित्यानंदें नित्य प्रत्यय । दार्ढ्यत हृदयीं ॥ ३८ ॥ कृपार्णव ऋषि श्रेष्ठ । ज्ञान जमदग्नि वरिष्ठ । आधीं ते ब्रह्मप्रतिष्ठा । स्वभाविक जाणिजे ॥ ३९ ॥ ब्रह्म जाणावया कवण । सरलें होईल दुर्जेपण । याकारणें जालें निर्वाण । समूळ भेदाचें ॥ ४० ॥ गुरुकृपा स्वरूप दर्शन । गुरुकृपा भेदाचें

निर्शन । ते सद्गुरुकृपा निरंजन । तुजपाशीं वसे ॥ ४१ ॥ भेदाशीं आलें नाहीं ब्रह्म । ऐसें जीवीं जाणावें सुवर्म । हें गुरुकृपेचें परम । अभिनव जाणिजे ॥ ४२ ॥ महा ब्रह्मस्थितीचा स्वानंद । ब्रह्मनंदन स्वसुखकंद । त्या दैवक्षपणें निर्द्वंद । तत्त्व अनुग्रहीलें ॥ ४३ ॥ विचाराची निजसंपत्ति । शतकोटी निजध्यास स्थिति । येत येत आली प्रचीति । आत्माराम तेणें ॥ ४४ ॥ त्या रामरूपें निरंतर । दाटलें माझें अभ्यंतर । अवधान देउनी निरंतर । अवधारीं परतत्व तें ॥ ४५ ॥ ऋषि वाल्मीक जमदग्नीसी । सांगेल ब्रह्मप्रतिष्ठा निश्चयेसीं । तरी कृपालुपणें श्रवणासी । आणिलीं पाहिजे दशा ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । तत्त्वगभक्तीचा प्रकाश । दाटलें अभ्यंतर सावकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ षष्टम सूर्य एकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ रामकृष्ण ॥

---

श्री

## सूर्य ६ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम निजांगें निर्गुण । निर्विकार अधिष्ठान । स्थानमान जगद्भान । क्रियाकर्म असेना ॥ १ ॥ सत्याची स्वभावता निज । कवणें सांभाळावी समज । आपुल्या स्वरूपें सहज । अभिन्नानुभवें ॥ २ ॥ पैस अंतराळ निर्मळ । सर्वघटीं साळमाळ । जिकडे तिकडे विशाळ । एक जिनसी ॥ ३ ॥ तेथें आकाश ना पाताळ । दिशासी ठाव नसे अळुमाळ । अग्रांत पोकळी अकळ । अस्तित्वलेनें ॥ ४ ॥ चळेना टळेना सहज । नसे चि रूपरेखा उमज । नसे चि चळवळ भावकाज । समूळीं तया ॥ ५ ॥ एक जिनसी सनातन । जगदाच नित्य नूतन । काळरहित पुरातन । संचलेंसे ॥ ६ ॥ तें परब्रह्म विशाळपणें । आभासलें वृत्तींच्या गुणें । ह्मणऊन तयाकारणें । नभ ऐसें ह्मणिजेत ॥ ७ ॥ वृत्तीमाजि तो अवकाश । त्यासी च ह्मणिजे भेदाकाश । भेदें चि शब्द सावकाश । स्फुटांसी आला ॥ ८ ॥

अभेद प्रचीतीच्या पाळवें । आकाशासी गाळूनि घ्यावें । असतां भेद वृत्ती स्वभावें । आकाश भूत जाहलें ॥ ९ ॥ अहंस्फूर्तीचा व्हावा लय । तरी च वसवावें सुखालय । परंधाम आत्मास्वयें । अपरोक्ष ज्ञानें ॥ १० ॥ अस्तिक्य सहज सदोदित । शुद्धबुद्ध व्योमातीत । नित्य निर्द्वंद्व निर्हेत । निराश्रय हें चि हें ॥ ११ ॥ द्वैताद्वैत स्फूर्ति विहीन । जाण अपिवर्या निर्गुण । अनुभवासी आलें ज्ञान । अपरोक्षतेनसिं ॥ १२ ॥ ब्रह्म आणि ब्रह्मज्ञान । आत्मा जाणावा समसमान । नामाचा चि भेद जाण । नामातीत बुझिजे ॥ १३ ॥ आत्मा ह्मणतां आत्म शब्द । अथवा ब्रह्म शब्द प्रसिद्ध । निःशब्दीं यान्त्रिक संबंध । असे चि ना कांहीं ॥ १४ ॥ अनुभवाचे ब्रह्मरूप । व्हावें तरी ते जाण अरूप । रूपासी ठाव नसे स्वरूप । हे उपमत्ति न घडे ॥ १५ ॥ अज्ञानाचें नाहीं मूळ । तेथें ज्ञानाचें काय काज तिवळ । आतां पदार्थज्ञानें केवळ । माया चि जाणिजे ॥ १६ ॥ मही नाव रूप ठेवी । हे जाण मायेची पदवी । शब्दार्थ उठाठेवी । घडामोडी करीतसे ॥ १७ ॥ आपण स्वरूपें असतां निज । मायेनें आणिला हा उमज । ज्ञेय ज्ञाता ज्ञान गुज । महिमान मायेचें ॥ १८ ॥ माया ब्रह्मस्वरूपें प्रतिष्ठे । माया स्वानंदें घनवटे । मायेचा भरा प्रगटे । सोहं स्वभावें ॥ १९ ॥ सोहं अवसान मूळीं । आटोनी जाय समूळीं । तस्मात घडमोडी जंजाळी । घातलें जनासी ॥ २० ॥ चुकोनी स्वरूपाचें आस्तिक्य । माया रूढविलें नास्तिक्य । भेद संरक्षिला ऐक्य । मायेच्या प्रयुक्ती ॥ २१ ॥ मायेनें मोहिलें मीपण । गुणातिशयेंकरून । पतन आणि पावन । कल्पिलें आत्मयासी ॥ २२ ॥ हे मायेची महा प्रौढी । अक्षोभ क्षोभता वाढी । नसती विकल्प दाढी । अकल्पित ये ॥ २३ ॥ निराकार असतां आपण । मायेनें आणिलें मीपण । तेणें अहंतेनें क्षीण । दारुण भोगिले ॥ २४ ॥ मिथ्या मायेचें करणें । नसोनी कांहीं सत्यपण । दाविलें आत्मयाकारणें । गुणबंधन ॥ २५ ॥ माया माईक निजवृत्ति । नसतां चि आत्मन्वीं प्रवृत्ति । दाऊनि विस्तारें निवृत्ति । बुझाविलें मीपण ॥ २६ ॥ अकळ मायेची टवाळ । वेदा लाविलेंसे

सकळा । आप आपणांत अवर्तळा । वात होतसे ॥ २७ ॥ ऐसी माया संकल्पस्थिति । जाणे जमदग्नि तुझी वृत्ति । जेणें क्रोधें निज संतति । जाया भस्म केली ॥ २८ ॥ ज्या क्रोधें केलें दहन । त्या क्रोधासीही त्यागून । सर्व चि जालासि सुप्रसन्न । प्रबुद्ध पुत्रासी ॥ २९ ॥ क्षणा क्रोध क्षणा आनंद । जाण मायामोह प्रभाद । विश्वकंदें केला विनोद । वर्ततसें जगीं ॥ ३० ॥ मायावी महा लाघव । मोहाचें मैदावें अभिनव । नेणोनी आपआपणा जीव । वेढा लाविले कैसें ॥ ३१ ॥ निजांगें असतां ब्रह्म । मायेनें वर्तविला भ्रम । कृपेनें निरसूनि सर्व कर्म । संकल्प शून्य करी ॥ ३२ ॥ वृत्तनिं वृत्ति वोसरे । साक्षत्वें साक्षी सरे । भेदें अभेद संव्हरे । महाभवसंकल्प ॥ ३३ ॥ स्वल्प संकेतें सूचना । निरोपिली निजकल्पना । कल्पनातीत अधिष्ठाना । प्राप्त केलें अक्षया ॥ ३४ ॥ आत्मा अपरोक्ष सभावें । परब्रह्म स्वानुभवें । प्रचीति गुरु आदिदेवें । दिधली मजला ॥ ३५ ॥ ब्रह्म साक्षात्कार मजला । सद्गुरु सुप्रसन्न जाला । माया असतां चि मायेला । मूळीहूनि ठाव नसे ॥ ३६ ॥ मायेच्या संस्कारा पासूनी । सुटलों मी ऋषि जमदग्नी । हे भावितां सिंहावलोकूनी । परतली माया ॥ ३७ ॥ अकल्पित माया उडी पडे । माया ब्रह्मस्थितीनें पवाडे । माया समाधी सुखें वाडे । अंतर्यामीं ॥ ३८ ॥ माया ब्रह्मज्ञानमिसें । योग्यतेच्या धरा येतसे । जाणीवेनें लागतसे । सकळा पाठीं ॥ ३९ ॥ ऐसी माया हे अभिनव । मायातीत तुझा अनुभव । विज्ञान संपन्न शिव । आराधिला तुवां ॥ ४० ॥ मायामूळ निवर्तक । गुरु शिवसुखदायक । अनुभव कैलासनायक । प्रसन्न तुजला असे ॥ ४१ ॥ त्या भव निवृत्ति उग्ररूपें । तूं प्रकाशलासी महातपें । सरूप सदाशिव जपें । होसी शिवरूप ॥ ४२ ॥ ऐसें वाल्मिकाचे वचनीं । प्रमय प्रबोध सुमनीं । अनुभव पूजा पावोनी । जमदग्नि आनंदला ॥ ४३ ॥ ह्मणे धन्य धन्य तूं वाल्मीक । निजांगें चि प्रवर्तलासी विवेका । एका अनुसंधानें शंका । चतुर्विध वारिली ॥ ४४ ॥ वचनें चि विश्रांतीसी आणिलें मज । काय प्रत्योपकार करूं तुज । माझा चि आत्मा तूं होसी सहज । महामुनेश्वरा

॥ ४५ ॥ तुझ्या वचनीं शंकर तोषला । तुझ्या वचनीं आत्मा प्रगटला । तुझ्या वचनीं उदयातें पावला । ज्ञानमार्तंड ॥ ४६ ॥ परस्परें महाऋषि तोषें । आनंदले निजावेषें । सभा सुखैकघनपरेशें । पार टाकिला सुखाचा ॥ ४७ ॥ केवळ अध्यात्मज्ञान । अपरोक्ष स्थितीचें अनुसंधान । षष्ठम सूर्य निरूपण । जालें प्रचीतीनें ॥ ४८ ॥ आतां सप्तम सूर्य कळा । केवळ भक्तीचा जिव्हाळा । अवधान देउनी एकवेळा । अवधारिजे : पुढें ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेश । आत्मबोधाचा सौरस । प्रगटला विद्याधीश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५० ॥ षष्ठम सूर्य द्वादश कळा संपूर्ण ॥ १२ ॥



श्री

## सूर्य ७ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम परमात्मा पूर्ण । आंगें चि आस्तिक्य सुखैकघन । स्वरूप उपलब्धी आपण । प्रसन्न आपणासी ॥ १ ॥ हे माझी प्रसन्नता मज । मज माझा चि उमज । आराध्य आराधितां काज । मी सर्वस्वें ॥ २ ॥ मी मज सेवी सनातन । मी मज प्रत्यक्ष पुरातन । मी मज भेटे नित्य नूतन । सानुकूळ बोधें ॥ ३ ॥ मी सच्छिष्य सद्भावें । शरण रिघोनी स्वभावें । मी मजला स्वानुभवें । होय गुरु बोधिता ॥ ४ ॥ मी विश्वाभ्यंतर देव । मी अभेद भजनें अंतर्भाव । मी अनंत निरावेव । शुद्ध बुद्ध सहजें ॥ ५ ॥ मी निजांगें निजनिर्मळ । स्वभावें ज्ञान केवळ । मी स्वानुभवें चि निवळ । स्वानंद सिंधु ॥ ६ ॥ मी उन्मनीचें निजजिव्हार । मी निवृत्तीचें सुख अपार । मी निजानंदाचें माहेर । निधानयोगीयाचें ॥ ७ ॥ ऐसा मज मी मूळीं । शाश्वत अनुभवीं राउळीं । विश्वव्यापक जळीं स्थळीं । वसे अखंडित ॥ ८ ॥ इतुकें गुण साम्ये पर । नव्हता गुण क्षोभ विस्तार । मी ज्ञानस्वरूपें निर्धार । वसवी जगदांतर ॥ ९ ॥ ज्ञान माझा अनादि स्वभाव । स्वसुख माझा अंतर्भाव । अनुभव माझा

सद्भाव ॥ ज्ञानाचेनि प्रसंगें ॥ १० ॥ सर्वांतरात्मा सदोदित । त्रिविध गुणान्वयें क्षोभित । तें भज माझें आराध्य दैवत । बोळलें कृपेनें ॥ ११ ॥ गुणक्षोभवृत्ति दुर्धर । ब्रम्हा विष्णु महेश्वर । आदि देवा तुझे अवतार । तूं चि आर्जविसी तुतें ॥ १२ ॥ आदिपुरुष तूं निरंजन । तुज प्रकाशित तुझें ज्ञान । लेउनी प्रचीतीचे नयन । तूं चि तुज पाहसी ॥ १३ ॥ त्रिगुण जगाचा विस्तार । पाहतां तुझे अनंत अवतार । विश्वहृदया निरंतर । बोधविसी स्वसुख ॥ १४ ॥ तो तूं परम पुरुष श्रीराम । श्रुतिपर परंधाम । अंतर्भावना परम । प्रसन्नता तुझी ॥ १५ ॥ तुझें हृदय चिदंबर । पाहतां स्वरूपें निराधार । तुजप्रति प्रवृत्ति संस्कार । असे चि ना कांहीं ॥ १६ ॥ अंबरस्वरूप विस्तीर्ण । चिद् अनुभवी निरावरण । सोहं स्वभावें आवरण । संपूर्णासी त्या ॥ १७ ॥ आदि देव तो सनातन । चिदानुभव देवस्थान । विज्ञान देवालयीं अखंड मान । सोहंदीप उजळिला ॥ १८ ॥ नमस्ते आदिदेव निरंजना । नमस्ते स्वभाव सिद्ध ज्ञानांजना । नमस्ते स्वरूपें चि सज्जना । प्रतिष्ठा करीसी ॥ १९ ॥ जेथें कांहीं न संभवे । तेथें चि सृष्टीचे होती उठावे । ब्रम्हांड कोटी कटावे । घटावे उदय अखिळ ॥ २० ॥ सोहं मूर्तीचें स्फुरण । तेथें निर्विकार वसे ज्ञान । जैसें सहज स्थितीचें गहन । आस्तिक्य निजाचें ॥ २१ ॥ त्या ज्ञान स्वभावावरी । जगदाद्यबीज निर्धारीं । त्रिविधक्षोभ भरोवरी । होतसे ज्ञानें ॥ २२ ॥ शुद्ध ज्ञानावरी स्वभाव । साक्षत्वज्ञान संभव । साक्षत्वज्ञानीं वस्तव । ब्रम्हांडाचे ॥ २३ ॥ साक्षत्व ज्ञाना ऐलिकडे । अवस्थारूप ज्ञान निवाडें । त्या त्या अवस्थे पासूनि पवाडे । इंद्रियवृत्तिज्ञान ॥ २४ ॥ अतींद्रिय आत्मया पासूनि । सोहं अन्वय अंतःकरणीं । पदार्थज्ञान रूढी जनीं । विस्तारें पाहतां ॥ २५ ॥ एवं आत्मज्ञान पसर । त्रिगुणा पासूनि संसार । त्रिगुणाहूनि परात्पर । ज्ञान अभिन्न स्थिति ॥ २६ ॥ अभिन्न ज्ञानरूप ईश्वर । पदार्थज्ञानें विश्वरूप अहंकार । उभयतान अभ्यंतर । आत्मा सहजें ॥ २७ ॥ परमात्मा जगदांतरीं । परंज्योति प्रकाशानरीं । माया ब्रह्म आत्मा विवरीं । ज्ञाधर्ते स्वतंत्र ॥ २८ ॥ साक्षत्वातीत स्वतःसिद्ध । आदिदेव तूं स्वतंत्र

प्रसिद्ध । आत्मयारामा उद्बोध । वेधे चिंतामणि ॥ २९ ॥ तुज आस्तिक्यतेने निरंतर । अखंडित माझा नमस्कार । जितुका आहे तुझा विस्तार । घडो त्या अभिवंदन ॥ ३० ॥ माझे हृदयीं प्रगटलासी । ज्ञानें प्रचीतीस आलासी । सद्गुरु स्वरूपें पावलासी । साचार स्वरूप योगें ॥ ३१ ॥ स्वरूप बोधासी कारण । लाधलों सद्गुरु तुझे चरण । नित्य प्रतीचें आचरण । प्रतिष्ठिलें देहीं ॥ ३२ ॥ मूळीचा मुळारंभ स्वयंभ । नित्य स्वरूपाचा लाभ । तो तूं स्वानुभव सुप्रभ । बोध चिंतामणि ॥ ३३ ॥ निजानुभवतनु विशाळ । स्वानंदघन सुखाचळ । उद्बोध रवितेज किळ । सर्वांग सुंदरा ॥ ३४ ॥ कोटी ज्ञान सूर्याचें तेज । अव्याकृत मुसेसी सहज । ज्ञान प्रळयाग्नि निज तेज । योगें पुटीं घातलें ॥ ३५ ॥ तें स्वयंभ शांत कुंभतेज । चारी पुरुषार्थ चतुर्भुज । स्वयंभ सतेज उमज । वसविला फरशकरीं ॥ ३६ ॥ अनादि भवतरूचें बेचाड । उन्मळिलें निजबोधांकुरें जाड । महामृत्यूसी आकळुनी पवाड । केला प्रधानसूत्रें ॥ ३७ ॥ ते पाशरूप प्रधानसूत्र । तृतीय करीं असे विचित्र । चतुर्थकरीं स्वानंद पवित्र । वसे मोदक प्राप्तीचा ॥ ३८ ॥ अनुभव उदर विस्तीर्ण । प्रवृत्ति निवृत्ति दोन्हीं चरण । समाधि बैसका अधिष्ठान । प्रस्थान गणपति ॥ ३९ ॥ ज्ञान विज्ञान दोन्हीं नेत्र । स्वरूप ईक्षणें ते स्वतंत्र । कपोळ प्राप्तीचें ते पत्र । श्रवण दोन्ही मीमांसा ॥ ४० ॥ स्वसुखाचा प्रचंड माया । बोधमुकुट तत्त्वता । विज्ञानप्रभा बोधसत्ता । किरीटीं शोभत ॥ ४१ ॥ उद्बोधाची सोंड झेलीत । अखंड उन्मनी सुखें डोलत । कैवल्य अनुभवाचे बोलत । बोल गंभीर बोधें ॥ ४२ ॥ ज्ञान साक्षात्कारीं सत्तातेज । सर्वांगभूषणें गणराज । पाहिला दृष्टीसी सहज । निवाली दृष्टी ॥ ४३ ॥ प्रवृत्ति दुराशा क्षोभक । सरली माझी तहानभूक । आत्मप्राप्तीचें सुखात्मक । पारणें जाले ॥ ४४ ॥ अधिष्ठान देवा गणेशा । चुकउनियां भवपाशा । वारिली संकल्प दुराशा । कृपाईक्षणें ॥ ४५ ॥ अनावृत कृपा तुझी । ते चि होय सद्गति माझी । अज्ञान ममतेची वोझी । उतरलीं कृपेच्या वरें ॥ ४६ ॥ ते स्वबोध तनु सरस्वती ।

अखंडीत ब्रह्मप्रचीति । ब्रह्मानुभव स्थिति । ब्रह्मानंद कळा ॥ ४७ ॥ ब्रह्मबीजा योगेश्वरी । हृदय प्रकाश बोध करी । नित्यानंद सुखकारी । वंदिली आदिशक्ति ॥ ४८ ॥ जियेच्या उदरीं संभवलों । स्वात्मप्राप्तिनें सुखी जालों । नित्यबोधामृतें धालों । निवालों ईक्षणीं ॥ ४९ ॥ स्वानंद जनका गुरुराया । ऐसी अभिनव तुझी दया । आत्मानुभव काया । लाधलों निजाची ॥ ५० ॥ कल्पनाशत छिद्रांबर । त्यागुनियां पांघरविलें दयांबर । अक्षय सुखें साचार । परिपाळिलें मज ॥ ५१ ॥ आतां निजभक्तीचा जिव्हाळ्या । मज प्रबोधवी अंतर्कळा । ऐसें प्रार्थितां कळवळा आला । अमृतसिंधूसी ॥ ५२ ॥ आतां तें चि पुढें निरूपण । केवळ भक्तीचा जिव्हाळा ज्ञान । उत्तरार्धीं स्वसुखघन । अवधारी जे ग्रंथ ॥ ५३ ॥ इति श्री भीमोपदेश । अधिष्ठान देवता परेश । अभिवंदिला स्वप्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ५४ ॥ सप्तम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ७ कळा २

॥ श्रीसीतापतये नमः ॥

श्रीरामा विश्वमूळकंदा । गाळीव सुखाच्या स्वानंदा । प्रबोधकरवर मुकुंदा । अधिष्टान देवा ॥ १ ॥ देवाधिदेव तत्वविशुद्धा । आदि अनादि सिद्ध प्रसिद्धा । निजानंद पद प्रबुद्धा । जय जयाजी सद्गुरु ॥ २ ॥ भवभयभंजन लीळा । प्रबोधविसी अंतर्कळा । स्वात्मसुखाचा जिव्हाळा । प्रगटविसी ॥ ३ ॥ तरी माझे मनींचें आर्त । प्रबोधवीं भक्तीचें ह्रत । भक्ति नवविधा सुनिश्चित । कीं अभेद स्वभावें ॥ ४ ॥ ऐसें प्रार्थितां सद्गुरुसी । प्रसन्न जाला प्रसादेसी । कृपेनें बोळला निश्चयेसीं । अभय दिधलें ॥ ५ ॥ जें अपरोक्ष भक्तीचें गुज । सुवर्म आकळलें तुज । हा असिर्वाद करांभोज । असो तव मस्तकीं ॥ ६ ॥ तेणें वर प्रसादें पूर्ण ।

विसांवलें अंतःकर्ण । भीमोपदेशक्रम करून । चालिलें प्रमय- ॥ ७ ॥
पूर्वार्धी क्रमान्वयें । बोलिलें स्वरूपज्ञान प्रत्ययें । श्रीरामसभेसी विस्मयें-।
रूढली चर्चा ॥ ८ ॥ सीतामुखें हनुमंतासीं । महावाक्य तत्वमसि ।
बोधविवर निश्चयेसीं । उपदेश जाला ॥ ९ ॥ तें उपदेशक्रमाचें अभ्यंतर ।
पावला महारुद्र साचार । समाधिसुखें निर्विकार । जाहला देहीं ॥ १० ॥
सीतेनें महावाक्य सांगितलें । श्रीरामें प्रत्यया आणूनि दिधलें । उभयता-
पासूनि निवळलें । तत्व हनुमंतासी ॥ ११ ॥ दोघांचें एक शरीर ।
अर्धनारी नटेश्वर । रामसीता परात्पर । दंपत्य गुरूचें ॥ १२ ॥ हनुमंतासी
लाधलें प्रचीतवर्म । सर्वकर्मी जाहला निःकर्म । स्वरूपें विसांवला स्वधर्म ।
विनटला गुरुभक्ती ॥ १३ ॥ अभिवंदुनी सीतारामासी । म्हणे भक्तीचें
रहस्य प्रचीतीसी । ये ऐसें करावें निश्चयेसीं । मजला समाधान ॥ १४ ॥
आत्मसुखसंपन्न चूडारत्ना । योगीमानसरंजना । कृपासिंधु भक्तपावना ।
स्तवितसे हनुमंत ॥ १५ ॥ जाणोनी कपींद्राचें प्रेम । बोलता जाला
श्रीराम । म्हणे तूं अवधान प्लवंगम । विहरें प्रबोधतरूसी ॥ १६ ॥
स्वशाखामृग मनोहरा । आनंदतरुपालेखाइरा । विकल्प महा रजनीचरा ।
संव्हरिसी बोधकरें ॥ १७ ॥ जगत्प्राण परितोषा । जगदानंद अंतर्कोशा ।
पवाड स्वरूपांवरीं वीरेशा । भवमळव्हरणा ॥ १८ ॥ ऐसें कपींद्रासी
गौरविलें । वचनामृतें सुखी केलें । कृपासिंधूनें सांभाळिलें । आपत्यासी
आपुल्या ॥ १९ ॥ धन्यधन्य कपीची भाग्यदशा । परात्पर सुखें पुरली
आशा । महा अद्वैत सुखसंतोषा । पात्र केलें श्रीरामें ॥ २० ॥ जयावरी
सद्गुरूची दया । सकळार्थ प्राप्त होती तया । माय कामधेनु जालियां ।
वत्सासी काय उणें ॥२१॥ परम पुरुषें अंगिकारिलें । चालें सर्वत्र त्याचें केलें ।
शिवादिदैव त्याच्या बोलें । इच्छित पुरविती ॥ २२ ॥ लडिवाळें वाक्यमधुरें ।
श्रीरामाप्रति करुणासारें । बोलिजेत सप्रेम वानरें । आवडीनें परिसा ॥ २३ ॥
तुम्ही कृपाळू सज्जन । नित्य स्वानंदीं करितां मज्जन । तुमची चर्या
निरंजन । प्रासवर ॥ २४ ॥ नित्य कृपेनें सांभाळिलें । स्वामीवचन
प्रतिपाळिलें । परतत्व सुखें वर्धविलें । नित्यानुसंधान ॥ २५ ॥ स्वामी

प्रसन्नतेची सत्ता । परत्व प्रत्यया आलें तत्वता । हे तुमची प्रसन्नता । कृपाळू संत हो ॥ २६ ॥ स्वामींचा अनुग्रह होये । तरीं च तुमचे दयेचा उदय । स्वरूप प्राप्तीच्या निश्चयें । वोळलेती दयेनें ॥ २७ ॥ माझीं वचनें वोवडीं । वैसोनी अवधान परवडी । यथार्थ धरूनी आवडी । परिसत असा ॥ २८ ॥ अमृताची धरा अनस्यूत । रामद्भुत सदोदित । नित्य प्रचीतीचे तुम्ही संत । अवधारा वचनें ॥ २९ ॥ आजि माझा देवसूर्य उदेला । मजवरी स्वानंदघन वर्षला । अनुभवाचा यावा केला । सद्गुरुरायें ॥ ३० ॥ माझिया सुखासी नाहीं प्रमाण । सांठवितां टांचें जालें गगन । एवढें महत्प्राप्तीचें अवधान । दिधलें मजला ॥ ३१ ॥ श्रीरामाचे महासभेसी । वैसोनी ऋषेश्वर पंक्तीसी । श्रीराममुखींच्या वोघा-मृतासी । सेवा श्रवणें ॥ ३२ ॥ श्रवण स्वराज्य चक्रवर्ती । केवळ प्रचीतीच्या मूर्ति । साधुस्वरूपें जगती । वोधें उत्धरिली ॥ ३३ ॥ संताची दीक्षा पावन । सहज ईक्षणें कृतार्थ जन । आत्मप्राप्तीचें शिरोभूषण । प्रसिद्ध महानुभाव ॥ ३४ ॥ साधुत्रिभुवन जिव्हाळा । साधु स्वानंद कृत लीळा । साधूचीं ऐश्वर्य अंतर्कळा । दर्शनें चि वेधिती ॥ ३५ ॥ एवं साधूच्या सहवासीं । वसतां पाविजे स्वसुखासी । साधूच्या वचनें मुक्तीसी । ध्यात्रे सद्भाविकानी ॥ ३६ ॥ कांहीं न करितां साधन । फरावें साधूचें भजन । संतवचनें निजनिधान । प्रगटे स्वयंभ ॥ ३७ ॥ सज्जन सायोज्याचीं माहेरें । सज्जन अनादीचीं भांडारें । सफळ वोध साक्षात्कारें । कृपेनें अनुगृहितीं ॥ ३८ ॥ स्वभाविक संतकृपा । पावतें करूनी स्वरूपा । निरंजन निर्विकल्पा । देती दीक्षा परम ॥ ३९ ॥ अपरोक्षज्ञान अंतर-स्थिति । प्रवोधाची महाशक्ति । भक्ति मुक्ति सधर्मयुक्ति । स्वसुख भक्तिदानें उदारें ॥ ४० ॥ अभिवंदन तुम्हाप्रति । सलगीची माझी विनंति । अवधान देउनी ग्रंथीं । श्रवण कीजे ॥ ४१ ॥ ऐसें प्रार्थितां संतासी । कृपेनें कळवळिले मानसीं । दयेचे समुद्र तयांसी । भरितें आलें सुखाचें ॥४२॥ आतां कैवल्यक्षेत्र अधिष्ठाता । वोधें ब्रम्हादिकांचा त्राता । भक्तांचें जिव्हार तत्वता । प्रकट करीतु ॥ ४३ ॥ तयाचे होउनी विभागी । अवधानें

सांभाळा मजलागी। कथासंगति निजांग योगी। भक्तांचें रहस्य पाहा ॥ ४४ ॥ इति श्री भीमोपदेश। संतप्राप्तीचे अवतंस। संतकृपेनें प्रगटे ईश। म्हणे मेरु अनंत ॥ ४५ ॥ सप्तम सूर्य द्वितीय कळा संपूर्ण ॥ श्रीरामसमर्थ ॥

श्री

## सूर्य ७ कळा ३

॥ श्रीरामसमर्थाय नमः ॥

श्रीरामपराभक्ति अभ्यंतर। विश्वपावन रामअवतार। आत्मज्ञान साक्षात्कार। विश्वोद्धार चरित्रें ॥ १ ॥ ज्याचेनि विश्व विस्तारलें। नाना कळेनें प्रवर्तलें। मनोहर शोभेसी आलें। सकळ कांहीं ॥ २ ॥ तो सर्वांतरात्मा सगुण। सर्वांग द्रष्टा विश्वलोचन। विश्वासी करितसे पावन। निजज्ञान देउनी ॥ ३ ॥ ज्याचे प्रसन्नतेची सीमा। गुज प्रतिष्ठुनी निगमा। स्वरूपज्ञानें महिमा। प्रगटली जगीं ॥ ४ ॥ स्वरूप ज्ञानाचें निजनिधान। हृदयीं अंतरात्मा विद्यमान। साक्षी स्वसुखाभिवर्धन। अंतरीं वसे ॥ ५ ॥ तो प्रसन्न तरी सुखें अवचट। योळलें मुक्तीचें वैकुंठपीठ। आनंदाभिवृद्धि उत्कट। आत्माराम कृपेनें ॥ ६ ॥ आत्मा प्रचीतीसी येतां जाण। नलगे साधावें आत्मज्ञान। ज्याकरितां करी जे साधन। तो योळवियों मग काय ॥ ७ ॥ राजसन्निद्धी व्हावया। सेवकासी आर्जवीजे तया। तेथें राजा चि प्रसन्न जालिया। पुरती मनोरथ ॥ ८ ॥ तैसा हृदयस्थ ईश्वर। वसे सर्वांघटीं साचार। सायोज्यतेचें माहेर। विद्यमान स्वयें ॥ ९ ॥ आपआपणा पाहों जाणे। द्रष्टा आक्रमेना दर्शनें। ऐसा चि निवळ प्रचीतीनें। स्वयंभ जो ॥ १० ॥ सकळ सुखाचें सुख केवळ। अनुभवाचें वास्तव्य स्थळ। विश्रांतीचें जन्ममूळ। जगदाद्य दैवत ॥ ११ ॥ विशुद्ध ज्ञानाचें हृदय। सभाव आस्तिक्यता निरामय। स्वबोध व्यापक निश्चयें। समाधानी स्वयंभ ॥ १२ ॥ सर्व साक्षिणी तुर्यावृत्ति। तियेसी

साक्षत्वें चि सर्वार्थी । साक्षत्वज्ञान सर्व प्रवृत्ति । करी संपन्न सन्निधानें ॥ १३॥ अर्धमात्रेचें परिज्ञान । प्रणवगिरीचें शिखर गहन । ज्याचेनि अनुभवलें समान । निराभास पद ॥ १४ ॥ तो निजांगद्रष्टा निर्मळ । जडत्व गाळुनी सोज्वळ । काश्मीरीचें लिंग केवळ । स्वप्रकाशघन ॥ १५ ॥ निखिळ स्वानंद उभारा । निवर्तउनी तत्वसंभारा । शुद्धसत्वाचा गाभारा । प्रकाशित निजतेजें ॥ १६ ॥ महत्तत्वाचें अभ्यंतर । सूक्ष्म गुणभूत संस्कार । विज्ञानदीप तेजें निर्धार । आणिल्य द्रष्टुत्वीं ॥ १७ ॥ ज्ञप्ति-सुखाचें सुखस्वयें । प्रत्ययेवीण घेत प्रत्यय । या आत्मज्ञान निश्चयें । राहिला सुनिश्चळ ॥ १८ ॥ द्रष्टेपणाची निजदृष्टी । व्यापकपणाची समसाटी । सामाविली आपुले पोटीं । तो द्रष्टा निर्मळ ॥ १९ ॥ सकळ वृत्तींचें निजमूळ । विश्वसंभव क्षेत्र केवळ । परंतु या कल्पनेचा मळ । कदापि न लगे ॥ २० ॥ गगनासी रंग द्यावया । उपाय तितुके जाती वृथा । वृत्तिसंस्कार आत्मया । तेंवि संसर्ग न लगे ॥ २१ ॥ मुक्ता-फळाचे आंगीचें तेज । मुक्ताफळीं पाहवे चोज । तेज काढुनी जातां तें सहज । तेज ना मुक्तें ॥ २२ ॥ तेज संभवलें जेथुनी । तें निजतेज पाहवें मनीं । मग त्या तेजापासुनी । मुक्त जाले पाहवे ॥ २३ ॥ साधु सच्चिदानंद व्यक्ति । विज्ञान सुसेसी संभूति । नित्य मुक्त सिद्ध विभूति । आत्मयोग संपन्न ॥२४॥ सच्चित्सुख तनु अभ्यंतर । प्रकाशलीं तेज निर्धारें । स्वरूपाचीं रूप भांडारें । आयतनें ज्ञानाची ॥ २५ ॥ केवळ आनंदाची च काया । स्वसुखाची तेणें उजळूनियां । आत्मज्ञान भूषित क्रिया । अळंकरली ॥ २६ ॥ अखिल स्वबोध निधी । अभ्रांत सुखाचे निरवधी । ठेवे चि होती निरोपाधी । देह सज्जनाचे ॥ २७ ॥ नित्य मुक्त कलेवरें । कायाकलिकल्मषहरें । कल्याणकृत चर्या निर्धारें । मूर्त सुख स्वयंभ ॥ २८ ॥ केवळ सुखाचे पुतळे । सिद्ध स्वसुखाचे जिव्हाळे । साधुसाक्षात्काराचे डोळे । श्रीमंत स्वरूपें ॥ २९ ॥ कैवल्य-घटावप्रघट्टिका । निजांग दीक्षित दशांग वेदिका । सन्निधान सदजें पीठिका । कैवल्य क्षेत्रींच्या ॥ ३० ॥ स्वरूप दशेचीं पाटांगणें । निर्मळ

शोभा विस्तीर्णपणें । अनुभव अंतस्तें गहनें । हृदयें ज्याचीं ॥ ३१ ॥ सुखाब्धीचे गर्भ अपार । अभ्रांत दशेचे परपार । पारावाराचे निर्धार । अकृतानें रूपस ॥ ३२ ॥ परब्रह्माचे निजप्रत्ययें । अवतरले स्वानंद स्वयें । अक्षय संपत्तीचे नृपवर्य । प्रगल्भ चूडामणि ॥ ३३ ॥ समाधि अचळाचें पाठार । विश्रांतीचें निजमंदार । ज्ञानमंदाकिनीचें अपार । बोध साधुशरीरें ॥ ३४ ॥ निज प्रसन्नतेचे चिंतामणि । अपरोक्ष ज्ञानरत्नांच्या खाणी । साधु स्वरूपाची भरणी । आलीं निजदेवें ॥ ३५ ॥ ऐसिया साधूच्या मूर्ति । प्रचीतीनें जे अर्चिती । भक्तींचें जिव्हार त्याप्रती । जाण आकळलें ॥ ३६ ॥ भक्तींचा अंतर्भाव गहन । येथें न चले कर्तव्याभिमान । भाव चि जाणिजे प्रधान । रहस्य कळावया ॥ ३७ ॥ केवळ अंतर्भावाचें जिव्हार । उपमेसी साधूचें शरीर । साधु शरीरीं निरंतर । दीक्षा चिन्हीत असे ॥ ३८ ॥ पराभक्तीचें अभय । तुज सांगतां निजप्रत्ययें । तरी तूं चि होउनियां स्वयें । अनुभवी तें गुज ॥ ३९ ॥ परा पारुषटी निश्चयेसी । तें भक्तिरहस्य तुजपासीं । सांगतों कपींद्रा निश्चयेंसी । देईं अवधान आतां ॥ ४० ॥ स्वामीचा अनुग्रह सत्तात्मक । स्वयंभ अनुसंधान विवेक । प्रचीति सुख कांहीं येक । दर्शनें जागृत ॥ ४१ ॥ जागृतीसी वेध असे निद्रा । निर्वेध तव कृपा योगींद्रा । अक्षोभित सुख समुद्रा । रामचंद्रा सद्गुरु ॥ ४२ ॥ दीप उजळली निजकरें । मग तेजस करणें नुरे । तूं प्रभेची निजप्रभा निर्धारें । ज्ञानरविकुळभूषणा ॥ ४३ ॥ विचित्र कळा यंत्रकारें । मनोहर यंत्र चमत्कारें । ते कळा प्रसवे उपचारें । स्त्राव न लगे तया ॥ ४४ ॥ काष्ठविशेषें कळाकारें । तारक प्रक्रिया निर्धारें । तारु निर्मिलें कार्यगारें । वरी तारका त्या चावी न लगे ॥ ४५ ॥ पदार्थ परिपाकें परिशुद्ध । माधुर्यतेनें जालें सिद्ध । तयासी गोडी असे स्वतः सिद्ध । आणावी न लगे ॥ ४६ ॥ अमृतें घोळिले पदार्थ । ते भक्षावे चि मात्र तृप्त्यर्थ । तेविं तुवां मज केलें कृतार्थ । यावरी कर्तव्य असेना ॥ ४७ ॥ तुवां दिधलें अवधान । परिपाळिले सनातन । आतां ते मागसी तें कोठून । द्यावें म्यां समर्था ॥ ४८ ॥ दिल्हें ते उपभोगासी आलें । सदोदित

अनुभविलें । निज तृप्तीचें पारणें जालें । जीर्णासी आलें दयाळा ॥४९॥ त्याची प्रत्योपकार स्थिति । पाहतां निरोपम मति । प्रत्यग्ना नसे तुजप्रति । धावया कांहीं ॥ ५० ॥ नयनें दिधलें दर्शन । यासी काय द्यावें हर्षोन । येथ सुदर्शन करें स्पर्शोन । भवभेद हरिला ॥ ५१ ॥ आता दुर्भव ना सुख संभव । निर्भव दशा अभिनव । ऐसा प्रसन्न जाला राघव । आमुचें कुळीं ॥ ५२ ॥ चिरंतन सुख तनु देऊन । वांचविलें सनातन । नाहीं सोयरीक लावणें । समंधाची कांहीं ॥ ५३ ॥ उपप्लवण ना सुभक्ष जात । आमुचीच जाती वर्जिली येथ । धन्य प्रतिपाळक समर्थ । तूं आमुचा धणी ॥ ५४ ॥ दिव्य शरीर दरिद्रता । मर्कटी काया दिल्ही उचिता । मुळीं च देहासी अयोग्यता । योग्यता तेथें कैंची ॥ ५५ ॥ नाहीं परिधान वसन । नाहीं दिव्यान्न अशन । नाहीं धरावया भूषण । योग्यता देहीं ॥ ५६ ॥ लागता शीतोष्ण वारा । सेऊं तरुवर निवारा । ऐसा सुप्रसन्न दातारा । निरोपाधिकारीसी ॥ ५७ ॥ शुद्ध बुद्ध सर्वांपरीं । ठेविला हस्तक शिरावरी । आतां पत्र सुखें अवधारीं । उरी च नसे मजला ॥ ५८ ॥ मीच मजला उरेना । तेथें कवण भावील कवणा । कवण महा अद्वैतज्ञाना । होईल पात्र ॥ ५९ ॥ ऐसियापरी लडिवाळे । प्रीतीचे पुरती ळळे । तें वचन माधुर्यें रसाळें । भीम उक्ति अवधारा ॥ ६० ॥ इति श्री भीमोपदेश । पराभक्तीचा आवेश । गुरु शिष्यान्वय सौरस । म्हणे मेरु अनंत ॥ ६१ ॥ सप्तम सूर्य त्रितीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥ श्रीराम ॥ समर्थ ॥ वल्भीमायनमः ।

---

श्री

## सूर्य ७ कळा ४

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामविश्रामबोध कंदरा । विद्याक्षीर निधी मथित मंदरा । स्वसुख विलास मंदिरा । मुक्ति इंदिराविभु ॥ १ ॥ इहपरत्र परपावन । तुझिये कृपेचें महिमान । कृपेच्या जनका विद्यमान । मज प्रसन्न जालासी ॥ २ ॥

संकल्पातीत केलें मजला । काय समर्पावें म्यां तुजला । दयार्णव दीन बंधु दीनाला । संरक्षिसी सुखें ॥ ३ ॥ कृपामृत वचनें मज । मागितलें अवधान सतेज । तरी मी तुझा चि की हे रघुराज । ज्ञानसूर्यप्रकाशा ॥ ४ ॥ तुझे कृपेचें निजतेज । ब्रम्हानुभवी निज गुज । तेणें चि भक्ति-रहस्यें उमज । उमजवीं मातें ॥ ५ ॥ ऐसें अवधान पर । जालें मारुतीचें अभ्यंतर । वारुनी श्रीरामासी नमस्कार । श्रवणीं बैसला ॥ ६ ॥ कृपा नयन सरोजें । अवलोकुनी सदयसमाजे । संबोधुनी भक्तीच्या उमजें । अनुगृहीतसे भीमा ॥ ७ ॥ अगा ये बोध गिरिवरधरा । विद्यानिधान अभ्यंतरा । अपरोक्षगर्ताच्या जिव्हारा । श्रवणासी अर्ह होसी ॥ ८ ॥ अवधारिलें माझें अभ्यंतर । तेणें सुखावलासी थोर । प्रचीतीचें माहेरघर । जालासी आतां ॥९॥ प्रज्ञाप्रगल्भ परिपाळणा । विज्ञान विश्व चाळणा । निजबोध संपत्ति निधाना । मम मानस प्रिया ॥१०॥ तरी गा तुज चि सकळ । अर्पीन जीवींचें गुज केवळ । भक्तीचें रहस्य प्रांजळ । अवधारीं आतां ॥ ११ ॥ जो स्वरूपीं अभेद दर्शनें । तदाकार जाला मनें । भेदाभेद संकल्पानें । उरला चि नाहीं ॥ १२ ॥ प्रचीतीचें करूनि पात्र । स्वसुख अनुभवी स्वतंत्र । परतत्वानुभवें श्रोत्र । विस्तीर्ण केला ॥ १३ ॥ निजबोधगुरुकृपावचनें । समाधानाचीं आयतनें । स्वराज्य सुख संस्थान । लाधला तो मुमुक्ष ॥ १४ ॥ गुरुवचनीं विश्वास जया । भक्तीचें रहस्य त्याची काया । सर्वस्वें समर्पोनियां । गुरुपदीं वसे तो ॥ १५ ॥ व्यक्ति मात्राचें अभ्यंतर । देखे स्वरूपें चि साचार । स्वरूपाचा आनंद अळंकार । ते हें विश्वरूप ॥ १६ ॥ विश्वीं परतले दर्शनें । पाहे स्वरूप प्राप्तीची स्थानें । चिदानंदाचीं भूषणें । निष्ठेनें भोगी ॥ १७ ॥ स्वसुखाचे साक्षात्कार । संत जाणिजेत साचार । संत भजनें कृतोपकार । ऋणी होय तयाचा ॥ १८ ॥ संतजनाचा जया नेम । तयाचा भृत्यानुभृत्य मी सप्रेम । उपचारीं सर्वस्वें परम । आराम स्थितीनें ॥ १९ ॥ आत्माराम मी निरंतर । वसवीं तयाचें चि घर । कां जे संतसेवा साचार । घडली तया ॥ २० ॥ संत अनंत विभूति । नामाधिले सांगावे किती । संतमाळा जे स्मरती ।

ते महापावन जगीं ॥ २१ ॥ संत माळिका मनोहर । येकेक ज्ञानी रत्न अगोचर । प्रभेनें विश्वप्रभाकर । मंटव्या आणिती ॥ २२ ॥ स्मरतां संत नामावळी । पावन होइजे तात्काळीं । महिमा अगाध भूमंडळीं । पावन संताची ॥ २३ ॥ माझें मूळ अधिष्ठान । त्या माझींच स्वरूपें जगीं जाण । प्रमाणा न येती संपूर्ण । सृष्टी भरली असे ॥ २४ ॥ विष्णु शिव विधि इंद्र । द्वादश सूर्य अक्रा रुद्र । प्रसिद्धतेचे सुखात्मचंद्र । समुद्र बोधाचे ॥ २५ ॥ अष्ट वसू अष्ट मूर्ति । तेहेतीस कोटी सुरवर पंक्ति । अठ्याण्सी सहस्र व्यक्ति । ऋषेश्वरांच्या ॥ २६ ॥ गणगंधर्व सिद्ध चारण । भैरव गणपति षडानन । सिद्ध सनक सनंदन । सनत्सुजात स्वरूपें ॥ २७ ॥ कपिल दुर्वास दत्तात्रय । ऋषि सप्त तेजोमय । श्वेत केतु नारद प्रत्यय । अष्टावक्र ऋषि ॥ २८ ॥ रोमहर्ष कौंडण्य कण्व । जावाली गार्ग्य सिद्ध नव । अंबऋषि शुक व्यास अभिनव । भक्तमालिका ॥ २९ ॥ एकेक भक्तरत्न चोखडें । ज्ञानप्रभाकर परिपाडें । प्रल्हाद बळि अक्रूर निवाडें । महाविभूति माझ्या ॥३०॥ पर्वत वनें विस्तार । नद्या सिंधु सविस्तर । माझें विभूतीनें चराचर । कोंदाटलेंसे ॥ ३१ ॥ गुप्त प्रगट सांगो किती । विश्वंभर माझ्या विभूति । नृपपरंपरा विख्याति । सूर्यचंद्र वंशाचे ॥३२॥ चौदा मनु पासुनी संतति । विश्वप्रकाशक ज्याची मति । विदेहादि नृपति । विभूति माझिया ॥ ३२ ॥ तपस्वी अनुष्ठानें योगी । आत्मपरायण वीतरागी । त्यक्त परिग्रह मजलागी । उदासीन जीवें ॥ ३४ ॥ त्यक्त उपभोग पुत्रदारा । विसरोन सर्वस्व संसारा । निज अभ्यंतरीं निरंतरा । मज चि पाहती ॥ ३५ ॥ कांता कनक विषयासी । विटले उदासीन तापसी । प्राणांतिकें निश्चयेसीं । मदर्थ करिती तपें ॥ ३६ ॥ माझे प्राप्तिस्तव अनुदिन । घालुनियां अखंडासन । धरूनि बैसले माझें ध्यान । मानसपूजनीं ॥ ३७ ॥ माझे नामाचे जयघोष । गर्जती वाचेसी संतोष । माझीं चरित्रें अशेष । कीर्तनीं गाती ॥ ३८ ॥ माझ्या अवताराचीं रूपडीं । प्रशंसितां जयासी आवडी । उपासना आर्जव परवडी । पूजाविधि प्रकारें ॥ ३९ ॥ रात्रिंदिवस मदर्चन । विशेष भक्ति अंतःकर्ण । भाव धरूनि

प्रमाण । मिळाले मत्स्वरूपीं ॥ ४० ॥ स्वरूप साक्षात्कारीं रूपें । तितुकींही जाण माझीं. स्वरूपें । मजकारणें महातपें । तपती सर्वदा ॥ ४१ ॥ मनापासुनी विषयीं विरक्त । मजकारणें भजती भक्त । मजवांचुनी तयासी मुक्त । कांहीं च प्रिय नसे ॥ ४२ ॥ सर्वस्वें मज चि अनुसरले । उदास विरक्त वनीं भरले । सर्वस्वें चि मज चि समर्पले । भक्त महा स्थितीचे ॥ ४३ ॥ जाण इतुकिया व्यक्ति देहधारक । ते माझे चि निश्चयात्मक । तया अंतरीं मी एक । सर्वस्वें वसे ॥ ४४ ॥ अणुपासूनी ब्रम्हांडवरी । चिर माझीं रूपें वरीं । मज विश्वरूपासी धरी । ध्यानसमेळें ॥ ४५ ॥ ऐसें मारुतीसी प्रबोधिलें । जगदांतर नामाथिलें । तेणें हृदयासी आणिलें । निरंतर ॥ ४६ ॥ पुढती विश्वकंद चिदंकुर । लीलासृष्टीचा ईश्वर । प्रबोधी रुद्रासी अभ्यंतर । तें सावचित अवधारा ॥ ४७ ॥ इति श्री भीमोपदेश । संतमाला अविनाश । एकेक ज्ञानी चित्प्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४८ ॥ सप्तम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥

---

श्री

## सूर्य ७ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामविश्वात्मविशेषा । विश्वबोधपराविशेषा । विश्वंभर सुख सावकाशा । निरावकाश रूपें ॥ १ ॥ अंतर्भावना भरपूर । सबाह्य अभ्यंतर सुख अपार । अपरांपर परात्पर । विश्वपर दैवता ॥ २ ॥ जय जय जगदभ्यंतरा । जय जय मुनिमानसमनोहरा । जय जय निजात्मसुखसागरा । सीतावरा नमस्ते ॥ ३ ॥ नमस्ते प्रणवगिरिधरपूर्वा । नमस्ते निजवृत्ति सुरत अपूर्वा । पूर्वापर द्रष्टुत्वें सर्वा । बोधिसी समार्थे ॥ ४ ॥ चिदानंदकंदाचे अंकुर । समुत्ते फांपावले अपार । बळावले निजसुखानें साचार । स्वानंदजळें ॥ ५ ॥ तें हें विश्वरूप प्रबळ । स्वानंदाचे कोंभ अखिळ । पैसावले अनुमाळ । साळमाळ विशाळें ॥ ६ ॥

आस्तिक्यतेची धृतिधरा । स्वानंदें बोल सर्वांतरा । सोहंबीज मूळ परा । उद्बोधित सुखें ॥ ७ ॥ सावकाशाचेनि मुरवाडें । विश्वमूळ जिकडे तिकडे । विरूढउें वाडें कोडें । देहात्म फळीं ॥ ८ ॥ नामरूपाचिया प्रसिध्दपणें । वेचाडें वळावरीं सुखानें । त्रिगुणाचीं पृथक स्थानें । योवें दृढावलीं ॥ ९ ॥ स्वसुखाची सत्वभूमी । तेथें स्वानुभव ब्रम्हास्मि । उंचावली अंतर्यामीं । लसलसीत वळें ॥ १० ॥ वंशपरंपरेचा डींगा । उंचावला शिक्षित जगा । मूळ जिव्हाळा निजांगा । सुखें अनुभवित ॥ ११ ॥ स्वानंद सिंधूचें जीवन । कल्लोळाकृति शोभायमान । ज्ञानघन आत्मयापासून । अलंकरलें विश्व ॥ १२ ॥ जगदंतर जिव्हाळा । जगद्रूप घन सांवळा । रूपासी येउनी स्वलीळा । दावितसे कौतुक ॥ १३ ॥ आस्तिक्ये वरील हा उभारा । आत्माराम परंपरा । सूर्यापासूनि रश्मि अपारा । तेवि जग श्रीरामीं ॥१४॥ विज्ञान स्वसुखा मृतकंद । विश्वाकारें परमानंद । विश्वरूप बोध मुकुंद । प्रसन्न जाला सद्गुरु ॥ १५ ॥ अनंत स्वरूप मनोहर । अनंतज्ञानें कृपाकर । अनंत सुखें साक्षात्कार । मज उपदेशित असे ॥ १६ ॥ रिता न पडे चि कोठें ठाई । आस्तिक्य बोधिलें हृदयीं । निरंतर स्वरूप प्रलयीं । फावलें मजला ॥ १७ ॥ कृपा अनंताची अनंत । ते प्रचीतीसी आली निवांत । अपरोक्ष दर्शनें एकांत । सेविला सुखें ॥ १८ ॥ आत्माराम आत्मनिधान । हृदय जालें विद्यमान । आत्मानुभव सनातन । अभिन्न प्रचीति ॥ १९ ॥ ऐसी तुझी कृपा अभिनव । विश्वरूप बोधिलें निर्भव । साधूचीं शरीरें स्वानुभव । उपदेश मूळ ॥२०॥ जनार्दन जन स्वयें । भजनाचा लाभ निश्चयें । भजनें समाधान निश्चयें । भेदासी न येतां ॥ २१ ॥ मी माझें सर्व समर्पण । अनुभव सुखें विनटोन । सप्रेम तारतम्यें पूर्ण । सेवीन श्रीगुरु रामा ॥ २२ ॥ अनंतदीप प्रभावळी । एक चि तेजाची नव्हाळी । तेवि विश्वरूपाची आगळी । अभिन्न शोभा ॥ २३ ॥ दिव्य सुवर्णाचे अलंकार । मनोहरपणें अपार । सुवर्णाचा चि तो विस्तार । तेवि जग ज्ञानघन ॥ २४ ॥ ऐसी स्वयंभ माझी प्रचीति । विश्वरूपा श्रीरघुपती । या चि अंतरस्थितीची गति । परिक्षूनि सांगे ॥ २५ ॥ शिशु स्वइच्छेनें वरले । कीं निद्रिस्त

अवचितें चावळे । सद्ज्ञानें जागृतें अंतर्कळे । परिक्षूनि प्रबोधिजे ॥ २६ ॥ विश्वाकार अंतर स्थिति । विश्वंभर जालासे मारुती । बोलामाजि महाप्रचीति । येतसे श्रीरामा ॥ २७ ॥ प्रचीतीची निज प्रसन्नता । म्हणे कृतार्थ जालासी रे हनुमंता । निवळत आलें तुज आतां । भक्तीचें रहस्य ॥ २८ ॥ प्रज्ञावंत शिशूतें । विद्या पढवितां तातें । मुखपाठ येतां चि तें । तोष पाविजे जेविं ॥ २९ ॥ शिकविलें तें पढोनी दावितां । आनंद पावे तो पिता । तेविं जालें रघुनाथा । हनुमंत वचनीं ॥ ३० ॥ संभवली वित्पत्ति जगे । शिकविलें पाठ तगे । लाविल्यां सन्मार्गी लागे । ते संततिसुख जनका ॥ ३१ ॥ तैसा सत्शिष्य प्रज्ञावंत । गुरुचित्तासी तोषवीत । सद्भावें चि घेत हृद्गत । प्रसंगोचित वचनें ॥ ३२ ॥ प्रसंगोचित अति नम्रपणें । जीवीं रिघोनी पुसों जाणे । विश्रांतीच्या सुखें तेणें । सांगावेंसें चि वाटे तया ॥ ३३ ॥ जेथें मन बुद्धी चाहात । न पवे चि कांहीं तर्क जात । स्वरूप ज्ञान तें अकल्पित । सत्शिष्य लाहे विनयें ॥ ३४ ॥ सद्भावाची बरवी चोज । सत्क्रिया आंगीं निजतेज । सन्मार्ग भूषण मोज । शिष्य चक्रवर्ती ॥ ३५ ॥ तरी गा सद्भाव संपत्तीनें । जो आगळा सत्शिष्य सन्मानें । ज्यासी देखतां चि स्वानंदानें । सद्गुरु तोषे ॥ ३६ ॥ पुरती मनोरथाचे लळे । ऐसे गुरु शिष्य अंतर्कळे । स्वरूप प्राप्तीचे जिव्हाळे । प्रगटती वचनीं ॥ ३७ ॥ महा आत्मज्ञानी निष्ठावंत । श्रवणीं सुखावले अनंत । गुरु शिष्य हृद्गत । घेत बैसले ॥ ३८ ॥ अंतर प्रचीतीच्या विवरें । चमत्कारती तत्वसारें । स्वानंद अक्षराचीं अक्षरें । रसना घोटूनि घेती ॥ ३९ ॥ जैसीं अमृतखंडें मधुरें । वदनीं घालितां चि चमत्कारें । रसनेसी गोडीच्या निर्भरें । अपार निववितीं ॥ ४० ॥ तेविं संत अद्वैत ग्रंथीं । विसांवत सुखें परमार्थी । तो अद्वैतबोध सर्वार्थी । संपन्न होये ॥ ४१ ॥ संत कैवल्य प्राप्तीचे नृप । संतासी आर्जवीं तूं सद्रूप । मारुतीसी कैवल्याधिप । प्रीतीनें प्रबोधी ॥ ४२ ॥ तें परमामृत वाक्यें सार । प्रचीति माधुर्य तें चि मधुर । चित्त देउनियां अत्यादरें । परिसीजे संतीं ॥ ४३ ॥ इति श्री भीमोपदेश । गुरु अद्भुत भक्तरहस्य । केवळ

सुखाचीं रहिवारा । म्हणे मेरु अनंत ॥ ४४ ॥ सतम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीराम ॥

श्री

सूर्य ७ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम स्वयंभ सुरें मी । माझा विस्तार न माय व्योमीं । तो मी पाहोनि अंतर्यामीं । तन्निष्ट जाटों ॥ १ ॥ पंचसत्रीं मृत्तिकेचें लिंग । स्वकरें चि निर्मूनि सांग । स्वातें चि सद्भावें अंतरंग । पूजा करितां ॥ २ ॥ स्वानंद जग जगे अव्यंग । तें ज्ञान निजांगें चिन्ह उत्तुंग । तेथें न साहे चि अंगपंग । संग वृत्तीचा ॥ ३ ॥ निजांग शोभेचें स्वयंभ । विज्ञान प्रभा सुप्रभ । तें अपरोक्ष आत्मलिंग अक्षोभ । आत्मनिष्ट अर्चिती ॥ ४ ॥ निजज्ञान आणूनि प्रत्यया । अष्टभावीं विधातया । षोडशकळेनें अद्वया । पूजा षोडशोपचारें ॥ ५ ॥ षड्गुण ऐश्वर्य जात । अविनाश संपत्ती अमित । उपचार पदार्थ अनंत । अनंतोपकरणें ॥ ६ ॥ अनंत पूजा परवडी । अनंतपात्रें योज चोखडी । अनंत सुमनें सुवास प्रौढी । अनंत धूपदीप ॥ ७ ॥ अखंडैक रस सप्रेम । पार्थिव अर्चिले परम । तें अर्चकाचें चि अंतर्याम । प्रसन्नतेसी आले ॥८॥ स्वयें चि धरूनि अंतर्निष्ठा । स्वयंकृत शिवलिंग प्रतिष्ठा । परप्रसाद वसौटा । जाहला स्वयें चि ॥ ९ ॥ तैसें आपुलें हृदय । प्रतिष्ठुनि आदि देव स्वयें । प्रसन्नतेसी आणूनि प्रत्ययें । आहवे प्रसाद ॥ १० ॥ तूं सद्भाविक अहेसी । गुज सांगावें वाटे तुजपासीं । यास्तव सद्भावें आपणासी । विश्वरूप आर्जवी ॥ ११ ॥ धातुमूर्ति मनोहर । प्रसिद्धतेनें हरिहर । नाम रूढलें साचार । भाव ठेवावा तेथें ॥ १२ ॥ सद्भावांच्या परवडीनें । अर्चितां क्षेत्र विधीनें । क्षेत्र प्रतिष्ठा प्रचीतीनें । विश्व तरे पहा ॥ १३ ॥ दारु धातु पाषाण । मृत्तिका विशेष चित्र जाण । अर्चिता सद्भावें पूर्ण । होती प्रत्यक्ष ॥ १४ ॥ नाना यंत्र मंत्र विधान ।

नाना पूजा पद्धति संस्थानें । नाना अनुष्ठान अंतर्निष्ठेनें । प्रसन्नतेसी येती ॥ १५ ॥ नाना तपश्चर्या अष्टांग योग । नाना मंत्र सिद्धि अंतरंग । नाना पुनश्चरणें प्रसंग । सफळ अंतर्निष्ठेनें ॥ १६ ॥ अंतर्निष्ठेनें पुरता । तो सद्भक्त जाण हनुमंता । अंतर्निष्ठेविण अहंता । रूढे भजन सार्थे ॥ १७ ॥ अंतर्निष्ठा म्हणिजे काय । संशय संदग्धपर्याय । नेणोंनी विवेक प्रलय । चाळिला परिपाठ ॥ १८ ॥ अंतर म्हणिजे आत्मस्वरूप । स्वयंभ आत्मज्ञान तद्रूप । अंतर्निष्ठा आपें आप । जाण निज प्रचीति ॥ १९ ॥ अंतर्निष्ठेनें जगदंतर । वसोनी राहे निरंतर । अणुपासूनि जगदाकार । देख माझीं स्वरूपें ॥ २० ॥ अंतर्निष्ठावंत तूं होसी । या कारणें चि तुजपासीं । वचनोपचनीं निश्चयेसी । रूढे भक्तीचें रहस्य ॥ २१ ॥ सत्क्षेत्र क्षेत्रज्ञा कपि । तूं निष्ठावंत आणि साक्षेपी । विरक्त सद्भाविक तपी । नित्य वससी सुखें ॥ २२ ॥ जप तप अनुष्ठान पर । तोपलेंसे तुझें शरीर । भव काम शंका संस्कार । असे चि ना तुजला ॥ २३ ॥ सन्मार्ग प्रवृत्ति प्रेमळ । शांति क्षमा दयाशीळ । तुझें अंतःकर्ण केवळ । अंतर्निष्ठेनें वरिलें ॥ २४ ॥ सत्क्षेत्रीं पेरितां वीज । ते अनंतगुणें लाभे सहज । तैसें आत्मज्ञान सतेज । निज तुजसीं फावे ॥ २५ ॥ जें गोप्याचेंही गोप्यगुज । निज हृदयीचें सहज । तुज म्यां सांगितलें उमज । चोज तेणें आतां ॥ २६ ॥ सूक्ष्मावरून सुख अप्रांत । स्वल्पामध्यें ध्यावें बहुत । हृदयामाजि सुखें अनंत । सेविजे तैसा ॥ २७ ॥ अलया परचक्राच्या कोंडी । कळतां सुवर्माची प्रौढी । चमत्कारें चि देशधडी । करूं ये त्यातें ॥ २८ ॥ कां राजकारण प्रसंगें । न कळतां वर्म कळेहो लागे । तें सूक्ष्म चि कळतां अंतरंगें । महाविक्षेप सरती ॥ २९ ॥ सांगितल्यावीण चिन्हावरूनि । तर्क ठाईं पडती ज्ञानी । विकल्पा नाणितां जनीं । सांभाळती प्रसंग ॥ ३० ॥ तैसें हें भवातिशय दुःख । जाले स्वरूपीं होतां विमुख । अकळ स्थिति होउनी सन्मुख । संत दुःखाचें सुख करिती ॥ ३१ ॥ पहा शिवें होउनी ध्यानस्थ । महा विष केलें अमृत । रजनीचरें अमृत घेत । विपस्थितीसी आणिलें ॥ ३२ ॥ येथ कर्तयापासीं चोज । आहे वरें जीवीं समज । पहा तुज चि तूं उमज । वंधु

आणि रिपुत्वें ॥३३॥ आपणासी नेणतां आरण । पावे कोटी दुःखातें मरण । आपणासी जाणतां सुखैकघन । कोटी मुक्ते अनुभवी ॥ ३४ ॥ येथें काय सांगणें अपूर्व । आपणामाजि आहे सर्व । धरूनि अहंतेचा गर्व । बुडाले भवीं ॥ ३५ ॥ ऐसिया विचाराचे रीती । परासी बोधऊं जाणे युक्ति । परि स्वहित चुकोनी जाती । प्रवृत्ति मेरें ॥ ३६ ॥ दुर्धरप्रवृत्ति संस्कार । अन्योपदेश सविस्तर । कुतर्क चातुरी विचार । अविचार रूढी ॥ ३७ ॥ परासी बोधविती सज्ञान । स्वयें आचरती अज्ञान । ध्यानारूढ अवधान । अंतरीं धन अपेक्षा ॥ ३८ ॥ निर्विषय विरक्तीचा वळसा । प्रवृत्तिविषया-सक्ति मानसा । निस्पृह चर्चेनें दुराशा । क्षोभित बहु ॥ ३९ ॥ ऐसिया प्रकारीची रूढी । जगीं प्रवर्तली प्रौढी । उपदेश घरोघरीं बोढी ! विकल्पाची च ते ॥ ४० ॥ अंतरीं धरूनि धनस्वार्थ । घरोघरीं धांवती उपदेशार्थ । जाण दुराशा क्षोभें परमार्थ । बाह्यमुद्रा ते ॥ ४१ ॥ नाहीं गुरुपदीं निष्ठा जिव्हाळा । नसे चि सद्भक्ति अंतर्कळा । अवघा चि लौकिक लीळा । प्रवृत्तीची च हे ॥ ४२ ॥ महामायेची मोहकशक्ति । प्रवाहीं घाली भक्ति विरक्ती । कल्पिला रानभरी युक्ति । मुक्त प्रतिष्ठा ॥ ४३ ॥ असो या विकल्पाच्या स्थिती । त्यागार्थ सांगणें मारुती । तूं तरी निष्ठावंत तुजप्रति । सांगणे चि न लगे ॥ ४४ ॥ गुणातिशयें क्षोभे माया । मायेचि चर्या जाणोनियां । व्हावें मायातीत सखया । तें चि आतां अवधारीं ॥ ४५ ॥ इति श्री भीमोपदेश । सद्भक्ति प्रमयविलास । तोष जिव्हारस विशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ४६ ॥ सूर्य सप्तम कळा षष्ठम ॥ ६ ॥ श्रीगोविंद ॥



श्री

## सूर्य ७ कळा ७

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम मज मी स्वसुखें । अनुभवित सद्गुरुमुखें । मी अधिष्ठान परी त्या उल्लेखें । प्रवाहीं न पडे ॥ १ ॥ माझी अंतरस्थिति जिवलगा ।

निजनिष्ठा तारतम्यें चि गा । अनुभवितसे निजांगा । सप्रेम भरें ॥ २ ॥ माझ्या विस्ताराची प्रौढी । पाहतां स्वरूपाची एवढी । संकल्प सृष्टीच्या कोडी । होत जाती स्वभावें ॥ ३ ॥ परी मी त्या सृष्टीचा । संकल्प न धरी अहंतेचा । लोभें तया पदार्थाचा । अभिळासी नव्हे ॥ ४ ॥ अनावर कल्पना जात । माझे ठायीं च अमासत । परी मी स्वामित्वें दुर्मत । गर्व न धरी कांहीं ॥ ५ ॥ ईश्वर हि मजपासूनी । सत्ता स्वामित्वें लाहोनी । उत्पत्ति स्थिति निदानी । कर्ता होय पुरुषार्थे ॥ ६ ॥ हे अकल्पित गुणभूत । अवांतर मायेचें कल्पित । माझ्या संन्निधानें प्रसंगोचित । व्यवसायीं प्रबळे ॥ ७ ॥ मी स्वभावें निर्विकार । सावकाशरूपें अपार । मज कर्तव्याचा संस्कार । मुळींहूनि नसे ॥ ८ ॥ जाण यथार्थ चि वस्तुता । माझी निःसंग अस्तिक्यता । मी द्रष्टा ना साक्षी पाहतां । कांहीं च नव्हे ॥ ९ ॥ ऐसें माझें स्वरूप निर्मळ । विस्तीर्णपणें साळमाळ । माझे चि पोटीं अंतराळ । भासलें भेदें ॥ १० ॥ माझ्या आश्रयें करूनि तत्वता । भेद विस्तारला पुरता । मी निरपेक्ष स्वभावता । तेणें भेदासी फावलें ॥ ११ ॥ मी नियंता नव्हे कांहीं । कवणाचें मज पाहणें पाहीं । मुळींहूनि लागलें चि नाहीं । स्वतः सिद्धपणें ॥ १२ ॥ या निजांग निर्मळतेनें । सनातन व्यापकपणें । स्वाभाविक माझें असणें । विश्वीं यया ॥ १३ ॥ स्वभाविक माझे ठायीं । माझें आत्मज्ञान न पाहीं । तें माझे हृदयीं सर्वही । प्रवर्तक होये ॥ १४ ॥ द्रष्ट्यासी द्रष्टेपण तेणें । त्याचे निर्गुणाभिवृद्धि होणें । त्याचेनि भूत प्रवृत्तीनें । पंचभूतरचना ॥ १५ ॥ त्याचे नि साक्षत्व सर्व देहीं । पदार्थज्ञान पडे प्रवाहीं । विश्वरचना आहे नाहीं । सत्यसंकल्पी ज्ञान तें ॥ १६ ॥ त्या ज्ञानामाजि अभिनवसत्ता । सत्तेने ब्रह्मांड तत्वता । निर्माण करूनि स्वभावता । संरक्षितसे ज्ञान ॥ १७ ॥ ज्ञानी च प्रळयशक्ति दुर्धर । करी महाप्रळय संव्हार । ज्ञानी च सृष्टीचा व्यवहार । चाळेसा उपाय असे ॥ १८ ॥ ज्ञानी च अद्भुत धारणाशक्ति । अंतरिक्षीं च ब्रह्मांडपंक्ती । पाहे चिरकाळ वसती । खचोनि जातां ॥ १९ ॥ चंद्रसूर्या

ऐसीं महा तेजें । ज्ञानी च संभवे सहजें । अव्याकृत अकृतबीजें । अभिनव उत्पत्ति ॥ २० ॥ अव्यक्ता पासूनि संस्कार । विस्तारला महा संसार । उत्पत्ति स्थिति संव्हार । सत्तेनें होत जातसे ॥ २१ ॥ अंतरिक्षीं मेघमाळा । काळ नेम सर्वांळा । वर्तती जिव्हाळा । संपूर्ण जगाचा ॥२२॥ ऐसें अव्यक्ताचें महा बीज । संभवलें सृष्टीचें काज । अनादि सिद्ध सहज । वर्तत आलें ॥२३॥ नाना औषधी प्रयोजनीक । विस्तारली वृक्ष सकौतुक । फळें पुष्पें अनेक । पदार्थ होती ॥ २४ ॥ नाना धान्यें वस्तुजात । पिकतसे वसुमती अमित । स्वभावें चि उपेगा येत । जग उपजीविका ॥ २५ ॥ दस्य विस्तारलें अफाट । नाना रचना गडघोट । उद्वसें वनें सैराट । पसरली धरा ॥ २६ ॥ अक्षोभित जळें श्रोत । सुशोभित महा पर्वत । विविध रसाचे क्षप्रांत । सिंधु भरले ॥ २७ ॥ फडोविकटीची रचना । लोकवस्तीचीं स्थळें नाना । चौदा लोक गणवेना । तेथीचें ऐश्वर्य ॥२८॥ स्वर्ग मृत्य पाताळें । द्वीपें दीपांतरें विशाळें । नाना पदार्थ शोभे आगळें । संपत्ति जात तेथें ॥ २९ ॥ अपूर्व पदार्थ परवडी । माधुर्यतेसी आणिती गोडी । ऐसी जाण सत्ता मोठी । माझिया ज्ञानाची ॥ ३० ॥ मी हृदयस्थ सर्वगत । अक्षोभ सुखें अनंत । अपरोक्ष दर्शनें निवांत । संत संचलासे ॥ ३१ ॥ सर्व देहींचें साक्षत्वसूत्र । धरूनि ज्ञानहस्तें स्वतंत्र । कर्ता न होनि यंत्रमात्र । सूत्रें चाळीतसे ॥ ३२ ॥ नाना देह जिनसानें । मनोहर थोरसानें । तितुकें ज्ञान सन्निधानें । मी चि वर्तती ॥ ३३ ॥ सर्व देहांचा क्षेत्रज्ञ । पाहतां मजवीण कवण । परी तेथीचा अभिमान । अतळेना मी ॥ ३४ ॥ देह अवस्था स्थानमान । सावरिता मी सज्ञान । परी अवस्थायोगें अज्ञान । लागों नेदी आपणा ॥ ३५ ॥ मी निरावेव अव्यंग । माझें अवेव हें जग । जगीं मजवीण उपभोग । कवण घेतां ॥ ३६ ॥ परी मी सापेक्षित संकल्पें । विषयाचेनि अणु ही न लिंपे । शुद्ध बुद्ध नित्यस्वरूपें । असें सर्वापर ॥ ३७ ॥ ऐसी माझी स्वभावता । सज्ञाना आणूनि चित्ता । माझे स्वभावानें आतां । राहीं अलिप्तपणे तूं ॥३८॥ ऐसें कृपा कमळे क्षणें ।

दुर्भव संस्कार शिक्षणें । अमृतवचनें सुलक्षणें । मारुतीसी प्रबोधी ॥ ३९ ॥ तें चि पुढें निरोपण । महा प्रचीतीचें संस्थान । परीसा तुह्मी सज्ञान । श्रोते महाजन हो ॥ ४० ॥ सद्गुरूच्या कृपेस्तव । जाला आत्मप्रचीति संभव । स्वरूप साक्षात्कारें देव । प्रत्यक्ष तुमच्या स्वरूपें ॥ ४१ ॥ इति श्री भीमोपदेश । साक्षत्वाचा शोध अशेष । निजबोधाचा परम तोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ४२ ॥ सप्तम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥



श्री

## सूर्य ७ कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसमर्थ संपत्ति । नित्यानुभव सुखवस्ति । फावली गुरुकृपा विश्रांती । भोगिजे भावार्थें ॥ १ ॥ संत प्रचीतीचे अवतार । संत विश्रांतीचे सागर । संत अनुभवाचे अपार । अक्षयी ठेवे ॥ २ ॥ गुरुकृपा सत्संगती । नित्यात्मचर्चा प्रचीति । त्याच्या भाग्यासी नाहीं स्थिती । विचारें पाहतां ॥ ३ ॥ सर्वकाळ विरक्तमानसें । अनुष्ठानपर अभ्यासें । सद्गुरुवचनें विश्वासें । राहिला सुनिश्चळ ॥ ४ ॥ सर्वकाळ गुरुभजनीं । ध्यानपर अनुसंधानीं । सर्वदां मानसपूजनीं । गुरुदेव भजे ॥ ५ ॥ भक्तीचें अंतर निरंतर । स्वरूपीं अनुसंधान अगोचर । केवळ विश्रांतीचें निर्धार । जागवी जीवीं ॥ ६ ॥ करुणा कीर्तन जिव्हाळा । नामस्मरणाचा अखंड चाळा । अमृताहून मधुर सरळा । गिरा अलाप करी ॥ ७ ॥ केवळ अंतरस्थितीची चाळणा । परात्पर विवंचना । साधकाची निजधारणा । सिद्धदशे माझारी ॥ ८ ॥ आंगीं सिद्ध स्वभावता । अभ्यासें कठीण साधकता । नाना साधनें परमार्था । साधी जीवापासूनि ॥ ९ ॥ जैसा कृपणाचा स्वार्थ । जीवापासुनी संचितार्थ । रत्नयत्नें रत्ना सांची सर्वार्थ । मनोरथसिद्धीनें ॥ १० ॥ ऐसें परमार्थ अनुसंधान । जगदावें जीहीं नित्य नूतन । निर्भर जगीं समाधान । हें महा

स्थिति राखे ॥ ११ ॥ विषमता न देखे भूतीं । स्वभाविक समता चित्तीं । अक्षोभ शांतीनें स्वस्थिती । राखों जाणे चतुर ॥ १२ ॥ वर्तती चर्या निरूपद्रव । सन्मानी न धरी गर्व । असन्मानें क्षोभें ना जीव । यथार्थ शांती ते ॥ १३ ॥ ऐसिया लक्षणयुक्त । अंतरापासुनी विरक्त । तो जाणिजे भगवद्भक्त । मुक्त चूडामणी ॥ १४ ॥ ऐसिया भक्ताच्या कोटी । पाळिताहे जो सृष्टी । तो सदाशिव धुर्जटी । प्रेमळ भक्तिरंगें ॥ १५ ॥ भक्तपरिपालण दीक्षा । करी अभाविकांसी शिक्षा । परम पुरुष तो प्रत्यक्षा । भक्तीसी रूढी करी ॥ १६ ॥ जनीं अवतरोनी स्वलीळा । भक्तीचा उत्सव आगळा । करी स्वभावस्थितीनें लीळा । जगदोद्धार ॥ १७ ॥ फेडी अधर्माचें वळोत्तर । निवारी पापात्मक संस्कार । स्वधर्माचा करी उद्धार । निजपुरुषार्थे ॥ १८ ॥ * असत्याची प्रबळता । निवारूनि टाकी दुरिता । सत्यवचनी स्वभावता । प्रवाहीं घाली ॥ १९ ॥ निग्रहूनि षड्वैरी विकृत । निर्वैरतेनें प्रतिष्ठाकृत । सन्मार्ग सत्क्रिया प्रवर्त । प्रवर्तवी सुखें ॥ २० ॥ सत्य सुचित्वाचा सुकाळ । करी प्रश्न ते चि वेळ प्रबळ । कलि कल्मश सांजवेळ । संधी निवर्तवी ॥ २१ ॥ वारूनि अविद्या शर्वरी । सारूनि अहंसूर्य उजागरी । दिवस रात्रीविण करी । अखंड उदो ॥ २२ ॥ स्वरूपदशा पाहट फुटे । प्रबोध अरुणोदय प्रगटे । ब्रह्मदशेची घनवटे । नित्य ब्राह्मी स्थिती ॥ २३ ॥ विवेक व्यवसाय जगीं । चालते करी बोधप्रसंगीं । विसांवती निजयोगी । ऐसा परिपाट ॥ २४ ॥ यापरी दैविक स्थिती । अनंत अवतार जगती । ईश्वर येऊनि देहाकृति । उद्धरति जगा ॥ २५ ॥ तो हा ईश्वरावतार । स्वसुखाचा मूर्त वनचर । स्वरूपदशा लक्षी साचार । सूर्य उदेला ॥ २६ ॥ फेडिलें तम विकृतीचें । प्रकाशलें तेज निजाचें । स्वरूपदशा संपत्तीचे । भरण भरिलें ॥ २७ ॥ आंगें चि सुखाचा स्वयंभ । निजबोधआत्मसद्भाव । विशेष भक्तीचें दुर्लभ । रहस्य आचरे ॥ २८ ॥

---

* येथें दुसऱ्या प्रतींत खालील ओवी आहे:-

अभक्तीचें विस्तारलेंपण । निग्रहूनि टाकी अज्ञान ।
परिहरूनि विकल्प कारण । सत्य संकल्प प्रतिष्ठी ॥ १९ ॥

त्याहीवरि सप्रेमें । भाविकांचीं निज सुवर्मे । प्राप्ति व्हावया अनुक्रमें । मुमुक्षतेसी आला ॥ २९ ॥ सोडून सर्व जाणपण । ईश्वरत्वाचें केलें स्मरण । त्यागूनि थोरपण सज्ञान । सानेपणासी आला ॥ ३० ॥ सर्व संकल्पासी सोडिलें । योग्यतेसी विभांडिलें । कल्पनेचें निर्मूळ केलें । मुमुक्षदशेनें ॥ ३१ ॥ सोडूनि ईपणा मूळ संकल्प । सद्भावें चि जाला निर्विकल्प । निज विवरें चि स्वरूप । गतीतें पावला ॥ ३२ ॥ वारूनि जाणिवेचें मरण । धरी भावार्थाचें अवतरण । रिघोनी सद्गुरूसी शरण । ईश्वर कृतार्थ जाला ॥ ३३ ॥ ऐसा अंतर्निष्ठ कपींद्र । अद्वैतगति सुखसमुद्र । कां जे सद्गुरु योगींद्र । अर्जविली जेणें ॥ ३४ ॥ निल सुखाचे ळळे पुरती । ऐसी मुमुक्षता पुरती । सप्रेम भावार्थें भक्ति । केली श्रीरामाची ॥ ३५ ॥ अनुचर होउनि अंतर्निष्ठेनें । अर्जविला जगद्गुरु प्रीतीनें । वर्षानुवर्षें महा भक्तीनें । पुरवला सर्वस्वें ॥ ३६ ॥ ऐसी मुमुक्षता यथार्थ । आधीं च अर्जविला परमार्थ । मुमुक्षदशेनें चि कृतार्थ । जाला अंतरीं ॥ ३७ ॥ ऐसिये मुमुक्षतेवीण । उपदेश होणें तितुका शीण । मुमुक्षदशेचें आचरण । दाखविलें मारुतीनें ॥ ३८ ॥ सर्वकाळ कर जोडुनी । उभा चि ठाकला आज्ञावचनीं । अपेक्षुनी श्रीरामध्यानीं । प्रत्यक्ष दृष्टि पाहे ॥ ३९ ॥ भक्तीचें रहस्य जाणे जीवीं । सेवक स्थितीनें आर्जवी । भजनदीक्षा पदवी । करी प्रगट ॥ ४० ॥ निष्ठा धरूनि सप्रचीत । जाणोनि घेतले मनोगत । स्वामीची कृपा सदोदित । पात्र जाला तया ॥ ४१ ॥ भजनापासीं आत्मसिद्धि । भजनापासीं स्वसुख उपलब्धी । भजनापासीं च त्रिशुद्धि । सद्गुरु प्रसन्नता ॥ ४२ ॥ भजनें निज आराध्य वोळे । भजनें निल स्वसुख सोहळे । भजनें साधकाचे ळळे । सरते होती ॥ ४३ ॥ सतिशष्य परीक्षा भजनीं । भजनीं मुमुक्षु शोधुनी । उपदेश करिती महामुनि । चित्तशुद्धि निरंतर ॥ ४४ ॥ वारा न यारा वरुषें । निग्रह करूनि सरोषें । चित्त शोधुनी विक्षेपवशें । मग उपदेशिती ॥ ४५ ॥ चित्तशुद्धिविना उपदेश । तो इहपरत्रीचा नाश । चित्तमळमर्शें अविनाश । प्रचीतीसी न ये ॥ ४६ ॥ यास्तव महानुभाव ।

आधीं घेती अंतर्भाव । मग उपदेशिती स्वभाव । साक्षात्काराचा ॥ ४७ ॥ याकारणें निष्टावंत । सज्ञान तो हनुमंत । सेवक धर्में चि कृपावंत । श्रीरामें अर्जविला ॥ ४८ ॥ अनुग्रहासी जाला पात्र । परत्रांचें पीठ पवित्र । सद्भक्तीचें धर्मक्षेत्र । आंगवला विरक्तीनें ॥ ४९ ॥ सद्गुरु श्रीरामकृपेनें । पावन जाला सन्मानें । नित्य श्रीराममुखींचीं वचनें । प्रीतीनें अवधारी ॥ ५० ॥ आंगीं निजयोग्यता संपन्न । त्याहीवरी सद्गुरु सुप्रसन्न । नित्योपलब्धीचा सुखघन । वर्षला त्यावरी ॥ ५१ ॥ नित्यात्मदशेचें दिनमान । पाहलें निजतेज समान । नित्य सुखारि सुख सन्मान । सोहळे भोगी ॥ ५२ ॥ पदार्थ गोडीचे अपूर्व । वरी सुगरिणी-करीं होती अई । मग ते गोडीनें चि सर्व । निववितो भोजनीं ॥ ५३ ॥ तैसी कपींद्र मुमुक्षता । त्याप्रति श्रीराम उपदेशिता । तयाच्या भाग्यासी पाहतां । पार असेल काय ॥ ५४ ॥ जगदानंदकारणी सीता । उपदेशिती होय हनुमंता । तयाचे प्राप्तीसी तत्वता । पार चि नसे ॥ ५५ ॥ अभिनव या मुमुक्षतेनें । पावन होइजे विरक्तीनें । श्रीरामप्रसन्नता सद्भावानें । सेवा मारुती परी ॥ ५६ ॥ उदार करूनि अवधान । श्रीराम वचनीं सुखनिधान । अवधारा स्वरूपध्यान । भीमाधिकारें ॥ ५७ ॥ सद्गुरूची कृपा आगळी । त्यासी चि नित्य सुखाची नव्हाळी । लक्षावी ज्ञान शोभा समूळीं । दीपावळी अभिनव ॥ ५८ ॥ विश्वभूतीं अनुक्रम । पूर्व ग्रंथान्वय परम । अखंडित अनुसंधानें सप्रेम । अर्थांतर परीक्षिजे ॥ ५९ ॥ इति श्री भीमोपदेश । निज दीक्षा स्वप्रकाश । मुमुक्षयोग आदिपुरुष । ह्मणे मेरु अनंत ॥ ६० ॥ सप्तम सूर्य अष्टम कळा संपूर्णमस्तु ॥ ८ ॥ श्रीराम ॥

श्री

## सूर्य ७ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अद्वैत छत्रपति । स्वरूप साक्षात्कार स्थिति । स्वसुखानुभवें प्रचीति- । भक्तांसी परिपाळी ॥ १ ॥ जाणोनी भक्तांचा जिव्हाळा ।

पुरवीतसे स्वसुखलळा । परमानंद अवलीळा । मनोरथसिद्धि करी ॥ २ ॥
विश्वाकारें मूर्तिमंत । साक्षात्कारीं आदिदैवत । सद्भावेंसी सप्रचित । डोळां दाखविलें ॥ ३ ॥ श्रीरामकृपेचा वज्रपंजर । भक्त संरक्षण निरंतर । स्वसुख रिद्धि सिद्धि साचार । समृद्धि भक्तसदनीं ॥ ४ ॥ श्रीरामकृपेच्या गजरें । विवेक वोळगणा निर्धारें । होय सद्भाव अष्टप्रहरें । रावता भक्तापासीं ॥ ५ ॥ श्रीरामभक्तीचा पवाडा । जिंती कळिकाळासी होडा । अक्षयानंदाचा धडपुडा । सौध वसविती ॥ ६ ॥ प्रत्यक्षाकारें प्रचीति । ते हे श्रीरामाची मूर्ति । नित्य अवधानें मारुती । निवेदला श्रीरामीं ॥ ७ ॥ निजांगें होउनी श्रीराम । श्रवणीं बैसलासे सप्रेम । घनानंद निजविश्राम । अर्थीं पवाडतसे ॥८॥ यथार्थ अद्वैताची प्राप्ति । श्रीरामामुखींच्या उक्ति । निरूपमदर्शनें मारुती । लाभ घेतसे तो ॥ ९ ॥ श्रीरामकृपा ईक्षणामृत । चकोर होऊन असे सेवित । पारावार सुखीं निवांत । चुंबकळतसे ॥१०॥ स्वसुख भरीव अंतराळीं । निराळ्यसुधा चित्कल्लोळीं । नित्य सुखाची नव्हाळी । घेतसे निजमज्जनें ॥ ११ ॥ निजप्रज्ञेचें करूनि पात्र । सांठवि अनुभवामृत पवित्र । ज्याच्या सुखासीं गति परत्र । सेऊं आली लाभें ॥ १२ ॥ निश्चळ करूनि अंतःकर्ण । अनंतावधानी केला कर्ण । विज्ञानदर्शनें संकीर्ण । प्रवेशतसे अर्थीं ॥ १३ ॥ अति सूक्ष्म अर्थांतर । अर्थावधानें साचार । अर्थ होऊनि निरंतर । अर्थ घेतसे ॥ १४ ॥ अनंत बोध प्रचीतीनें । अनंत अर्थांतर वचनें । काढो विकाडी विवर्णे । विवरतसे ॥ १५ ॥ त्या मारुति प्रति श्रीराम । कृपाळूपणें परम । आत्मप्राप्तीचें सुवर्म । सांगितलें चि सांगे ॥ १६ ॥ नित्य नूतन सूर्यदर्शनीं । आवडी उठे भाविक जनीं । हा काळींचा चि किं ह्मणउनि । कोण्ही उपेक्षिना ॥ १७ ॥ नित्य नूतन गंगाजळ । सेविलें चि सेविजे सुशीतळ । घेतलें चि घेइजे केवळ । दर्शन देवाचें ॥ १८ ॥ कालीं सेविल्या अन्नाची । ठाउकी आहे आह्मा रुची । ह्मणउनी उपेक्षा तयाची । काय करवेल ॥ १९ ॥ तैसें नित्य निरूपण । अद्वैतप्रचीति उणे खूण । चर्चा होत असतां वत्रण । विटेल पा तयासी ॥ २० ॥ अद्वैतनिरूपण होतां । वार्गळ चर्चा करी

घृया । तो बहिर्मुख जाण श्रोता । पढत मूर्ख ॥ २१ ॥ द्वैतार्थी न घाली मन । वसवी कल्पनेचें रान । जैसें सुणें तें वणवण । करी दारोदारीं ॥ २२ ॥ अद्वैत चर्चा करितां । जो उपरमोनी जाय तन्वता । तो चि प्रचीतीचा श्रोता । विरे स्वानंद सिंधूसी ॥ २३ ॥ श्रोतृत्व जेथुनी संभवलें । जेणें अन्वयें श्रोत्रासी आलें । त्या श्रोतृत्वाचें रूप कळलें । तो चि श्रोता विशेष ॥ २४ ॥ श्रोता चि संपूर्ण व्हावा श्रोत्र । तो सर्वांग लोचन सुनेत्र । दृष्टीविण देखणा परत्र । श्रवणाधिकारी ॥ २५ ॥ स्वरूपार्थे शब्द निपजे । त्या बोध हृदयासी उमजे । जाणींव ग्रासुनी उमजे । तो चि श्रोता सर्वज्ञ ॥ २६ ॥ श्रवणपुटीं रिघालें तत्व । साक्षत्व घोंटुनी विवळे सत्व । केवळ स्वरूपाचें आत्मत्व । ज्ञान त्रिपुटीविना ॥ २७ ॥ बोध प्रचीतीसी दिवस करी । गर्मांध प्रचीतिविण व्यर्थपरी । ऐसें श्रवणीं जाळियांवरी । श्रोतृत्व तें तैसें चि ॥ २८ ॥ निजबोध श्रवणीं साचार । श्रवणें चि जाला रुद्रावतार । अर्थ होउनी निर्विकार । निर्वेध ऐके ॥ २९ ॥ सप्रचीत श्रीरामवचनें । विरे सर्वगत श्रवणें । प्रचीतीच्या अंतःकरणें । होय येकाग्र तो ॥ ३० ॥ देखोनी अवधानी तत्पर । सुखावला परमेश्वर । तत्ववेत्ता परम चतुर । भीम श्रोता सर्वोत्म ॥ ३१ ॥ श्रीरामकृपाब्धीचीं वाक्यमुक्तें । असंत सांतवनें चि सुक्तें । नित्य सायोज्य रमामुक्तें । श्रवणीं भूषण धरी ॥ ३२ ॥ केवळ सुखाचें सुख गाळींव । श्रीराम प्रचीतीनें निर्मेव । तत्वानुभव स्वमेव । मग श्रोत्र बोडविला ॥ ३३ ॥ जेथें गाळुनी टाकिलें गगन । स्वरूप अनुभवें सघन । परी गुरुबोधीं अवकाश पूर्ण । श्रवणीं बैसला ॥ ३४ ॥ प्रचीतीच्या रामउक्ति । तितुकी भीमावधान शक्ति । युक्तिच्या मननें नित्य मुक्ति । ग्रंथार्थे परिसें ॥ ३५ ॥ इति श्री भीमोपदेश । श्रीराम संभाषण सघोष । भीम नित्यावधानें तोष । ह्मणे मेरु अनंत ॥ ३६ ॥ श्री गोविंद ॥ सप्तम सूर्य ॥ नवमकळा ॥ ९ ॥



श्री

## सूर्य ७ कला १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अद्वैत प्रेमगर्भ । साक्षत्वीं वक्तृत्वाचा आरंभ । साक्षत्वातीत स्वयंभ । वक्ता केवळ तो ॥ १ ॥ श्रोत्या वक्त्याचें अभ्यंतर । निजध्यासें चि अर्थ विवर । श्रोता चि होय साक्षात्कार । वक्तयाचेनि ॥ २ ॥ श्रोता वक्ता परम दुर्लभ । घेऊं जाणे अलभ्य लाभ । रामहनुमंत मूळारंभ । श्रोते वक्ते ॥ ३ ॥ मूळींचा वक्ता श्रीराम । मूळींचा श्रोता वलभीम । उभयतांचें अंतर्याम । अद्वैत स्वरूपें ॥ ४ ॥ दोघांची नवल स्थिती । येक अभ्यंतर प्रचीती । अद्वैतदशा अनुभविती । येकात्मतेनें ॥ ५ ॥ श्रीराम कृपामृत अक्षरीं । ह्मणे कपींद्रासी अवधारीं । विश्वरूप सर्वांपरीं । देख माझ्या स्वरूपें ॥ ६ ॥ दृश्य त्रिपुटी विटाळें । विटाळूं नको चि निजडोळे । गुण घनानंद सोहळे । सर्वदा भोगीं ॥ ७ ॥ माझी सगुण सर्वोत्तमें । रूपडीं पाहे निरोत्तम । तेणें दर्शनें अनुक्रमें । भक्तिसंपदा भोगीं ॥ ८ ॥ अरे कल्याण कल्पतरूचें । रोप आहेसि तूं मूळींचें । तेणें चि स्वानंद-प्राप्तीचें । फळ लाहे संपूर्ण ॥ ९ ॥ सांप्रदायक्रमें भक्ति । साधन सिद्ध प्रयुक्ति । महोत्साव त्रिजगती । अभिनवें भरी ॥ १० ॥ माझे स्वरूप तें चि उदारें । भजे संतकुळें साक्षात्कारें । भाविकें सात्विकें निर्धारें । सन्मानूनि रक्षीं ॥ ११ ॥ माझी प्रेमळें सत्वगळितें । सावधी नुपेक्षावीं प्रेमयुक्तें । सांभाळूनि भक्तितात्पर्यातें । निरंतर प्रतिपाळीं ॥ १२ ॥ जाण माझे उपासक । मत्परायण पुण्यश्लोक । साचित्सुखें सम्यक । सांभाळीं तया ॥ १३ ॥ माझे नामधारक जनीं । निष्ठावंत नामस्मरणीं । तयासि तुवां अनुदिनी । संरक्षावें सुखें ॥ १४ ॥ माझिये कीर्तिनें जे वेधले । ते प्रवृत्तीसी दुन्हावले । जीवें सर्वस्वें लागले । माझे कारणीं ॥ १५ ॥ मज कारणें प्राण संकटें । प्रवर्तले साधन दुर्घटें । मत्प्राप्तीस्तव निकटें । अनुसरले भक्तीसी ॥ १६ ॥ सर्वकाळ माझे ठायीं । प्रीति ठेउनी सर्व हि ।

कांहीं च मज वांचुनी नाहीं । उरलें तया ॥ १७ ॥ ऐसे माझे अंतरंगभक्त । भवीं उदासीन विरक्त । जे संकल्पा पासुनी मुक्त । जाले स्वभावें ॥ १८ ॥ लागों नेदितां भवउर्मी । भरले स्वसुखें अंतर्यामीं । त्यांच्या प्रारब्ध अनुक्रमीं । मी चि सर्वस्वें ॥ १९ ॥ भक्तांचें केलियां परिपाळण । मज चि पावलें जाणोन । करावें भक्त संरक्षण । हें मागणें तुजला ॥ २० ॥ तूं पुरुषार्थ वज्रदेही । तुज कळिकाळाचें भय नाहीं । तेणें चि सामर्थ्यें पाहीं । सांभाळीं भक्तासी ॥ २१ ॥ तूं परम संपन्न सामर्थ्यें । तूं कृपावंत परमार्थें । सांभाळीं भक्तासी सर्वार्थें । मम मनोगत वर्धना ॥ २२ ॥ तुजप्रति जितुकें सांगणें । तें म्यां चि करावें अंतःकर्णें । तूं मी अभेद याकारणें । निरोपिलें तुज ॥ २३ ॥ ऐसें सप्रेम होउनी । भक्तकारुण्यें द्रवोनी । बोलतसे कृपावचनीं । भीमाप्रति श्रीराम ॥ २४ ॥ जाणोन भक्ताचा कळवळा । भीम करुणेनें उचंबळला । ह्मणे भक्त आवडती श्रीरामाला । केवळ जीवापासूनि ॥२५॥ यथार्थ हा भक्तवत्सल । कृपासिंधु दीनदयाळ । अनाथ संरक्षणीं केवळ । सामर्थ्य होय सर्वार्थें ॥ २६ ॥ भक्तपति भवांतक । भक्तकारुण्य प्रकाशक । भक्तपरिपाळण जनक । श्रीराम तो कृपेचा ॥२७॥ ह्मणे श्रीरामा तूं आमुचा । प्रतिपाळक निजाचा । जनिता जननी स्वसुखाचा । होसी सकळ कारणार्थ ॥२८॥ जें जें आमुचें संसर्गिक । तितुकें तुजला चि निश्चयात्मक । करणें लागे परत्रिक । संसारेसीं ॥ २९ ॥ तुवां कृपा करुनि रोकडी । निरसिल्या मरण दुःख कोडी । अक्षय स्वरूपाची जोडी । जाली तुझेनि ॥ ३० ॥ आह्मी भक्त ह्मणवितों । परंतु अभक्तपणें चि वर्ततों । संकल्प घालुनी करितों । भारवाही तुज ॥ ३१ ॥ तुझी प्रसन्नता होय । ते आचरों नेणों स्वयें । परी सांभाळिसी स्वयें । दयासमुद्रा ॥ ३२ ॥ करावें भक्त परिपाळण । आज्ञा केली मज लागून । तरी मी आज्ञाधारक दीन । वर्तेन तैसा चि ॥ ३३ ॥ भक्तापासीं सर्वदां । निरंतर राहेन सानंदकंदा । भक्त आज्ञा-वृंदारक वरदा । वर्तेन तैसा चि ॥ ३४ ॥ वसेन भक्ताचे चि सदनीं । घेईन तव कीर्तनाची धणी । पुरले मनोरथ निरउनी । देईं मज भक्तांसी ॥ ३५ ॥ एवं कपींद्र वचनें । संतोषला श्रीराम मनें । पुढील कथेसी

अवधान देणें । समर्थपणें सज्जनीं ॥ ३६ ॥ इति श्री भीमोपदेश- भक्तांचा कळवळा विशेष । वसे भक्तापासीं श्रीराघवेश । ह्मणे मेरु अनंत ॥ ३७ ॥ सप्तम सूर्य दशम कळा संपूर्णमस्तु ॥ १० ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ७ कळा ११

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम स्वसुखाची भरणी । होय तुझी अभिनव करणी । शांति आस्तिक्यतेची धरणी । होउनी विश्व धरिलें ॥ १ ॥ विश्व तुज जाणे ऐसा । कवण आहे परम पुरुषा । जगदीशा जगन्निवासा । जगदानंदकंदा ॥ २ ॥ आधीं जाणिवेसी आलें जग । हें कोठुनी पाहावें येरें मग । स्वा निजबोध निजांग । तुझी प्राप्ति आतुडे ॥ ३ ॥ तुझी प्राप्ति तुज चि घडे । येर संकल्प ते बापुडे । तुझी आस्तिक्यता निवाडें । सदोदित देवा ॥ ४ ॥ वसउनी भक्त हृदय । दाउनी स्वरूपाची सोय । देउनी स्वरूप प्रत्यय । अभक्ताचे भक्त करिसी ॥ ५ ॥ विषाचें अमृत कराया । सामर्थ्य आहे देवराया । तुझी अनादि सिद्ध दया । सृष्टि परिपाळिसी ॥ ६ ॥ तुज आपुलें परावें । अरिमित्रपण न भावे । समान दयेनें स्वभावें । सर्वत्र वससी ॥ ७ ॥ तूं अक्षोभ सुख सिंधु । दीनानाथ जगद्बंधु । जगदाद्य कृपासिंधु । जय जय जी जगपाळका ॥ ८ ॥ स्वसुख देउनी निरंतर । वसविसी भक्त अभ्यंतर । तेणें प्रचीतीनें चि परपार । पाववीसी तया ॥ ९ ॥ होउनी सर्व उपजीविका । भक्त- संगोपन जगन्नायका । करिसी हे प्रसिद्धी वेदादिकां । कवीनें वर्णिली ॥ १० ॥ तुझी पुरुषोत्तम विख्याति । याची पाहतां अंतरस्थिती । जाणती अनुभव प्रचीती । येरां न कळे ॥ ११ ॥ पांचा पुरुषांत एकळा । प्रसिद्धतेनें उंचावळा । तयासी ह्मणती थोरला । विश्वरूढीनें ॥ १२ ॥ सकळ पुरुषाचे अंतरीं । संभवीत पुरुषार्थ च्यारी । प्रकृति पुरुष नर नारी ।

रूपासी आणीत ॥ १३ ॥ जीव शिव साक्षी उत्तम । ध्यान्ही पुरुष अंतर्याम । वसविता तूं अभिराम । सर्वोत्तमा ॥ १४ ॥ तुझिया स्वरूपाची आस्तिक्यता । पाहतां निरोपाधी तत्वता । नभापरी व्यापकता । निर्मळ तुझी ॥ १५ ॥ नभासी व्यापकपण आलें । सत्य तुझें पोटीं उभारलें । तुजवांचुनी कांहीं नाहीं जालें । अमर जनका ॥१६॥ तुझे आस्तिक्यतेवरी । स्वभावता तुझी च परी । तिये स्वभावतामाझारीं । होती सृष्टीचे उभारे ॥१७॥ तुझी स्वभावता ज्ञानघन । तियेमाजि सत्ता गहन । तिये सत्तेनें परिपाळण । होतसे जगा ॥ १८ ॥ उत्पत्ति स्थिति संव्हार । कार्याकारण व्यवहार । तुजपासुनी च विस्तार । सर्व हि होतसे ॥ १९ ॥ जीव जीववी सकळां । ज्या जीवाचा तूं निज जिव्हाळा । तुझी सत्ता जीवनकळा । जगासी जीववी ॥ २० ॥ जीवना वांचुनी जनीं । रूपासी नये चि पा कोण्ही । तैसी तुझी सत्ता धारणी । रूढली देवा ॥ २१ ॥ तुझी चिच्छक्ति सत्ता । ते हे विश्वजननी सीता । सकळ उपजीविका तत्वता । अंतर स्थिति जगाची ॥ २२ ॥ आदि विश्व मूळकाया । ते आदिशक्ति मूळ माया । विश्वसंवर्धन हृदया । वसविती होये ॥ २३ ॥ ते निजभक्तांचीं अंतर्कळा । पाळीत अक्षयानंदलळा । तियेचा अक्षोभ सुखें जिव्हाळा । तेणें भक्त सुखावले ॥ २४ ॥ अंतर्निष्ठाची निज जननी । सच्चित्सुखसंवर्धिनी । अनुभवदशा-संजीवनी । साक्षात्कारचर्या ॥ २५ ॥ जैसें तरुवरासी जीवन । घालितां सुखें ये उफाळोन । तितुकें कोंवळिकेनें विस्तारोन । सुमनफळा येत ॥ २६ ॥ तैसी विश्वानंदवर्धनी । निज लावण्याची जननी । पारावार सुखें करूनी । संततीसी वर्धवी ॥ २७ ॥ एकेक उफाळ्याचें विश्वंभर । मूर्त साक्षात्कारी शंकर । आनंदविधि असे कुमर । प्रसवली लीळा ॥ २८ ॥ विज्ञान घन सुखामृत कंद । मुसावले ज्ञानें अपरोक्षमुकुंद । दशा सदोदित स्वानंद । संत रूढीसी आले ॥ २९ ॥ महा प्रचीतीनें अनंत सिद्ध । स्वानुभवाचे ठेवे प्रसिद्ध । आत्मदर्शनें स्वतःसिद्ध । प्रसवली सीता ॥ ३० ॥ अप्राप्त सुखनिधि साधुवृंदें । सच्चिदानंद सुख स्वछंदें । क्रीडले सायोज्यसदनीं मोदें । सीताकटाक्षें करूनी ॥ ३१ ॥ अपरोक्षानुभव गरिमा । जाणसी तूं सीता-

महिमा । सीता तुझी सायोज्य अगिमा । अष्टविभूति निर्मी ॥ ३२ ॥ तुज सानंदकल्पतरूची छाया । मम जननी हे सीता अद्वया । मज उपदेशुनी निजदया । दशारूढ केलें ॥ ३३ ॥ संतिचें विज्ञान उदर । आत्मप्रचीतीचें मंदिर । सत्सुखार्थेन धार । धरिली जिहीं ॥ ३४ ॥ ते आत्मयोगें कृतार्थ जाले । चिरशांत्याच्या उदरा आले । सानंदगर्भी अंकुरले । कोंभ स्वयंभाचे ॥ ३५ ॥ स्वयंभ सुखाची सांग । पावले निजबोध निजांग । परमानंदें अंतरंग । अनुभविती ते ॥ ३६ ॥ ते तुझे अंतर्निष्ठ भक्त । ते चि जाणिजे प्रसिद्धीचे विरक्त । ते चि जाणावे जीवन्मुक्त । नित्यमुक्त योगी ॥ ३७ ॥ ते चि जाणिजे प्रसिद्ध जनीं । भगवंताच्या मूर्ति आत्मज्ञानी । तुझी उभयता एवं करूनी । प्रतिपाळिलीं आम्हां ॥ ३८ ॥ तूं स्वयंभ सुखाचा ठेवा । तुझा अनुभव जीव शिवा । हा संतिचेनि जाणावा । योग जनीं ॥ ३९ ॥ तूं सानंदघन विघ्नघ्नी । तदाश्रित ज्ञानसौदामिनी । तुझी अंतरस्थिति प्रभामामिनी । पद्मविधि पावन ॥ ४० ॥ अपरोक्षानुभव कल्पलता । सानंद संजीवनी सत्वता । मोक्ष कल्पतरु महा सत्ता । सफळित करी ॥ ४१ ॥ आनंद उद्यानवनमालिनी । ज्ञान कल्लोळवनकमळिणी । तव लीला लावन्य कल्लोळिनी । कृपावनवसंता ॥ ४२ ॥ अपरोक्ष सुख अपरांपर । तुझ्या विस्ताराचें मंदिर । ज्ञान सत्ता सुख साभार । घनवर्धनवसंता ॥ ४३ ॥ नित्य प्रातीचा उदयकर । तव कटाक्ष सुखाचा आकर । तव हृदय अमृतकर । अनुभवी सीता ॥ ४४ ॥ निरोपम सुख कुसुमाकरा । चिच्छक्ति वन श्रीवरा । नित्य तदाश्रित अपारा । फळांसी प्रसवे ॥ ४५ ॥ तुझेन भक्त परिपाळण । ऐसें हें सामर्थ्य असोन । मज कृपेनें सांगसी पूर्ण । कृपाळूपण तुझें ॥ ४६ ॥ गौरविसी निज भक्तांसी । तुझे कृपेची महिमा ऐसी । या चि कृपेनें आम्हांसी । भूषणाढ्य करी ॥ ४७ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रचीतीचें तेज विशेष । श्रीरामकृपेचा चंद्रांश । म्हणे मेरु अनंत ॥ ४८ ॥ सप्तम सूर्य एकादश कळा ॥ ११ ॥



श्री

## सूर्य ७ कला १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम नित्य सुखानुभवी । बोधे नित्यानंद वर्धवी । नित्य नूतन चालवी । पुरातनचर्या ॥ १ ॥ नित्योपदेश नित्यस्थिति । नित्याचरणं नित्यप्रचीति । नित्योपजीविका विश्रांति । नित्य परिपाळित भक्त ॥ २ ॥ धन्य धन्य भाग्य भक्तांचें । कैवारी केलें दैवत साचें । सदोदित आराध्याचें । पावलें संनिधान ॥ ३ ॥ नित्य आत्मप्राप्ति दैव उदेलें । अंतर प्रचीति भरण भरलें । नित्य सुखाचें अवतरलें । महावैभव ॥ ४ ॥ श्रीरामप्राप्ति चंद्रउदेला । भक्तां सुखसिंधु उचंबळला । प्रमाण टाकुनी लोटला । पारावार दर्शनें ॥ ५ ॥ श्रीरामदया निरवधी । भक्तां नित्यसुखउपलब्धी । बोळल्या सर्व समृद्धि । साक्षात्कारें ॥ ६ ॥ निरतिशय सुख ऋद्धिसिद्धि । अंकित जाल्या महा समाधी । निरोपाधि सुखें त्रिशुद्धि । नांदों लागले भक्त ॥७॥ अक्षयानुभव संपदा । भोगिती भक्तसुखें सदा । कां जे नित्य तव पदारविंदा । सेविलें अंतरनिष्ठेनें ॥ ८ ॥ तव पद सेविलियां प्रति । कदापि नव्हे दुर्गति । सद्वर्ताचे माथां वैसती । गतिदायक सकळां ॥ ९ ॥ तुझे पाय सेविल्यां वरी । जन्मांतरा नसे उरी । मरणांत दुःखें परिहारी । अजरामर तव कृपा ॥ १० ॥ अक्षयानंद सिंधुहृदया । जयावरी होय तुझी दया । काळ बाधूं न सके तया । ऐसी महिमा तुझी ॥ ११ ॥ तवपदपंकजरजें । उजळिली निजतेजें । जड देहबुद्धि समाजें । तरले भवाब्धींसी ॥ १२ ॥ तवपदमहिमा अभिनव । शिळेची चित्कळा संभव । पावनगौतमसती निर्भव । गतीसी पात्र जाली ॥ १३ ॥ तव पदयोगें अपार । पावले भवाब्धींचा पार । तव कीर्तीचा निरंतर । सेतु विस्तारला ॥ १४ ॥ तव चरित्रामृत श्रवणें । उठलें भवशत्रूचें धरणें । तव नाम दिव्य रसायनें । हरला भवरोग ॥ १५ ॥ जगाचे सन्तोस कारण । श्रीरामा तुझें अवतरणें । नित्य सुख प्रचीतिचें

भरण । भरिसी सर्वांतरीं ॥ १६ ॥ जग सद्गती पावावया । तुजला चि संभवली दया । तेणें दयेनें चि अवतरोनियां । तारिलें जगासी ॥ १७ ॥ जाणोनी दुर्भवाची दुष्टता । अहं उपशमनें तत्वता । प्रबोध सत्तेनें समर्था । तूं प्रत्यक्ष जालासी ॥ १८ ॥ महा मायेची प्रवृत्ति । अविद्या-मोहक विषयवृत्ति । तितुकी करावया निवृत्ति । तूं चि होसी समर्थ ॥ १९ ॥ दृढ महा ममतेचें बंधन । विषय दुराशा अज्ञान । धन सुत जाया दारुण । पाश हे भवाचे ॥ २० ॥ महा मृत्यूचे काळ-क्षोभित । घाले पडती अकल्पित । जीवासी यातायाती अघात । महामारे होती ॥ २१ ॥ या भवसंसर्गीं सोडवण । करता नाडळे तुजवीण । चांग होतासी तूं दयासंपन्न । नाहीं तरी काय करितों ॥ २२ ॥ हातपायेंवीण गर्भांध । परदेशी जाळियां प्रसिद्ध । त्याची उपजीविका विरुद्ध । सांगणें चि न लगे ॥२३॥ तैसें निजरूपीं जग आंधळें । नुघडी निजज्ञानाचे डोळे । अज्ञान अंधतमीं खोळे । विपरीत दर्शनें ॥ २४ ॥ कां जे तूं जगदीश होसी । यास्तव जगदुःखें परिहरीसी । प्रसिद्ध तूं जगत्कुशी । जगदांतरात्मा ॥ २५ ॥ तूं चि जगाचा मायबाप । तूं चि जगाचे आस्तिक्यरूप । जगत्कारण सत्य संकल्प । तुझा चि मूळींचा ॥ २६ ॥ याकारणें जग दुखवतां । अवतरसी महासुखें समर्था । धावोनियां सवेगता । सोडविसी महासंकटीं ॥ २७ ॥ मछ कछ सिंव्हाकृति । प्रगटसी नाना व्यक्ति । जगाचीं दुःखें निवृत्ति । करिसी आंगें चि तूं ॥ २८ ॥ महा दुरात्मे रजनीचर । आंगें चि विभांडीसी दुर्धर । बोध शिक्षेनें धनुर्धर । दीक्षा धरीसी ॥ २९ ॥ जीव अहंकृतीच्या भरीं । भरोनी जाले रानभरी । सीणतां नाना अहंकारीं । चुकले निजवर्म ॥ ३० ॥ नेणोनी निजरूप ज्ञान । करिती सुखास्तव वणवण । परी दुःखें सीणले अज्ञान । अहंकृतीसी आले ॥ ३१ ॥ अहंकृतीच्या माजेंकरूनी । उन्मादें विचरती जनीं । युक्तायुक्त तें न मनुनी । ओघले दुर्विषयीं ॥ ३२ ॥ कर्माकर्मप्रवृत्तीमुळें । नेणोनी हिताहित आगळें । झांकोनी विचाराचे डोळे । काम प्रवृत्ति करी ॥ ३३ ॥ कामादिक षड्वैरी ।

विषय सरळ देउनी अंतरीं । अकर्तव्यांचे भरीं । भरले दुर्हृत ते ॥ ३४ ॥
प्रमाद मदिरापानें भुलले । कल्मष रति कर्दमीं बुडाले । अप्रांत दुःख
समुद्रांत गेले । शुद्धि नांडव्तां ॥ ३५ ॥ तया जीवांची सोडवण ।
करावयासी दया तुज पूर्ण । त्या कारणें चि अवतरोन । आलासी हें
प्रसिद्ध ॥ ३६ ॥ दुष्ट सुत जालियां पित्यासी । लोभ असे चि पा मानसीं ।
तयाचें ऊर्जित करावयासी । जीवें सर्वस्वें कष्टवी ॥ ३७ ॥ तैसें रावणादिकां
दुष्टां । ज्ञानशरें शिक्षूनि तुवां वरिष्ठा । निर्वाणदर्शनें आत्मप्रतिष्ठा । केली
तयाची ॥ ३८ ॥ ऐसें तुझें कृपाळूपण । कारुण्याचें तूं निजनिधान ।
विश्वमुक्त व्हावयासी संपूर्ण । अवधानीं वससी ॥ ३९ ॥ साच तुझेनि
जगदोद्धार । परोपकारी सप्तमावतार । करावयासी कृतोपकार । दुरितभंजना
देवा ॥ ४० ॥ महापापपीडा परिहरीं । ऐसी तुझी पावन कीर्ति गजरीं ।
वर्णितां वर्णितां अद्यापि वरी । वर्णिती कवेश्वर ॥ ४१ ॥ तुझी कीर्ति
अपरांपर । वर्णितां वेदासी न कळे पार । तेथें हें प्राकृत कवेश्वर । केवि
वर्णूं शकती ॥ ४२ ॥ सप्तम अवतार सत्याचा । हा कृपेचा अवतार
साचा । विश्वोद्धार रवीचा । कुळभूषण ॥ ४३ ॥ अज्ञान निवृत्तीचा
प्रकाशक । स्वरूप गतीचा गतिदायक । रविकुळटिळका तूं चि एक ।
सद्गतिदाता ॥ ४४ ॥ आतां केलिये कृपेचें संरक्षण । करीत आहेसी तूं
चि आपण । तरी मी प्रार्थितां गौण । दिसोन येईन कीं ॥ ४५ ॥ तुझ्या
प्रबोधाची महा स्थिति । पावन जाली त्रिजगती । मज आली जे प्रचीति ।
ते चि पुढती निरोपी ॥ ४६ ॥ ऐसें कारुण्यनिधिवचनें । प्रार्थिला रघोत्तम
कपीनें । श्रीरामकृपेची सन्निधानें । पुढें अष्टम सूर्य विलोका ॥ ४७ ॥
इति श्री भीमोपदेश । अंतरींचा प्रबोधविता ईश । परमार्थ प्रगटला अशेष ।
क्षणे मेरु अनंत ॥ ४८ ॥ सप्तम सूर्य द्वादश कळा संपूर्णमस्तु ॥ १२ ॥
श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ८ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम ससंवेद्य वेद्या । निजबोधाच स्वरूप आद्या । वेदक वेदने-वीण विद्या । अनुभवींक तुझी ॥ १ ॥ तुझें निजांगीक दर्शन । भेद निवृत्ति ज्ञान सुदर्शन । वसउनी आत्मप्रतिष्ठा कारण । वर्तविसी स्वानंद ॥ २ ॥ अभिनव तुझी विख्याति महिमा । अद्वयस्वरूपीं उपक्रमा । कर्तृत्वेंवीण निरोपमा । कार्ये संभवीसी ॥ ३ ॥ एकात्मतेनें स्वभावीक । वास्तव्यस्वरूप अमाइक । अखंडानुभवें कांहीं एक । स्फूर्तीसी आलें ॥ ४ ॥ नवल तुझें तुज आश्चर्यकर । कांहीं च नव्होनी विस्तार । उठवे उठती अपार । प्रपंचाकारें ॥ ५ ॥ स्वभावीक अनिळगती । उदधी जळें हेलावती । तेथें न करितां चि होती । बुद्बुद अनेक ॥ ६ ॥ तेवि ज्ञान स्फूर्ति सदोदिती । सन्मय स्वभाव उठती । हे जाणिजे अवांतर गती । नाटक मायेची ॥ ७ ॥ वायो समुद्र आहे त्यास्तव । संपर्के बुद्बुद संभव । होती हा जाणिजे स्वभाव । होइ कावा ॥ ८ ॥ जें भविष्यें होणार । ते वर्तमानीं सुचवी साचार । कां जे परंपरा संस्कार । रूढोनि आला ॥ ९ ॥ रात्री जालियांवरी जाणिजे । दिवस उगवेल सहजें । जगरूढी या उमजें । उमजली च आहे ॥ १० ॥ जेथें जगउत्पन्न जालें नाहीं । तेथें जगत्कारण नसे कांहीं । काळदेश लोक सर्वहीं । वसतां वर्तमानेंसीं ॥ ११ ॥ तेथें कैचें भूतभविष्य । जाणिवे सहीत नसे दृश्य । ते स्वरूप स्थिति निर्देश्य । निजांगें निर्मळ ॥ १२ ॥ परब्रह्म सहज अमळ । नाहीं कल्पनेचा कांहीं मळ । हे प्रसिद्ध चि सकळ । यथार्थवादें ॥ १३ ॥ द्वैत नसतां निःशेष । उपदेशक्रम केवि परेश । कर्तेनवीण कर्ता अशेष । कारण कर्तव्यासी ॥ १४ ॥ स्वरूप दृष्टीनें अभेद । स्वभाव दृष्टीनें वाटे भेद । आतां भेदाभेद संवाद । कारण जाला व्हावया ॥ १५ ॥ ऐसें चि अंतरीचे संकल्प । संशये विकल्पाचे कल्प । स्वभावें होत जाती अकल्प । विश्व अभ्यंतरीं ॥ १६ ॥ मी स्वभाविक उभय द्रष्टा । अद्वय आस्तिक्यें

प्रतिष्ठा । मी द्रष्टा ना साक्षी विशिष्टा । कारणें चि नव्हे ॥ १७ ॥ यापरी निजअभ्यंतरीं । विचार निश्चयेंसीं निर्धारीं । मी च अनुभवितों यापरी । पुसावें वाटे ॥ १८ ॥ इतुक्या उमजासी आणिलें । हें तुझें कृपेचें केलें । यापूर्वी वर्तविलें । अनादि सिद्ध अज्ञान ॥ १९ ॥ पूर्व संस्कारें मी विद्यमान । प्रत्ययासी येतें भविष्यज्ञान । हे स्वभाव अवस्था-भान । वर्ततसे हृदयीं ॥ २० ॥ तुझिया प्रबोधाची थोरी । जें आपेंआप अभ्यंतरीं । निवळलें ज्ञान परोपरीं । स्वरूप उमजे ॥ २१ ॥ स्वरूपावांचुनी दुजें । कांहीं नसे चि या उमजें । उमजलों वरवा काज । सरली विकल्पाची ॥ २२ ॥ द्वैताद्वैत संकल्प नाहीं । ऐसें तुझें करणें पाहीं । कां जे तुझ्या स्मरणें देहीं । देहभाव जुरे ॥ २३ ॥ चंद्राकडे पाहतां निकटीं । चकोराची निवेना केविं दृष्टी । तेवि तव कृपा गोष्टी । आठवें चि कृतार्थ करी ॥ २४ ॥ तुझा सहवास सर्वकाळ । वरी विशेष प्रबोध अकळ । दयेचा पुरावा प्रबळ । करीसी वेळोवेळां ॥ २५ ॥ निज जिव्हारींचें गुज । विचारिलियांवीण सहज । परम कृपेनें चि मज । सांगसी मुखें ॥ २६ ॥ हितगुज जीवींचें केवळ । सांगसी प्रीतीनें अकळ । आदि स्वरूप निजनिर्मळ । आंगें चि मज देसी ॥ २७ ॥ यापरीं न वंचितां कांहीं । सत्य पुरविसी सर्वही । तुझे उत्तीर्णतेसी नाहीं । कांहीं-येक पदार्थ ॥ २८ ॥ आतां कोरड्या गोष्टी फुकट । कीजे चाउटांची वटवट । परंतु म्यां काय कीजे घनवट । सुखाब्धी तुतें ॥ २९ ॥ कांहीं न होतां स्वयें जाण । टाकीनुसार कीजे स्मरण । पुरुषार्थाचीं नामें गर्जोन । चरित्रें वर्णावीं ॥ ३० ॥ जेणें केलें परिपाळण । त्याचा कृतोपकार आठऊन । असतां स्वभावें आपण । तयाचा चि होइजे ॥ ३१ ॥ समर्थें परिपाळिलें । हें चि सभाग्यपण भलें । अभिमानारूढ वहिलें । फुंजो नये कोण्ही ॥ ३२ ॥ विश्वाची आदी सुखैकघन । विश्व संभव कृपाघन । विश्व परिपाळण जीवन । परमात्मा प्रसिद्ध ॥ ३३ ॥ त्या परमात्मया समान । प्रत्योपकारें होय कवण । सूर्याच्या प्रभेसी कोठून । साम्यता आणावी खद्योतें ॥ ३४ ॥ अप्रात दिव्यजल निधीसी । थिल्लरें यावें प्रत्यग्नेसी ।

छपन्न कोटी वसुमतीसी । अणुसम केवि कीजे ॥ ३५ ॥ तैसें प्रत्योपकारें फुंजे । घेउनी मीपणओझें । फुंजो नये गुरु पदांबुजें । चिंतावीं सदा ॥ ३६ ॥ यापरी परिशुध्द मन । भिन्नपणें वृत्तीस न येऊन । आठवितां तुझे चरण । मी निवालों सुखें ॥ ३७ ॥ नाना जागृतीचे व्यापार । सुषुप्तीसी नुरती सविस्तार । तेवि तुझे कृपेनें संस्कार । सरले माझे ॥३८॥ निजानंदघन वपु माझी । ऐसी बोळली दया तुझी । आतां संकल्प विकल्प वोझीं । वाहेल कवण ॥ ३९ ॥ मुळीं द्वैत की अद्वैत ऐसें । आठवासीच कारण नसे । निजबोध दयाब्धि सौरसें । करणें तव कृपेचें ॥ ४० ॥ परंतु स्वामीपासीं अंतरींचें । भावलें स्वभावीक साचें । सांगणें चि वाटे मनींचें । सर्व कांहीं ॥ ४१ ॥ बोधक्रम ऐसा जाला । तेणें अभिप्राव कळला । जरी मज बोध नसता जाला । तरी मी व्यर्थ चि होतों कीं ॥ ४२ ॥ जयजय सद्गुरु सुखदा । निर्वाण बोध संपदा । चांग तुझेनीच आपदा । वारली भवाची ॥ ४३ ॥ प्रत्यक्ष असोनी मी नित्यमुक्त । भ्रांतीनें बंधन केलें अयुक्त । अज्ञानाचें अभिनव युक्तायुक्त । सुचो चि नेदिती ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष जग हें निदसुरें । स्वरूपीं जागृत नव्हें निर्धारें । पडिलें भ्रांतीचें भुरेरें । वरळे अव्हा सव्हा ॥ ४५ ॥ तें पाहतां भ्रांति बंधन । दुःखें फुटत अंतःकरण । जन्म मरणादि दारुण । दुःखें अनुभविती ॥ ४६ ॥ स्वप्नींचें दुःख जागृती भासे । तैसें हें साक्षत्व पिसें । वंध्या कुमराचे जैसे । संततिजात ॥ ४७ ॥ जात्यंधाची परीक्षा । तैसी हे अज्ञानाची दीक्षा । याचि दीक्षेनें प्रत्यक्षा । प्रमाण करीत आले ॥ ४८ ॥ जनदृष्टी संस्कारें । पूर्वचर्याकृत अपस्मारें । अज्ञान संपर्कविकारें । कांहीं झळंब होय ॥ ४९ ॥ भय उत्पन्न होय सरिसें । निर्भयपण ज्ञान प्रकाशे । अद्यापिवरी मज उमसे । हा स्वभाव ॥ ५० ॥ अंधकाराचें प्रबळ । होतां काय करी चक्षुबुबुळ । वाळाखूनि पाहतां सजळ । होय परि प्रकाशेना ॥ ५१ ॥ क्षुधेचें जालिया प्रबळ । तृप्ती आठवेना अखिळ । तैसें अज्ञानाचें पडळ । झकवीतसे ॥ ५२ ॥ यापरी अज्ञान

संसर्ग । तैसा चि ज्ञानाचा सद्भाववर्ग । प्रबळ्येनी स्वमार्गमार्ग । आत्मप्रतिष्ठेनें वसे ॥ ५३ ॥ यापरीं अज्ञानामुळें । मोहती विचाराचे डोळे । सत्रें चि स्वरूपाच्या अनुमेळें । बोध निवळती ॥ ५४ ॥ ज्ञानाज्ञान साक्षी सतेज । मीज होउनि उमजें मज । हनुमंताचें चि काज । उमजल्यापरी ॥ ५५ ॥ संशय संदिग्धमनें । नसोनी असतां विद्यमानें । शंकेसी कारण संकल्पानें । केलें हें कर्तव्य तुझें ॥ ५६ ॥ थोर कृपाळूपण तुझें । मनोरथसिद्धिदैवत तूं माझें । जोडिली तुझी पदांबुजें । आतां न सोडीं सर्वथा ॥ ५७ ॥ जाणोन अभ्यंतर समर्थे । कृपा केली निज परमार्थे । ते स्वामिकृपा सर्वार्थे । श्रवण कीजे तुम्ही ॥ ५८ ॥ श्रवणावांचुनि जनीं । वक्तृत्व नव्हे चि प्रमाणी । श्रवण ते चि अनुसंधानी । जागवी वक्तयासी ॥ ५९ ॥ ऐकों लागलियां आवडीनें । वक्ता वदों लागे उदारानें । ग्राहीक जालियां प्रीतीनें । देणें होतसे उदार ॥ ६० ॥ तेवि तुम्ही श्रोते ज्ञानें सतेज । वक्तयाचे वक्ते अर्थ चोज । तुमच्या श्रोतव्या पासूनि सहज । वक्तृत्व संभवलें ॥ ६१ ॥ स्वसुखाचे निजजनक । प्रचीतींचे चि विवेक । तुमचे दयेस्तव सम्यक । मजला सुचती ॥ ६२ ॥ आतां ज्ञान संपन्न कृपा उदार । सायोज्याचे सुखविस्तार । निजावचानें साचार । मज सांभाळिजे ॥ ६३ ॥ कृपा सद्गुरु अनंतें । निरऊनि दिधलें तुमतें । आतां उचित ते कीजे पुरतें । सत्य कृपाळूपणें ॥ ६४ ॥ अनंतकृपेचा प्रसाद । प्रबोधानुभव स्वानंद । तो हा भीमोपदेश संवाद । स्वामींचे मुखींचा ॥ ६५ ॥ सीताराम परम प्रचीती । उपदेश क्रम उद्धती । श्रीरामवक्ता स्वसुख संगती । अर्थांतर श्रोता भीम ॥ ६६ ॥ भक्तीचें रहस्य श्रीरामें । सांगोनी सप्रचीत प्रेमें । आतां अद्वैतानुभवक्रमें । वक्ता होय उदार ॥ ६७ ॥ इति श्री भीमोपदेश । अध्यात्मप्रचीतीचा तोष । जालें द्वैताद्वैत निःशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ६८ ॥ अष्टम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

श्री

## सूर्य ८ कळा २

॥ श्रीगोविंदाय नमः ॥

श्रीराम अद्वैतानुभव वक्ता । तो चि अवधानीं रूढला श्रोता । प्रचीतीनें होय श्रवणीं घेता । निज अर्थांतर ॥ १ ॥ स्वरूपानुभवें अनुलेख । प्रबोधदशेचे उल्लेख । महासमाधानाचें सुख । प्रगट करीती ॥ २ ॥ स्वरूपाची सुख प्रचीती । अभिनव आत्मत्वीं सन्मती । प्रचीतीमाजि संभवतीं । प्रमेयें बोधाचीं ॥ ३ ॥ जेविं सुगरणीनें परिपाक । परम गोडीचा सकौतुक । माजि परवडीचा अनेक । पण असे चातुर्यें ॥ ४ ॥ समाधानाचे विस्तीर्णपणें । वरी उपचार विशेष गुणें । ऐसिया प्रसंगें करून । सुखवेळा ठोटे ॥ ५ ॥ तैसें श्रीरामाचें अंतःकरण । बोधामृत परवडी पूर्ण । भोक्ता होय मुख्य प्राण । महा आवडीचा ॥ ६ ॥ आजि श्रवण सुख संपदा । प्रिकटी अनुभव स्थिती सर्वदा । आनंद उपजीविका आत्मविदा । प्राप्ती होतसे सहजें ॥ ७ ॥ अद्वैत अर्थांतरें पवाडे । तो श्रोता परम दुर्लभ निवाडें । पाहतां स्वरूप ज्ञानाएवढें । भाग्य नाहीं सृष्टीसी ॥ ८ ॥ जे स्वरूप ज्ञानें संपन्न । ते चि जाणावे कृतार्थ जन । येर जन्मा आले अज्ञान । कुळासी बुडविते ॥ ९ ॥ जन्मासी आलियाचें कार्य । जो स्वरूप ज्ञानाचा गुरुवर्य । आर्जउनी स्वरूपता आश्चर्य । भोगी आस्तिक्य आपुलें ॥ १० ॥ आपण होउनी कृतार्थ । उपदेशिती तत्त्व तत्त्वार्थ । जगासी उद्धरिती परमार्थ । निज प्रचीतीनें ॥ ११ ॥ ऐसा प्रचीतीचा श्रोता । सहस्रांत एक पाहतां । या श्रोतव्यें संपन्नता । भीम भावार्थें ॥ १२ ॥ परमात्मा राम परमार्थें । विवरे सर्वदा यावयार्थें । आत्मस्वरूपाचा निश्चितार्थ । केळा चि करीतसे ॥ १३ ॥ अनुभवाचा महा सिद्ध । प्रेमळाचा स्वतःसिद्ध । या परमार्थ प्रीतीनें शुद्ध । हृदय जयाचें ॥ १४ ॥ जें श्रुतीचें सार मथित । केवळ स्वानंदघन सदोदीत । तें प्रमयसुख मूर्तिमंत । श्रीरामस्वरूपें ॥ १५ ॥ महद्भाग्य ज्याचें होय । तरी श्रीरामाचें नाम प्रत्ययें । जागवी हृदय

निश्चयें । तो कृतार्थ जाला ॥ १६ ॥ नामव्यापकाचे घरीं । यम पाणी वाहे निर्धारीं । काळ आज्ञा शिरीं धरी । हे महिमा नामाची ॥ १७ ॥ जेथें नामरूप प्रांजळ । तेथें विश्रांतीचें चि रूप केवळ । अनुभवस्वरूपाचा निवळ । जागतसे तेथें ॥ १८ ॥ अनुभवाचें माहेरघर । जेणें आर्जविला जानकीवर । महा विश्रांतीची थार । तो पावला जाणिजे ॥ १९ ॥ या भजनप्रीतीची अंगें । मारुती जाणे अंतरंगें । विद्या अविद्यान मनोवेगें । सिद्धीतें पाववी ॥ २० ॥ सकळ मंत्रावळी सिद्ध बीजें । महा प्राप्तीचीं भवितव्य काजें । मारुतीच्या स्मरणें चि सहजें । प्रासिकर होती ॥ २१ ॥ अगम्यार्थ अवचट । होती हनुमत्स्मरणें प्रगट । प्राप्तीचें अधिष्ठान उत्कट । भक्तीनें आथिलें ॥ २२ ॥ करूनि श्रीरामासी अभिवंदन । अद्वैत बुद्धीनें संपन्न । प्रणववायूचा नंदन । म्हणे ऐक श्रीरामा ॥२३॥ जगदोद्धार संकल्पें । तूं चि होसी विश्वरूपें । हें भक्तांचें रहस्य साक्षेपें । पूर्वी निरोपिलें मज ॥ २४ ॥ तरी विश्वरूप हें पाहतां । भवभ्रांति दिसे तत्वता । स्वरूपानुसंधानीं असतां । नसे चि जगद्भान ॥ २५ ॥ स्वरूपानुसंधानें निरंतर । कीं विश्वरूप भजनपर । या उभय अनुसंधानी अभ्यंतर । समान रुढें ॥ २६ ॥ स्वभावस्थिति परिपाटें । चित्तीं अनुसंधान प्रगटे । जेविं शिखरींचे तोय लोटे । ढाळ पडला तिकडे चि ॥ २७ ॥ तैसें अनुसंधान चाळतां बरें । कीं साक्षेपें भजन प्रकारें । जगऊन स्वानंदनिर्धारें । असतां उत्तम ॥ २८ ॥ ऐसें अंतर प्रचीतीनें भीम । विचारीतसे सप्रेम । कळवळोनी मुखें श्रीराम । म्हणे अवधारी आतां ॥ २९ ॥ स्वानुभविक प्रेमळा । अक्षयानंद अंतर्वळा । उभय अभिन्न जिव्हाळा । ते जगऊं जाणे ॥ ३० ॥ ते माझी चित्शक्ति सीता- । तुझिया हृदयीं तत्त्वता । सुखामृताची सरिता । वाहे अखंडित ॥ ३१ ॥ मी स्वमुख प्रणवाचळ । माझे हृदयींचें ते निवळ । सदोदित सुखें अंतराळ । फुटला झरा ॥ ३२ ॥ वोतप्रोत करूनि हृदय । महा अद्वैत सुखें निश्चयें । आत्मयापासूनि सुख विस्मयें । परात्परासी आली ॥ ३३ ॥ ते निजपद अधिष्ठान । पद प्रचीतीचें संस्थान । तेथें बोधप्रद संभवज्ञान । उगम देखिला ॥ ३४ ॥ जैसें गगनाचें पुरतेपण ।

पाहतां जाणिवेत संपूर्ण । तया परीच अवकाशेंवीण । संपूर्णव्याप्ति माझी ॥ ३५ ॥ एवढी व्याप्ति हि व्यापून । पद पावन प्रांत घेऊन । आली त्रिपदा गहन । प्रवाहधारा ते ॥ ३६ ॥ नाहीं उर्धतेचा शेवट । ऐसें उंचिवेनें तें अफाट । त्या कड्यावरूनि महा लोट । लोटली सैरा ॥३७॥ संपूर्ण प्रणवाचीं शिखरें । तिंवलीं जीवन तुषारें । महा उल्हेखें पाठारें । संपूर्ण भिजविलीं ॥ ३८ ॥ अप्रांत सुखाची कंदरें । पाझरती स्वसुखनीरें । निवृत्तीचे स्वानुबोध निर्झरें । वाहती प्रवाह ॥ ३९ ॥ एवं प्रणवाचळपर । विज्ञानगंगा गंभीर । माझ्या स्वरूप प्रचीतीची साचार । चित्शक्ति सहज ॥ ४० ॥ तियेचा तुज अनुग्रह । केवळ प्रचीतीचा तूं विग्रह । निखिळ स्वसुख संग्रह । तूंचि तुझा होसी ॥ ४१ ॥ आदरें विचारिसी सप्रचीत । तेणें सांगावें वाटे सावचित्त । प्रचीत कान करून उचित । ऐकूं जाणसी तूं ॥ ४२ ॥ भोजनक्रिया सनातन । संभवी परवडी सदन्न । कीं जागृती च विस्तारून । सुषुप्तीसी रूढवी ॥ ४३ ॥ तैसी तुझी अवधानस्थिती । वगतृत्वासी संभवी मारुती । सगुणभजनें विश्रांति । अथवा निर्गुण ज्ञानें ॥ ४४ ॥ विविध प्रकारींचीं सदन्नें । जेवण जाळियां त्या क्षणें । तृप्तीमाजि अभिन्नपणें । केवळ तृप्ती असे ॥ ४५ ॥ तैसा विश्रांतीसी विसावला । निजव्यासें समरसला । तो पावन सुखें निवाला । विश्रामला ब्रह्मीं ॥ ४६ ॥ होतां सुखें संशयातीत । नसे त्या सगुण निर्गुण हेत । अप्रांत सुखामाजि चित्त । संस्कार विराला ॥ ४७ ॥ न स्मरे सगुण भजनस्थिती । न स्मरे अद्वैत प्रचीती । मी कृतार्थ जालों हे स्फूर्ति । असे चि ना जया ॥ ४८ ॥ आधीं आपुलें स्मरण नसे । तेथें द्वैताद्वैत केविं भासे । एवं प्रचीतीच्या उत्कर्षे । प्रांत टाकिला ॥ ४९ ॥ तो सर्वदां सगुणींच भजो । अथवा निर्गुण सुखें रंजो । नातरी विलासें चि उमजो । स्वभाविक ॥ ५० ॥ कळस जालियावरी इमारती । विश्रांतीसी आली अवाप्ती । मग ते पाहणेपणाची प्रीति । तैसें दर्शन मात्र तें ॥ ५१ ॥ प्रत्यक्ष जालियां निज दैवत । मग ध्यान करावें न लगे तेथें । पात्र विस्तारिलियां परिपूर्त । पाक सिद्धी चाड नसे

॥ ५२ ॥ तसें अतींद्रियसुख सहज । अवसर रहात निज उमज । फावतें अवधान सतेज । अनुसंधानेसीं ॥ ५३ ॥ या अनुसंधानें हें पुरता । तुज वोळली प्रसन्नता । शांता अनुमहें तत्वता । कृतार्थ जालासी ॥ ५४ ॥ आतां साक्षेप ना स्वभाव स्थिती । सगुण निर्गुण भजन विश्रांती । येणेंत्याही प्रसंगें प्रचीती । अद्वैताची च ते ॥ ५५ ॥ भजन आणि तें ज्ञान । या उपपत्तीं वाटती भिन्न । परि उभय स्थिती गहन । एकात्म स्थितीनें ॥ ५६ ॥ भजनें सद्गुरु प्रसन्नता । भजनें निज उपदेश तत्वता । भजनें प्रचीतीच्या मार्गा । सुखीं वैसविलें ॥ ५७ ॥ ज्ञानप्रत्ययाभिव्यक्ति । भजनें प्रतिष्ठिलें दैवत । सगुण साक्षात्कारें वर देत । दैवत भेटलें ॥ ५८ ॥ निर्गुण तया पासुनी । प्रत्ययासी आलें जनीं । या कारणें सगुण भजनीं । पूर्ण निष्ठा असावी ॥ ५९ ॥ निर्गुणासी काय ध्याईल । निराकारासी काय वाहील । अरूपासी काय पाहील । संपूर्णतेनें ॥ ६० ॥ अपरोक्षपणें आपण । जाला सनातन निर्गुण । अनुभवील हें कवण । वरवें अवधारीं ॥ ६१ ॥ इति श्री भीमोपदेश । उपक्रम भजन तोष । अद्वैत सुखाची मूस । म्हणे मेरु अनंत ॥ ६२ ॥ अष्टम सूर्य द्वितीय कला संपूर्ण ॥ २ ॥ श्रीरघुनाथार्पणमस्तु ॥

---

श्री

## सूर्य ८ कला ३

॥ श्रीसीतारामाय नमः ॥

श्रीराम जगदात्मा मी स्वयें । त्रिकांड वेदार्थ प्रमय । भक्तिज्ञान-उपासनामय । एवं प्रकारें ॥ १ ॥ भक्तीचें रहस्य उपासना । सत्कर्मे अनुसरिजे भजना । भजनाचें अभ्यंतर भावना । स्वरूपाकारें ॥ २ ॥ कर्म उपासना ज्ञान । तीहीं विशेषणें करून । स्वरूपाचें अनुसंधान । प्रांजळ होय ॥ ३ ॥ महा प्रयोजन प्रसंगीं । नाना उपाय करिजेत जगीं । कार्यसिद्धीसी सकळांलागीं । उपाय योजणें ॥ ४ ॥ तेवीं स्वरूप लाभ

व्हावया । सन्मार्ग सद्भाव सत्क्रिया । सत्समागम जगीं या । उपाय प्रवर्तले ॥ ५ ॥ डोळियांसी आलियां पदर । दृष्टी यावयासी बळेत्तर । जीवापासूनि निरंतर । लागे साक्षेप करणें ॥ ६ ॥ तैसें स्वरूपाचें ज्ञान । व्हावया करणें लागे साधन । नाना तपश्चर्या अनुष्ठान । देहदंडणा करान्या ॥ ७ ॥ तीर्थे व्रतें तपाच्या कोडी । कठीण साधनाच्या परवडी । सोसुनी महा दुःखें आवडी । प्रवृत्ति पडे साधनीं ॥ ८ ॥ मरणांतीक दुःखें साहती । सीतवास जळवास करिती । विरक्ती भरें संचरती । कठीण स्थळें ॥ ९ ॥ महा अनुतापें उदासीनें । आरण्य वसविती अनुदिन । वृक्षाचीं पर्णे चि भक्षून । करिती तपश्चर्या ॥ १० ॥ जळाहारी कंदाहारी । पवन प्राशिती परोपरीं । नाना हटयोग विस्तारीं । महादुःखें श्रमती ॥ ११ ॥ साधूनि हृदयीं श्वासोच्छ्वास । महा आसनीं सिद्धी प्रयास । वायो नेउनि मस्तकास । चिरकाळ राहती ॥ १२ ॥ ऐसीसीं दुर्घट साधनें । करिती आत्मप्राप्ती कारणें । सद्भाव धरून मनें । ध्यानपर होतीं ॥ १३ ॥ हा कर्मकांडीचा विस्तार । साधनें पाहतां अपार । येणें पावावयासी पार । टाकी नाहीं कवणा ॥ १४ ॥ आंगींचें निज सुकृतबळ । असतां कर्मयोग होय निवळ । नाहीं तरी धांवसा चि केवळ । सत्कर्म प्रवृत्तीचा ॥ १५ ॥ स्वाभाविक जगप्रवृत्ती । देहसंबंध विषय प्रवृत्ती । देह उपजीविका सर्वार्थी । प्रवाहीं पडिलीसे ॥ १६ ॥ नदी उगमासी परते ना । तैसें स्वरूपीं जन उमजेना । बळोत्तर प्रवाह जना । माजि मन संकल्प ॥ १७ ॥ जगप्रवृत्ति देखणें ऐकणें । निजध्यास चि प्रपंचीं होणें । सलोभ जीव अंतःकरणें । बाह्याभ्यास सदृढ ॥ १८ ॥ विषय लालुचीनें जन । भरीं भरले अनुदिन । रात्रंदिवस ध्यान । करितसे विषयाचें ॥ १९ ॥ धनदारा विषयसंसार । हा महा अज्ञान संस्कार । दुर्विषय घ्यासें निरंतर । जन्म मरण भोगी ॥ २० ॥ क्षणभरी नाहीं अवकाश । विकल्प द्वेष निंदा विशेष । मत्सरें निंदी सावकाश । साधुवृंदें ॥ २१ ॥ ऐसिया स्वाभाविक प्रवृत्ती । महा पातकें आर्जविती । आतां पापक्षय कवणे रीती । व्हावा तयाचा ॥ २२ ॥ कोटीमध्यें सात्विक

जनीं । परंपरा सन्मार्गे करूनी । बहु जन्मीं सुकृतें सांचुनी । येती सार्थ-
काच्या घरा ॥ २३ ॥ तेथें सन्मार्ग सत्क्रिया । विवेक नीति शांति दया ।
स्वरूप विचारणा तया । प्रवृत्ती रूढे ॥ २४ ॥ आश्चर्य ईश्वराचे सृष्टीसी ।
क्रिया प्रवृत्ति ज्या जैसी । जाति विशेषीं त्या तैसी । वर्तणूक घडे
॥ २५ ॥ पेरितां निंबवृक्षाचें बीज । त्यासी निंबोळ्या चि येती सहज ।
तेथें मधुरपणाचें काज । सरतें नव्हे चि कीं ॥ २६ ॥ कितेक सुरस
फळीं तरुवर । वर्षती मधु फळें संभार । ते विपरीतपणें विकार ।
फळरूर्दानें येती ॥ २७ ॥ तैसे सज्जन दुर्जन वृत्ति । बळिवंत संस्कार
प्रवृत्ति । सुकृति दुष्कृति जगती । प्रवाहीं पडिली ॥ २८ ॥ मायेचा
अनादि संस्कार । शुद्ध स्वरूपीं दावी विकार । आत्मत्वीं त्रिगुणपर । चेष्टा
रूढवी ॥ २९ ॥ पापियाचे होती सुकृती । हे अद्भुत कर्तव्यशक्ती ।
जैसी सिद्ध सामर्थ्ये होती । विख्याति जगीं ॥ ३० ॥ निंबवृक्षाकडे
पाहतां । माधुर्यतेसी येउनी सत्ता । आम्रफळें दे तत्वता । सामर्थ्याची
पदवी ॥ ३१ ॥ साधु अनुग्रहिती जया । सुलभ आत्मप्राप्ती तया ।
पापनिवृत्ति होऊनियां । सुकृतें त्या फळती ॥ ३२ ॥ प्रत्यक्ष तमोगुणी
नर । क्रिया पालटे होय निर्विकार । का जे गुरु अनुग्रह थोर । संस्कार
उरों नेदी ॥ ३३ ॥ महाविषयी रजोगुणी । ते चि विषय निवृत्ति येउनी
प्रवृत्तीते आत्मसाधनी । प्राप्तीस्तव ॥ ३४ ॥ या कारणें हे अवचट ।
व्हावया दैव असावें उत्कट । तरी च तें कैवल्यपीठ । बोळे. निज
कृपेनें ॥ ३५ ॥ एऱ्हवीं पाहता प्रवृत्ति । अज्ञानी च जगासी गती ।
चित्तापासुनी आवडती । विषयाचे संस्कार ॥ ३६ ॥ दैविक सत्वाच्या
संस्कारें । सत्क्रियेसी लागे निर्धारें । कर्मकाड तें अत्यादरें । श्रवणा आणी
॥ ३७ ॥ संत दीक्षा सन्मार्ग । त्या चि दीक्षेनें वर्ते सांग । आत्मसुटिकेसी
जग । तेव्हां प्रगटे ॥ ३८ ॥ अध्यात्म ज्ञान विचार । श्रवणीं प्रीति धरी
साचार । आत्मानुसंधानें निरंतर । विचरों लागे ॥ ३९ ॥ कर्मकांड गर्भ
सविस्तर । भवबंधनीं वृति निर्धार । जैसा बंधनीं सांपडला नर । उपायें
चि निखटे ॥ ४० ॥ तेथें अदृष्टही सानकुळ । ईश्वरासी ध्याये केवळ ।

तरी च तो उपाय सफळ । होय तयाचा ॥४१॥ प्रत्यक्ष जिवेंसी जातां । सुटोनी येती अवचिता । तेविं भवबंधापासुनी तत्वता । सुटती दैवें ॥४२॥ भवनिवृत्ति कर्तव्य जनीं । सत्क्रिया विस्तारें करूनी । उपाय विस्तारा आणुनी । कर्मकांड म्हणावें ॥ ४३ ॥ परी हें अति दुस्तर । जरी सानकूळ जाला ईश्वर । तरी कर्मकांड सविस्तर । उपासना आर्जवी ॥ ४४ ॥ स्वतंत्र धावया मुक्ती । कर्मासी असे चि ना पा शक्ति । कर्में आर्जउनी भक्ति । संनिष्ट व्हावें लागे ॥ ४५ ॥ भक्तीच्या संसिद्धीनें जाण । व्हावें परिशुद्ध आत्मज्ञान । त्या आत्मज्ञानें भवबंधन । निवृत्ति घडे ॥ ४६ ॥ असतां पूर्वसंस्कार भक्ती । तरी आंगऊं नये विरक्ती । विरक्तीनें सत्कर्मासक्ती । संस्कार रूढे ॥ ४७ ॥ सकळ उपायासी मूळ । सद्भक्तीच जाण केवळ । सद्भक्तीवांचून अकाळ । परतत्व न कळे ॥ ४८ ॥ पूर्वभक्तीचें बीज पेरिलें । तें चि सत्कर्में सफळ जालें । पुन्हा सत्कर्मापासूनी भलें । होय भक्ती च प्रवळ ॥ ४९ ॥ निर्वाळिले भूमीसी पेरिलें । तें म्हणों नये कीं वायां गेलें । तेविं सुकृत संस्कारें जालें । नरदेह सफळ ॥ ५० ॥ सुकृत एकाच्या कोटीगुणें । नरदेहा येउनी लाभे गेणें । महा सद्भक्तीचें भोगणें । भाग्य या देहीं ॥ ५१ ॥ असो चित्त करी सावधान । तुज रहस्य सांगतों संपूर्ण । सप्रचीत त्रिकांड ज्ञान । आध्यात्मप्रचीतीनें ॥ ५२ ॥ उघडून विचाराचे नयन । विलोकीं त्रिकांड प्रस्यानें ज्ञान । तरी च तूं त्रिगुणापासून । सुटसील बापा ॥ ५३ ॥ भवबंध कडोविकडी । त्रिगुणपाश महा सांकडी । येथे दुराशेची महा बेडी । विचार पदीं पडिलीसे ॥ ५४ ॥ त्रिगुण त्रिपुर हरा । अवधानशीळ अभ्यंतरा । जगदांतर शरीरा । अवधानीं वसें ॥ ५५ ॥ तुवां घेतलियां श्रवणीं । जग निवळेल या चि अनुसंधानीं । तुवां प्रवर्तलिया मननीं । मननी प्रवर्तेल विश्व ॥ ५६ ॥ जगदभ्यंतर मुख्यप्राणा । स्वसुख निधि निधाना । अवधानारूढ अवधाना । रूढवी वरें ॥ ५७ ॥ दारुयंत्र विशेषीं विचित्र । चमत्कारांचें अग्नि सूत्र । लागतां चि महाशब्दें स्वतंत्र । नभ पडसादवी ॥ ५८ ॥ तैसें पत्राचें अभ्यंतर । रूढे पत्र अवधानपर । ब्रह्मसाक्षात्कारीं जिव्हार ।

सवोप-प्रगटे ॥ ५९ ॥ ऐसियापरी पतितपावन । हनुमंतासी परम कृपेकरून । प्रबोधवी नित्य नूतन । हृदयींचें गुज ॥ ६० ॥ तया अनुसंधानी निरंतर । सप्रचीत तुमचें जिव्हार । असतां तेथें वारंवार । प्रार्थना कायसी ॥ ६१ ॥ इति श्री भीमोपदेश । निवळ्यातें कर्मकांड अशेष । कर्मी च लाभे स्वप्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ६२ ॥ अष्टम सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥



श्री

## सूर्य ८ कळा ४

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम उपासना जिव्हार । आत्मानुभवी उपासक साचार । निजानंद घननिर्धार । भक्त प्रचीतीनें ॥ १ ॥ उपासनाकांड सविस्तर । आत्मउपासना अखंडाकार । निज हृदयींचें निरंतर । तत्व अर्जवीजे ॥ २ ॥ सत्य स्वरूप अनुसंधानी । भक्त राहिले नित्य ध्यानीं । विभक्तपणाचा कल्प सारुनी । अभेद भक्त जाले ॥ ३ ॥ चहूं देहाचा परिशोध । विजातीचा परिहार प्रसिद्ध । सजाति प्रारोहण प्रबुद्ध । बोध रीतीनें ॥ ४ ॥ कमळ्याचें दळें दळ । काढितां उरे कर्णिका मूळ । तेविं तत्वें जाता अकळ । साक्षत्व उरे ॥ ५ ॥ होय मकरंदाचें संस्थान । परि सुवास नसे दळेंवीण । तेवि तत्वांतीत सनातन । साक्षत्वीं स्फूर्ति नुरे ॥ ६ ॥ उभयवृत्तीचा संस्कार । गुप्त प्रगट मूळ विस्तार । प्रगट सरतां विश्वाकार । गुप्त उरे बीजांतरीं ॥ ७ ॥ तें सोहं सर्व तत्वबीज । निपजवी प्रवृत्ति उमज । निवृत्तिचाहि पूर्ण समज । त्यापासून होतसे ॥ ८ ॥ तें साक्षत्व शोधून पाहतां । नुरे चि कांहीं स्वभावता । द्रष्टा चि हरपे तत्वता । द्रष्टृत्वेंसीं ॥ ९ ॥ ऐसा द्रष्ट्याचा अभाव । होय वृत्तिशून्य स्वभाव । त्यातें चि स्वरूपानुभव । म्हणती कोण्ही ॥ १० ॥ तरी येथें वरा विचार कीजे । जेणें अभावासी देखिजे । तो द्रष्टा शून्य वृत्ति व्याजें । अभावें नेणा ॥ ११ ॥ माया महा शून्यांतरें । वाप होती

अभाव परें । भाव प्रचीति निर्धारें । साक्षत्व धरावें ॥ १२ ॥ आत्मप्राप्ति प्रयोजन । साक्षत्वीं लाभ असे गहन । निरास न करितां उमजोन । पहावें साक्षत्वापर ॥ १३ ॥ वसता ठाव कल्पांतरें । कल्पनाजळ वळोत्तरें । स्वरूप निवास भेदद्वारें । अवरोधावा ना ॥ १४ ॥ वुजीनाजळ येती द्वारें । जळ आलें म्हणउनी गजरें । हाका मारितो निर्धारें । शाहणा कीं काय ॥ १५ ॥ तेविं साक्षत्वीं स्वानुभव । स्वानंद विश्रांतीचा ठाव । अज्ञान प्रवृत्तीनें दुर्भव । भरला जाय ॥ १६ ॥ आत्मप्रचीति स्वकरें । वारी ना तो संस्कार निर्धारें । बाधक होय भव संस्कारें । ठाव स्वहिताचा ॥ १७ ॥ आपुलें चि विश्रांतीचें घर । शत्रूनें रोधितां दुर्धर । तें चि वैरपणाचे विकार । अनुकूळतेसी आणी ॥ १८ ॥ देह सुखाचें अयतन । तें चि रोगातिशयें करून । सुखाचें चि संपूर्ण । कारण दुःखासी होय ॥ १९ ॥ तैसें हें साक्षत्व पाहें । प्रवृत्ति संस्कारें निर्दय । अवरोधूनि सुख हृदय । दुःखासी पात्रकरी ॥२०॥ उपेगासी यावें निजज्ञान । तें चि संभवितें होय अज्ञान । दुःखपरंपरेसी संवर्धन । करी साक्षत्व ॥ २१ ॥ याकारणें निज अभ्यंतर । आर्जउनी निरंतर । अनुभविजे परात्पर । महा सुखासी ॥ २२ ॥ विषाचें अमृत होय । ऐसी विचारपदवी पाहें । अविचारें अमृताचें निश्चयें । विष चि संभवे ॥ २३ ॥ प्रवृत्तिपर सानकुळें । पंचतत्व हेतूमुळें । प्रबळोनी साक्षत्वजळें । विस्तारती विषरूपें ॥ २४ ॥ तें आपुलीच संकल्पपर । अप्रांतीची अज्ञानद्वारें । आपुलीं आपणासी विस्तारें । प्रतिकूळ जालीं ॥ २५ ॥ आपुल्या स्वरूपामध्यें आपण । नसतां क्षोभविलें भीषण । मग ते प्रवृत्तीनें दारुण । दुःखें भोगविलीं ॥ २६ ॥ संसारपर मित्र संकल्प । तितुकेहि होउनी विकल्प । मरणांत दुःखें आपेंआप । बाधूं लागले ॥ २७ ॥ त्यास्तव आत्मनिष्ठापरें । कोण्ही एक संकल्पभरें । प्रवाहीं पडोनी निर्धारें । विपत्तीसी येऊं नये ॥ २८ ॥ एक विचारेंवीण सकळ । होइजे दुःखासी पात्र केवळ । येथें उपायें चि अकळ । साक्षत्वीं सुटावे ॥ २९ ॥ लुटावें स्वानंदाचें भांडार । तुटावें साक्षत्वाचें दुस्तर । पिटावें माया परापर । मूळावर्ण तें ॥ ३० ॥

जडावें स्वरूपाचें शेजेसी । झडावें अज्ञान विकृतीसी । पटावें उन्मनी विश्रांतीसी । साक्षत्वें विरें ॥ ३१ ॥ विपत्ती भयाची न भोगितां । भोगावी निर्भय लक्ष्मीसत्ता । साक्षत्वींच अस्तिक्यता । साधावी अपरोक्ष ॥ ३२ ॥ निजप्रसन्नता अभिन्न । साक्षत्वींच असें समाधान । उपासक अनुभवी सज्ञान । भोगिती आत्मप्रसन्नता ॥ ३३ ॥ आपुली स्वभावता आपण । ज्ञानप्रतिष्ठा पुरातन । भावनेसी आणुनी संपूर्ण । सनातन घ्यावी ॥ ३४ ॥ पैसावलें जितुकें हृदय । तितुकें अवकाश स्वयें । सुखाच्या अवसरें प्रलय । घ्यावा स्वरूपाचा ॥ ३५ ॥ स्वमुखाचे यावे अवचट । होती ज्ञान ऐसें होय उत्कट । ज्ञानें आदि मध्य शेवट । साक्षत्व सरावें ॥ ३६ ॥ ज्ञान आणि अधिष्ठान । निवाडा होतां सनातन । आपुली आस्तिक्यता आपण । सुखें अनुभविजे ॥ ३७ ॥ जैसा आपुला पर्यंक । मार्ग सांपडे विवेक । तैसा प्रतिक्षणीं सम्यक । शोध करावा जीवीं ॥ ३८ ॥ नवविधा भजन द्वारें । श्रवणापासूनि निवेदन परें । नित्यानित्य विचारें । रक्षावीं सप्रेम ॥ ३९ ॥ नित्य श्रवणीं निजविचार । अनित्याचा त्याग निरंतर । श्रवणासी आलें अभ्यंतर । श्रवण पर शोधावें ॥ ४० ॥ श्रवण ऐकताति जेणें । त्याचें श्रवण करूनि तेणें । ऐकती शब्द ते प्रचीतीनें । अर्थपर ऐकावे ॥ ४१ ॥ महा वाक्य समसमान । श्रवणा आले शब्द संपूर्ण । आत्मप्रचीतीनें श्रवण । नित्य करावें ॥ ४२ ॥ कां जे शब्द आपुले चि सर्वही । आपणें चि वक्ता सर्व देहीं । जर्‍हीं अवाच्य शब्द आला तो ही । न न्यावा विक्षेपासी ॥ ४३ ॥ आपुलें वाईट आपण । भावी च ना पां कवण । सुखोपलब्धीसी कारण । निज हेतु सर्वत्र ॥ ४४ ॥ तैसी स्वहितचिंतना । शब्दमात्रीं अनुसंधाना । साधूनि आत्मविवंचना । श्रवण कीजे ॥ ४५ ॥ येणें चि प्रकारें निवेदनादि । पहावी आत्मपरपदसिद्धि । श्रवणाची सोय या प्रबोधीं । अवधारीं दृढा ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । संकल्प शोध अविनाश । साक्षत्वीं च सुख समावेश । म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ अष्टम सूर्य चतुर्थ कळा संपूर्णमस्तु ॥ ४ ॥

श्री

## सूर्य ८ कळा ५

॥ श्रीरामसमर्थाय नमः ॥

श्रीरामपदपदार्थे । हृदय शोध परमार्थे । श्रवणीं निवळ तत्वतार्थे । कृतार्थ होई तूं ॥ १ ॥ जालियां श्रवणाचें सार्थक । प्राप्तिस्वरूप निष्कळंक । संकल्पातीत निश्चयात्मक । बसावें सहज ॥ २ ॥ श्रवणीं मनन ऐसें होतां । श्रवण भक्ती अर्पे अच्युता । या चि प्रचीतीनें तत्वता । शोधी कीर्तन भक्ती ॥ ३ ॥ जैसी संतोषाची वार्ता । मुखासीं ये अवचिता । आत्मप्रचीति सुखें तत्वता । उच्चार होती ॥ ४ ॥ भवनिवर्तक नामें । मुखासी येती सप्रेमें । अच्युता अनंता अनुक्रमें । नामावळी ते ॥ ५ ॥ श्रीरामा सर्वोत्तमा । देवदेवा निजविश्रामा । वासुदेवा विश्रांति धामा । छंद लागला वाचेसी ॥ ६ ॥ जगज्जनका जानकीशा । रघोत्तमा पूर्ण परेशा । कैवल्यनिलया स्वप्रकाशा । पुराणप्रसिद्धा ॥ ७ ॥ दीनबंधु दीनोद्धरणा । भक्तवत्सला कृपाघना । परप्रकाशा पावना । परम पुरुषा श्रीरामा ॥ ८ ॥ केशवा कृष्णा कमळाकांता । कमळ लोचना कृपावंता । कारुण्यजळधी कीर्तिवंता । कमळोद्भव विभु ॥ ९ ॥ अमरवरदा कृपानिधी । संतपरिपाळका निरवधी । सत्‌चित्‌सुख तनु त्रिशुद्धि । आदिजनका ॥१०॥ अभयप्रद परावरा । स्वसुखवरदा परात्परा । भवभयभंजनईश्वरा । राजीवाक्षा ॥११॥ अनंत नामाचे प्रबंध । मध्य अनुभव स्वछंद । सरळ अळापे प्रबंध । सद्भावें निघती ॥ १२ ॥ सद्गुरुचीं नामें आवडी । जिव्हा पुस्तक करोनी रोकडी । सप्रेम अक्षरें प्रौढी । उच्चारी कीर्तनीं ॥ १३ ॥ अज्ञान निवृत्तीचे पवाडे । अखंड विरुदावळी पढे । महा अद्वैत ग्रंथ रूढे । निरोपण कीर्तनीं ॥ १४ ॥ देवत्रयकीर्ति विख्याति । अवतार संभव महा स्थिती । महा पुरुषार्थ दुष्ट निवृत्ती । चरित्रें प्रगटी ॥ १५ ॥ सगुण साक्षात्कारी ध्यानें । वर्णी अलंकार भूषणें । अद्वैत प्रचीतीचीं वचनें । नित्य अनुवादे ॥ १६ ॥ महा संत सुखसंवाद । स्वानंदप्रद पदें विशद । अनेक धाटीनें

स्वछंद । निघती मुखांतुनि ॥ १७ ॥ परब्रह्म प्रचीतीसी आलें । तेणें मन उपरमलें । स्वसुखातिशयें जालें । निमग्न महासुखीं ॥ १८ ॥ तें उन्मनपरदर्शनें । महा उन्मादभरें सुखानें । अनुभवसिद्ध हृदयानें । कल्लोळ टाकी सुखाचे ॥ १९ ॥ सहस्रनामाच्या आवर्ती । करुणास्वरें पुढती पुढती । वाचा उद्‌घाट करी प्रचीती । निज अभ्यंतरें ॥ २० ॥ सुखावलें निज जिव्हार । ते चि अखंड येती उद्गार । अश्रांतमुखें अगोचर । कीर्तन ऐसें ॥ २१ ॥ देहबुद्धि विसरोनी । नामें अद्वैतबोधवचनीं । सुखानुसंधान कीर्तनीं । महा प्रेमा दाटे ॥ २२ ॥ कीर्तन म्हणिजे कीर्ति अयतन । निरोपिलें आपुलें अनुसंधान । जैसें तृप्तीनें समाधान । तनुचिन्ह तेजस्वी ॥ २३ ॥ जन्मदुःखाची निवृत्ती । सरे गर्भवासप्रवृत्ती । तुटे अज्ञानभवभ्रांति । परिहार दुःखाचा ॥२४॥ महावाक्यें सद्गुरुमुखींचीं । व्याख्या सत्‌चित्‌सुखपदाची । विचारणा जीव शिव शब्दाची । कीर्तनीं प्रगटी ॥ २५ ॥ कलियुगीं हरिकीर्तनें । होय परम पावन । जगा कीर्तने चि करून । उद्धार जगती ॥ २६ ॥ कीर्तनें अज्ञान निवर्ती । कीर्तनें पापें लया जाती । कीर्तनें पुरुषार्थ प्राप्त होती । मुक्तसमृद्धि होय । ॥ २७ ॥ कीर्तनीं विरक्ति प्रगटे । कीर्तनें भवजळ वोहटे । कीर्तनें कैवल्याचे दारवंटे । मुखें चि उघडती ॥ २८ ॥ कीर्तनीं प्रगटे वैकुंठ पीठ । कीर्तनीं भेटे नीळकंठ । कीर्तनीं स्वरूपाचा अवचट । बोध होय प्रांजळ ॥ २९ ॥ कथाश्रवणें साधुसिद्ध । पावन जाले प्रसिद्ध । प्रल्हाद नारद प्रबुद्ध । परंपरेचे ॥ ३० ॥ अक्रूरादि भक्त परम । कथा प्रौढीनें विश्राम । पावले ते परंधाम । कीर्तन गजरें ॥ ३१ ॥ यापरी तूं करी कीर्तन । पावसील महा समाधान । भक्तीचें रहस्य भगवान । बोधी भीमासी तें ऐका ॥ ३२ ॥ श्रीरामप्रचीतीचें अयतन । समाधानाचें जन्मस्थान । ज्याचे प्राप्तिस्तव सज्जन । कीर्तन करिती ॥३३॥ तो आपुल्या मुखें आवडीनें । अनुभवांक कथा प्रशंसेनें । करुणा अखंडरस वचनें । कीर्तनपर बोले ॥ ३४ ॥ भक्त देवासी सुखें वर्णिती । हरिकीर्तनीं चरित्रें गाती । देवासी आपुलें करिती । अभ्यंतर प्रीतीनें ॥ ३५ ॥ देवभक्तांची नामावळी । प्रगटी निजमुख कमळीं । भक्तनामरत्न सुढाळीं । सर्वांग विभूषित ॥ ३६ ॥

नित्य ज्ञानप्रभेनें सोज्वळें । भक्तनित्यमुक्त मुक्ताफळें । श्रवण भूषण तेजागळें । श्रवणीं धरी ॥ ३७ ॥ अद्‌भुत कीर्तीचे पवाडे । भक्तांचीं चरित्रें निजनिवाडें । भक्तांपासी च वाडे कोडें । कीर्तन करी देव ॥ ३८ ॥ या देव भक्त विशेषणें । आत्मा च रूढला कीर्तनें । विश्वरूप प्रचीतीनें । कीर्तनीं प्रगटे ॥ ३९ ॥ परब्रह्म महाप्रलय । आत्माराम वक्ता होय । त्याचि अनुभवाच्या प्रमेयें । श्रोता हनुमंत कीर्तनीं ॥ ४० ॥ वक्ता हनुमंत श्रोता श्रीराम । या उभयतांचें अंतर्याम । स्वयंभ तत्वाचे सुवर्म । प्रगट जालें ॥ ४१ ॥ अद्वैताचा महाविवर । वाचेसी येऊनि निरंतर । आपुला आपण उद्धार । जाला कथाश्रवणें ॥ ४२ ॥ श्रवणापासून जालें कीर्तन । कीर्तनीं अनुसरलें श्रवण । कां जे हृदयींचें निज अनुसंधान । एकःचि असे ॥ ४३ ॥ कीर्तनीं प्रत्यक्ष सगुण । दर्शन देउनी करी पावन । साक्षात्कारें चि निज निर्गुण । कीर्तनीं रूढे ॥ ४४ ॥ कीर्तनीं प्रगटती महा सिद्धि । कीर्तनीं स्वानंदाची समृद्धि । या कीर्तनावरी उपलब्धी । अवधारीं विष्णुस्मरण ॥ ४५ ॥ स्वयें चि विष्णूचें अधिष्ठान । स्वयें चि निज स्मरणाचें निधान । स्वये ब्रह्मप्राप्ति अनुसंधान । स्मरण तें अवधारीं ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश । स्वरूप कीर्तन निजध्यास । पर तत्व बोध सघोष । म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ अष्टम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ८ कळा ६

॥ श्रीरामकर्ता ॥

श्रीराम विष्णुतत्व स्वयें । माझें स्मरण मी च निश्चयें । निजात्मप्राप्ति प्रत्ययें । स्मरणासी आलें ॥ १ ॥ माझें मज नसतां विस्मरण । अभिवचन वाचें होय विस्मरण । स्वरूपज्ञानें नित्यनूतन । स्मरण करीतसें ॥ २ ॥ सद्भाव स्मरणें रूटलें । ब्रह्मप्रचीतीनें आंगवलें । त्या स्मरणाचें

निरोपिलें । न यचे महिमान ॥ ३ ॥ स्मरण त्रिपुटीहूनपर । करी आत्म-स्मरणें उद्धार । मी कोण ऐसा निजनिर्धार । स्मरणासी आणी ॥ ४ ॥ या स्मरणभक्तीनें निजलाभ । मी स्वसुखात्म स्वयंभ । विज्ञान रवीची सुप्रभ । प्रभा स्फुरली ॥ ५ ॥ माझ्या स्मरणें जग उद्धरे । माझ्या स्मरणें सुख अवतरे । माझ्या स्मरणें साक्षात्कारें । धवळीतें जगती ॥ ६ ॥ मी त्रिभुवनैक सुखकंद । जगासी स्मरणें चि दे स्वानंद । माझ्या स्मरणाचें संवाद । नित्य वेद करिती ॥ ७ ॥ माझ्या स्मरणें बोध रूढले । माझ्या स्मरणें संत विसांवले । माझ्या स्मरणें सिद्ध ठावले । स्वरूप दर्शनें ॥ ८ ॥ महा अद्वैत परवडी । स्मरणें चि ग्रंथ आले रूढी । स्वरूपानुभव-प्रौढी । या स्मरणांत असे ॥ ९ ॥ निजानंद घन स्मरण । निजानुभाव उपकरण । निजविश्रांति अनुसरण । या स्मरणांत असे ॥ १० ॥ निज आस्तिक्यतेचें माझें स्मरण । तुवां करावें अनुदिन । या च स्मरणें मदवदन । डुल्लतसे सदा ॥ ११ ॥ स्वरूपाचें नित्य स्मरण । तेथें साक्षात्कार पूर्ण । भवसंसर्गीक विघ्न । तयासी न बाधी ॥ १२ ॥ नाममंत्रमाळा सकळ । या स्मरणें चि केल्या सफळ । भवदुःखाचा फिटला दुष्काळ । ते हें निजस्मरण ॥ १३ ॥ द्रष्टत्वासी न येतां द्रष्टा । जाण हे स्वरूप प्रतिष्ठा । स्वरूपप्रत्ययें कपिश्रेष्ठा । जाणे स्मरण भक्ती ॥ १४ ॥ स्मरणासी न येतां कांहीं । सूर्यावरी रूप चि नाहीं । त्या सृष्टिसंभव-ज्ञानासी । या स्मरणें प्रकाशिलें ॥ १५ ॥ ऐसें हें माझें स्मरण । केवळ स्वरूपाचें ज्ञान । प्रचीतीचि उघडोनी श्रवण । ऐके स्मरण भक्ती ॥ १६ ॥ जितुकें कांहीं स्मरणासी आलें । तितुकें परतोनी स्मरणीं सामावलें । तें विचारें चि वर्तविलें । निरंतर स्मरण ॥ १७ ॥ केवळ निर्विकार स्मरण । जाण स्वरूपाची अनुभव खूण । महा समाधिस्थ सनंदन । सनकादि स्मरणें ॥ १८ ॥ निर्गुणरहित समाधीपर । या स्मरणीं नवसिद्ध साचार । कपिल दत्तात्रयादि अपार । या स्मरणेंचि रूढले ॥ १९ ॥ एकेक स्वरूप साक्षात्कार । या स्मरणाचा चि विस्तार । हे त्रिभुवनैक सार । स्मरण माझें ॥ २० ॥ जाणिवे रहित अनुसंधान । ज्याचे हृदयीं सनातन । तयासी

हें स्वरूपज्ञान । स्मरणें चि आतुडे ॥ २१ ॥ भवसंकल्प परिहार । निर्विकल्पता निराधार । निजांग द्रष्टा अगोचर । मी या स्मरणीं असे ॥ २२ ॥ तिसरी भक्ती स्मरण पावन । तिसरे भक्तीनें जगदोद्धरण । तिसरे भक्तीनें निरंजन । प्रचीतीसी आलें ॥ २३ ॥ आत्मसाक्षात्कारी स्मरण । स्मरणें चि होय निरावरण । स्मरणाची योग्यता आपण । आपुली उपलब्धी ॥ २४ ॥ ज्या स्मरणें उठाउठी । होय आपआपणा भेटी । त्या स्मरणाची उंच कोटी । जाण कपींद्रा ॥ २५ ॥ अनादिसिद्ध या स्मरणें । मी अवतरोन सुखानें । आत्मप्रचीत उपदेशानें । जगविलें स्मरण ॥ २६ ॥ अद्वैतानुभव जीवन । स्वसुखाचें भांडार पूर्ण । जें वां महावाक्यें करून । सीतेनें उपदेशिलें ॥ २७ ॥ तें हें निखिळ स्वसुख स्मरण । स्वरूपावबोधाचें भरण । सर्वार्थ तुज प्रसन्न । सीतेनें प्रबोधिलें ॥ २८ ॥ या स्मरणामृताची उकळी । सीता हृदयानंद जळीं । सायोज्यता उफाळली । अद्वैत चर्या ॥ २९ ॥ सीतेचें अभ्यंतर मी च होय । माझें रूपकर्ती सीता स्वयें । मी परब्रह्म या प्रत्ययें । प्रगटली सीता ॥ ३० ॥ सीतास्वरूपाची प्रचीती । ते हे जाण स्मरणभक्ती । या स्मरणरूपें नित्य मुक्ती । प्रबोधली तुतें ॥ ३१ ॥ काळ देश वर्तमान । विसरोन सृष्टीचें भवभान । चित्शक्ति स्वानंदघन । या स्मरणीं वसे ॥३२॥ परा पश्यंति मध्यमा । वैखरीसी आली नाहीं स्मरण सीमा । स्फूर्तिवीण निजमहिमा । जाण स्वरूपाची ॥ ३३ ॥ अतींद्रिय स्वसुखवर्धन । जयासी आकळलें हें स्मरण । तोचि सृष्टीसी जाला पावन । या चि स्मरणें ॥ ३४ ॥ मोक्षश्रियेचा विजयध्वज । तुझा याचि स्मरणें उमज । स्मरणामृत पानें सतेज । शोभेसी आणिली तनु ॥ ३५ ॥ कैवल्यप्रतिष्ठा रूप स्मरण । साकेतपुरीं वसविली संपूर्ण । तूं अधिष्ठाता आणि अधिष्ठान । या क्षेत्रीं रूढलासी ॥ ३६ ॥ निज स्मरणेंचि पुरता । ज्ञानस्वरूप अधिष्ठाता । अधिष्ठान तरी तत्वता । आंगेंचि होसी ॥ ३७ ॥ एवंप्रकारें निजस्मरण । आत्माराम सुखैकघन । आत्मप्रतिष्ठा अनुसंधान । रूढोसी आणिलें ॥ ३८ ॥ भक्तीच्या विशेषणें करूनी । ज्ञानप्रतिष्ठा करी जनीं ।

ज्ञानसुलोचन विद्यमानी । प्रसन्न जाला भीमासी ॥ ३९ ॥ स्वमुखकल्पतरु आंगणीं । वसतां काय न पुरवी धणी । स्वरूपानुभव अनुसंधानीं । संपन्न केला रुद्र ॥ ४० ॥ श्रवण कीर्तन स्मरणें । उद्धरिलें विश्व निरूपणें । तेंचि श्रीरामाचीं अमृतवचनें । भक्तिपरें अवधारा ॥ ४१ ॥ केवळ समाधान मूर्ती । पाहतां श्रीरामाची चिद्दीप्ती । स्वरूपज्ञानें मारुती । अनुग्रहिला ॥ ४२ ॥ त्या मारुतीचे पंक्तीसी । बैसा अवधान विशेषीं । बोधामृत निश्चयेसीं । सेवा श्रवणसुखें ॥ ४३ ॥ परमपावन पादसेवन । आत्मप्राप्ती जन्मस्थान । स्वरूपानुभव आख्यान । अवधारिजे सज्जनीं ॥ ४४ ॥ इति श्री भीमोपदेश । अपरोक्षज्ञान स्वप्रकाश । स्मरणभक्ति हे विशेष । म्हणे मेरू अनंत ॥ ४५ ॥ अष्टम सूर्य षष्टम कळा संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य ८ कळा ७

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्रीराम मज मी संबोधी । निजपद सेवन सिद्धि । केवळ समाधान समृद्धि । सद्गुरु वरदया ॥ १ ॥ प्रणव ज्ञानाग्नि गिरिवरी । उभारे साहंशृंग निर्धारी । त्या शृंगासी स्वयंभ साक्षात्कारी । उंचावला कळस ॥ २ ॥ त्या कळसाची सिखा अगोचर । तेथवरी अवधान चक्षुधर । नेऊनि पाहे तेथीचा पसर । निजात्मप्रभेनें ॥ ३ ॥ न्याहाळितां निजचक्षु निढळें । अनुभवाचा आश्रय पसरे । तया उर्धासी तूं निर्धारें । जरी जासील कां ॥ ४ ॥ नव्हे चि हे आश्चर्य परी । निजाचे निज अभ्यंतरीं । दृष्टि घालुनी पाहे वरी । अवधानपर ॥ ५ ॥ परममंगळ निजनिधाना । निजावधान सुलोचना । सर्वांग द्रष्टा तूं देखणा । तुजप्रति सांगणें काय ॥ ६ ॥ स्वरूप ज्ञानगिरी पाठारीं । निर्मळ निश्चळ नभापरीं । व्यापक घेऊन अभ्यंतरीं । निरावकाशीं रिघे ॥ ७ ॥ निरावकाश निज निर्धारें ।

परि शुद्ध स्वरुपांवरें । पवाडतां धर साक्षात्कारें । सर्वदा वरिजे ॥ ८ ॥ नित्य स्वसुखाब्धि मज्जन । करिती मननशीळ सज्जन । भव उन्मेश विसर्जन । अहंबीज भर्जिती ॥ ९ ॥ वर्जोनि भ्रांतिजातचर्या । आर्जिली निजार्जित तुर्या । चित्सूर्य संभवसूर्या । श्रेष्ठ मातें आराधिती ॥ १० ॥ त्यांची निजपदसेवन स्थिति । आतां सांगतों तुजप्रती । स्वात्मसुखप्राप्ती प्रचीती । निजपद संदर्शन ॥ ११ ॥ जे सबाह्याभ्यंतर भरलें । जे अभ्रांतपणें असे उरलें । जेथें अनसरोन सरलें । निजप्रचीतीचें ज्ञान ॥१२॥ जेथें विस्मयापन्न सुख विरालें । अखंडैक रस फळ मुरालें । नित्यानुभवभुक्त जिरालें । महां परिपाक ह्य ॥ १३ ॥ ऐसें निरावरण उदर । घनवटलें सुख अपार । ते चि होउन तें साचार । अनुभविती ॥ १४ ॥ आतां त्या अखंड मंडळ्याकारीं । स्वसुखमंडळ वृत्ति निर्धारीं । निजानंदाची वीज बरी । भोगूं जाणिजे ॥ १५ ॥ अत्यंतिक निश्चळपणें । निजअभ्यंतर अवधानें । चमत्काराची ही उन्मेशानें । सांचळ न व्हावी ॥१६॥ अवधान श्रोत्र कीजे वाड । ब्रह्मास्मीचें पातें स्थीर पवाड । ऐसिये दर्शनें उघड । विलोकन व्हावें ॥१७॥ स्वस्यता स्वकीय अपार । अत्यंत सूक्ष्म पै सार । त्या निजांगीं च निज विवर । पद ठेवावें ॥१८॥ एकांगावरी निःसंगता । निजांग अवधरुनी पुरता । स्वानंदपर तत्वता । आश्रयासी धरावें ॥ १९ ॥ मग तें गूढ स्वसुख निराळ । अमृताचें भरींव केवळ । निरामय सुख अंतराळ । सुधाबिंब सारें ॥ २० ॥ जें अनुभविलें नाहीं कवणीं । जें देखिलें चि नाहीं नयनीं । जें ऐकिलें चि नाहीं श्रवणीं । वाचेनें बोलवेना जें ॥ २१ ॥ ते अनंत सद्गुरुपद । स्वयंभानुवी निर्द्वंद । संत अनुभविती स्वानंदकंद । माझ्या विद्यमाने ॥ २२ ॥ हें अखंड मंडळस्वरूप । गुरु कृपेनें आपेआप । निजपद सेवन सद्रूप । तद्रूपतेनें ॥ २३ ॥ चिद्रूप त्याचें चि निजांग । मद्रूप तें चि तें अभंग । आनंदरूप अंतरंग । सद्गुरुपदसेवनें ॥ २४ ॥ यापरी सद्गुरुपद सेवन । करिती ते कृतार्थ सज्जन । मी त्याचा भृत्यानुभृत्य जाण । तें आराध्य लिंगें माझीं ॥ २५ ॥ त्याची दीक्षा देखोनें आचरें । त्याची शिक्षा

भवशिक्षींत विचरें । सर्वस्वें कृपा त्यांची आचरें । सद्भावभक्ती ॥ २६ ॥ परम साक्षात्कारी दैवतें । जे गुरु उपासिती एकचित्तें । जे गुरु अनुग्रहित सर्वार्थें । ते सेव्य मजला ॥ २७ ॥ स्वसुखाचे सिंहासनीं । त्यांतें उपचारीन अनुदिनीं । निज जिव्हार लाउनी । आर्जवीन मीं तयां ॥२८॥ निजहृदय शेजेसी । सुखें निजवीन तयासी । सनातन सावकाशीं । प्रीती पांघरवीन त्या ॥ २९ ॥ शांति दया क्षमादिकां । सेवेसी लावीन स्थिती अनेका । आत्मजोति लिंगासी वेदिका । करीन मंत्रोद्धारें ॥ ३० ॥ स्वानंद शिवालय उभारा । सेवीन निवांत गाभारा । पंचप्राणाची चिदंबरा । करीनें पंचारती ॥ ३१ ॥ गुरु सेवका ययापरीं । सेवीन सुखें सर्वांपरीं । गुरुपाद सेवनें निर्धारीं । जे प्रसिद्धीसी आले ॥ ३२ ॥ सर्वोत्तम सृष्टीचा ईश्वर । तो मज आर्जवी निरंतर । माझें घेऊनियां अभ्यंतर । राहिला माझे ध्यानीं ॥ ३३ ॥ प्रणवपर अभ्यंतर । धरून अनुसंधानधर । मजला सेवी निरंतर । इतुक्या च कारणें ॥ ३४ ॥ साच सद्गुरुकृपा मज । त्या स्वयंभ ज्ञानाचें महा तेज । गुरुप्रसन्नतेचि ते सहज । मी तनु चि दावलों ॥३५॥ त्यास्तव प्रचीत माझिये आंगीं । अखंडित सेविती मज योगी । निजबोध दीक्षा मजलागी । अर्जउनी घेती ते ॥ ३६ ॥ जालों मी गुरु अनुग्रहित । त्यास्तव हें महत्व प्राप्त । शिवादिक महा संत । सेविती मातें ॥ ३७ ॥ साच चि गुरुपर दैवत । आणिक नाहीं जाण निश्चित । निज आराधन सदोदित । सार्थक गुरुभजनें ॥ ३८ ॥ हें चि सद्भावाचें शिखर । जेथें धरिजे गुरुपद थार । निज निर्धाराचे निर्धार । लाहिजे गुरुवटाक्षें ॥ ३९ ॥ हे चि सद्गतिसीमा । नित्य आठवीं गुरुमहिमा । हे चि सन्मार्गांची गरिमा । जो गुरुदयेसी प्राप्त जाला ॥ ४० ॥ हें चि महा सुखाची सीग । होय नित्य गुरुपद योग । हा चि पुरुषार्थाचा प्रसंग । सर्वदां गुरुचर्चा ॥ ४१ ॥ हें चि सार्थकाचें जगीं जिणें । नित्य गुरुरूपा स्मरण । हें चि अंतरस्थितीचीं लक्षणें । जो गुरुरूपानपर ॥ ४२ ॥ जो जीवापासुनीं पाहीं । नेणे चि गुरुवांचुनी कांहीं । अखंड गुरुबोध मनाहीं । वाहे अभ्यंतर ॥ ४३ ॥

सकळ प्राप्तींची घरें । आतुडला विश्रांतिद्वारें । गुरुपदसेवना आदरें । अनुसरला जो ॥ ४४ ॥ प्रचीतीचे निजअभ्यंतर । गुरुपद सेवनें साचार । निवळती निजयोग अपार । गुरुउपासकांसी ॥ ४५ ॥ ऐसिया गुरुभक्तांचा किंकर । मी ह्मणवीतसें निरंतर । गुरुपदसेवनें निर्धार । मज आकळला ॥ ४६ ॥ स्वसुखाचें निज जीवन । अविनाश गुरुपदसेवन । तुज निरोपिलें समाधान । अभ्यंतरींचें ॥ ४७ ॥ अगा ये भवजित अवधान परा । अर्चन भक्तांच्या जिव्हारा । तूं आचरतोसी निरंतरा । ज्या आराध्यासी ॥ ४८ ॥ ते मी स्वयंम तुझें दैवत । अर्चिसी मातें सप्रचीत । तुझ्या निजकरें आलंकृत । जालों ते अवधारीं ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेश । अखंड-मंडळ महा तेजस । गुरुपदसेवन विशेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ५० ॥ अष्टम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥



श्री

## सूर्य ८ कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामस्वयें भानु भवभानु । विज्ञान घन स्वसुखतनु । गुरुकृपादों अलंकृत वानूं । न शके परावचनें ॥ १ ॥ अपरोक्ष ज्ञानाचे नयन । निजांग तनु लावण्यघन । पाहों न शकती सनातन । उपरामलें सुखें ॥ २ ॥ दर्शन त्रिपुटीसी ठाव नसे । या अंतरदृष्टीच्या पैसें । सद्गुरु-कृपेच्या प्रकाशें । पाहिलें स्यां मज ॥ ३ ॥ आधीं शृंगारलों श्रवणें । काय वानूं तें श्रवणभूषण । जे ज्ञानरवीसी प्रभेनें । नित्य प्रकाशिती ॥ ४ ॥ नित्य मुक्तांचे तेज कल्लोळ । ज्ञान मणिमय कुंडलें सुढाळ । जडित नित्यमुक्तें सोज्वळ । अपूर्व लेणें तें ॥ ५ ॥ मुक्तासी सुवर्णें वेष्टलें । कीं सुवर्णी मुक्त जडलें । मुक्त सुवर्ण घनवटलें । चिद्रत्नांक भूषण ॥ ६ ॥ एकेक भूषणाची ऐसीपरी । ऐसीं अपार भूषणें शरीरीं । सर्वांग भूषणें साजिरीं । शोभवी स्वयंम गुरुकृपा ॥ ७ ॥ सद्गुरुकृपा निजकरें । शृंघार गाभा मी

अलंकारें । त्या सौंदर्याच्या निर्धारें । जडल्या मद्रूपीं योगदृष्टी ॥ ८ ॥ हृदयीं सच्चिदानंद गाभा । गुरुपद प्राप्ति पदक शोभा । शोभवीं स्वयंभाची शोभा । नित्य मी त्या वर्चसें ॥ ९ ॥ सायोज्यप्राप्ती बाहुभूषणें । विज्ञान पर करकंकणें । समाधि अंतस्थ प्रमेनें । मुद्रिका मिरवीं ॥ १० ॥ नित्य मुक्तांचें मनोहर । विज्ञान घनमर्णामयहार । बोध कौस्तुभासमान अपार । रुळवीं गळां ॥ ११ ॥ स्वरूप सुखावृत स्वतंत्र । नित्य प्रकाशाचें कटिसूत्र । विचित्रानुभवी सुचित्र । मिरवी कटि प्रदेशीं ॥ १२ ॥ निज ज्ञानालंकृत अंबर । स्वयंम हेम प्रभाकर । अखंड कास कसुनी सुंदर । च्यर्यी दावी ॥ १३ ॥ दुर्मंत्र भवभेदहर । निजबोध गजरें दुर्धर। अखंडांत पदीं तोडर । सुखें मिरवी ॥१४॥ माया कल्मषं हरणें । निजप्राप्तीचीं अलंकरणें । उद्बोधपर पदभूषण । ल्यालों अमनस्क मीं ॥ १५ ॥ अद्वैत पदप्राप्ति भूषणें । सद्गुरुकृपेचें लेणें । अलंकृत करुनि मजकारणें । दिल्हीं संरक्षणदशा ॥१६॥ भव विकल्प हरण तेज । धनुर्बाण बोध सबीज । सत्ता मंत्रदीक्षा सहज । दिधली मजला ॥ १७ ॥ हें नित्य गुरुकृपेचें लेणें । तूं लेवविशी मजकारणें । होसी निजविश्वासी तेणें । शृंगारूं जाणसी ॥ १८ ॥ विज्ञानभूषित कराया । परम चतुर होसी सखया । या अंतर्लेणियानें सुखकाया । नित्य शृंगारिसी ॥ १९ ॥ सद्गुरुकृपेची अंतर्लेणीं । देसी वेसीं अनुदिनीं । हृदय निर्धासी रक्षुनी । लेवविसी मजला ॥ २० ॥ तुझ्या हृदयींचा हा निक्षेप । माझें शृंगारिसी स्वरूप । अर्चनभक्तीनें समीप । उपचारिसी मज ॥ २१ ॥ तूं चि होउनियां ज्ञानभूषणें । अलंकारिसी नित्यानुवर्तनें । हे तुझी प्रचीत साक्षात्कारानें । मज अर्पितसे तव हृदय ॥ २२ ॥ नित्य साक्षात्काराच्या पोटीं । भक्तिरहस्य सुखकोटी । अर्चनाची हे परिपाटी । अवधारीं बरा ॥ २३ ॥ तूं प्रत्यक्ष अलंकारिसी प्रीतीनें । तेणें सुखावोन तृप्तीनें । तोषयुक्त माझीं वचनें । श्रवणीं घाली तुझ्या ॥२४॥ मी अनुभविजे निम्य भूषणें । तुज अलंकारितसें तेणें । तव जनकरायानीं सन्मानें । मज प्रतिष्ठा तुवां दिधली ॥ २५ ॥ निज जनकराचें अलंकरण । विमव वसन भूषण । नित्य संपदा अक्षय धन । सपुत्र अनुभवी ॥२६॥

तैसें चि सद्गुरूचें महा वैभव । सान्निध्य अनुभवी सदैव । इतरांसी अधिकार स्वभाव । विशेषें असे ॥ २७ ॥ अगा मम अनुसंधान अर्चका । तुज वांचुनी कोण आहे ममात्मिका । निजसखा चि होसी तूं निका । जिवलग निजांचा ॥ २८ ॥ माझा आस तूं अंतर्निष्ट । त्यास्तव अंतरींचें उत्कट । सुख तुजपासीं वाटे स्पष्ट । बोलावें कपींद्रा ॥ २९ ॥ हे स्वरूपालंकरणभक्ती । सायोज्यावरील निष्टायुक्ती । स्वानंद तृप्तीनें संतृप्ती । विशेष तारतम्ये ॥ ३० ॥ हे गुरुभजनाची आवडी । विज्ञानालंकरण परवडी । तुजपासीं जीवांतील गोडी । प्रगट केली सुखें ॥ ३१ ॥ अद्वैतानुभव ज्ञानें । अर्चनभक्ती अवधानें । वंदन भक्तीसी या चि प्रीतीनें । अनुसरें आतां ॥ ३२ ॥ इति श्री भीमोपदेश । गुरुकृपा अंतर्लेणें रूपस । अर्चनभक्ती स्वप्रकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ३३ ॥ अष्टम सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ८ कळा ९

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्रीराम मज मी अभिवंदी । हे उपपत्ती जाणिजे स्वछंदीं । भक्तीचें रहस्य संवादी । प्रगटेल आतां ॥१॥ स्वयें करूनि आत्मप्रतिष्ठा । स्वये चि धरूनि अंतरनिष्ठा । स्वयें चि अर्जउन वरिष्ठा । आप आपणासी ॥ २ ॥ आपुली प्रसन्नता आपण । व्हावयासी करावें आपुलें ध्यान । तेणें अनुसंधानें पावन । होइजे सहजें ॥ ३ ॥ पहावें आपआपणा वेगळें । संतप्रतिष्ठे चि राउळें । तेणें चि प्रीतीनें आगळें । देखिजे आपणा ॥ ४ ॥ विश्वद्रष्टा विश्वातीत । त्या विश्वांतील नामांकित । आत्मानुभवी साधुसंत । महा प्रतिष्ठेचे ॥ ५ ॥ त्याची योग्यता जेणें जाणीतली । त्याची अर्चना ज्यासी घडली । त्याची प्रचीत जेणें घेतली । नित्याभिवंदनें ॥ ६ ॥ सद्गुरुकृपेसी सत्पात्र । होउनी अनुभवी सुख परत्र । विश्वगुरुरूप देखे पवित्र ।

जाण हृदय तयाचें ॥७॥ त्या विश्वरूपा आंतौतें । निजदेह जात सकळ । नांवरूप होय अखिळ । त्या विश्वेशाचें ॥८॥ घेतां विश्वरूपदर्शन । द्रष्टा उरला जरी कां भिन्न । तरी तें दर्शनें चि नव्हे सुजाण । कपी अंतर्निष्ठा ॥ ९ ॥ आपणा सगट सर्वत्र । देखावें आत्मदृष्टीनें परत्र । हे पवित्र ज्ञानदृष्टी स्वतंत्र । सर्वां निराळी ॥ १० ॥ त्या दृष्टीचा तूं डोळस । निज विचारीं उमजलांस । द्रष्टेपणें आपणास । देखसी सर्वदां ॥ ११ ॥ या स्वरूपपर दृष्टीनें । होत कवणे ही अकृर्तानें । जाण तयाचे कृतार्थतेनें । उद्धरलें जग ॥ १२ ॥ साक्षीचा साक्षी होऊन । निवळ जालें आत्मज्ञान । त्याचें तयासी अभिवंदन । जालें सप्रचीतीनें ॥ १३ ॥ नमस्कारासी नुरे चि भिन्न । हे वंदन भक्तीचें अनुसंधान । जाण तयासी च अभिवंदन । घडली भक्ती ॥ १४ ॥ आत्मानुभवीक आचरण । निजनमन अनुसरण । आत्मनिष्ठा सनातन । वंदिती आपणा ॥ १५ ॥ जाण आपणा वांचुनी जनीं । पाहतां नाहीं वियमानी । विश्वरूप अंतःकरणीं । आपुले पणें चि जागें ॥ १६ ॥ वागे विश्वरूपीं आपण । सांगे विश्वंभर ज्ञान । लागे आपणासी अनुसंधान । तेव्हां निवळे ॥ १७ ॥ मागें सद्गुरुपासीं गुज । जागे तेव्हां स्वरूपीं निज । ऐसें हें सज्जनापासीं गुज । निरंतर वसे ॥ १८ ॥ आत्माभिवंदन युक्ती । एवं प्रकारें षष्टम भक्ती । तुजपासीं निरोपिली नित्यमुक्ती । अंतर्कळ्य हे ॥ १९ ॥ अणुपासूनी ब्रह्मादिवरी । कोण्ही तरी हो देहधारी । या चि रीतीनें नमस्कारी । सर्वत्रासि तूं ॥ २० ॥ अमृत सिंधूचे कण । गगनसिंधूत संपूर्ण । मथुन काढिलें सुखैक घन । नित्य नवनीत ॥ २१ ॥ तैसें विश्वाकारें सहज । प्रबोध मुसेसी सतेज । मुसावलें सुखद्विभुज । चतुर्भुजेसीं ॥२२॥ दशभुज सहस्रभुज । विश्वरूप अनंतभुज । त्या अनंतचरणासी सहज । नित्याभिवंदी तू ॥ २३ ॥ जैं ऐसें वंदन घडे । तैं वारे अज्ञान सांकडें । विज्ञानरूप चहूंकडे । होय अभिनंदनें ॥ २४ ॥ या नमनभक्ति उमजें । आत्मरूपें केलें बीजें । त्याचें निवारलें सहजें । प्रकृतिबंदन ॥ २५ ॥ आत्मनमन निजविधी । वंदन भक्तीची सिद्धि । सदोदित निरोपाधी ।

द्रष्टेपणें निराळा ॥ २६ ॥ जो आपणावेगळेपणें पाहे । तो प्रवृत्ति वेगळा होय । विश्ववंदी याचे पाय । तेही न स्मरे तो ॥ २७ ॥ हे नित्याभिवंदन । होय भवभयभेदकंदन । ऐसें कृपेनें रघुनंदन । सांगतसे कपींद्रा ॥ २८ ॥ नित्यानंद संवर्धनीं । हे अभिवंदन भक्ती मानी । आतां येणें चि अनुसंधानीं । दास्यभक्ती तूं अवधारी ॥ २९ ॥ दास्य सिद्धीचें साधन । सर्वदा करिसी तूं सावधान । दास्यभक्तीचें अधिष्ठान । तूं चि प्रसिद्धीनें ॥ ३० ॥ इति श्री भीमोपदेश । निरसलें कायेचें कल्मष । हे चंदनभक्ती अकल्मष । ह्मणे मेरु अनंत ॥ ३१ ॥ अष्टम सूर्य नवम कळा संपूर्ण ॥ ॥ ९ ॥ श्रीगोविंद ॥



श्री

## सूर्य ८ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामीं सत्‌चित्सुखें । सेवी आपणासी हरिखें । पावन होय सद्गुरुमुखें । क्रमान्वयें करूनि ॥ १ ॥ मी निरपेक्ष वस्तुता । माझी अपाती स्वभावता । मी निरोपाधी तत्वता । सापेक्ष या चि अर्थे ॥ २ ॥ स्वरूप प्रभावें निर्गुण । सप्रचीत साक्षेपें सगुण । या चि प्रचीतीचें अनुसंधान । प्राकृतांसी न कळे ॥ ३ ॥ सगुण निर्गुण स्वभावता । दिसोनी आली आश्चर्यता । हे अज्ञान कल्पनेची सत्ता । पाहतां उमस नसे ॥ ४ ॥ निजवृत्तीते सत्‌चित्सुखरूप । हा स्वभावसिद्ध संकल्प । स्वभाव ह्मणिजे आपेआप । भेदें संभवावें ॥ ५ ॥ भेदीं अभेद तत्वज्ञान । अभेदीं भेद नित्य नूतन । हे स्वभावता पुरातन । जाण मायेची ॥ ६ ॥ माया ह्मणिजे कांहीं च नाहीं । मायेचें हें जातिनाम पाही । स्वरूपीं पाहतां अणु ही । माया संकल्प नसे ॥ ७ ॥ आतां हे पाहतां अभिनवता । द्रष्टव्यीं वृत्ति च रूढवी सत्ता । द्रष्टुत्वाची अस्तित्वता । तत्वता निर्गुण ॥ ८ ॥ सद्‌वृत्तिरूप मूळ माया । अस्तित्वें न भासे कांहीं काया ।

आपणासी आपण सुखें धावें । आपुलें आपण सुखें चि घ्यावें । कोण्हासी कोण्हीं धावें ना घ्यावें । हे दास्यभजनहृदय ॥ ४६ ॥ या दास्यें करूनि संपूर्ण । कृतार्थ जाले महा सज्जन । सिद्ध योगी मुनिगण । अनंत अनुभवी ॥ ४७ ॥ तो तूं अनंत स्वरूपी । पुरता प्रचीतीनें कपी । संकल्पविहीन साक्षपी । दास्यें रूढलासी ॥ ४८ ॥ दास्य भजनाचें जिव्हार । तूं चि होसी सत्‌चित्सुखाकार । तुजप्रति सांगणें विचार । तुझा तुज चि घडला ॥ ४९ ॥ तुज मज कायसा भेद । तूं निजानुभव सुखकंद । या प्रचीतीचा संवाद । दास्य भजनविधी ॥ ५० ॥ ऐसें दास्य जया घडलें । त्याचें स्वरूपीं चित्त जडलें । त्याचे नि भवभान विघडलें । दास्यभक्तीमहिमा ॥ ५१ ॥ या अनुभवें दास्यभक्ती स्वयें । मीं दासानुदास प्रत्ययें । विश्व गुरुरूपासी निश्चयें । सेवितसे सुखें ॥ ५२ ॥ गुरुदास्य विधि विधान । अक्षय सुखाचें अवधान । देउनियां सावधान । निजसख्य अवधारीं ॥ ५३ ॥ आपुला आपण सेव्यसंतोषें । दास्यभक्तीचा उल्हास । सख्यासी येउनी सावकाश । सख्य करी आपुलें ॥ ५४ ॥ इति श्री भीमोपदेश । स्वानंदाचा सेव्य सहवास । दास्यभक्तीचा ह्या विलास । ह्मणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ अष्टम सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥

---

श्री

## सूर्य ८ कळा ११

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसख्यत्व निर्धारें । तत्व आत्मत्व देउनी पुरें । अवंचकता नित्यावसरें । तत्पर स्वरूपीं ॥ १ ॥ अष्टभावेंसीं सप्रेम । गार्ळ्याव सुखाचें अंतर्याम । सद्वृत्तीसी व्यापकता धर्म । व्योम अनुसरलें ॥ २ ॥ अनन्य प्रचीतीची आवडी । पाहिजे तिनुक्या परवडी । विविध पदार्थेंसी गोडी । ताटें विस्तारलीं ॥ ३ ॥ तऱ्हीं सख्यत्वाचा जिव्हाळा । तोपेना स्वामींची अंतर्कळा । कां जे उदासीनता व्वळा । निःसंगपणाची ॥ ४ ॥ सप्रचीत

सद्भावें । नावडे उमसलें पण वरवें । अतिदुरळपण स्वभावें । कांहीं च न साहे ॥ ५ ॥ उगउनी तत्वांची माळा¹। काढिला गुणाचा गुंडाळा । जीव करूनियां मोकळा । अर्पितां सख्य न वटे ॥ ६ ॥ साक्षेप नावडे म्हणउनी । उगेंचि राहतां मनीं । तेहीं सख्यत्वालागुनीं । उपयोगा नये ॥ ७ ॥ यापरी परिशोध चित्तें । पाहतां कवण्या गुणें सख्य तें । जीवीं न सुचेचि मग स्वामीतें । विचारिलें सख्यत्व ॥ ८ ॥ सद्गदीत मानसें सप्रेम । अरुपमतीनें अंतर्याम । बोळखोन समर्थें सुवर्म । निजसख्य सांगितलें ॥ ९ ॥ बोळखोनियां आपणासी । जरी सख्यत्वासी तूं येसी । तरी च हें सख्यत्व पावसी । स्वरूपदर्शनें ॥ १० ॥ परोक्षमतीनें कोठवरी । पुरवसील सख्या वारीं । संत सद्रुप विचारीं । तैसे चि सख्य करावें ॥ ११ ॥ सद्गुरु सख्यें चमत्कारला । सत्शिष्य सुवर्म लाधला । स्वरूप बोळखोनें केला । सख्य भक्तीसी अधिकारी ॥ १२ ॥ केलेपणें कांहीं च न मनें । न मने ते हीं उगे चि असणें । त्यास्तव सहज स्थितीनें । आपुलें सख्य आपणा ॥ १३ ॥ विचारिलें निजमानसीं । मीपणें पाउनि क्षोभासी । शत्रु होउनी आपणासी । आपणें चि नाडिलें ॥ १४ ॥ म्हणउनी मीपणें उपशमें । ऐसें आपुलें सख्य अनुक्रमें । स्वरूप अनुभव वर्मे । अभेद सख्य प्रगटे ॥ १५ ॥ सर्वोत्तम सद्गुरु रूप । सर्वात्मा गुरु विश्वरूप । संत साधु सिद्ध स्वरूप । बहुधा रूपें ॥ १६ ॥ वेद सद्गुरुचा मुखोद्गत । बोध सद्गुरु शास्त्र कथित । वेध सद्गुरुपुराण युक्त । इतिहासें वर्तला ॥ १७ ॥ अनंत साधु ग्रंथोक्ती । अनंत उपासना महा भक्ती । अनंत ग्रंथांतरें मुक्ती । अनंतार्थ दशा ॥ १८ ॥ इतुकें वाक्य विस्तारले पण । इतुकें अर्थज्ञान दर्शन । इतुक्या संभाषणी हर्षोन । सख्यत्वासी यावें ॥ १९ ॥ त्रिकाळीं अकाळ स्थिती । अंतर्निष्ठा पुरती । तेणें सख्यत्वें आद्यंतीं । जो पुरवला ॥ २० ॥ होउन सर्वत्र श्रवण । ऐके ग्रंथोक्ती संपूर्ण । ग्रंथार्थरूप पारायण । करी सख्यत्व सुखें ॥ २१ ॥ नित्यानुवृत्तीनें सत्याचरण । हृदय ग्रंथांतरीं विवरण । स्वरूपानुभवें कारण । सख्यत्व करी ॥ २२ ॥ हरिहराचीं अधिष्ठानें । तीर्थें व्रतें तपें दानें । सत्क्रिया सन्मार्ग जीवीं

घरणें । सत्य जाणिजे परम ॥ २३ ॥ सर्वभूतीं भगवंत । जाणोनी भजे सप्रचीत । तें परमसत्य सुनिश्चित । जाणिजे सहजें ॥ २४ ॥ .परम सुशीळ भगवद्भक्त । भजनें तोषवी यथोक्त । गुरु भक्तीनें नित्यमुक्त । निववी गुरु भक्तांसी ॥ २५ ॥ गुरुचे अंतर्भाव जे जे । गुरु प्रीतीचे ठेवे सहजें । गुरु उपासक निज वोजे । भजावे गुरुरूप ॥ २६ ॥ गुरु संतति सविस्तरें । मानुनी गुरुरूप सुखभरें । अर्चावें निज अभ्यंतरें । अनन्य भावार्थे ॥ २७ ॥ सद्गुरु समंधीक सोयरे । मानुनी गुरुरूप निर्धारें । त्यांसी भजे अत्यादरें । हें गुरुसत्य उत्तम ॥ २८ ॥ गुरुचें हृदय होउनी । राहे अपरोक्ष समाधानी । तो या सत्यभजनी । सरता जाला ॥ २९ ॥ गुरु अंतरींचें सत्य पूर्ण । करुं जाणती ते शिष्य सज्ञान । अंतर्निष्ठेनें प्रवीण । त्यासीच म्हणावें ॥ ३० ॥ सद्भावें सर्वार्थे सदैव । सत्यें पुरवला स्वयमेव । तो चि सत्शिष्याचा राव । देवांचा मुगुटमणी ॥ ३१ ॥ देवाधिदेव गुरुराजा । जेणें अपुला केला वोजा । त्याचे प्राप्तीस्तव मोक्षध्वजा । उभऊन भजती देव ॥ ३२ ॥ गुरुचें महा सत्य ज्यासी । सिद्ध मैत्री करूं येती त्यासी । ऋषि रहस्य पुसावयासी । धाव घालुनी येती ॥ ३३ ॥ लोटती स्वबोध सेना संभार । रक्षिती गुरु भक्तांचें द्वार । कां जे गुरुसत्यें स्वराज्यधर । केले सिद्ध साधका ॥ ३४ ॥ हे स्वरूप सिद्ध सत्यप्रसिद्धि । सेऊं आल्या महा समाधी । नित्यानंद निज योग रिद्धि । समृद्धि वोळल्या ॥ ३५ ॥ स्वानंदाचे योग प्रबळ । त्या उपचारिती सर्व काळ । साक्षात्काराचें मंडळ । वसवी निजसत्यें ॥ ३६ ॥ निजसत्यें उपचारी साक्षात्कार । साक्षात्काराचें निज सत्य अपार । ऐसें हें निजसत्य साचार । अनुभवीं हनुमंता ॥ ३७ ॥ माझें प्रचीतीचें सांगणें । तुझें प्रत्ययाचें ऐकणें । त्या चि अनुभव दृष्टीनें । आत्मनिवेदन अवलोकी ॥ ३८ ॥ इति श्री भीमोपदेश । हें निजसत्य अविनाश । सत्यभक्तीचा निवास । म्हणे मेरु अनंत ॥ ३९ ॥ अष्टम सूर्य येकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥

श्री

# सूर्य ८ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी मज निरंतर । निवेदन करी अभ्यंतर । माझा उमस विश्वाकार । वर्धउनी सुखें ॥ १ ॥ स्वानंदजळें उपचारी । विश्वाकार तरुवरी । मुळेंवीण विस्तारीं । निजमूळ शाखा ॥ २ ॥ नित्यानंद अमृतकरें । विश्वांकुरावरी पाझरे । स्वानंदैक रस जळकरें । सिंचन करी सर्वदां ॥ ३ ॥ प्रबोध सूर्याच्या किरणीं । अनुताप आणि वृत्ती धरणी । तत्वानुभाव्य अंतःकरणीं । सर्व करणें संतृप्त ॥ ४ ॥ स्वानंदाचा नित्य स्वसुकाळ । अद्वैतात्म निवेदन वेळ । ते गुरु सन्निधी सर्वकाळ । लाभे गुरुभक्तांसी ॥ ५ ॥ नवविधाभक्तीचें अभ्यंतर । निवेदन भक्ती मनोहर । निवेदन भक्तीनें परिवार । सकळ पावले ॥ ६ ॥ निवेदन भक्तिसुखें अप्रांत । न कळे अनुभवास हीं प्रांत । निजानंद विभवें अनंत । दशा गहन ॥ ७ ॥ सद्गुरुची स्वरूपता । सायोज्याची स्वयंम सत्ता । निवेदनी भक्ती हे तत्वता । परम पावन ॥ ८ ॥ नवविधा भक्ति हृदय । ते हे निवेदन भक्ती अद्वय । सद्गुरु अनंत सदय । प्रसन्न जाला येणें ॥ ९ ॥ हे निवेदनी भक्ती अभिनव । नव नव सुखें दे स्वानुभव । सद्भावें वोळली सदैव । भक्ती कामधेनु ॥ १० ॥ सद्भाव सत्क्रिया जात । सद्भक्ती सुरभीनें सप्रचीत । सेउनी सर्वदां दुमत । स्वानंदक्षीरें ॥ ११ ॥ इयेचें स्वसुखक्षीर मधुर । नित्यामृत गोडीनें अपार । सेविती स्वानुभवी साचार । अमर कोटी ॥ १२ ॥ गुरु स्वानंदघन सुरभी । वोळला अखंड रसें नभीं । अनस्यूत क्षीरधारा स्वयंभीं । सेविल्या ज्यांनीं ॥ १३ ॥ ते गुरुवर कृपा पाडसें । चौताळती स्वानंदरसें । कल्लोळ सुखाच्या सौरसें । रूपसें क्रीडती ॥ १४ ॥ मराळ ते चि मनोहरा कृती । नित्यानुभव क्षीर प्राशिती । त्या स्वानंदक्षीराची परिपूर्ति । उपेग अवधारीं ॥ १५ ॥ नित्य निवेदन निरोपणें । संशांत क्षीर दोहन । हृदय पात्रीं समृद्धीनें । सुखें सांठविजे ॥ १६ ॥ स्वसुखावरील उपक्रम । निवेदन भक्ति निरोपम । मी अनाहृत होऊन सप्रेम ।

सेवीं या परवडी ॥ १७ ॥ नित्योपजीविका उपपत्ति । चौं साक्षत्वीं यथारीतीं । सांठउनी क्षीर सर्वार्थी । सेवीतसे सुखें ॥ १८ ॥ केवळ सद्गुरु सन्निधान । रहस्याच्या गोष्टी सुखेंकथन । नित्य धारोष्ण क्षीरपान । करीतसे सप्रचीत ॥ १९ ॥ कृतार्थ व्हावया सृष्टी । घाली अनुताप परिपाठीं । निर्वाण ज्ञान हव्यवाटीं । क्षीर चिरंतन तापे ॥ २० ॥ क्षीरतांवी विरजी गुसळीं । माझी चित्शक्ति वेल्हाळी । परम सुंदर तेजागळी । अनुभव सीता ॥ २१ ॥ विक्षेपाचें घाली विर्जण । तेणें परिणाम होय संपूर्ण । हृदयदधी स्वानंदघन । भरणी भरलीं ॥ २२ ॥ प्रचीतीच्या माजघरीं । अवधान स्वरूपांवरीं । हृदय विस्तीर्ण निरंतरीं । डेरा भरिला ॥२३॥ सद्गुरुमुखींचा निजबोध । विवेक मथनी प्रसिद्ध । त्या निजयोग दृढावें सिद्ध । मंथन आरंभिलें ॥ २४ ॥ ज्ञानरवींचा स्वमुख माचव्या । अबोध-दधीमाजि रिघाला । गुरु कृपा करें चेतला । विज्ञान सूत्रें ॥ २५ ॥ नित्य प्रचीतीच्या करीं । विवेक यत्न उभयपरीं । करें सूत्र वोढुनी निर्धारीं । मंथन होतसे ॥ २६ ॥ नित्यानुवृत्तीनें आवडी । धरूनि गुरुकृपेची चारडी । स्थिरता योगें तांतडी । फिरतसे रवी ॥ २७ ॥ वरिवरी सुखाचे उमस । चमत्काराचे येती फेस । घुमरला तोष । अवकाश रुधोला तेणें ॥ २८ ॥ केवळ प्रीतिरसाचा वेढा । गोडीस आला तो मरडा । सेविता रवि तळील तो रस गाढा । अवदा जाय जन्माचा ॥ २९ ॥ नित्य प्रातींची पुष्टी चढे । नित्य उन्मनी निद्रा रूढे । कां जे नवनीत सुखनिवाडें । समिश्रित असतां ॥ ३० ॥ त्या अखंडैकरस सुधेसी । कडसितां योग विशेषीं । अनुभवाचे कर निश्चयेंसीं । शीणतां तेथें ॥३१॥ युक्तिविशेष कर क्रियाजात । टव्हळुनी पात्रपुरा अमित । अभिनव कर क्रियेनें नवनीत । सार निवडे ॥३२॥ स्वानंद कणसाळक्षण । बुद्बुदाकृती सुसावळे सान । मेदवळें स्वमुख भरण । साक्षात्कारेंसी ॥ ३३ ॥ प्रचीत आळियां वरिवरी । प्रचीतीचा याथा पुन्हां करी । मनन निजभ्यासें चमत्कारीं । एकु वटीत तया ॥ ३४ ॥ स्वजातीय सुख नवनीत । अनुभवाचा सदोदीत । घनवट गोळ्य करूनि संत । ठरवी निजातीसी ॥ ३५ ॥ तैसें साक्षत्वा-

तुनी ज्ञान काढिलें। कां जे गुरुकृपाकरें निवडलें। जन्हीं साक्षत्वींच तें वसलें। तन्हीं तयासी तें न लिंपे ॥ ३६ ॥ अबोधदधी सार मथित। असतां वृती तक्रा आंत। बुडेना लामाजि अद्भुत। दावी तारक स्थिती ॥३७॥ तें नवनीत परापात्रीं। सांठउनी अवधान पवित्रीं। निर्वाण अग्नी सर्वत्रीं। कढविलें बरें ॥ ३८ ॥ निर्दोष स्वानंद अभ्रांत। मधुर सुवासिक घृत। तें सद्गुरुरायासी उचित। समर्पिलें विधीनें ॥ ३९ ॥ दधी क्षीर घृत शर्करा। मधुसहीत गुरु शंकरा। प्रचीती पंच्यामृतें त्वरा। अभिषेचिलें ॥ ४० ॥ लाविला विज्ञान दीप तयाचा। हा निवेदन भाव भक्तीचा। संतोष निजात्मशक्तीचा। निवेदन होतसे ॥ ४१ ॥ स्वानुभव स्वसुख बोदन। विज्ञान परवडी सदन। नित्य चिच्छक्ती निवेदन। होतसे मजला ॥ ४२ ॥ हें अभिनव भक्तिचें दुभतें। संपूर्ण लाभलें कपी तुतें। भक्ति रहस्य अष्टम सूर्यातें। आणिलें संपूर्णतेसी ॥ ४३ ॥ पुढें नवम सूर्य निरोपण। अवधारीं तूं सज्ञान। अक्षरार्थ सुखैकघन। सांठवी श्रवणी ॥ ४४ ॥ इति श्री भीमोपदेश। निवेदन भक्तीचा घ्यास। निजबोध रविवंशईश। म्हणे मेरु अनंत ॥ ४५ ॥ द्वादश कळेनें अष्टम सूर्य संपूर्ण ॥ कळा ॥ १२ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

---

श्री

## सूर्य ९ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसद्गुरु माहेरा। स्वसुखात्मक निज अभ्यंतरा। परात्पर आत्मबोधपरा। नमन तुतें ॥ १ ॥ जय जय विश्वकारुण्यउदरा। जय जय विश्वआस्तित्वनिरंतरा। जय जय विश्वभरणभरा। सुखदातारा नमस्ते ॥ २ ॥ जय जय निजमंगळ कृतकार्या। जय जय भवनिर्जित घ्यर्या। जय जय विश्वोद्भव तुर्या। भार्या प्रतिष्ठित तूं ॥ ३ ॥ स्फूर्ति फमउद्भवकारणा। कीर्ति विश्वभरतेजकारणा। निजबोध अवतरणकिरणा।

विज्ञानविंबा ॥ ४ ॥ आद्यंतसृष्टीचा प्रकाशक । विज्ञानप्रकाश निजात्मक । नित्योदयबोध निष्कलंक । वंश आस्तिक्य भरणा ॥ ५ ॥ जय जय मोक्षरमालालनलीला । अज्ञानतमहरचित्कळा । सघन सदोदय अंतराळा । दाविसी प्रबोधीत ॥ ६ ॥ आत्मस्फूर्तीचें सत्यावरण । स्वानंदमंडळा तुझेनि भरण । स्वानुभव विंब अवधारण । धुरीण वरिष्ठा ॥ ७ ॥ तुझियेनि कृपेच्या उजियेडें । सदोदीत चहूंकडे । स्वानंदचंद्र विंब चोखडें । नित्योदय करी ॥ ८ ॥ अभिनव दैवी संपदाबोध । निजप्राप्ती सत्तेसीं स्वतःसिद्ध । लाभे तव आश्रिकांसीं प्रसिद्ध । प्राप्ती सर्वस्वें ॥ ९ ॥ अपरोक्ष निज आत्मता । भेद रहित प्राप्ती तत्वता । अभिन्न उपदेश क्रम आतां । वियमानीं होतसे ॥ १० ॥ ते निजसत्तेनें स्वभाविक । त्रिभुवन वर्ततसे सकौतुक । अघटित घटना सकौतुक । प्रतिष्ठा विस्तारें ॥ ११ ॥ मनें कल्पवेना ऐसी । वसवीतसे सृष्टीसी । एवढी धरा अवकाशीं । राहिली सुनिश्चळ ॥ १२ ॥ तर्के तर्कवेना कार्य । सृष्टीं होतसे आश्चर्य । उत्पत्ति स्थिती सत्तेनें सूर्य । उदय करीतसे ॥ १३ ॥ ज्ञान अभ्यंतर आत्मारामा । सकळाभिष्ट पूर्णकामा । स्वसुखें प्रतिपाळिसी श्रीरामा । नमो आदि पुरुषा ॥ १४ ॥ ब्रह्मादि सुरवर कोटी । दैत्य मानव अपार सृष्टी । संभवोन तुझ्या पोटीं । सविस्तर नांदती ॥ १५ ॥ जितुकें काहीं रूपासी आलें । तितुकें तुजपासूनि जालें । तव प्रभेनें प्रकाशिलें । आत्मविंबसूर्या ॥ १६ ॥ सकळ सृष्टीची पालन सत्ता । परिपाळिसी तूं श्रीअनंता । निजांग निर्भव तत्वता । निर्मळ निश्चळ ॥ १७ ॥ तुझें आस्तिक्य निजस्वरूप । पाहतां गेले किती कल्प । सरले श्रुतीचें संकल्प । प्राप्ति निश्चयेसी ॥ १८ ॥ अभंग स्वरूप सदोदीता । आदि विभु श्रीअनंता । हृदयीं वसोनियां आतां । दे अक्षोभ सुख ॥ १९ ॥ अनाथबंधु दीनोद्धरणा । करुणासिंधु अमृतकिरणा । तव प्रबोधवी अंतःकरणा । तत्त्वबोध प्रभवा ॥ २० ॥ तुझिये कृपेची आस्तिक्यता । प्रतिष्टीत शिवविष्णुधाता । देवाधिदेवा सद्गुरु श्रीअनंता । वर्णवेना तुतें ॥ २१ ॥ प्रत्यक्ष माझे चि हृदयीं । व्यापकतेनें वससी सर्वां ठाईं । निवास तुझा आस्तिक्य पाहीं । परि तूं अकळ ॥ २२ ॥

सरली साक्षत्वाची शींव । लक्षितां लक्षितां विराला प्रणव । निःशब्द या चि अर्थ निर्भव । निःप्रपंच निर्गुणा ॥ २३ ॥ तुझें स्वरूप अप्राकृत । न चले उल्लेख तर्कजात । अतर्क्य स्वरूपें अनंत । श्रुति संकेतें म्हणिजे ॥२४॥ सिद्ध प्रचीतीनें सिद्धांत । आटले तुझे स्वरूपीं वेदांत । निज आस्तिक्य प्रचीती धादांत । अनंत स्वरूपा ॥ २५ ॥ स्वरूप विलोकिलें नव जाय । तेथें केवि आचिलें जाय । आतां पुढती पुढती होय । अनिर्वाच्य चि देवा ॥ २६ ॥ दर्शनाचा चि दुष्काळ जेथें । केवि चंदना पवाड तेथें । ऐसा अनंत तूं समर्थ । निज आस्तिक्यतेनें ॥ २७ ॥ शुद्ध बुद्धपणें सर्व ही । दुजेपणासी ठाव नाहीं । तेथें कवणासी ही कांहीं । लाभो चि नेदिसी ॥ २८ ॥ ऐसा तुझा स्वभाव निःसंग । मजवरी कृपा करूनि सांग । केलें शुद्ध बुद्ध अंतरंग । देउनी तुवां आपुला ॥ २९ ॥ आतां मनेवीण तुझी पूजा । कीजे मज आवडी ऐसी मोक्षध्वजा । तरी प्रचीतीनें गुरुराजा । अंगिकारिजे तुवां ॥ ३० ॥ पंचतत्वातीत सुवेद्य । गंध पुष्प धूप दीप नैवेद्य । आत्मानुभवें मी सद्य । अर्चीन तुजला ॥ ३१ ॥ ते अनुभवाची प्रीति गाढी । उभवीन मोक्षाची विजय गुढी । ऐसी अभिनव माझी आवडी । पुरवी समर्था ॥ ३२ ॥ वृत्ति परिपाकाच्या परवडी । माजि स्वसुखामृताच्या गोडी । बोध अभ्यंतर कडोविकडी । उपचार पद्धती ॥ ३३ ॥ निज उन्मेश परिपक्वता । गळित सर्वेंसीं सहिष्णुता । शांति विनय विनयता । सदप मिळणी ॥ ३४ ॥ निजानंदाची मिळणी समृद्धि । साक्षी उपसाक्षी आत्मलब्धी । समाधि रिद्धि सिद्धि निरवधी । स्वसुख निलयें ॥ ३५ ॥ सर्वोपलब्धी शिखर । आत्मप्राप्तीचा योग दुर्धर । मनोरथ सिद्धीचा मंदार । योग तुझा फळला ॥ ३६ ॥ तो तुझा तुज विनियोगें । माझा संकल्प कारणीं लागे । आत्मनिवेदनावरील जागे । ऐसें अनुसंधान देईं ॥ ३७ ॥ आत्म प्रचीतीची सीमा । ते हे आत्म निवेदन महिमा । ते तुझिये कृपेनें आम्हा । प्रचीतीसी आली ॥ ३८ ॥ आत्म निवेदना उपरी । कांहीं उरली नाहीं उरी । आत्म स्फूर्तीचे सर्वोपरीं । निवेदन जालें ॥३९॥ आत्म निवेदनीं आकळलें । परतत्व अनुभवासी आलें । अनुभव सहीत

निवेदलें । आत्मतत्व तेथें ॥ ४० ॥ आतां आत्मतत्व ना परतत्व । सरलें निवेदनीं साक्षत्व । या प्रचीतीचें निज सत्व । निःशेष जालें ॥४१॥ हें आत्मनिवेदनाचें शिखर । अनुभवे वीण अनुभव थार । ते तुझें वस्तीचें मंदिर । श्रीमौनी अनंता ॥ ४२ ॥ वसतोसी जया मंदिरीं । तेंचि अगोचर सर्वांपरी ॥ आधीं गृह चि नसे त्या माझारीं । केविं देखिजे गृहस्था ॥ ४३ ॥ नित्य योगी मानस डोहळे । जे दर्शनाचे पुरावे सोहळे । शीणले ज्ञाना ध्यानाचे डोळे । परि लक्षासी न येसी ॥ ४४ ॥ ऐसा आत्मपरोक्ष दृष्टी । भाविती तुज सिद्धांच्या कोटी । योगी मुनि महंत सृष्टी । प्रवर्तल्यां साधनीं ॥ ४५ ॥ या परिपाटीं पडलें अपार । चुकले ते निज अभ्यंतर । त्या निजोपलब्धीचे साचार । प्रसन्न जालासी आम्हा ॥ ४६ ॥ ते प्रसन्नतेची महासिद्धी । आत्मबोध विधान विधी । वचना नंतरें प्रबोधी । वचनमाळा ॥ ४७ ॥ शब्द मालिका निजसूत्रें । सुशोभित केलें मज परत्रें । भीमोपदेश निज वग्त्रें । प्रसवलासि तूं ॥ ४८ ॥ श्रीराम सद्गुरु संबोधन । सीता उपदेश कर्ता सुख घन । भीम उपदेश घेता प्रतिष्ठून । इतुकें स्वरूपासी ॥४९॥ तें चि निरोपण पुढें । चालवीं प्रचीतीच्या निवाडें । श्रोता होउनी अर्थी पवाडे । श्रीसद्गुरु अनंता ॥ ५० ॥ इति श्री भीमोपदेश । बोध प्रचीतीचा चंडांश । पाहला हृदयीं स्वप्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ५१ ॥ नवम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥



श्री

## सूर्य ९ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम आदिपुरुष देवदेवा । निवेदनावरील तव सेवा । प्रचीति पद्धतीनें जीवा । उमजवी आतां ॥ १ ॥ निज अंतःकरणासी स्वयें । आत्मविवेक निज निश्चयें । उपसाक्षीनें निज प्रत्ययें । बोधवावें लागे

॥ २ ॥ युक्ती प्रयुक्ती दृष्टांतें । तैसें प्रबोधवी ते त मातें । त्यास्तव सद्भावें तुतें । माझें अभिवंदन ॥ ३ ॥ यावयासी कांहीं नाहीं मज । त्यास्तव पुढती पुढती सहज । नमन करावें लागे तुज । ते उपसाहें आतां ॥ ४ ॥ मनें घडतें अभिवंदन । काय अखंड दंडायमान । या चि नमनें निवेदन । जाहलें तुजला ॥ ५ ॥ हें बोलणेंही माझें नव्हे । शब्दें अभिवंदन व्हावें । आतां ययापरी च स्वभावें । नमस्ते आत्मसद्गुरु ॥ ६ ॥ आतां स्वरूपाची पूर्ण प्रचीती । तुझी आवडी तुजप्रती । बोलसील तितुक्या प्रचीती । सुखेंचि बोल आतां ॥ ७ ॥ वक्तेपणासी आणूनि मज । तूं चि बोलवितोसी सहज । तरी मी आतां बोले न तुज । आवडलें तैसें चि ॥ ८ ॥ देवा श्रीरामा ऐसे अनंत । वक्ते होती अनुभवी संत । श्रोते अनंत हनुमंत । जालियां धणी न पुरे ॥ ९ ॥ एक हनुमंताची महिमा । बळयुक्ती बुद्धीची सीमा । पाहतां विस्तीर्णतेनें व्योमा । आक्रमिलें जाय ॥ १० ॥ ऐसें अनंत हनुमंत । श्रीरामस्वरूपें अनंत । स्वरूप प्रचीतीनें सदोदीत । प्रसिद्धीसी आले ॥११॥ ऐसें तुझें अनंत दयाउदर । संभवले सिद्ध अपार । अनुभव प्रसिद्धीनें साचार । तुझिये उदरीं ॥१२॥ अनिर्वाच्य तुझी प्रशंसा । सद्गुरु जी आदि पुरुषा । अनंता अपारा अशेषा । अप्रांत परा ॥ १३ ॥ तुज अर्चावयासी माझें मन । नित्य प्रवर्तलें सुखैकघन । तरी आवडी पुरवीं अनुदिन । मम सुखात्मक माहेरा ॥ १४ ॥ साजिरा होउनी द्विभुज । सुश्याम तनु सतेज । वसें मम हृदयीं निजगुज । नित्य उपदेशीत ॥१५॥ सल्लक्षणीक जेंवि राजमुद्रा । तेंवि सुचर्य स्वानंदचंद्रा । अभिनव विग्रह कृपासमुद्रा । दावजी दृष्टीसी ॥ १६ ॥ ते स्वरूप पाहतां पाहतां । मन विसांवेल अनंता । डोळे निवतील तत्वतां । न्याहाळितां श्रीमुख ॥ १७ ॥ चीरीव कमळपत्रापरीं । नयनांबुजें साजिरें । विलोकितां विलोकितां अंतरीं । नित्य सुखाब्धी उल्थे ॥ १८ ॥ विशाळ आकर्णनयन । अंतर्चक्षु करितां विलोकन । तुझा नयन चि होउन । निरेक्षण तेथें ॥ १९ ॥ निज ज्ञानचक्षु संपूर्ण । तव निजांगीं निरेक्षण आपण । हेंच अनुभवाचें निवेदन । सर्वतोमुख ॥ २० ॥ सर्वांगें चक्षुसी आली शरण । चक्षुद्वारें

जालीं निवेदन । भावार्थाचें मस्तक होऊन । गुरुपदीं जडलें ॥ २१ ॥ सांग पृथकाकारें प्रीती । घडल्या नवविधा हि भक्ती । गुरुपद सेवनें चि च्यान्ही मुक्ती । आधीन जाल्या ॥ २२ ॥ ऐसें हें गुरु महिमान । साच चि गुरु कृपेनें जाण । प्राप्त होय निज अनुसंधान । गुरुभक्तांसी ॥२३॥ गुरुभक्त माळिका मेरु । कृपेनें तुझां चि सद्गुरु । प्रसिद्धीसी आणिला तारु । भवसिंधूसी लीळा ॥ २४ ॥ भक्त साक्षात्कार भूषणें । निजांगीं अळंकारलासी तेणें । नित्यमुक्तांचीं आभरणें । शोभविसी मणि मुकुट मेरु ॥ २५ ॥ किरीटीकुंडलें सुढाळें । बाहु भूषणें तेजाळ । वीरकंकणें रसाळें । मुद्रिकाभरणें ॥ २६ ॥ कौस्तुभा ऐसीं तेजाळें । रत्नें मिरविसी कंठमाळे । कटिसूत्रप्रभा निर्मळ । शोभवी संपूर्ण ॥ २७ ॥ दिव्य पीतांबर कट तटीं । कासे घातली माळघंटी । पदभूषणें प्रभाकोटी । चिरसूर्य उजाळ्या ॥ २८ ॥ आत्मज्ञान वैडूर्यप्रभा । अभेदबोध वज्रगाभा । अपार तत्व प्रमय शोभा । शोभवी सिंहासन ॥ २९ ॥ विज्ञान प्रकृती सहीत । बोध अभयंकर युक्त । निज कृपेनें विलोकित । बैसे सिंहासनीं ॥ ३० ॥ तुझे प्रत्यक्षतेसी प्रार्थना । करणें घडली करुणाघना । तो अपराध क्षमुनी निधाना । निजसुखें सांभाळीं ॥ ३१ ॥ ध्यानीं प्रत्यक्ष व्हावें ध्येय । हें ज्ञान परंपरा अन्वय । येथें ध्येय तें चि ध्यानविषेय । स्थितीसी आणिलें ॥ ३२ ॥ निराकृतीसी अकृती भाव । अरूपासी रूपाची ठेव । अगुणासी गुणाभिनव । प्रशंसा केली ॥ ३३ ॥ निःसंगासी संग सकळ । उदासासी कल्पिलें स्थळ । निरपेक्षासी केवळ । उपचार चिंतिले ॥ ३४ ॥ अमनासी मनोगत । काव्यरहितासी काव्योचित । उपचार कल्पूनि समस्त । तारतम्य केलें ॥ ३५ ॥ भावशून्यासी सद्भावें । स्तवन केलें सद्गौरवें । अनिर्वाच्यासी अभिनवें । आणिलें वाचेसी ॥ ३६ ॥ अचिंत्यासी चिंतनापरी । चिवुनि प्रसन्नतेवरी । अपेक्षापूर्त अभ्यंतरीं । सहाकारी केलें ॥ ३७ ॥ निराधारासी सर्वाधार । कल्पुनि कल्पिला विश्वाकार । बुद्धि रहितासी निरंतर । भावनेसी आणिलें ॥ ३८ ॥ निरोपाधिकासी त्रिशुद्धि । आर्जवली म्यां कृतबुद्धि । पावलों सकळार्थ सिद्धि । मनोरथाच्या ॥३९॥ तव कृपेनें मी कृतार्थ जालों ।

नित्यामृतपानें निवालों । सकळ समृद्धीनें पावलों । उंचिवेचा कळस ॥४०॥ आजि अढळ सितांचा ध्रुव जालों । तव प्रसन्नता मेरु मिरवलों । आजि स्वरूपतेचा उगवलों । साक्षात्कारसूर्य ॥ ४१ ॥ आजि दैवपट्टणीं प्रवेशलों । आजि स्वराज्यमदीं बैसलों । आजि अनुभवाचा पावलों । राजविलास ॥ ४२ ॥ आजि निजसख्यें मज बोळलीं । आजि निज अनुसंधानें पाहिलीं । जे सर्वसुखप्रद विलोकिली । मूर्ति तुझी डोळां ॥ ४३ ॥ आतां आश्चर्यासी आश्चर्यकर । करीन तुज षोडशोपचारें । ते अंतर्मात्र अगोचर । तूं चि अवधारीं ॥ ४४ ॥ इति श्री भीमोपदेश । सुंदर स्वरूपें परेश । ध्यानासी आणिला सविशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ४५ ॥ नवम सूर्य द्वितीय कळा संपूर्ण ॥ २ ॥

---

श्री

## सूर्य ९ कळा ३

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनंता कर्तानें । मज प्रसन्न जाला कृपेनें । दिधलें दर्शन निजाथितीनें । प्रगट्य हृदयीं ॥ १ ॥ अनंत संबोधन विशेषणें । गीर्वाण प्राकृता मतीनें । पुढती पुढती आवडीनें । गाईन गीतीं ॥ २ ॥ हा स्वछंद माझा सहज । अनंता आटवीन वेळोवेळां तुज । तरी कृपा करूनियां मज । आळवी प्रत्योत्तरें ॥ ३ ॥ जन्मजन्मांतरींची सुकृतें । सफळ जालीं तुझ्या दर्शनार्थें । तुझे सानिध्यानें सर्वार्थें । कृतार्थ जालों मी ॥ ४ ॥ सकळ देवाधिदेव श्री अनंता । सकळ सिद्धादि सिद्ध समर्था । सकळ तत्वार्थ तत्वता । तुझी मूर्ति देखिली ॥ ५ ॥ निजांग लावण्य अविनाश । नयन जडले त्या सद्‍पास । पाहतां पाहतां प्रत्यंतास । मडस न पुरे ॥ ६ ॥ सूर्यकांतासी जैसें दीपन । त्याहून थोरी तुझें आवडे दर्शन । त्या सुखासी नाहीं प्रमाण । हा प्रत्ययो माझा ॥ ७ ॥ समाधानाच्या अपार थोरी ।

त्या कुर्वाळिजेत होतां तुझी भेटी । स्वानंदाच्या महांसृष्टी । कीजेत निंबलोण ॥ ८ ॥ ऐसी दर्शनाची आगळीक । संभाषणीं महां कौतुक । विशेष तव सविधानीं अर्चक । जालों निज दैवें ॥ ९ ॥ निज भाग्यें सभाग्यवंत । तेणें जालो तुझा अनुग्रहीत । मनोरथ सिद्धीचा तूं अनंत । प्रसन्न जालासी ॥ १० ॥ निज अर्भकें लडिवाळें । जनकाप्रती क्रीडा कल्लोळें । शब्दींचे उपचार सोहळे । कीजेत जैसे ॥ ११ ॥ तैसें तुज अविनाशा । उपचार करीन परेशा । हें चि पुरवी माझी आशा । अभ्यंतरींची ॥ १२ ॥ तुझी सेवा घडावया । भाग्य असावें सद्गुरुराया । तुझे सेवेनें चि प्राणसखया । काळ जावा संपूर्ण ॥ १३ ॥ तुझे कृपेचें निज वैभव । जें पावों न शकती ब्रम्हादि देव । महां आनंदाची राणीव । समर्पीन तुजला ॥ १४ ॥ तरी गा कृपेच्या राउळा । जगऊन माझा हा जिव्हाळा । पुरवीं आवडीचा ळळा । अर्चन विधीनें ॥ १५ ॥ सकळ सुखाचें सुख साचार । सकळार्थ प्राप्तीचें महांद्वार । जैं मी तुझे अर्चनीं तत्पर । होईन तेव्हां ॥ १६ ॥ ऐसें प्रार्थितां अंतर स्थितीनें । कल्पवल्ली अनंत निज कृपेनें । करें कुरवाळुनी मज कारणें । दिधलें निजक्षेम ॥ १७ ॥ म्हणे मम आनंदवर्धनवाळा । तुझा अपरोक्ष सुखजिव्हाळा । त्यास्तव हे अंतर्कळा । वसे तुझे ठायीं ॥ १८ ॥ सद्गुरुभजनीं जया आवडी । त्यासी च आमच्या अद्वैतार्थ जोडी । महत्सुखाच्या अपार कोडी । आर्जवीती तयातें ॥ १९ ॥ अंतर प्रचीतीनें सहज । तुवा नित्य अर्चिलें मज । पुढती अपेक्षेसी तरी तुज । माझें अभय चि असे ॥ २० ॥ स्वकायेसी स्वकरें । अर्चनी प्रार्थिजेत काय आदरें । तेविं तूं निजांगिक निर्धारें । काय प्रार्थितोसी ॥ २१ ॥ स्वरूपानुभव अंतर्भाव । माझे प्रचीतीचा तुझा जीव । आतां व्याधवासी अभिनव । मुखें चि मज अर्ची ॥ २२ ॥ आपुले चि श्रवण आपण । ऐकविल्यां ऐकती संपूर्ण । नाइकावयाचें त्यासी प्रमाण । केलें चि न वचे ॥ २३ ॥ तैसें चि निजनयनांचें देखणें । अवलोकितां नये शब्दानें । तेविं अंतर तजुनि प्रीतीनें । मज नित्य अनुसरें ॥ २४ ॥ कृपा जलधीचे चिन्मकल्लोळ । समर्थाचे अंतर्भाव केवळ । माझे हृदयींचे अर्प

अकळ । तुज सर्वत्वें दिधलें ॥२५॥ ऐसें कृपाळूपणें पूर्ण । बोलिला अनंत कृपाघन । तेणें प्रचीतीनें स्वानंदवर्धन । मी परम सुखावलों ॥ २६ ॥ स्वानंदसुखाची परवडी । अर्चीन अनंतासी मी आवडी । आतां हे माझी प्रचीत रोकडी । मीं चि अनुभवीन ॥ २७ ॥ 'गंध पुष्पादि सकळ । अंतर्भावाचे पदार्थ निर्मळ । मी चि होउनियां अखिळ । अर्पीन सद्गुरुंसी ॥ २८ ॥ चंदनीं सुवास निर्वाळला । तो जेथुनी योग्यतेसी आला । ते चि अधिष्ठान तयाला । चर्चिला चंदन ॥ २९ ॥ अत्यंतीक परिमळें सुमन । रूपासी आलें कां जेथून । सुमन संभव स्वस्थान । अर्पिलें पुष्प तें चि ॥ ३० ॥ दशांग स्थितीचा सुगंध । जेथूनि प्रगटला सुवास सिद्ध । तें जगदाद्य स्थान प्रसिद्ध । तो सुधूप समर्पिला ॥३१॥ चंद्रसूर्यासम महां दीप । जेथुनी प्रकाशले सदप । ते अनंतासी अनंतरूप । दीप समर्पिले ॥३२॥ अमृतादिकाची माधुर्यें । जेथुनी गोडीसी आलीं आश्चर्यें । ते सदन्न परवडी तात्पर्यें । नैवेद्य समर्पिला ॥ ३३ ॥ पदार्थेंवीण पदार्थाच्या सिद्धी । द्वैतें वीण स्वसुख उपलब्धी । भाव सिंहासनी निरोपाधी । हें अर्चन होतसे ॥ ३४ ॥ छत्रचामरें व्यजन । अलंकार वसन समार्चन । गीतवाद्यनृत्य कीर्तन । अनुस्वरीत होतसे ॥ ३५ ॥ महा रसाचे फळसंग्रह । तोपविला अनुभव विग्रह । सुखैकघन निजानुग्रह । नित्य मी लाधलों ॥ ३६ ॥ नित्यानंद निजप्रचीती । तांबोल दिधला सद्गुरुप्रती । पुढती स्तवन निःशब्द स्थिती । पुढती आरत होतसे ॥ ३७ ॥ हें महा अंतर्पूजा विधान । सद्गुरु स्वामींचें नित्यार्चन । निरतर सद्भावें पूर्ण । होतसे सहजें ॥ ३८ ॥ चंदनीं च चंदन उगाळला । तो जेथीळ तेथें समर्पला । सुमनीं सुवास दाटला । तो समर्पला सहजें ॥ ३९ ॥ महा सुवासीक पदार्थ । सुधूपें समर्पले सर्वार्थ । दीपीं दीपार्थ कृतार्थ । जाले सद्गुरु सन्निधानें ॥ ४० ॥ अखंडैकरस महा नैवेद्य । जगत्कारण तत्व सुवेद्य । ते नैवेद्यार्थी पदार्थ सद्य । पदार्थीच समर्पले ॥ ४१ ॥ ऐसी हें कर्तव्ये विना । अर्चनविधी समाधना । नित्यार्चन सद्गुरुराणा । संतोषविला सुखें ॥ ४२ ॥ निवेदन भक्ती अंतर्मुख । अंतर्निष्ठेनें निज उल्लेख । अर्पिले

सद्गुरूसी तेणें स्वसुख। पावला प्रसाद ॥ ४३ ॥ निवेदन भक्ती उपरी। श्रीरामसंमापण ग्रंथांतरीं। श्रोता भीम साक्षात्कारी। अवधारीतसे ॥ ४४ ॥ तें अनुभवाचें निरोपण। आत्माराम हृदयींचें अनुसंधान। भीमहृदय करूनि अवधान। श्रोतीं अवधारिजे ॥ ४५ ॥ ऐसी हे प्रचीतीची प्रीति। अनुभवीक संत जाणती। तुमचें हृदय तुम्हाप्रती। उपचारें निवेदिलें ॥ ४६ ॥ इति श्री भीमोपदेश। अंतपूजा समारंभ तोष। निश्चयाचा निज निष्कर्ष। म्हणे मेरु अनंत ॥ ४७ ॥ नवम सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ राम ॥

श्री

## सूर्य ९ कळा ४

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामस्वमुखोद्भव मी जाण। नवविधाभजनें अलंकरण। अलंकारलों निज प्रचीतीनें पूर्ण। तुझें प्रीतीच्या हस्तकें ॥ १ ॥ माझें अलंकरण मी चि होय। माझें स्वरूप मी चि पाहें। माझें स्वसुख मी चि आहें। तुझियेनियोगें रुद्रा ॥ २ ॥ या अंतरस्थितीचिया गोष्टी। कवणाप्रति निवेदूं सुखकोटी। तूं अंतरनिष्ठेच्या मुकुटीं। प्रकाशवासी हीरा ॥ ३ ॥ तूं आनंद गगनाचा गाभा। तूं कैवल्याचा विग्रह उभा। तूं बोध संपत्तीची शोभा। प्रत्यक्षाकारें ॥ ४ ॥ तरी अवधानीं अति तत्पर। अवधारी माझें अभ्यंतर। तुजप्रती सांगितलें अपार। तैसें चि पुढें अवधारी ॥ ५ ॥ अप्रमेय निजबोध हृदय। अभ्रांत सुखें भरलें आहे। तया पारावारासी प्रत्ययें। पाहेल ऐसा कवण ॥ ६ ॥ तें प्रमय अवधारितां। विश्वरूपें मज अनंता। कल्प गेले सन्हीं हनुमंता। पार चि न लगे ॥ ७ ॥ परेचें करूनि खरें माप। प्रमय उमाणितां आपेआप। अधिक चि होतसे स्वरूप। लेखासी नये ॥ ८ ॥ सारस्वतांचें निज जिव्हार। सूक्ष्ममतीचे कर चतुर। मोवितां मागें साचार। निःशब्द राहिले ॥ ९ ॥ सद्गगुरुगम्याचा निर्धार द्विसहस्र। प्रचीतीच्या करें संभवोनी सार। मोवितां

निज हृदय अपार । जिव्हां भंगल्या ॥ १० ॥ विचार याचस्पति युक्तिकार । प्रमाणा आणितां निज अभ्यंतर । तटस्त जाले निरंतर । उल्लेख तयांचे ॥ ११ ॥ ऐसें विश्वाकारें मोवितां । निज हृदय नये चि हाता । एवं या प्रचीतीनें आतां । हृदय निवेदीन तूतें ॥ १२ ॥ ग्रंथकवन यंत्रकळा । प्रचीतीची स्थिती अवलीळा । अनुभव शब्दाचा जिव्हाळा । उद्‌घाट होतसे ॥ १३ ॥ सुशब्द सार्थकें स्वयंभ । हे चि जाणिजे सुवर्ण कुंभ । स्वसुख प्रचीती अक्षोभ । प्रमय घेउनी येती ॥ १४ ॥ हृदय अमृत सिंधू भीतरी । शब्द कुंभाची भरोवरी । नित्य होतसे परी । पार चि न लगे ॥ १५ ॥ या स्वरूप सनातनी । महा अनुभवी ज्ञानी । प्रमय घेउनी समाधानी । सुखी जाले अपार ॥ १६ ॥ ते निज प्रचीतीचे उद्गार । कोट्यावधी ग्रंथ विस्तार । जाले आहेती निर्धारें । अवधारिजेत आतां ॥ १७ ॥ पुढें होतील अपार । नित्यानुभव ग्रंथ साचार । तऱ्हीं निज हृदयींचा पार । न लगे चि तयां ॥ १८ ॥ ऐसें अप्रांत प्रचीतीनें हृदय । तूं चि होउनी अनुभवी स्वयें । भिन्नपणें निश्चयासी न ये । वर्म सांगतों तुजला ॥ १९ ॥ अरे अरे आश्चर्याच्या कोटी । नित्य संभवताती पोटीं । सांगतां ऐकतां त्याची गोष्टी । सुख अपार होय ॥ २० ॥ सांगितल्यानें दिधलें नाहीं । ऐकिल्या हातासी आलें कांहीं । परी सांगितलें ऐकिलें पाहीं । सुख जालें अपार ॥ २१ ॥ आपलें स्वरूप आपणासी । कळलें नसतां निश्चयेसीं । भेद जन्मांतरें दुःखासी । भोगणें जालें होतें ॥ २२ ॥ ते निजवर्म सद्गुरूनें । सांगितलें स्वरूप प्रचीतीनें । दुर्गती भवबंधन तेणें । हरलें सहज ॥ २३ ॥ आपुल्या स्वरूपाची प्रचीती । सद्गुरुमुखें महावाक्य स्थिती । श्रवणासी आणितां मारुती । कृतार्थ केलें ॥ २४ ॥ आश्चर्याची आश्चर्य गती । हृदयीं संभवलें सांगों किती । महा प्रचीतद्वारें मारुती । ऐकासी तेणें सुखावे ॥ २५ ॥ सर्वांग हृदय निर्धारीं । संभव भेदाभेद परी । भेदें बुडिजे भवसागरीं । अभेदें तरिजे सुखें ॥ २६ ॥ भेदानुगती निज विवर । तेणें विस्तारला हा संसार । जन्ममरणाचे घोरांधार । फेरे पडविले ॥ २७ ॥ अभेदानुगत विवरें । सत्यरूपी

केलें चेइरें । स्वनुभाव निज निर्धारें । विश्रांति जाली ॥ २८ ॥ त्यास्तव भेदा भेदपर । स्वभावीक निज अभ्यंतर । असतां स्वरूपाचा निर्धार । वळावत नाहीं ॥ २९ ॥ या कारणें साक्षेपेंसी । अभेदपर निश्चयेंसीं । वळकाविजेत निर्धारासी । साधक स्थितीनें ॥ ३० ॥ स्वरूप धरेवरी सार । हृदयजीवन अपार । वाहे स्वभाविक साचार । पक्षरहित ॥ ३१ ॥ निर्विकार स्फूर्तिपर । जाण तें निज अभ्यंतर । उपेगासी आणिजे अपार । फळ प्राप्तीमिसें ॥ ३२ ॥ चतुर्विध पुरुषार्थाचीं फळें । पाविजेत तेणें चि जळें । साक्षेप वृत्तीच्यामुळें । पिकवावें प्रमय ॥ ३३ ॥ पिकऊनि फळप्राप्ति भोग । होतां लाभे निजांग योग । त्यास्तव अभेद अंतरंग । रक्षावा सर्वदां ॥ ३४ ॥ इति श्री भीमोपदेश । हृदयींचें प्रमय विशेष । भेदाभेद परंपरेश । म्हणे मेरु अनंत ॥ ३५ ॥ नवम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥ श्रीगोविंद ॥



श्री

## सूर्य ९ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी निजांग द्रष्टा । मज माझ्या चि स्वरूपें प्रतिष्ठा । मीपणातीत मज वरिष्ठा । अनुभविलें जिहीं ॥ १ ॥ ते माझ्या चि स्वरूपें मद्रूप । मी चि होउनी जाले तद्रूप । माझी प्रतिष्ठा जाणोनी सद्रूप । नित्य प्रतिष्ठिले ॥ २ ॥ तत्वता त्याचें स्वरूप । अबोधरूप आत्मरूप । ते अरोपतेसीं चिद्रूप । बोध माझा चि जाला ॥ ३ ॥ ते मी चि होउनी असतां । मजसी भिन्न कदापि नव्हे तीं । ते निजभक्त माझे तुजप्रती । पूर्वीं त्याची स्थिती निरोपिली ॥ ४ ॥ तरी गा तूं भक्त शिरोमणी । तत्व विशारद बोध सन्मणी । तुझ्या वचनें आत्मदिनमणी । दिसे प्रतिष्ठवंत ॥ ५ ॥ तूं निजांग द्रष्टा आत्मगमनी । तुझियेन प्रतिष्ठलो मी सन्मनी । अनादि योग तुजमजप्रती । गुरुशिष्यसंबंधें ॥ ६ ॥ माझा सखा तूं अनादि

सिद्ध । तुझा अंतर्भाव मी प्रसिध्द । सख्यत्व समर्थेर्वाण शुद्धबुद्ध । अभंग सख्यत्व असे ॥ ७ ॥ तूं मी ऐसा हीं पवाड । नसे चि आत्मत्वीं माया निवाड । भेद प्रशंसेचें दुर्वाड । संसर्गीक नसे ॥ ८ ॥ संसर्गीक सख्यें विरती । ऐक्यासी येउनी कल्पांत मती । दुस्तर भेदें वेवादती । परस्परें ॥ ९ ॥ ते कल्पनीक सख्यत्व । समंध सोयरीक साक्षत्व । हें तुज मज नसे आत्मत्व । जाण येकत्वें चि तूं ॥ १० ॥ निज ज्ञानाचा भाग्योदय । अभंग सख्यत्वाचा आत्मप्रत्यय । अवीट गुरु कृपा सदोदय । नित्य प्रभात ॥ ११ ॥ अखंडोदय निजानुभव । अखंडीत स्वरूप स्वयमेव । या अबोध बोधाचा स्वभाव । स्वभाविक असे ॥ १२ ॥ आत्मत्वीं ठेउनी ज्ञानदृष्टी । आत्मा चि पहावा पाठीं पोटीं । परी पाहणें-पणाच्या परिपाटीं । पडों नये दृष्टीनें ॥ १३ ॥ डोळा चि मुरडोनी भीतरी । न पाहतेपणीं विलोकन करी । तो चतुर द्रष्टा सर्वोपरीं । निजांग डोळस ॥ १४ ॥ जेवढी स्वरूपाची व्याप्ती । पाहिली न घडितां पाती । अंतर दृष्टीच्या अंतर स्थिती । ऐशा चि जाण तूं ॥ १५ ॥ उगे चि म्हणती अंतर दृष्टीचे । परी ते न देखती चि साचें । झकवती द्रष्टेपणें त्यांचे । अवरोधले चक्षु ॥ १६ ॥ अथवा अद्रष्टेपणे शून्यमती । ज्ञानी च बापुडे झकवती । एकाची निश्च पाती लवती । सत्य साक्षत्व मुळें ॥१७॥ एक अखंडत्व आत्मत्वानें । डोळा निढार देती निश्चतेनें । हेहीं अंतर दृष्टीचें देखणें । नव्हे चि बापा ॥ १८ ॥ सांगो जातां अंतर दृष्टी स्थिती । प्रवाहीं पडते प्रवृत्ती । तेथ महा ज्ञानी झकवती । गुरुत्व घेउनी आंगीं ॥ १९ ॥ सहज आणि साक्षेपता । दोन्ही स्वभावीक अवस्था । स्वभाव घेउनी साक्षेपता । टाकिलियां साक्षेप चि कीं ॥ २० ॥ या उभय दृष्टी गोचर । हें निज दृष्टीची पाती दुर्धर । ऱ्हों नेदितां निरंतर । देखे तो दिव्य द्रष्टा ॥ २१ ॥ मी अंतर्भाव बोधवीतसें । या चि प्रबोधीं जातसें । परी परतोनी पाहतां मी हें ऐसें । उमजों चि नेदी ॥ २२ ॥ तूं कवण मी कवण कैचा । मज सोस कां लागला बोधाचा । मी मज उमगुनी दे मूळीचा । स्मरण तरु शाखा मृगा ॥ २३ ॥ तूं प्लवंगम

सूक्ष्मगती । जाणसी विचरों अंतरस्थिती । आत्मदर्शी लपंडाई मारुती । उमगूनि दे मज ॥ २४ ॥ मी कवण वोधी कवणा । कवणाप्रति वोध पुसें निपुणा । सांगें याची अनुभव खुणा । निजास्तिक्यज्ञानें ॥ २५ ॥ निजानंद घन अंतर स्थिती । जाणसी तूं जिवलग विशारदमती । आतां प्रबोधवी मजप्रती । माझें चि अभ्यंतर ॥ २६ ॥ आपणासी पडतो विसर । म्हणोनी मित्रासी सांगणें सादर । घटलें मज वारंवार । अभंग सख्यत्व सख्या ॥ २७ ॥ अपार जीवींच्या गुज गोष्टी । सांठवितां आठवण संपुटीं । सामावे चि ना ते दाटी । स्वानंदाची होतसे ॥ २८ ॥ स्वसुख दाटीनें हृदय । उतटोनी परेशी उल्लेख ये । यंत्रविशिष्टें उद्‌घाट होय । अक्षर स्थितीनें ॥ २९ ॥ या प्रवाहीं पडोनी आठव । मुळींच्या विसरासी होम ठाव । परतोनी जावयासी धांव । स्मरणाची न पुरे ॥ ३० ॥ विवेकाचा हीं योढा वारा । लागला नाहीं ज्या निज जिव्हारा । आंगें तें चि असोनी थारा । विसरें आठव भरें ॥ ३१ ॥ या चि आठवाच्या गुह्य गोष्टी । करिता होय मुळींची भेटी । त्यास्तव या आठव राहटी । तुज मर्तविलें ॥ ३२ ॥ आपुलें व्हावया परिपालन । पिता पुत्रासी शिकवी संपूर्ण । तेविं वेद पुरुषें सज्ञान । सत्संगती केली ॥ ३३ ॥ शिष्यासी गुरु उपदेशिती । हे आत्मोद्धार प्रचीती । शिष्य प्रबोधितां अंतरस्थिती । उजळणी होतसे ॥ ३४ ॥ विद्यासंपन्न महा शास्त्रकार । कठिणांग विल्पत्तीचें जिव्हार । जिवीं रिघोनियां वारंवार । शिकविती निजाभ्यासार्थ ॥ ३५ ॥ एवं परंपरा जाण । आत्म अभ्यासास्तव सज्ञान । बोधरूढीनें आत्मज्ञान । स्फुटीसी घालिती ॥ ३६ ॥ तरी या आत्मज्ञानसंपन्ना । अध्यात्मिकविद्यानिधाना । तत्व नत्र व्याकरण प्रवीणा । प्रबोधवी मज ॥ ३७ ॥ जैसें निद्रेनें अवरोधिलें । ना तें अभाव परचक्र आलें । स्मरण स्वराज्य घेतलें । जाय अवचट ॥ ३८ ॥ व्यामोह सरिता प्रवाहीं । बोध संपदा बुडे पाहीं । तेविं विस्मरणता हृदयीं । टाकूनि आली ॥३९॥ कीं हे अनादि माया क्षोभली । कीं हे निज अविद्या वोडवली । कीं हे शून्य अवस्था बळावली । कांहीं न कळे ॥ ४० ॥ मी मज स्मरें चि ना

काहीं । अवरोधलें ठांइचा ठाईं । मौन्य मुद्रेनें सर्वहीं । प्रतिष्टिलें अभ्यंतर ॥ ४१ ॥ अनिर्वाच्य शब्दे वीण । जाला वाचेसी अत्यंतिक क्षीण । स्वभाविक निज स्मरण । अवरोधलें ॥ ४२ ॥ जैसा पर्वता आंगीचा झरा । ग्रीष्मकाळीं आथीत गिरि जिव्हारा । तेवि निज अभ्यंतरा । माजि स्मरण रिघालें ॥ ४३ ॥ इति श्री भीमोपदेश । अंतर दृष्टीचा प्रकाश । सदय प्रतिष्ठा सुरेश । म्हणे मेरु अनंत ॥ ४४ ॥ नवम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ श्रीगुरुगोविंदाय नमः ॥



श्री

## सूर्य ९ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामस्वबोध अभ्यंतरीं । निरावकाश नभापरीं । पाहतें पाहणें समसरीं । सपाट पाहलें ॥ १ ॥ वैखरीचा धर उडाला । परेमाजी पडोसा पाहिला । तो द्रष्टा चि पवाडला । त्या निरावकाशीं ॥ २ ॥ हा विस्मरणावरील धर । जैसें सुषुप्तीचें अभ्यंतर । सुखरूप असे साचार । हृदय शय्येसी ॥ ३ ॥ आंगीं निद्रेच्या मुखभरें । ज्ञानें चि होउनियां चेहरें । इच्छेनुसार विश्वाकारें । देखतें होय ॥ ४ ॥ तेथें कवण त्या जागे कर्ता । कवण प्रवृत्ती भरण भर्ता । जेथें द्रष्टेपणाची वार्ता । ते हीं असे चि ना ॥ ५ ॥ नसतां यथार्थ द्रष्टेपण । देखते पणें द्रष्टा तो कवण । पाहतां आपणा चि पासून । प्रतिष्ठिला असे ॥ ६ ॥ ऐसें हें स्वभावीक । वृत्ति साक्षत्वाचें कौतुक । गुप्त द्रष्टेपणें अनेक । क्षोभवृत्ती द्रष्टुत्वें ॥ ७ ॥ नसोनी वेधा निजांगीं । स्वमांतर अवस्था भोगीं । दुरातिशय वृत्ति प्रसंगीं । नाना प्रकार ॥ ८ ॥ ऐसें हें अवस्थांतर मार्मीक । विस्मरणाचें कौतुक । या चि विस्मरणें ऐक । जग प्रवृत्ति पडिलें ॥ ९ ॥ हें मासे चि ठायीं विस्मरण । तेणें मी होय जगत्कारण । स्वमींच्या द्रष्टेपणाचें अवतरण । मी चि होय जगकर्ता ॥ १० ॥ स्मरण विस्मरण विनरें । सरूपदायक

स्मरण पसरे । तें स्वानंदसिंधूंत घसरे । साक्षत्वें येकसरां ॥ ११ ॥ विस्मरणाच्या अभ्यंतरें । जितुकीं देखिलीं स्वप्नांतरें । तितुकीं माझीं च जन्मांतरें । जाण कपिश्रेष्ठा ॥ १२ ॥ परंपरा प्रशंसा अभ्यंतरें । वर्तत आलीं सभाग्यपरें । तितुकीं माझीं च मन्मंतरें । जाण वुत्पती कपींद्रा ॥ १३ ॥ जन्मांतर विशेष कर्मांतरें । महां विस्तीर्ण कल्पांतरें । अवस्था रूढ विश्व अभ्यंतरें । साक्षत्वीं फुंजतसे ॥ १४ ॥ तत्वता स्वरूप जागृतीनें । तत्वता जागृत होऊन स्थितीनें । स्वरूप प्रतिष्ठा सत्तेनें । पदवी भोगी ॥ १५ ॥ स्वराज्य स्वानुभविक । स्वानंदेसीं सकौतुक । अविनाश संपत्ति विवेक । पावे निजोपलब्धीं ॥१६॥ विस्मरणावरील आठवें । अवस्थात्रय स्वभावें । साक्षत्वातीत स्वानुभवें । प्रतिष्टत असे ॥ १७ ॥ आतां विस्मरण अभ्यंतरीं । रिघोन स्मरणाच्या पसरीं । पाहतां अधिष्ठान सर्वांपरीं । शुद्ध बुद्ध निर्मळ ॥ १८ ॥ विस्मरणासी गिळुनी पुरलें । स्मरण पैसावलें वरूतें । तें चि विश्रांतीकर निरुतें । जाण सद्बुद्धि अंजनेया ॥ १९ ॥ या चि स्मरणीं असतां सहज । स्वानंदाचें पुरे भोज । स्वराज्य चक्रवती राज्यध्वज । मिरऊ ये सुखें ॥ २० ॥ आगें चि स्वराज्यप्रतिष्ठा । सहज स्मरणें जाण वरिष्ठा । यास्मरणें सद्गतीच्या वाटा । दिसों लागती सर्वत्र ॥ २१ ॥ विस्मरणें मज आक्रमितां । म्यां तुझें स्मरण केलें हनुमंता । तेणें स्मरण संपत्तीच्या माथां । मिराशी केली सुखें ॥ २२ ॥ नदीतीरें किंवा कड्यावरी । जातां प्रसंगोचित निर्धारीं । घसरतां पाऊल त्वरें करीं । पुत्रें पित्यासी धरिलें ॥ २३ ॥ तैसें मज विस्मरणांतरीं । घसरतां अभाव भरीं । तुझ्या स्मरणाच्या निर्धारीं । उभें केलें नावेक ॥ २४ ॥ पायांची गेलिया चळवळ । वळें उभें केलिया ही पांगुळ । निज धैर्याचा एक ही पळ । आव न धरी ॥ २५ ॥ तैसें स्मरण गळित जालें । अभावाचें दुर्धाड गेलें । या विस्मरणाचें अभिनव केलें । कवणासी न कळे ॥ २६ ॥ हें विस्मरणसें वाटे जया । स्मरणें चि आथिलें तया । या विस्मृतीच्या निळया । पावला चि नाहीं तो ॥ २७ ॥ जें स्मृतिस्मृति-

रिक्त होणें । तें वैसे अनुभव ठाणें । निस स्वानंदाचीं भरणें । भरती स्वभाविक ॥ २८ ॥ हा स्वानंद नव्हे चि परोक्ष । होय अनुभविता अपरोक्ष । ऐसें अंतरदृष्टीचें लक्ष । मुळींचें सांभाळीं ॥ २९ ॥ अंतरदृष्टी प्रभा पैस । धरूनी सावकाश आतां वेस । द्वैताद्वैत वृत्ती उमस । उमसों नेदी ॥ ३० ॥ अवचट होतां निज उमस । बोधबळें निगृहीसी त्यास । तरी मग तो चि वहुवस । होय बळावला ॥ ३१ ॥ त्यास्तव सहज हृदयीं । आठव नाठव वृत्ती द्वयीं । स्वभाविक वसें ठाईंच्या ठाईं । निज निश्चळतेनें ॥३२॥ निजांगीची निश्चळता । सिद्ध हारपले पाहतां पाहतां । महा मननशीळ तत्वता । निर्हेतु जाले ॥ ३३ ॥ महत्सुखाचे निजयोगी । आत्मज्ञान प्रसिद्धीनें जगीं । प्रशंसिले महा वीतरागी । निजांग दर्शनें निवाले ॥ ३४ ॥ सत्य सनातन जिकडे तिकडे । सपाट पाट चहूंकडे । पाहतां विचार दर्शनें कोणींकडे । पार चि न लगे ॥ ३५ ॥ पूर्ण अबोध अंतराळ । एकजिनसी पैस विशाळ । जाला चि नाहीं दृश्य विटाळ । तया निर्मळासी ॥ ३६ ॥ कोणेकडे सेवटासी जावें । अपारासी त्या कैसें पहावें । निज उदासासी आठवावें । कवणेपरीं ॥ ३७ ॥ असंगतासी काय म्हणोनी । आणावे अंतरदृष्टीच्या ध्यानीं । निजं व्यापकता पावनी । सर्वांच्या विसरें ॥ ३८ ॥ सकळांच्या अभावीं सहज । निजांग आस्तिक्यता निज । या आत्मभूमीवरी सतेज । आत्मप्रवृत्ति चाले ॥ ३९ ॥ सतेज साक्षत्व विवकळा । कवळी जें आस्तित्व अंतराळा । तें तो साक्षत्व निर्वाळा । सहज होय ॥ ४० ॥ एकदोनी तिनी च्यारी । आहेती साक्षत्वाच्या परी । त्या मी सांगेन निर्धारीं । अवधारीं आतां ॥ ४१ ॥ अंतरदृष्टीचा द्रष्टा होसी । स्वास्तव हितगुज तुजपासीं । सांगणें पडलें निश्चयेंसीं । ऐक अवधानपरा ॥ ४२ ॥ इति श्री भनोपदेश । निज आस्तिक्यता अविनाश । अंतर दृष्टींचा अवकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४३ ॥ नवम सूर्य षष्ठम कळा संपूर्ण ॥ श्रीराम ॥



श्री.

## सूर्य ९ कळा ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मज मी सुप्रसन्न । माझें स्वरूपतेचें समाधान । अनंत होउनी आपण । मी चि अनुभवीं ॥ १ ॥ माझें हितगुज मजपासीं । सांगतसें रूप विशेषीं । तूं मी चि होउनी निश्चयेसीं । अवधारीं आतां ॥ २ ॥ माझी स्फूर्ति मी चि अपार । सावकाशाचें अभ्यंतर । ब्रह्माहमस्मि निजोद्धार । माझा मी चि कर्ता ॥ ३ ॥ जितुका पाहिजे ठाय विशाळ । तितुका पैस होउनी केवळ । मजमाजि विस्तारलों अखिळ । चतुर्विधा प्रकारें ॥ ४ ॥ माझें निश्चळत्व सदोदित । शाश्वतपणें अस्तित्व अप्रांत । मीपण स्फूर्तिवीण अनंत । तेथें साक्षत्वें तुमसे ॥ ५ ॥ जैथ द्वैताद्वैत नाहीं स्फूर्ति । तेथें साक्षत्वाची कैंची स्थिती । ऐसी निश्चळतेची व्याप्ती । तें मी स्वरूप तचता ॥ ६ ॥ ऐसें स्फुरलें ज्या हृदयीं । तें शोधितां हृदय निश्चयीं । बुडाले अप्रांत सुखाच्या डोहीं । निज उल्लेख सर्व ॥७॥ स्वयंभ साक्षत्वातीत ज्ञान । केवळ स्वयंभ समाधान । निजानंद ज्ञानघन । हें मूळ साक्षत्व पैं ॥८॥ मी सनातन आदिदेव । अनुभवें प्रतिष्ठलों स्वयमेव । निराश्रयज्ञानें निरावेव । आदिदेव प्रतिष्ठा ॥ ९ ॥ येथ मज परमात्मा ऐसें । योगी भाविती विगत मानसें । श्रुतींचे अंतर्भाव सौरसें । स्तविती परम पुरुषा मज ॥ १० ॥ परेच्या अंतर्भावीं सनातन । त्यास्तव परेश मज अभिधान । परेश न कळे व्यापकपणें । परात्पर तेणें मी ॥ ११ ॥ चौथें साक्षत्व यथापरीं । मुळींचे मुळीं अभ्यंतरीं । ब्रह्मस्फुरण नभापरीं । निश्चळता सद्रूप ॥ १२ ॥ निराकार निःसंग निर्मूळ । निराधार निःप्रपंच निर्मळ । निरोपम निर्धूत केवळ । निर्मळ अरूपतेनें ॥ १३ ॥ निर्विकल्प निर्मन निर्गुण । निर्मव निर्हेत निर्वाण । निर्मोह निभ्रांत निर्जन । निष्पाप निवृत्ति ॥ १४ ॥ असंग अद्वय अकळ । अपार अबोध अखिळ । अनंत अपरोक्ष अविमळ । स्वभाविकतेनें ॥ १५ ॥ सहज सद्रूप शाश्वत । साक्षीविहीन सदोदित । हे निश्चळ स्वरूपाची प्रचीत । अर्धमात्रामय

॥ १६ ॥ हा साक्षत्वातीत स्वबोध । हा स्वानुभव स्वतःसिद्ध । हा स्वयंभानंद शुद्ध बुद्ध । अंतरंग सिद्धांचा ॥ १७ ॥ सिद्ध प्रचीतीनें मज अनुभविती । सिद्ध स्वरूपतेनें प्रतिष्ठिती । सिद्ध संकेतबोध स्थिती । ग्रंथ कोटी विस्तारें ॥ १८ ॥ मूळ साक्षत्वीं साक्षत्वातीत । सिद्धावबोध सिद्ध-संकेत । सिद्ध प्रसिद्धीनें अनंत । मी सिद्ध परंपरा ॥ १९ ॥ स्वरूपतेचा सहज बोध । यातें चि बोलिजे पैं सिद्ध । सिद्ध परब्रह्म प्रसिद्ध । स्वानुभव संकेतें ॥ २० ॥ स्वानुभवाचें अभ्यंतर । स्वरूप आणि साक्षात्कार । साक्षात्कारीं निरंतर । ज्ञानयोग परंपरा ॥ २१ ॥ अनुभवामाजि केवळ ज्ञान । योगीयाचें अनुसंधान । सिद्धानुभवीं रिघोन । योगी अनुभविती ॥ २२ ॥ ज्ञानें योगी निवळले । ते सिद्ध स्वरूप चि जाले । योगीया-माजि मननीं भले । मननशीळ मुनी ॥ २३ ॥ एवं सिद्ध योगी मुनी । अनुसंधान परब्रह्मज्ञानी । मूळ साक्षत्व समाधानी । निवळले बहु ॥ २४ ॥

मूळ साक्षत्वीं स्वानंदकंद । स्वबोध प्रतिष्ठा निजनिर्द्वंद । या स्वरूपतेमाजी विद्वद । माझी सद्वृति उमसे ॥ २५ ॥ माझी सद्वृत्ती ते मूळमाया । त्यान्हीं साक्षत्वें तियेपासुनियां । स्फूर्तिरूपें आवर्ण हृदया । चतुर्विध प्रकारें ॥ २६ ॥ सद्वृत्ती ते अवस्थारूप । तिये तें चि ह्मणिजे सत्य संकल्प । नामरूप विस्तारें चिद्रूप । अंतस्तें जाहलीं ॥ २७ ॥ जागृती स्वप्नसुषुप्ती । तुर्यारूप अवस्था चौथी । या चौं अवस्थेंने मजप्रती । च्यारी साक्षत्वें आलीं ॥२८॥ मूळ साक्षत्वाची कथा । तुज सांगितली कपिनाथा । मनन करूनि स्या सिद्धपंथा । अवलंबी योगबळें ॥ २९ ॥ त्रिपुटीरहित शुद्धज्ञान । अर्धमात्रा अभ्यंतर गहन । तुझें हृदयींचें अनुसंधान । नित्य जागृत ॥ ३० ॥ तें तुझें मज अभ्यंतर । प्रचीतीसी आलें निरंतर । जे सद्रूपतेनें परात्पर । मज अनुभविसी ॥ ३१ ॥ अनुभवेंवीण अनुभव । बोलिजेत हा निजस्वभाव । परंतु सद्वृत्तीचा संभव । तेथ असे चि ना ॥ ३२ ॥ या अनुभवाची केवळ स्थिति । महा सिद्ध अनुभविती । ते सांगों जातां मारुती । वेगळीक दिसे ॥ ३३ ॥ सांगण्यातीत सागणें । ऐकिजे तेणें चि ऐकणें । सिद्धसंकेत या चि कारणें । बोलिले सिद्ध ॥ ३४ ॥

अनुभवपर स्वभावता । चौथ्या साक्षत्वीं निश्चळता । संकेत निश्चळात्मा तत्वता । परब्रह्मरूप ॥ ३५ ॥ आतां परमात्मयाचें रूप । एक होउनी तद्रूप । योग विश्रांती आपेआप । बोलेल कैवल्यता ॥ ३६ ॥ इति श्री भीमोपदेश । परब्रह्म अविनाश । निश्चळात्मा परेश । म्हणे मेरु-अनंत ॥ ३७ ॥ नवम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥ श्रीरामकर्ता ॥



श्री

## सूर्य ९ कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी परम पुरुष । मकारात्मक निर्विशेष । प्रतिष्ठिलों स्वप्रकाश । जगत्कारण रूप ॥ १ ॥ जगदाद्य मी जगत्कर्ता । जगत्कारणें समूळ भर्ता । जगदोद्भव सर्वार्था । होय विस्तारिता सर्वे चि ॥ २ ॥ हे ही माझी स्वभावता । सद्वृत्तिरूप निजसत्ता । तियेचेनि सत्य अनेकता । मजवरी विस्तारली ॥ ३ ॥ बीज होय तरुवराकारें । एक चि अनेकपणें विस्तारे । जात्यांश पाहातां निर्धारें । एकपण ते नव जाये ॥ ४ ॥ संख्येनें पाहातां अनेक । जात्यांशें पाहतां तें चि एक । हे उगींनिगी निश्चयात्मक । जाण तूं सद्वृत्ते चि ॥ ५ ॥ सद्वृत्ती ते अगोचर सत्ता । अभिनव प्रसवली पृथकता । एकीं संभव अनेकता । बीज आले फळासी ॥ ६ ॥ एक फळीं अनेक बीज । अनेक फळें बीजींच उमज । ते सत्तेचें अभिनव चोज । कवणासी च न कळे ॥ ७ ॥ भूमी आप वन्ही वारा । सत्तेचा चि अवघा पसारा । मी सनातन होय थारा । सत्ताविस्तारासी ॥ ८ ॥ ये वसुंधरेसी टाकुनी । गगनें कोठें जावें पळोनी । तैसें या विस्तारासी पावनी । मज त्यागितां नये ॥९॥ त्या जगत्कारण प्रसंगीं । मज प्रतिष्ठिलें सर्वसंगीं । ते सद्वृत्ती माझी मजलागीं । वाटे मज क्षोभली ॥१०॥ जाली वाटे मज माझी अनावर । क्षोभली विश्वाकारें दुर्धर । जेवीं पर्जन्यवृष्टीनें अपार । धरातृणें अंकुरे ॥ ११ ॥ कीं सिंधुजळ वायुवेगें ।

तरंगाकार होऊं लागे । तेवि मज माजि हे जग । अंकुरों लागती ॥ १२ ॥ जन्म जरा मरण दुःखें । त्या त्या प्रसंगीं माझ्या चि उल्लेखे । जगत्कारणाचेनि सन्मुखें । मजला होती ॥ १३ ॥ माझ्या स्वरूपतेची सहज । विन्मुखता पातली मज । निःसंगतेचा निज उमज । निर्बुजों लागे ॥ १४ ॥ अधोमुख महादुःख सांकडी । नाना प्रसव मरण धाडी । नित्य जागृतासी काडोविकाडी । स्वप्नांतर दुखें ॥ १५ ॥ जगीं मजवांण आहे कवण । विश्वकारणें विश्वरूप जाण । गगन अणुहूनि सान । मी व्यक्तीसी आलों ॥ १६ ॥ जगदाचकाया प्रतिष्ठवंत । उत्पत्ति स्थिती संव्हारयुक्त । प्रतिष्ठलों मूर्तित्रय अनंत । मी स्वरूप होतसाता ॥ १७ ॥ संभव अमर कोटी विस्तारें । देवयोनी संभव अपारें । ज्योतिर्मय दिव्य शरीरें । मनोहर धरिलीं ॥ १८ ॥ जाल्या प्रवृत्तीचा महा विस्तार । तेणें लोपला माझा निर्धार । परतोनियां आपुला विवर । दुल्लभ जाहला तेणें ॥ १९ ॥ मग कितेक काळें करूनि । विस्तार संव्हारा येउनी । निवळ होत होत मनीं । उमजासी येतसें ॥ २० ॥ कोठें उमजे कोठें निर्बुजें । सुखदुःखाचेनियोगें फुंजें । निवळत निवळत निज तेजें । पावतसें स्वरूपा ॥ २१ ॥ नवल आश्चर्याचें चोज । भेद होय माझा मज । तैसा च अभेद उमज । उमजों लागे ॥ २२ ॥ प्रियेआधीन जालियां भर्तार । मग ते काय काय न करवी चार । निश्चयाचा निज विचार । तेथें कैंचा मग ॥ २३ ॥ तैसें सद्वृत्तीनें अवरोधिलें । असद् व्यावृत्तीसी आणिलें । जैसें सूर्यासी आक्रमिलें । महा तमें ॥ २४ ॥ तेवि सद्रूप ज्ञानघनासी । अवरोधिलें कारण विशेषीं । आवरण होउनी सावकाशीं । अवळिलें मज ॥ २५ ॥ नभ सांठविलें घटीं । घटाकाश पडिलें राहटीं । तेवि नित्यशुद्धासी देह कोटी । आक्रमिलें वाटे ॥ २६ ॥ एवं हें जगत्कारण बीज । माझी च वृत्ती अवरोधी मज । म्हणोनि म्यां निज उमज । नित्य मुख्य सांवरिला ॥ २७ ॥ स्नेहमुन्न निर्वात स्थिति । दीप सावरिजेत स्वहस्तीं । तेवि निज अन्तर्भाव आवर्तीं । म्यां सरक्षिला ॥ २८ ॥ देवात्मपूजेने पदार्थ । जावों नेदितां काही व्यर्थ । नित्यार्चन निश्चीसी समर्थ । जेवि आर्चक गेरधी ॥ २९ ॥ तेवि माझें हृदयीं सनातन ।

स्वरूपता ज्ञान पुरातन । संरक्षितसें निय नूतन । स्वयंप्रबोधविधी ॥३०॥ अवस्थारूप अभ्यंतर । वेगळी च राखोन निरंतर । तेवीं च आठव विसर । आतळों नेदितां ॥ ३१ ॥ जैसी सुगरिणी महा चतुर । आम्लकटुत्व तीक्ष्ण मधुर । विविध रुची रस सार । वेगळिकेनें राखे ॥ ३२ ॥ तेवि जगत्कारण साक्षत्वीं । राहटी होतसे अनेक तत्वीं । विवेक प्रतिष्ठुनी सत्वीं । प्रत्येकपणें संरक्षी ॥ ३३ ॥ जैसें कुटुंबाचें संरक्षण । करूं जाणे कुटुंबी सज्ञान । जयाचें तयापरी प्रमाण । संरक्षी चुकों नेदितां ॥ ३४ ॥ परस्परें सख्यें वैरें । कल्हो मैत्री पृथुकाकारें । ऐकोनी कानीं विस्तारें । हृदयीं च राखे ॥ ३५ ॥ तैसा थोर हृदयाचा सांठोवा । मी विश्वकुटुंबी निज जीवा । राखो जाणे तत्व विभवा । पृथुकाकारें ॥ ३६ ॥ तृतीय साक्षत्व जगत्कारण । माजि निश्चय पाहिजे असाधारण । येथें चि ब्रह्मादि साधारण । बुडाले शुद्धि चि नाहीं ॥ ३७ ॥ या साक्षत्वीं अज्ञान प्रबळ । ज्ञानें चि वेव्हारिले सकळ । निजप्राप्तीचें अकळ । कळांत योजिलें ॥ ३८ ॥ ते अदृष्टगतीच्या योगें । कोठें मुद्दल चि बुडालें प्रसंगें । तेथें कळ्यांतर कैंचें संसर्गें । दुःखासी पात्र चि केलें ॥ ३९ ॥ कोठें मुद्दलें सहीत कळ्यातर । प्राप्त जालें निरंतर । कोठें मुद्दल स्वयंभ साचार । निय कळांतर दुभतसे ॥ ४० ॥ एवं या साक्षत्वाची स्थिती । स्वरूपीं जागृत प्रत्यावृत्ती । असतां चि वेरें आत्मप्रचीती । उद्बोध परायणा ॥ ४१ ॥ एवं नित्यानित्य विचारें । हृदयींच्या निजनिर्धारें । उपरमोनी साक्षत्व विवरें । पैस धरिला अकळ ॥ ४२ ॥ त्रिविधा आत्मा उपरमोनी । उपरमला बोध संस्थानी । विराला स्वानंद सनातनी । यातें परमात्मा ह्मणिजे ॥ ४३ ॥ परम ह्मणिजे उत्कृष्टार्थ ज्ञान । ज्ञानें धरिलें स्वरूप संस्थान । यास्तव परमात्मा अभिधान । पावलें मज ॥ ४४ ॥ या साक्षत्वीं साक्षत्वरहित । उमज तूं परमात्मा अनंत । आतां शिवसाक्षत्व सर्वगत । अवधारी पुढें ॥ ४५ ॥ इति श्री भीमोपदेश । प्रत्यगात्मा स्वप्रकाश । परात्पर परम पुरुष । ह्मणे मेरु अनंत ॥ ४६ ॥ नवम सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥

श्री

## सूर्य ९ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी शिव सर्वगत । उकार मातृकात्मक प्रतिष्ठित । विश्वकारणासी संरक्षित । असे विस्तारेंसीं ॥ १ ॥ वृक्षाचीं स्वभावता उत्पत्ति । स्वभावें पत्रें पुष्पें फळें येती । त्याचें परिपाळन करितां स्थिती । फळ प्राप्ती आतुडे ॥ २ ॥ कांहींएक प्राप्तीविण । कवण करील प्रयोजन । तैविं ब्रह्मांडविस्तार अनुदिन । मी रक्षीतसें ॥ ३ ॥ निजानंद ज्ञान ऐश्वर्य । सत्ता प्रतिष्ठुनी स्वकीय । उत्पत्ति स्थितीनें मी चि होय । परिपाळणकर्ता ॥ ४ ॥ माझी चित्कळा घटियंत्र । तेथें प्रतिष्ठलें अभिनवसूत्र । हात न हालवितां तें विचित्र । कार्य सिद्धीसी आणी ॥ ५ ॥ वृक्षासी फळें काळानुसारें । येती ते करणें नलगेती करें । सुमनें सुवास भरें । भरावें नलगेती ॥ ६ ॥ विविध फळ रस गोडी । अष्टादश धान्य परवडी । नाना पदार्थ काडोविकडी । संभव सहजें ॥ ७ ॥ पृथ्वी विस्तारली सहज । हें मूळ वृत्तीचें वळ सतेज । अंतरिक्षीं च राहिली हें चोज । कवणासी कल्पवेना ॥ ८ ॥ मनें कल्पवेना माझा प्रपंच । ब्रह्मांड विस्तारें उंच नीच । घडमोडी होतसे विसंच । काळ करूं शकेना ॥ ९ ॥ ते माझे सत्तेनें काळ वर्ते । भूत प्रवृत्ती सर्व प्रवृत्ते । महा बळिवंत ब्रह्मांडहर्ते । सत्तेनें नि प्रवर्तले ॥ १० ॥ एका प्रतिष्टे एका उछेदी । हे सद्वृत्ती सत्ता अनादि । परंतु हे स्वतंत्र नव्हे निरवधी । ममाश्रित होय ॥ ११ ॥ माझ्या आश्रयें विस्तारा आली । म्यां चि प्रतिष्ठिली उछेदिली । तो मी शिवरूप केवळी । साक्षत्वाची निशुद्धि ॥ १२ ॥ हे वासनात्मक साक्षत्व जाण । ब्रह्मांड दुराशा विस्तीर्ण । आशा न पुरे चि फिरफिरोन । उत्पत्तीसी येतसे ॥ १३ ॥ हे पृथ्वीवरी नित्य नूतन । उपजले ते होउनी लीन । पुन्हा होतसे उपन्न । ब्रह्मादि तृणवरी ॥ १४ ॥ नित्योत्पत्ति नित्यलय । हें चि नित्य परिपाळन होय । यां जे अमृतकंद मी सूर्य ।

असे विश्वहृदयीं ॥ १५ ॥ जैसीं रावणाचीं दश शिरें । अनिवार श्रीरामाच्या शरें । छेदितां समरीं विस्तारें । पुन्हा उद्भवती ॥ १६ ॥ कां जें अमृतकुंभ हृदयीं । होता ब्रह्मदत्त तेणें चि पाहीं । शिरें उगवती लवलाहीं । अमृताच्या प्रभवें ॥ १७ ॥ तेवि जगत्कारण अमृतकुंभ । वसे विश्वहृदयीं मी स्वयंभ । ब्रह्मादि व्यक्ति दसलक्षांत कोंभ । निघती काळ विशेषें ॥ १८ ॥ विश्वोद्भव असुरवृत्ति । दुर्भेद्य अहं रावण प्रवृत्ति । स्वरूपानभव अमृतावृत्ति । गवसलें विश्वीं ॥ १९ ॥ हें असुरवृत्तीचें उदर । मी चि होऊनि ज्ञानी अगोचर । निर्वाण ज्ञानशरें साचार । जरीं शुद्ध करील कां ॥ २० ॥ तरी तो ज्ञानी मी धनुर्धर । करूनि अहं रावण विदार । काढुनी निज बोधामृत सार । अमर-उपजीविकेसी दे ॥ २१ ॥ हें कल्याण शिवसत्तामय । माझी कर्तव्यता विजय । होय ईश्वरता सदोदय । साक्षात्कारिणी ॥ २२ ॥ वरें असुरांसी प्रवर्तवी । शरें निर्वाण निवर्तवी । ज्ञानपरंपरेसी वर्तवी । स्वानंद स्वराज्यें ॥ २३ ॥ अज्ञान जीवासी निज उमजें । काळ विशेष भवव्याजें । शिणऊनियां दुर्घट काजें । पश्चात्तापासी आणी ॥ २४ ॥ देउनी चित्तीं निज विवेक । प्रबोधऊन-लौकिक वैदिक । सांगोनी स्वरूप सोयरीक । निववी स्वसुखें ॥ २५ ॥ स्वरूपदानें होउनी उदार । न पाहतां चि कांहीं अधिकार । न म्हणतां जीव लहान थोर । स्वरूप चि करी तया ॥ २६ ॥ बोध प्रचीतीच्या निर्धारें । सारुनी किंचित्ज्ञताकाविरें । परब्रह्म साचोकारें । जीवासी प्रतिष्ठी ॥ २७ ॥ तो मी कल्याण कैलासनाथ । आत्मज्ञान कल्पद्मसमर्थ । या चि साक्षत्वीं कृतार्थ । जगासी करीत आलों ॥ २८ ॥ मुळींचें साक्षत्व तें अद्वैत । तेथें कृतार्थतेचा नसे हेत । कारण साक्षत्वीं दुर्हेत । अज्ञान प्रबळ ॥ २९ ॥ वृक्षासी फळ आलें नसता । रसाळतेची कायसी कथा । रूपेंवीण डोळसता । देखेल काय ॥ ३० ॥ जग विस्तारा आलें नसतां । बोधावें कवणा कवणें तत्वता । त्यास्तव विश्वरूप अहंता । वासनेसी बोधिजे ॥ ३१ ॥ वासना बहुविध उपाय । स्थूळ उपभोगाचें आलय । त्या

जडप्रिती कवणें काय । बोधावें कैसें ॥ ३२ ॥ आसत्व - वासनात्मकीं प्राण । जालें प्रबोधासी कारण । तें ईश्वरत्व ज्ञानघन । निरोपिलें शिवरूप ॥ ३३ ॥ इति श्री भीमोपदेश । सत्ता शिवरूप प्रकाश । आत्मानुभवें निजभ्यास । ह्मणे मेरु अनंत ॥ ३४ ॥ नवम सूर्य नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥ श्रीदाशरथी रामार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ९ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

॥ श्रीराम स्वयंभ मी निरावेव । सकळ जीवांचा निज जीव । माझेनिं जीव जगती स्वभाव । स्थितीगतीसी आला ॥ १ ॥ उभऊन तत्वाचें अलय । कडोविकडी विविध उपाय । मज सुखघनासी विलास होय । ऐसें सूत्र प्रतिष्ठिलें ॥ २ ॥ जैसा कां सुवर्णाचा स्वयंभ । रथ निर्माण केला सुप्रभ । वळोत्तर अश्वगतीनें नभ । आक्रमिजेत तेणें ॥ ३ ॥ तैसें स्थूळ शरीर मनोहर । दिव्य विलास स्थिती सुंदर । मज ज्ञानघनासी उपचार । होती येणें चि द्वारा ॥ ४ ॥ शरीर नाना कळात्मक । अवघें ज्ञानमय येथ कौतुक । दिव्य उपभोग अनेक । उपाय येथ वर्तला ॥ ५ ॥ देह प्रसिद्धी करितां । दिसोनी आली नाना योग्यता । नाना कळा चातुर्य सत्ता । शरीरोद्भव सृष्टी ॥ ६ ॥ दिव्य आकृतीचेनि प्रसंगें । अचळ तें हि फळों लागे । सांगणें ऐकणें देहयोगें । हितगुज निवळे ॥ ७ ॥ देव दानव मानव कोटी । शरीराचेनि प्रसिद्ध सृष्टी । महा पुरुषार्थ प्रगनेठी । वळिवंत देहाचेनि ॥ ८ ॥ वेदार्थकीर्ति प्रचापवंत । सुचिष्मंत आणि बळवंत । देहाचेनि योगें महामहंत । प्रसिद्धीसी आले ॥ ९ ॥ सिद्ध साधु ऋषी मुनी । देहयोगें विख्यात जनीं । जेविं प्रभाचक्षुचेनि रूप न्याहळे ॥ १० ॥ नाहीं तरी अवघाचि अंधकार । कवणासी कळेल सारासार । कवण सांगेल विचार । कवणाप्रती ॥ ११ ॥ या मार्गे शरीरोद्भव । कार्यकारण चालिलें सर्व । श्री शरीराचा

अंतर्भाव । स्थूळीं निवळला ॥ १२ ॥ द्विभुजें चतुर्भुजें नागरें । विविध
मार्शी दिव्य शरीरें । नाना प्रसंगीं मनोहरें । तेणें चरित्रें रूढलीं
॥ १३ ॥ मनोहरा अनंताकृती । विश्वंभर नांदे मी जगतीं । विश्व-
कुटुंबी मी आयतीं । एकाकी एकला ॥ १४ ॥ जैसीं जीर्ण वस्त्रें त्यागुनी ।
नूतन स्वीकारीजेत जनीं । तेविं नाना देहाच्या आभरणीं । मी चि
शृंघारतसें ॥ १५ ॥ एकाकी अखंडता निज । काळ क्रमेना ह्मणउनी
मज । एक चि अनेक सतेज । शरीरें धरी ॥ १६ ॥ जैसीं मृत्तिकेचीं
लेपें । कर्ताराचेनि संकल्पें । अनेकाकृति दिव्यरूपें । होत जाती
किती ॥ १७ ॥ केलें तें नये चि मनासी । ह्मणोनि नूतन करी
विशेषीं । ऐसीं च घडामोडी सृष्टीसी । चालिलीसे पहा ॥ १८ ॥
परंतु या शरीरयोगें । देह लोभ ममता लागे । शीणजेत तेणें प्रसंगें ।
हें एक दुर्घट ॥ १९ ॥ रचिलें मनोहर टवळार । त्यांत वसतां सुखकर ।
अवचिता खचोनी संव्हार । कर्तयाचा करी ॥ २० ॥ तैसें शरीराश्रितासी ।
देहबुद्धि आणी नाशासी । आत्मा अविनाश तयासी । वृद्धि क्षय होय
॥ २१ ॥ त्यास्तव देह संस्कार । दावी जन्ममरणें दुर्धर । अज्ञान आवरण
शरीर । बंधन आत्मयासी ॥ २२ ॥ देहबुद्धि लोभ धरितां । अप्रांत दुःखें
देहावस्था । विवेकें देहबुद्धि त्यागितां । सुटिका होय सहजे ॥ २३ ॥
न धरितां देहबुद्धि । शरीरोद्भव कर्म न बाधी । देहातीत कृतबुद्धि । ते
समाधी पैं जाण ॥ २४ ॥ असतां देहबुद्धीपर । न लगे ब्रह्मज्ञान इतर ।
न लगे निलानिल विवर । करणें कांहीं ॥ २५ ॥ साधु सज्ञान प्रज्ञावंत ।
नित्य असती देहबुद्धीतीत । त्यास्तव कल्पना दुर्हेत । तयासी न बाधी
॥ २६ ॥ असो या देहयोगें अभिनव । आवरला ज्ञान व्यापक जीव ।
देहविचारें अंतर्भाव । गुरुमुखें ऐकिला ॥ २७ ॥ चहूं देहाची भाजणी ।
केली आत्मज्ञान उजळणी । जागृति स्वप्न सुषुप्तीहुनी । परता निवळलों ॥ २८ ॥
मुळींचा मी येथ फळा आलों । फळीं स्वानंदरसें मुसावलों । फळांच
रसनायोगें धालों । निवालों तृप्तीनें ॥ २९ ॥ महाकारण कारण देह ।
तिसरा सूक्ष्म वासनामय । स्थूळाचेनि प्रशस्त होय । ज्ञान इतुक्याचें

॥ ३० ॥ महा कारणींचा स्थूळासी आलों । मुळींहूनि प्रवृत्तीसी पडलों । चांग स्थूळदेहाचेनि उमजलों । सकळ कांहीं ॥ ३१ ॥ त्यास्तव नरदेह पावन । जाला देहबुद्धासी उत्तीर्ण । सकळ देहपंग फेडून । कृतार्थ केलें ॥ ३२ ॥ देहासी कृतार्थ केलें जीवें । जीवासी पावन केलें देहोद्भवें । परस्पर-उत्तीर्णता भावें । भोगिलें स्वराज्य ॥ ३३ ॥ हें प्रथम साक्षत्व पावन । येथें चि तरलें बहुत जन । भवसंकल्प निदान । जाला सर्वसें ॥ ३४ ॥ जाली भवभयनिवृत्ती । सरली संकल्प प्रवृत्ती । निरोपम स्वरूप प्राप्ती । अवधारी पुढें ॥ ३५ ॥ सर्वाध्यक्ष तत्त्व विद्रुपा । निरोपमस्वरूप परेशा । माझें हृदय तोपवी शेषा । पुढती निवळे ॥ ३६ ॥ इति श्री भीमोपदेश । पावन नरदेह विशेष । देह साक्षत्वातीत तोषं । म्हणे मेरु अनंत ॥ ३७ ॥ नवम सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ९ कळा ११

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी साक्षत्वातीत । सत्य स्वरूपें अखंडित । ज्ञानयोगें असे अनुभवित । मज मी सर्वदा ॥ १ ॥ अभेदानुभव कडसणी । मगा निरोपिली तुज लागुनी । पुन्हा पुन्हा प्रांजळ करूनी । तें चि सांगणें लागे ॥ २ ॥ एका स्वरूपावीण कांहीं । पाहतां दुजें कांहींच नाहीं । तैसा चि ज्ञाना वांचुनी पाहीं । उपाव दुजा नसे ॥ ३ ॥ स्वरूप आणि स्वरूप ज्ञान । पुनःपुन्हा उदघाट होऊन । प्रचीतीसी नित्य नूतन । येतसे पहा ॥ ४ ॥ अमर संदोह संपूर्ण । नित्यानुवृत्ती अमृतपान । करितीं तैसे संत सज्जन । पान अनुभवामृताचें ॥ ५ ॥ निरवबोध सुधामय । चर्चा होतें महा विस्मयें । तेथें नित्य अमृतें सूर्योदय । होय दिवस सुखाचा ॥ ६ ॥ साठी घटिकांमध्यें एक । घटिका आत्मचर्चेची सम्यक । जाय तरी तो सुखात्मक । दिवस सुवर्णाचा ॥ ७ ॥ सर्व प्रवृत्तीसी अत्यादरें ।

मन प्रवर्ते विषयाधारें। परंतु स्वरूप साक्षात्कारें। कोणी हि न प्रवर्ते ॥ ८ ॥ हा अभ्यास देहबुद्धीचा। विषय सोस वृत्तीचा। सर्वकाळ संश्रुतीचा। अभ्यास करिती ॥ ९ ॥ याकारणें सत्वशीळ। विषयीं उदास केवळ। स्वरूप साधनपर सकळ। प्रवृत्तीसी घालिती ॥ १० ॥ नित्य नेम प्रातःकाळीं। स्नान संध्या जपानुमेळीं। ध्यान धारणा अंतराळीं। साधिती निज लक्ष ॥ ११ ॥ निरावलंब धारणा। समाधीपर अंतःकरणा। साधून समाधी निरावरणा। आचरिती सुखें ॥ १२ ॥ प्रवृत्तीच्या प्रसंगें करूनी। संतृप्त करिती भूतमात्रजनीं। एक अंतःकरण दया कारणी। प्रवृत्ती जयाची ॥ १३ ॥ आत्मवत्परावें जन। मानून दया संपन्न दान। वाग्माधुर्ये करून। निववितीं सकळां ॥ १४ ॥ परोपकारा एवढें जनीं। सुकृत नाहीं गा पावनी। सर्वभूतीं मजला चि देखोनी। भजती ते चि महा जन ॥ १५ ॥ सर्वघटीं मी द्रष्टा अनंत। ज्ञान प्रतिष्ठा माझी अखंडित। जाणोनी सज्जन सप्रचीत। आराधिती मजला ॥ १६ ॥ मज वांचुनी दुसरें कांहीं। जयाचे दृष्टि दिसेना पाहीं। विश्वरूप मी सर्वदेहीं। सर्वोत्तम प्रतिष्ठलों ॥ १७ ॥ माझी आस्तिक्यता अद्वय। देखती सर्वभूतीं प्रत्ययें। तें चि होऊनिया निश्चयें। भजती तया ॥ १८ ॥ याकारणें प्रवृत्तीस्तव। वेचोन सर्वस्वें गेले जीव। परंतु स्वरूपाच्या भोगें निर्सव। चिरंजीव नव्हे ती ॥ १९ ॥ ज्ञानामृत असोनी हातीं। पान करूनि अमर नव्हेती। व्यर्थचि मरमरोनी जाती। बापुडे जीव ॥ २० ॥ हे देखोनी जनप्रवृत्ति। सज्जन जीवीं कळवळिती। तया दयार्द्र चित्तें बोधिती। परोपकारार्थ ॥ २१ ॥ परोपकारार्थ आत्मज्ञान। नित्यबोधें निरोपण। नित्यनेम निजानुसंधान। घाली ज्ञानान्न छत्र ते ॥ २२ ॥ आपुली जैसी सुटिका जाली। ते चि प्रचीतीनें आगळी। परिपाळिती वंशावळी। साखिकांची ॥ २३ ॥ या कारणें तूं बोधपरायण। आत्मनिष्ठ साधनसंपन्न। बोधशक्तीनें मुमुक्षु जन। कृतार्थ करी ॥ २४ ॥ बोणव्यांत सांपडले कोणी। उडी घालूनी

काढावें जनीं । तैसे या भवाग्नीतुनी । जनासीं काढावें ॥ २५ ॥ भव प्रवृत्ती गोड वाटे । परंतु हे मरणें चि अवचटें । नाना उपायाच्या वाटे । काढावे यथांतुनी ॥ २६ ॥ भव मरणार्णव दुस्तर । कामक्रोधादि सावज क्रूर । ईक्षणमात्रें चि अपहार । करितीं जीवाचा ॥ २७ ॥ काळ विक्राळ जळावृत । महाप्रळय त्याचा उसळत । मातला मरणार्णव क्षोभित । सखोल जीवनें ॥ २८ ॥ या भवार्णवांतूनि सोडवी । तो महानुभाव जाण जीवीं । सद्गुरुवांचुनीं या विश्वीं । दुजा कवण आहे ॥ २९ ॥ जाण सद्गुरूचे दयेस्तव । भवार्णव चि जाला थाव । गुरुदयेनें चि सर्व जीव । परपार पावले ॥ ३० ॥ ते सद्गुरुदया सनातन । प्रचीतीसीं आली सुखैकघन । त्या गुरुकृपेच्या अनुदिन । चर्चा करिजेत सुखें ॥ ३१ ॥ अपरोक्ष आत्मज्ञान झरा । प्रचीतीसी आणूनि वरा । चालवावा वचनद्वारा । श्रवण परियंत ॥ ३२ ॥ श्रवण मुखें करूनि । न्यावा नित्य अंतःकरणीं । मनन निजध्यास धरणी । खेळवावा सुखें ॥ ३३ ॥ मग तो सफळ साक्षात्कारें । फळेल निजप्राप्तिद्वारें । नित्यनेम साधन प्रकारें । पावे हे उपजीविका ॥ ३४ ॥ आतां अतितत्पर अवधानीं । साधी स्वसुख संजीवनी । चिदाकारा मतीनें आणी । अनुभव गिरी द्रोण ॥ ३५ ॥ अहं रावण संस्कारें । पडिले मृतजीव वानर धरे । ते संजीवनी योग समीरें । सावध करी रुद्रा ॥ ३६ ॥ तूं प्रचीतीचें अभ्यंतर । अनुसंधान योगपर । प्रबोध सृष्टीचा ईश्वर । होईं आतां त्वरें ॥ ३७ ॥ भारवाही होऊनी पुरा । करीं सृष्टीच्या निज उद्धारा । पाववीं आत्म साक्षात्कारा । सकळ सृष्टीसीं ॥ ३८ ॥ हे चि माझी जीवीची आवडी । करावी सृष्टीची सद्गती प्रौढी । उभयाची मोक्षाची गुढी । स्वराज्यसुखें ॥ ३९ ॥ ऐसीं श्रीरामाचीं वचनें । निवाला रुद्र अंतःकरणें । सद्भावा श्रीरामा-चरणें । समर्पिलें निज मस्तक ॥ ४० ॥ पदीं ठेउनी शिर मल्हार । वदन निरीक्षी वारंवार । सप्रेम निज जिव्हारें । पुसोनी दास ॥ ४१ ॥ म्हणे मी तुझा शरणागत । आज्ञाधारक निश्चितार्थ । विश्वकारण सत्ता समर्थ । तुझी सर्वोत्तम ॥ ४२ ॥ तुझे आज्ञेनें विश्व प्रवर्ते । महाकाळ

आत्मत्वें वर्ते । सर्व कर्तव्य सर्वार्थे । तुझेनि चाले जनीं ॥ ४३ ॥ साच चि डोलियाचें पातें । ते हीं न हाले विना तव सत्ते । तुझे इच्छेनुसार सर्व भूतें । प्रवर्तती जगीं ॥ ४४ ॥ विश्वहृदया रघोत्तमा । विश्वपावन परंधामा । मजला प्रबोधिसी निजप्रेमा । कृपेनें अद्भुत ॥ ४५ ॥ तुझिये दयेची प्रसन्नता । प्राप्त केले मज आत्मत्व सत्ता । कृपेसी पात्र करूनि तत्वता । प्रतिष्ठीसी बोधीं ॥ ४६ ॥ तूं जें केलें तें होय अविकळ । सत्वेंनें पाषाण तारी जळ । तैसें चि मी एक गोलांगुळ । करविता काय एक न करी ॥ ४७ ॥ ऐकोनी रुद्रमुखींच्या गोष्टी । श्रीराम संतुष्टला पोटीं । पुढें उभयतांच्या चर्चा सुख कोटी । अवधारिजे ॥ ४८ ॥ इति श्री भीमोपदेश । परोपकार बोधविशेष । पावन करीतसे जगतीस । ह्मणे मेरु अनंत ॥ ४९ ॥ नवम सूर्य एकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ ॥



श्री

## सूर्य ९ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सत्यानंतहृदया । अपरोक्ष पूर्ण दया । तेणें स्वरूपानुभवच्यर्या । आचरीत जालों ॥ १ ॥ पाहतां स्वरूपतेची स्थिति । स्वानंद होतसे चित्तीं । अप्रांत सुखाब्धी प्रति । मज्जाविले स्वसुखें ॥ २ ॥ अपरोक्ष दशेचा निर्धार । करूं जातां होय चमत्कार । चमत्कारेंसी अभ्यंतर । स्फूर्तिविहीन होय ॥ ३ ॥ द्रष्टत्वीं च द्रष्टा विरे । ते द्रष्टुत्व स्वरूपें अवतरे । दृश्य त्रिपुटितीत उरे । निज निर्विकार ॥ ४ ॥ ऐसें हे स्वभाविक ज्ञान । अपरोक्ष दशेचें चिन्ह । सत्चित्सुखानंदघन । प्रचीतीसी आलें ॥ ५ ॥ सहज स्थितीच्या सुखभरें । विदेह कैवल्यगती निर्धारें । बोधें चि स्वरूप साक्षात्कारें । असतां सहज ॥ ६ ॥ बोध प्रचीतीसी येउनी । बोध बोधातीत होउनी । बुडाला स्वानंद जीवनीं । बोध संस्कार ॥ ७ ॥ सहज अद्वैताचा बोध । अद्वैतपणें जाहला सिद्ध । आतां साक्षत्वासी समंध । कांहीं च

नसे ॥ ८ ॥ अवचट दशेनें मुराला । अद्वैत स्थितीनें स्थिरावला । जैसा वन्हिशेजेसी उपशमला । विशुद्ध कर्पूर ॥ ९ ॥ अद्वैतीं पाहतां दुसरें । असे चि ना विश्वाकारें । कर्ता चि नाडळे साक्षात्कारें । जो बोधासी कारण ॥ १० ॥ जग विकृतीसी आलें चि नाहीं । जगदांतर बोधकर्ता ही । त्या अद्वैत स्वरुपीं कांहीं । कार्यकर्ता नुमसे ॥ ११ ॥ ऐसें अनुवादितां भीम । ह्मणे भला रे भला श्रीराम । तूं अद्वैतबोधवेत्ता परम । अद्वैत चि होसी ॥ १२ ॥ तुज अद्वैतबोध कैसा जाला । कवणापासुनी प्रलया आला । कवण गुरु होय तुजला । जो अद्वैत कर्ता ॥ १३ ॥ जेणें प्रचीतीसी आला बोध । तो सद्भाव शुद्धबुद्ध । बोध उपपत्तीनें वेध । तुज जाहला कैसा ॥ १४ ॥ कोणी एक विद्या अभिनव । जीतें मारुनी कीजे सर्जीव । विद्या अभ्यासितां स्वभाव । मारणें चि शिकला ॥ १५ ॥ निमाल्याप्रति उठवणें । शिकला नाहीं आळसवृत्तीनें । तैसें चि तुझें अभ्यासणें । जालें तुझिया निश्चयेसी ॥ १६ ॥ गुरूनें उपेदिलें निर्वाण । पंचत्व पावला शिष्य निदान । हें शून्यबोध स्थितीचें ज्ञान । दिसतें तुजपासीं ॥ १७ ॥ तुझे प्रचीतीसी आले अद्वैत । ते प्रचीतीनें जालासी शांत । तें बोधावयासी कारण हेत । उरला नाहीं ॥ १८ ॥ ह्मणोनी युक्तीच्या बळें । साधितोसी अद्वैत ठीके । ते चि प्रचीतीनें वरलें । अद्वैतबोधसुखें ॥ १९ ॥ अद्वैत बोधामृतें धालासी । अद्वैत विश्रांती आलासी । अद्वैत सुखें निवालासी । जैसा तूं कपिश्रेष्ठा ॥ २० ॥ हे महा अद्वैत संपत्ती । अनुभवितोसी मारुति । त्या बोधाधैर्ये जगती । संतुष्ट करी बोधविमर्श ॥ २१ ॥ श्रीराम अनुवादतां ऐसें । रुद्रासी प्रबोध विशेषें । बोध स्फुरण संतोषें । द्याकिला पार ॥ २२ ॥ जननी प्रती त्या अर्भकें । अळी घेउनी मागिजे भातुकें । तेवि दयाब्धी कौतुकें । तुजप्रती सलगी करीं ॥ २३ ॥ म्या आळि घेतलियां निर्हेत । तूं प्रबोधिशीं कांहीं उचित । तुझें मुखीचें चि ऐकणें निश्चित । आवडे मजला ॥ २४ ॥ निग्य बोधामृताचे सुरस । आपुल्या करें घालिसी ग्रास । तें मी शरणमुखें हृदयास । आणितां निवतसें ॥ २५ ॥

जैसी कुमरी माहेरघरीं । निःशंक उपचाराचे परी । लाहे ते श्वशुरमंदिरीं । संकोचे सर्वस्वें ॥ २६ ॥ तैसें स्वबोधीं मजला सुख । प्रबोधासी नचलचि मुख । तुझ्या चि बोधीं हरिख । मजला अत्यंत असे ॥ २७ ॥ ऐसा लडिवाळ मर्तनें । बोलतसे लाडकीं वचनें । श्रीरामासी सुखें तेणें । पार लाकिला ॥ २८ ॥ ह्मणे ऐक रे स्नेह लडिवाळ्या । तुझा अनिवार प्रेम जिव्हाळ्या । तुझ्या संभाषणीं च कल्लोळ्या । उपजे मज बहु ॥ २९ ॥ आतां करूनिया अवधान । सावरीं हृदय तुझें संपूर्ण । सांठवी स्वबोध निजनिधान । अंतरनिष्ट रुद्रा ॥ ३० ॥ नव्हे लापणिकेचा विचार । सुखें मळ्वळिलें माझें जिव्हार । ऐक आश्चर्याची अगोचर । सांगेन तुज उपपत्ती ॥ ३१ ॥ या गोष्टीमाजी रिघोनि तुवां । वरवा अंतर्भाव घ्यावा । कां जे तुजवांचूण बोधवी भवा । अधिकारी न दिसे ॥ ३२ ॥ पुढती पुढती मनापासून । करावें वाटे तुझें स्तवन । कां जे तूं गुणवंत निधान । गुण आठवती तुझे ॥ ३३ ॥ असाधारण तुझी स्थिती । वेध होतसे माझिये चित्तीं । तुझे गुणानुवाद मारुति । बोलता पार न लगे ॥ ३४ ॥ तूं मूर्तिमंत माझा प्रेमा । मम स्वरूपानुभव भीमा । साक्षात्कारा अंतर्यामा । विश्रांती उदधि ॥ ३५ ॥ महत्सुख महा संबोधनें । गिरा गौरवींतसें सुवचनें । मज विसरोनी तुझिये प्रीतीनें । स्तुतिवादासी आणिलें ॥३६॥ भव कल्पांत कल्मष हरा । कारुण्य जळधी कपिवरा । ज्ञानविभव पुरंधरा । विशाळ बुद्धि ॥ ३७ ॥ भव संस्कार विगत मती । माझे हृदये चि तुज प्रती । देईन प्रचीतीच्या हातीं । घेई सत्चित्सुखें ॥ ३८ ॥ अप्रांतासी करूनि प्रांत । देईन तुज सुख अमित । बोध श्रवणीं सावचित्त । बैस आतां कपिश्रेष्ठा ॥ ३९ ॥ तो बोधामृत संवाद । स्वरूपप्राप्तीचा स्वानंद । अवधान देउनी सत्चित्सुखकंद । अवधारिजे पुढें ॥ ४० ॥ इति श्री भीमोपदेश । बोध उपक्रम उद्देश । उपपत्ति युक्ति विशेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ नवम सूर्य द्वादश कळ संपूर्णमस्तु ॥ १२ ॥ श्रीगोविंद ॥

श्री

## सूर्य १० कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामें मी माझ्या स्वरूपीं । सप्रचीत ज्ञान सुमन तल्पीं । विसांवलें विसांवलों संकल्पीं । निर्विकल्प दर्शनें ॥ १ ॥ ज्ञानघनव्यापकता । सिद्ध स्वानुभुति स्वरूपता । संबोधना आणुनी तत्वता । बोधवीं मी मातें ॥ २ ॥ माझी अनंत स्थिती ऐसी । नामरूपाची सोय पाहसी । मी चि होउनियां निश्चयेसीं । अनुभवीं मज ॥ ३ ॥ तत्वता वस्तुबोध सुचर्या । वेद वैरागर वैडुर्या । निजांगदर्पण चित्सूर्या । प्रभेनें त्रिलोकीं ॥ ४ ॥ एकेक अनंत प्रचीतीने । संत अनंत स्वरूपतेनें । अनेक बोध आत्मस्थितीनें । अनंतानंत रूढां ॥ ५ ॥ नवम सूर्य पर्यंत । उपदेशक्रम अद्वैत । दशम सूर्यीं महा वीर्यवंत । ब्रह्मानुभवी भीम हा ॥ ६ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण । पिंडाचें चौथें महाकारण । ब्रम्हांडींचें तत्त्वप्रस्थानं । हृदयींच धरूनि ॥ ७ ॥ परतोनियां जन्ममूळासी । केली स्वरूपींच मिरासी । कांहीं एक दशा निश्चयेसीं । जाली परंपरा ॥ ८ ॥ परंपरा त्रिजगती ज्ञानी । सच्चिदानंदघन महाप्रस्थानीं । अन्वयबोध गुज अनुभवोनी । सहज वाचेसी आणिलें ॥ ९ ॥ तें हें ग्रंथरूप अनुसंधान । ग्रंथाकृती स्वयें भगवान । अवधान शाखोपशाखा ज्ञान । शाखामृग विहारी ॥ १० ॥ ज्ञानबाळसूर्य धर्वसें । कायाविशाळरूपी प्रकाशे । गगन भरोनी उसळतसे । गगनातीत ॥ ११ ॥ सशांत स्थितीनें निवांत । आपआपणा विसांवत । ते चि देऊनिया अवधान संत । अवधारिजे ग्रंथीं ॥ १२ ॥ अतिशयेसी चपलता । न पवे तें स्थळीं पावे सवेगता । सप्रचीतीचीं फळें तत्वता । आरोगित सुखें ॥ १३ ॥ आत्माराम बोध सुरद्रुम । अनंत उपक्रम निरूपम । दृष्टांत द्राष्टांत परम । फळ प्राप्तांसी आला ॥ १४ ॥ रामकृपा पारिजाताश्रित । तपोवन विहारी अद्भुत । प्रचीती किराणें झेंपावत । अर्थरूप फळें ॥ १५ ॥ तत्वतस जांबुनदवर्ण । बोधबाळसूर्य भीम-भगवान । आत्माराम चिद्गगन । गतीनें आक्रमी ॥ १६ ॥ साधन तपश्चर्या

रूढली । अनुभव कल्पवल्ली विरूढली । परम सायुज्यता पवाडली । भीमरूप ग्रंथें ॥ १७ ॥ विवेककर ज्याची दीप्ती । प्रकाशित कोटीसूर्य कांती । प्रकाश स्फटिक गाभाद्युति । स्वच्छवर्ण शोभा ॥ १८ ॥ सत्यसंकल्पामुळें पाहतां । अनेकपणाची अनेकता । भीमग्रंथ हृदयसत्ता । सीताराम स्वरूपें ॥ १९ ॥ लवभरीं अवकाशीं काळ । कीं अणुमाजि वसे अंतराळ । अमृतकणामाजि रसाळ । अमरता वसे ॥ २० ॥ गुरुकृपेचा एक उन्मेश । पावत्री अनंत हरुप । तैसा ग्रंथरूप हा अशेप । रूढे भीम जगजेठी ॥ २१ ॥ हनुमंत स्वरूपाचा दीप । कीं स्वरूपप्राप्तीचा संकल्प । हनुमन्नाटक सद्रूप । ग्रंथवर्चसें ॥ २२ ॥ वेदपाठक प्रणवमुळीं । अद्वैत नाटक कथा कल्लोळीं । भारती वाहे मनमुळीं । गंगा ऊर्ध्वगतीनें ॥ २३ ॥ दहराकाश महां सभा । सभापती कैवल्यगाभा । बोध उपक्रम नाट्य शोभा । कथा कौतुहल हे ॥२४॥ अष्टभाव विद्याविशारद । अष्टतत्त्वें विवर्जित संवाद । अष्टावधानें होय उद्बोध । अभिनव कळा ॥ २५ ॥ निवांत आत्माराम नृपती । निवृत्तीपर संत महा मती । साक्षत्वसत्ता आवर्ती । नाट्य करी चित्कळा ॥ २६ ॥ विश्व हें स्थूल व्यक्तीसी आलें । जेथुनी प्रवृत्तीसी रूप जालें । त्या विज्ञान तत्त्वासी आणिलें । शृंगारूनि सभेसी ॥ २७ ॥ लघु लाघवता चपळ परी । नाना हावभावें नृत्य करी । अपेक्षित रूपातें अंगिकारी । नटनटी स्वरूपें ॥ २८ ॥ ऐसें जें सूक्ष्म ज्ञानतत्व । विश्वरूपाचें महा महत्त्व । त्रिगुण प्रवृत्तीनें शुद्ध सत्व । बहुधा न टळे ॥२९॥ उन्मनीहून परतें । अनुभव अधिष्ठान तें । नाना रूप नाना व्यक्तीतें । तेंचि प्रसवलें ॥ ३० ॥ जगत्कारण कार्यावेशें । विश्व उपक्रम बहुधावेशें । रूपासी येउनी सावकाशें । असे विस्तारलें ॥ ३१ ॥ अंतरीं असूनि पुरुषता । बाहेरी नटले व्यामोहता । अविद्याविकारी वनिता । बहुधारूपें ॥ ३२ ॥ ज्ञानचक्षुसी आच्छादुनी । विनोदार्थ अज्ञान दढाउनी । स्थूळ कपडा डोळ्यां घालुनी । दाखवी आंधळेपण ॥ ३३ ॥ हावभाव कटाक्षें करूनि । आपआपणातें भुलउनि । आश्चर्य कोटी मनीं भाउनी । विस्मय करी ॥ ३४ ॥ निर्विकारीं विकार साक्षत्व । मायामय महा महत्तत्व ।

एवढें नाटक करी तिचें सत्व । हृदयीं धरिलें ॥ ३५ ॥ महारुद्र विराट रूपी । पुरातन स्थितीचा महा कपी । जें जें साक्षत्व धरी खटाटोपी । तितुकेंहीं रूपासी आणी ॥ ३६ ॥ दशविध करणानुसंधानी । अंतःकरण मन बुद्धि करूनी । नाना अवस्था होउनी । विस्मयापन्न होय ॥ ३७ ॥ एवं प्रवृत्ति पररूप । निवृत्तिपर पाहतां अरूप । अर्धनारी नटेश आपेंआप । सोगें धरी ॥ ३८ ॥ षड्गुणेश्वर मूळपुरुष । चैतन्य साक्षी आत्मापरेश । शिवशक्ती नामे विशेष । एवं प्रकारें ॥ ३९ ॥ जें जें नामासी आलें सूक्ष्म । विशेषरूपाचा संभ्रम । नामरूपातीत वर्म । ठाईं पडिलें पाहिजे ॥ ४० ॥ याकारणें विवरूनि जीवीं । नामें अर्थासह रूढवीं । स्वरूपानुभव पदवी । पावशील तेणें ॥ ४१ ॥ जगदानंद विग्रह राम । आपुलें हृदय निजविश्राम । शिष्यासीं अनुकंपेनें विश्राम । देतसे आवडीनें ॥ ४२ ॥ ते महा अद्वैतदशा । अवधान देउनी परेशा । श्रवणें पाविजे आदिपुरुषा । निरंजनासीं ॥ ४३ ॥ कृपासंजीवनी सुरसें । ग्रंथश्रवणीं अर्थ सोरसें । प्रचीत अमृत हरुषें । आणिजे श्रवण वदना ॥४४॥ दशम सूर्य हा दशेचा । निखिळ अनंत बोध हा कृपेचा । जेणें श्रवणें मुक्तांचा । निज ठेवा लाभे ॥ ४५ ॥ सीतामुखें हनुमंतासी । स्वरूपप्राप्ति निश्चयेसी । तेचि अनंत मुखें मेरूसी । प्राप्त जाले सुख ॥ ४६ ॥ आतां आपुला अनुभव आपण । देउनी निःशब्दाचें उद्घाटण । अक्षरमाळा सुमन । घेइजे अर्थ सुवासें ॥ ४७ ॥ इति श्रीमत् भामोपदेश । प्रचीती सन्मात्र सत्व अशेष । निःसगता परमहंस । म्हणे मेरु अनंत ॥ ४८ ॥ दशम सूर्य प्रथम कळा संपूर्ण ॥ १ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य १० कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम तत्वांग तत्वविदा । तत्वानुष्ठित ज्ञप्तिप्रिपदा । तत्वावबोध निज संपदा । अनुभविती सिद्ध ॥ १ ॥ स्वयंभ अपरोक्ष तत्वस्वयें ।

तत्वबीज संत संप्रदायें । कारकतत्व अशिपद ज्ञेय । तत्व विदुपते ॥ २ ॥ नित्यस्वरूप नित्यानुभव । नित्योदय ज्ञान निर्भव । नित्यान्वित बोध अभिनव । तत्व जगदंतरा ॥ ३ ॥ सत्व जगदांतरीं नित्यसूर्य प्राचीं । तमसन्वकर्दमें अप्राचीं । परोक्षापरोक्ष मुळींचीं । सद्वृत्ति रूढे ॥ ४ ॥ तमें दाखउनी संसरण । भरिलें ध्वांत तमभरण । अज्ञानरूप मरण । संभवलें तेथें ॥ ५ ॥ सत्वीं ऊर्ध्व अनुसरण । नित्य संपदा स्वबोधाभरण । तेणें शृंगारिलें करण । कर्तृत्वानिराळें ॥ ६ ॥ तमरजमिश्रित वृत्तीमुळें । अव्यक्त तत्त्वबीजें सकळें । प्रकोप स्थितीच्या प्रबळें । विश्वव्यक्तीसी आलीं ॥ ७ ॥ रजें दाखविलें तत्वबंधन । तमें विस्तारलें अज्ञान । तेणें अंधपरंपराज्ञान । पांच्यभूतीक जालें ॥ ८ ॥ रजसत्वसमिश्रयोगे । विषयोपचार सानुरागें । कार्यकारण दैविक प्रसंगें । प्रीति लागली मुळींची ॥ ९ ॥ अधिष्ठान गततत्वं संपदा । त्रिगुणात्मक हे त्रिपदा । जीव पदानुसंधानें सदा । शिवपदीं रूढे ॥ १० ॥ शिवपदानुसंधानें अनुस्यूत । परिपक्व दशेनें विबोध छत्र । अनुभउनी वस्तूसी नित्यान्वित । रूढे सदसद्पदीं ॥ ११ ॥ जडाजड उपपत्तीनें । प्रांजळ बोध गुरुकृपेनें । निवळलें हृदय प्रचीतीनें । अत्यद्भुत तें ॥ १२ ॥ अवलंबुनी निरावलंब । ज्ञानें उजळिला तत्त्व कदंब । सत्त्व सद्वृत्ति स्नेह निर्बिंब । अमृत बिंब किरणीं ॥ १३ ॥ हा दैविक मानसीचा । निजयोग ठेवा मुळींचा । आंतुडला सद्गुरु कृपेचा । तत्त्व साक्षात्कार ॥ १४ ॥ डोळा चि होऊनियां अंजन । स्वयेंच निधी निरंजन । हे अनुभवकळ्या सज्जन । अभ्यंतरींची ॥ १५ ॥ अपरोक्ष ज्ञानदीप मोहरे । चक्षु होउनी अवतारे । पाहणें घालुनी पाठिमोरें । पाहे निजाग अरूप ॥ १६ ॥ सनातन स्वरूप दीक्षा । अंतर साक्षीची परीक्षा । परोक्षपक्ष रहित सीक्षा । श्री मौनी अनंताची ॥ १७ ॥ तुर्येचें साक्षत्व घेउनी । दृश्यद्रष्टा पदार्थ ठेउनी । उन्मनी अंतर्मात्र होउनी । पावलों स्वरूपीं ॥ १८ ॥ ते जडाजड साक्षत्व सरलें । तत्त्व अकाळींचें अभ्र वारलें । सत्त्व ब्रम्हधर्माचे भरलें । जीवीं अनुसंधान ॥ १९ ॥ अनंत आजविरीं सुरलें । अनंत कृपा प्रसाद उचित । स्वमुखानुभवांत वहातें ।

प्रमयें फळासी आलीं ॥ २० ॥ प्रत्यगात्मस्थितीची तूर्या । प्रबोध दिवस्पतीची चर्या । प्रशमित त्रिताप कार्या । निष्क्रय तत्त्वयोगें ॥ २१ ॥ शाश्वत अस्तिक्यधरा । प्रतिष्ठांत गती अभ्यंतरा । जडाजड वृत्ति उभारा । तेथुनी ऐलीकडे ॥२२॥ अजड तत्त्व ते ज्ञानघन । सत्ताविभवें सनातन । त्रिभुवन वपूचा प्राण । जीवनकळा ॥ २३ ॥ जड तत्त्व तें पांच्यभूतिक । सूक्ष्माचें सदन कांहीं एक । त्या सूक्ष्म तत्त्वानें अनेक । सृष्टी उभारल्या ॥ २४ ॥ सूक्ष्मामध्यें शुद्ध सूक्ष्म । निजसंयमाचा उगम । तें चि विश्वाचें अंतर्याम । अभिराम रूपें ॥ २५ ॥ तेथून क्षेत्रपर भावना बहु । स्वसुखामृत प्रासांत राहू । जेणे आत्मदिवसाची कुहू । निशा केली संपूर्ण ॥ २६ ॥ सात्विक सूक्ष्म मुळीं । धरिली तन्मात्रा कवळी । परात्पर दर्शनें जवळी । ब्रह्म रंध्रमार्गे ॥ २७ ॥ गवाक्ष द्वारा संचरण । बोधभानूचें किरण । त्या विचार उजेडें कारण । सुपुर्तीसी जाली ॥ २८ ॥ तत्व वपूचा निजनयन । उन्मन अरुवारीं कृतशयन । त्या आत्मविभूचें गहन । वर्चस पहा नयनीं ॥ २९ ॥ तामस सूक्ष्म प्रवृत्ती । स्मरण व्यामोहक सर्वार्थी । देह भावना सर्व वृत्ती । रूपासी आणिल्या ॥ ३० ॥ एवं गुणत्रयात्मक सूक्ष्म । जग वासनात्मक अंतर्याम । यातें प्रकृति बोलिजे निस्सीम । अंतःकरणरूपें ॥ ३१ ॥ आंगें सूक्ष्म तरी केवळ । परि करी स्थूळ वृत्ती चळवळ । कां जे तमोगुण संस्कारमळ । आवर्ण जाला ॥ ३२ ॥ शुद्ध अंतःकरणासी सहजें । निरावर्ण सद्वृती बीजें । अध्यात्म प्रचीती उमजें । जीवीं च उमजे जीव ॥ ३३ ॥ त्या चि जीवाचें तामस अंतःकरण । करी प्रवृत्तीचें अनुसरण । राजस सूक्ष्म वितरण । करी उपभोगासी ॥ ३४ ॥ त्रिविध सूक्ष्मापर । विशुद्ध सत्वीं निजधर । निर्गुण भावना निरंतर । तें चि अजड तत्त्व ॥ ३५ ॥ नाना संस्कारें भळें । जीवनें चि काठिण्यतेसी आळें । अति तीक्ष्णतेनें जाळें । रुढतर यत्र ॥ ३६ ॥ अजड तत्वामध्यें गहन । महत्तत्व असे भगवान । या अजड तत्वीं च विद्यमान । ब्रह्मपर प्रचीती ॥ ३७ ॥ ब्रह्माश्रित माया अजड । संसाराश्रित अविद्या जड । या उभय वृत्ती

जडाजड । आत्मत्वीं स्फुरल्या ॥ ३८ ॥ कमळ पराग नेला भ्रमरीं । तो चि तृतीसी आणूनि वेखरी । गुंजारवसुखमाधुरी । अंबरीं मिळाला ॥ ३९ ॥ अमृतार्चा संतृप्तता । अप्यायनें अमरां तनुता । देउनी अंतर-स्थिती व्यापकता । धरूनि वितुळे ॥ ४० ॥ मधुर साम गायन स्वरें । रंजउनी अश्विनीदेव विवरें । विया सुमन तल्पीं आदरें । सुलीनतेसी आणिलें ॥ ४१ ॥ दिव्यान्न परवडी स्वाद । चित्कळ्य रसनेसी स्वानंद । देउनी सुखावह अमृतकंद । गती जीर्णासी ये ॥ ४२ ॥ चिदंबर प्रावर्ण विभवें । वरी सुखानुसरण देवें । श्रृंगारविभूषणगौरवें । तोष आणिला स्थितीसी ॥ ४३ ॥ अक्षीय तोप संभूत करणें । अद्वयानुभवकारणें । तत्वंमसि येउनी मरणें । उपशांतीसी आली ॥ ४४ ॥ अजडी संभवे जडता । ते निर्विकार स्थिती तत्वता । जडीं प्रपंच क्षोभकता । निःशेष नसे ॥४५॥ जडी क्षरता समूळ । जाणिजे अविद्या केवळ । जड तचीची जाणिजे निवळ । अक्षरता सहजें ॥ ४६ ॥ हेतु उभयसाक्षीपरं । जड अजड योगें विवर । या उभयवृत्तीहूनपर । परब्रह्म सहजें ॥ ४७ ॥ आतां आत्मत्वाचा विचार । अवधान करुनी परात्पर । अवधान परायणा निरंतर । अवधारीं सुखें ॥ ४८ ॥ अवधानद्वय सहस्र श्रवणा । अवधान श्रुतीं सहस्रनयना । अवधान विश्व अंकुरणा । अवधारीं वरें ॥ ४९ ॥ अवधान सहस्रमुखें मिळालीं । समरसलीं स्वरूपसिंधुजळीं । ते प्रचीतीचीं नित्यनव्हाळी । अपरोक्षपर ॥ ५० ॥ दीपप्रभा निर्विकार । परि करी द्रष्टुत्वाचा उद्धार । तैसी अवधानता अगोचर । बोधउल्लेखासी ये ॥ ५१ ॥ सुधावृष्टीचा योगर । आरोगणेंचि करी सुस्थिर । रसना माधुर्य रससार । भावी पदार्थ तितुका ॥ ५२ ॥ जेथ अवधान आणि अनुसंधान । जालें समरसोनी समाधान । स्वरूप प्राप्तीचें जन्मस्थान । वसो नित्य अवधानीं ॥ ५३ ॥ इति श्री भीमोपदेश । सप्रचीत आणि सविशेष । अप्रात वदन अवधान शेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५४ ॥ दशम सूर्य द्वितीय फल्ग संपूर्ण ॥ २ ॥ श्रीगोविंदार्पणमस्तु ॥

श्री

# सूर्य १० कळा ३

॥ श्रीरघुनंदनाय नमः ॥

श्रीराम आत्मपरायणपरा । परा अभ्यंतर नित्य विचरा । विज्ञान आत्मत्व भास्करा । प्रकाशीं परतत्व ॥ १ ॥ आत्माराम प्रसन्नता । आत्मसाक्षात्कार आत्मसत्ता । आत्मावबोध दशा आतां । प्रगट करी ॥ २ ॥ जीवींचें हितगुज जीवीं । जीवींचा जिव्हाळा अनुभवी । हे आत्मज्ञानाची पदवी । अनुभवी स्वयें ॥ ३ ॥ आत्मज्ञान आणि स्वरूप । निर्विकल्पेंसी सत्य संकल्प । उभयरूप आपेआप । हे आश्चर्यता ॥ ४ ॥ सारदते-माजि माधुरी । महादीप्ती माजि विचारुकरी । विज्ञानदशेमाझारी । नित्य विश्व अंकुरे ॥ ५ ॥ परिणामासी येउनी आत्मज्ञान । होय विश्वरूप अनुसंधान । प्रतिक्षणी कोटी उल्लेख भान । विस्तारासी ये ॥ ६ ॥ तरी हा आपला विचर आपण । केला पाहिजे मनातन । निवात करूनि अवधान । निजसेजेसी ॥ ७ ॥ आत्मह्रदयाची विस्तीर्णता । आत्मत्व घेउनी निजसत्ता । निवांत निजसुखें तत्वता । चोतवी अभिनव ॥ ८ ॥ उल्लेख तरुवर बीजापोटीं । सामावोनी होय समेटी । ते पर संभावना विज्ञानकोटी । परतोनी पाहा ॥ ९ ॥ आपुलें आत्मत्व तें कैसें । ज्यावरी विश्वरूप प्रकाशे । विश्व समरसोनी सरिसें । सहज होय निश्चळ ॥ १० ॥ परब्रह्म प्रचीती आगळें । आपुलें चि आत्मत्व निवळे । तरी आत्मत्व तें कवणे लीळे । कळलें पाहिजे ॥ ११ ॥ आत्मत्व म्हणिजे काय ज्ञान । किंवा आत्मवस्तु गहन । कीं ब्रह्मानुभवें सनातन । आत्मत्व विळसे ॥ १२ ॥ किंवा निखिल स्वानंदाचें रूप । किंवा आत्मत्व सत्य संकल्प । या प्रचीतीचा लाउनी दीप । दावी डोळां ॥ १३ ॥ आपण तरी आत्मा चि वस्तुता । आपुलें ज्ञान आत्मत्व सत्ता । या दोहींची स्वभावता । निवळ व्हावी ॥ १४ ॥ एक स्वभावता निर्विकार । एक स्वभावता सविकार । उभय स्वभावता साचार । आत्मत्वीं स्फुरल्या ॥ १५ ॥ या कारणें हे त्रिपुटी । साचार आत्मत्वापोटीं । सत्य साक्षत्व

दृश्य कोटी । निलोद्भव उभारा ॥ १६ ॥ अखंडाचळ शिखरीं । अहं ब्रम्हास्मीची उजरी । उगमरूप अभ्यंतरीं । चंचळ सरिता ॥ १७ ॥ उगमी अतिसूक्ष्म तर । निघाला झरा अगोचर । अकळ दाटोनियां आलें नीर । कैचें कीं न कळे ॥ १८ ॥ संग्रह नसतां जीवन । नसतां प्रवाह आणि घन । न कळे उफाळलें कोठून । असंभाव्य हें ॥ १९ ॥ कवणें केलें नाहीं कांहीं । कर्तृत्वासी हि कारण नाही । कर्ता नसोनी हें सर्वहि । प्रवाहीं पडिलें ॥ २० ॥ विचारें परतोनी पाहतां । द्रष्टा चि हरपे आश्चर्यता । कवणें कवणाप्रती हें आतां । सांगिजे रहस्य ॥ २१ ॥ ब्रह्म अखंडाद्रि माथां । उल्लेख स्वरूप विश्वचलथा । चालिल्या प्रवृत्ति असंख्यता । हे आत्मत्व रूढी ॥ २२ ॥ सनातन ब्रह्मभूधर । अंकुरला साच विश्वाकार । मुळेंवीण सर्व विस्तार । असे विस्तारला ॥ २३ ॥ एव पाहतां आत्मदर्शनें । द्रष्टा चि होय विश्वस्फूर्तीनें । सवेचि उपशामवृत्तीनें । होय द्रष्टत्वा निराळा ॥ २४ ॥ गगनीं अभ्र उदंड आलीं । सवेचि वितळोनियां गेलीं । परि ते गगनाची संचली । निश्चळता ॥ २५ ॥ आत्मस्वरूप संचलें । आत्मत्वाचें रूप जालें । परि तेणें करितां हालविलें । नसे चि स्वरूप तें ॥ २६ ॥ येथें प्रचीतीची आगळीक । जेथुनी जालें ज्ञान विबोधक । ते स्वरूप निश्चयात्मक । उल्लेखा आलें नसे ॥ २७ ॥ आपणें चि काय अंतःकरण । किंवा आपुलें अंतःकरण हें प्रमाण । हें विद्यमानी विवरोन । बरें पहावें ॥ २८ ॥ हा परीक्षेचा निवाडा गहन । जाणती स्वानुभवी सज्ञान । इतरासी न कळे हें अनुसंधान । अपरोक्ष स्थितीचें ॥ २९ ॥ येथ विचाराच्या जाल्या कोटी । तऱ्हीं पडती संदेहाचे पोटीं । एक गुरु-कृपेवीण परिपाटीं । पडे प्रवृत्ती सर्व ॥ ३० ॥ म्हणती ब्रह्म निर्विकल्प । तेथ कायसा हा संकल्प । परि निवळ न होती आप । सद्गुरु कृपेनें ॥ ३१ ॥ शास्त्रार्थदर्शनें थोर । परि आत्मानुभवी नव्हे चि धीर । त्यासी स्वद्वैत विवर । ठाईं न पडे चि कीं ॥३२॥ बहुधा शब्द ऐकोनी प्रौढी । वाढविती तर्क जातिरूढी । कल्पना ब्रम्हांड कोडी । घडमोडी करिती ॥३३॥ परोक्षविचारें अति प्रवीण । याहूनी अपरोक्ष गतीसी पाषाण । वाहती

आत्मज्ञानाचा पण । येती विक्षेपासी ॥ ३४ ॥ जरी आपुलेचि आपणा न कळे । तरी तो कवणाचेनि निवळे । जाणिवेचें करूनि गुंडाळें । पावतसे बंधन ॥ ३५ ॥ बंधन पावोनी अनिवार । सांगे स्वराज्य गोष्टी फार । तैसें चि म्हणतो ब्रह्म निर्विकार । कांहीं च न घडे तेथें ॥ ३६ ॥ ब्रह्मीं कांहीं न घडे हें यथार्थ । परि ब्रह्म केलें परोक्षार्थ । आपण वेगळा होउनी कृतार्थ । कैसा होतो न कळे ॥ ३७ ॥ ब्रह्म आपणें चि तत्वता । ऐसें असतां स्वभावता । तरी साक्षित्वाची वार्ता । मुर्ख्यहूनि नसे ॥ ३८ ॥ ऐशा ऐकुनियां गोष्टी । चळवळी जाणिवेच्या पोटीं । म्हणे मी जाणिवेच्या परिपाटीं । असतां केविं ब्रह्म होईन ॥ ३९ ॥ जाणिवेचें अधिष्ठान । स्वयें असोनी विद्यमान । त्याचि जाणिवेनें परतोन । न पाहे आपणा ॥ ४० ॥ येथ विचार पडिला संदेहीं । जाणिवेसी जाणता हृदयीं । तो कवण कैसा पाहीं । कळला पाहिजे ॥ ४१ ॥ हें ब्रह्मविद्या घडमोडी । ज्ञान प्रचीतीची परवडी । कोंडी संताच्या वाक्य रूढी । विवर व्हावा ॥ ४२ ॥ संशयाश्रित आक्षेपता । बळावला संकल्पें श्रोता । निवळ उपपत्तीनें आतां । केलें पाहिजे तयासी ॥ ४३ ॥ आपुलें चि गृहींचें गुप्त धन । लौकीक रीतीसी आले टाकून । साक्षेप साधनें सत्ते कडून । लभ्य करावें आपणा ॥ ४४ ॥ आपण वस्तु सर्वगत । ते आप आपणासी कैसी अप्राप्त । परोक्षापरोक्ष हृद्गत । निवळलें पाहिजे ॥ ४५ ॥ तें चि पुढें निरोपण । अखंड वस्तु विद्यमान । असतां भिन्नाभिन्न भान । अवगमलें कवणा ॥ ४६ ॥ हा आक्षेप अति दुर्धर । पाहो जातां सविस्तर । पाहणें विद्यमानी चतुर । परीक्षा करितो ॥ ४७ ॥ निवेदन आणि अवधारणें । रूढीसी आलें विद्यमानें । यासी संशये चि नसे ज्ञानें । निवळोनी पहावें ॥ ४८ ॥ ब्रह्मानुभव अगम्य अगोचर । सद्गुरु कृपा सत्ता थोर । त्या चि कृपेनें हें निरंतर । अवधारिजे श्रोतीं ॥ ४९ ॥ इति श्री भीमोपदेश । टाकुनी जाणिवेचा रोष । कीजे निज विवरीं अवकाश । म्हणे मेरु अनंत ॥५०॥ दशम सूर्य तृतीय कळा संपूर्ण ॥ ३ ॥ श्रीदशरथनंदनाय नमः ॥श्रीराम॥

श्री

## सूर्य १० कळा ४

॥ श्रीपुरुषोत्तमाय नमः ॥

श्रीराम आत्मा मी सर्वगत । अकळ माझे चि केसें हृद्गत । विद्यमान मी विचारवंत । असोनी परम ॥ १ ॥ माझी मज प्रचीती प्रसन्नता । माझी मज अपरोक्ष ज्ञानसत्ता । माझी मज नित्य स्वरूपता । सहजें असोनी ॥ २ ॥ परोक्षापरोक्षवादी जाण । उभय प्रवृत्ती प्रमाण । द्रष्टा चक्षु दर्पण । विचासी पाहे ॥ ३ ॥ येथें जाणिवेची प्रस्थानें । निर्गुणासी काय असेल तेणें । निर्गुण ऐसें रूप होणें । गुणाचेनि सर्वथा ॥ ४ ॥ एक जाणिवेचे महाप्रस्थान । आत्मा साक्षी ज्ञानघन । वर्तत आहे विद्यमान । प्रत्यक्षाकारें ॥ ५ ॥ प्रत्यक्ष एक अपरोक्ष स्वयें । त्यासी जाणिवेचें प्रमाण काय । जाणिवे वांचुनी न होय । रूप जयाचें ॥ ६ ॥ सुवर्णे अवलंबिला हिरा । तेणें प्रकाशिला अति साजिरा । तैसा जाणिवेचेनि साक्षात्कारा । रूढ जाला आत्मा ॥ ७ ॥ जाणीव नभाचिये पोटीं । आनंद उदधी कोटी । बुडी देउनी उफराटी । तो चि सामावला ॥ ८ ॥ उल्लेखतांत सन्मती माय । पासूनि संभव साक्षी स्वयें । पितरांसी सद्गती सोय । जेणें दिधली ॥९॥ तिव्यांगुली देउनी संकल्पासी । जो संकल्पशून्य निश्चयेंसी । तो आत्मा आपआपणासी । वुझूं सरला ॥ १० ॥ ज्ञानदर्पणाचे मंदिरीं । आत्मा सर्वगत विहारी । घट भरोनियां अंबरीं । येस नेला जेसा ॥ ११ ॥ तैसा जाणिवेचा घट सुंवळ । माजि आत्मा भरूनि अचंचळ । नेला पदार्थ घरीं अकळ । जाणिवद्वारा ॥१२॥ भूमीअंतरींचें जीवन । भूमीमाजि होउनी दीन । नाना बीजमुखें उफळोन । वृक्षाकारें वाहे ॥ १३ ॥ काष्टें पानें फुलें फळें । जीवनें चि विस्तारलें तेणें मुळें । तोय म्हणोनी ते झाड सगळें । पान करितां नये ॥ १४ ॥ फळीं रसरूप प्रगटलें । तें रसनेच्या विभागा आलें । नाना सुस्वादें घोंटिलें । गोटानें उदक ॥ १५ ॥ तैसा जाणिवेचा सविस्तर । नामरूपें पदार्थे अपार । जाणीव चि स्थूळाचा

---

१ उ ना ते ( र )

आकार । धरूनि रूढली ॥ १६ ॥ आधीं जाणीव चि स्वयें केवळ । आत्मज्ञानें व्हावी निवळ । जाणीव वोसरतां निर्मळ । आत्मज्ञान सरे ॥ १७ ॥ शुद्ध कर्पूराची वाति । मिळाली तेथ स्वछ जोती । वेंग्राळ होउनी जोतीवाती । निःशेष जाळी ॥ १८ ॥ तैसी अपरोक्ष ज्ञानद्वारें । जाणीव चि समूळी सरे । मग जाणता या निर्धारें । हेतु चि असेना ॥ १९ ॥ कार्यें रूढविला कर्तार । हा उफराटा चि विचार । कर्तयावीण उत्तरोत्तर । कार्य कांहीं च नसे ॥ २० ॥ केलियां वांचुनी कांहीं । कार्य सहसा नव्हे पाहीं । अभिनव कर्तयाची हे हि । माव अकळ ॥ २१ ॥ अकळ भृकुटीचें च्याप । चक्षुस्मर त्रिविध ताप । भेदुनी गगन तनूसी आप । जीवासी घेतलें ॥२२॥ अनंग अरूप तो धन्वी । विंधिली अकाळ काया तन्वी । प्रीतीचा संगर अनुभवी । हे विश्व आतां ॥२३॥ मरणीं उपरती रमे । धरणी आकाशाची शमें । करणी कर्तव्याची क्रमें । ठाईं पाडा अकळ ॥ २४ ॥ कर्ता लाघवी हा भगवंत । म्हणोनी गौरविती महंत । परि आप न होनियां संत । असंत होती ऐसे ॥ २५ ॥ कार्य कर्ता माया ईश्वर । आप जाणिवेचा विस्तार । विचार सुरद्मसार । शोध न घेत जंवरी ॥ २६ ॥ तंवरी अगम्येचि आघवें । आक्रम निजवृत्ति लाघवें । आक्रमोनी वासना जीवें । विपर्त्तासी भोगिती ॥ २७ ॥ स्वयें अगोचर कीं गोचर । बरा पहावा निज निर्धार । स्वयें कर्ता कीं निर्विकार । अकर्ता सहजे ॥ २८ ॥ स्वयें जाणीव कीं जाणता । हेंचि निवळोनी आतां । अवधान द्यावें तत्वता । निजात्मविवरीं ॥ २९ ॥ जें श्रुत ना दृष्ट जगीं । कवण अक्षेपील त्यालागीं । त्यास्तव स्वरूपता वेगीं । अवलोकन करा ॥ ३० ॥ अवलोकन करा हें संबोधन । सहजप्रवृत्ती आलें वचन । कां सांगणें ऐकणें ज्ञान । विद्यमान रूढलें ॥ ३१ ॥ निर्गुण ब्रह्म निर्विकार । हा जाणिवेचा चि निर्धार । तरि जाणिवेसी आलें तें साचार । कैसें न म्हणावें ॥ ३२ ॥ अप्रतर्क्य पर ब्रह्म स्वयें । म्हणिजे तर्किलें तें नव जाय । आणि परोक्षया प्रवाहें । अवगमे चि नाकीं ॥ ३३ ॥ आपणा भिन्न नव्हे आपण । नव्हे सगुण ना तो निर्गुण । हें अपरोक्षपणाची खूण । दिधली

सद्गुरुनें ॥ ३४ ॥ हें जीवेंसीं धरूनी सदृढ । व्हावें स्वरूपदर्शनें रूढ । तरी हें अव्हांट चक्रगूढ । उगवेल कांहीं ॥ ३५ ॥ स्वयें अपरोक्षकर्ता । कर्तव्याची नसे चि वार्ता । तो करूनि चि अकर्ता । सर्व प्रकारें ॥ ३६ ॥ अवकाशें चि घडे सर्व हि । सर्वगत सर्वां ठाईं । परी ते कर्तेपणें कांहीं । शीणलें नसे ॥ ३७ ॥ डोईवरी ठेउनी पाउलें । वेधलें ज्ञानाचें राउळें । मार्ग चोरूनी सकळ । चालणें शिका ॥ ३८ ॥ घ्राणें अघ्राणिलें आपणा । सुवास तो सुमनविना । हा परिमल घेऊं शिकाना । कां श्रवणा' वाटे ॥ ३९ ॥ अरूप आणि सुंदर । अनंग परी मनोहर । चक्षुर्वीण साचार । निरखानात कां ॥ ४० ॥ मलयचंदनाचे मंदिरीं । सुवास पवनाचिये परी । अवकाश देउनी अंतरीं । कां नेघा अवकाश ॥ ४१ ॥ गुप्त अभ्यंतरींचें विवर । अगोचर गर्तीचे घर । धरूनि जीवीं निरंतर । वैसा श्रवणी ॥ ४२ ॥ साचार हे स्वरूपता । साचार उपलब्धी तत्त्वता । सत्याची प्रचीती अमृतलता । सुरस सेवा ॥ ४३ ॥ परोक्ष ब्रह्मवाद न कीजे । परोक्ष आत्मा न भाविजे । परोक्षज्ञान हि नाणिजे । दृष्टीसी सहसा ॥ ४४ ॥ आम्ही सद्गुरु कृपेचे डोळस । घेऊं अपरोक्ष सुखविलास । परोक्षज्ञानाचे बहुवस । विकल्प नातळों ॥ ४५ ॥ सद्गुरु कृपा अजरामर । धरूनि अक्षय विश्रांति घर । द्वैतसंस्कार समीर । लागों नेदूं आपणा ॥ ४६ ॥ अपरोक्ष कृपांवर वोढूं । भेद काळाचें उदर फाडूं । द्वैतनिश्चयाचें फोडूं । शीर प्रबोधकरें ॥ ४७ ॥ सद्गुरुकृपेच्या पुरुषार्थें । प्रतापवंत परमार्थें । कृतार्थ होउनी सर्वार्थें । स्वबोध रूढऊं ॥ ४८ ॥ त्यागुनी निवृत्तीचें विवर । होऊं गुरुभजनीं तत्पर । सेऊं सद्गुरुपद निरंतर । सद्भावानें ॥ ४९ ॥ नव जाऊं जाणिवेच्या आड राना । न करूं विमोहक तनाना । गाऊं चरित्रें नाना । सद्गुरु श्रीरामाचीं ॥ ५० ॥ पाहूं अभिराम रूप डोळां । लाहूं जगदांतर जिव्हाळा । घेऊं स्वसुख सोहळा । सद्गुरु कृपेचा ॥ ५१ ॥ सद्गुरुप्रसाद तृप्ती । अनुभवाचे ढेकर येती । ते वचन माळिका श्रोतीं । अवधारिजे पुढें ॥ ५२ ॥ इति श्री मीमोपदेश । अपरोक्ष स्थितीचा निर्देश । सद्गुरुकृपा विशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ दशम सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥ श्रीरामसमर्थ ॥

श्री

# सूर्य १० कळा ५

॥ श्रीवासुदेवाय नमः ॥

श्रीरामसद्गुरु स्वयें। निजसंबोधन नित्यान्वयें। नित्यानित्य विवेक प्रत्ययें। आत्मप्रतिष्ठा ॥ १ ॥ विश्व अगोचर दर्शनें। अनुभव पाहे सद्वृत्तीनें। सद्भाव सत्शिष्य मतीनें। रहस्य चित्रें ॥ २ ॥ स्वयें चि होउनियां संमती। निज वेद वाक्य उपपत्ती। निजानुभव विश्रांति। निवेदी आपआपणा ॥ ३ ॥ तरी आतां मम सद्भाव। श्रवणासी आलें हो निर्भव। वाक्यार्थी वेचुनी जीव। निज प्रतिष्ठा ॥ ४ ॥ हें मम अवधान कर्णी। वाक्यार्थ विवर सुवर्णी। निर्विकार दर्शनें निरावरणा। हृदयासी प्रतिष्ठी ॥ ५ ॥ हें स्वकीय तव अनुसंधान। अपरोक्ष दर्शनें वर्तमान। आत्मा आणि आत्मत्व जाण। ऐक्वी यचना ॥ ६ ॥ आत्मयावरी सद्वृत्तीमुळें। आत्मत्व दिसोनियां आलें। त्या आत्मत्वीं प्रकाशलें। आत्मरूप सहजें ॥ ७ ॥ दर्पण न होनियां वदन। जालें सस्वरूप दर्पण। डोळा न होनी सनातन। वदन विलोकिलें ॥ ८ ॥ आत्मसुधा विंब संपूर्ण। होउनी अमराचें वदन। आत्मप्राप्ती अमृतघन। किरणें प्राशिली ॥ ९ ॥ स्वयंम विंबे सगळें। आप आपणासी प्रासिलें। आत्मतृप्ती लाहोनी तात्काळ। आलें निर्बिंबतेसी ॥ १० ॥ चित्सूर्य अभिनवता। निर्वाण राहू होउनी तत्वता। अखंड मंडळ खग्रासता। जीर्णतेसी आणिली ॥ ११ ॥ जैसा निरिंधन वन्ही। महा तेजाची धरणी। आपआपणा निदानी। वसे सहजें ॥ १२ ॥ तैसें पूर्ण साक्षत्वज्ञान। गुणत्रयाचें अधिष्ठान। महातत्त्वें विद्यमान। असे प्रत्यगात्मत्त्वें ॥ १३ ॥ पाहतां तरी एक शरीर। परी अवेवे दिसे विस्तार। तैसा आत्मत्वाचा विचार। एकानेकपणें ॥ १४ ॥ सावेवता आणि सुंदर। परी चैतन्याचेनि मनोहर। तेविं ते आत्मत्व साचार। सत्य प्रतिष्ठेनें ॥ १५ ॥ अवेवामाजि मस्तक। तैसें आत्मत्वीं ज्ञान रूपक। इंद्रियामाजि प्रकाशक। डोळा जैसा ॥ १६ ॥ शतांगें

मिळोनी उभारे रथ । सूत्रें चाळविलियां समर्थ । चाले अश्वगतीनें सर्वार्थ । प्रदभूमि सीमेसी ॥ १७ ॥ तैसें आत्मत्त्व हें उभारलें । ज्ञानप्रधानसूत्रें गोविलें । अव्यक्ततत्वाचें जालें । रूप व्यक्तिपरियंत ॥ १८ ॥ अपंचीकृत भूतें मुळीं । होतीं ब्रह्मस्फूर्तीचिये अंचळीं । अव्यक्त हंकार मौळीं । विलसो लागली ॥ १९ ॥ प्रत्येकपणासी आणूनि सर्व । स्वयें आत्मत्त्वें स्फुरे हे अपूर्व । आत्मज्ञानासी करी अर्ह । अमृतत्व जीविकेनें ॥ २० ॥ दैविक ज्ञान संपत्ति योग । आत्मत्त्व रूटलें सांग । अव्यक्त पंचतत्त्वें सवेग । आली दिव्याकृतीसी ॥२१॥ दैविक महद माया शरीर । विस्तीर्णतेसी नाहीं पार । आकाश हृदय आकार । बोलिला तितुका ॥२२॥ दैविक दिव्यतनूचें अभिनव । नवनव रूपस सजीव । एक देह परी कटाव । देह ब्रह्मांड कोटी ॥२३॥ मनोहर आकृती परवडी । रूपें होउनी ल्वड सवडी । जेविं सिंधूमाजि कडोविकडी । होत जाती कल्लोळ ॥ २४ ॥ विविध रूपाचें भरण भरे । रूपांतरे रूप चि अवतरे । साभिप्राव होउनी त्वरें । डोळस होय पहावया ॥ २५ ॥ अद्भुत हे अव्यक्त काया । महदानंद शक्ती मूळमाया । ज्ञानशरीरें अकुरुनियां । मोहरली विश्वफळें ॥ २६ ॥ हे अबीजा आदि पराशक्ती । ईचेनि सर्वाभिष्ट प्राप्ती । ईचेनि चतुर्विधा मुक्ती । रूपासी आल्या ॥ २७ ॥ हे हिरण्यगर्भईश्वरी काया । हे अपरोक्ष तत्त्वार्थ करी दया । हें केवळ सद्गुरुकृपा जया । बोळलियां तुमे ॥ २८ ॥ पुरुष प्रकृती पिंड ब्रह्मांड । स्थूळेंवीण उभारे उदंड । हे महद् ब्रह्मदशा प्रचंड । महाखंड विभवें ॥ २९ ॥ ईचेनि प्रतिष्टे स्वरूप ज्ञान । इयेचेनि रूढला श्रीभगवान । इयेचेनि प्रतिष्टले त्रिगुण । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ३० ॥ हे अनुतापें जें पुरती । तें वीतराग मनोरथ पुरती । आत्मानुभव धुरंधर होती । इयेच्या कटाक्षें ॥ ३१ ॥ हे चतुर्विध अवसानें स्फुरे । शुभेच्छा विचारणा रूढे त्वरें । तनुमानसा सत्त्वापत्तीभरें । होय उन्मनी ॥ ३२ ॥ जीवावरी कृपेनें तत्त्वता । देत सद्वृत्तीचीं प्रसन्नता । विषयीं धाडुनी विक्षेपता । भूमिकेवरी आणी ॥ ३३ ॥ दाऊनि विक्षेप वृत्तींचा लय । वस्तूसीं आणी स्वसुखाश्रय । विक्षेप उपशांतीनें अद्वय । गता यातिसीं आणयीं ॥३४॥ साक्षेपें सद्वृत्तीद्धृत ।

जैसा ईक्षुरस सघरस्तस । गोडीनें रसनेसी देत । माधुर्य मिठी ॥ ३५ ॥ कीं मनोहर रूपसें । लावण्य वनिता वयसें । कामिक चक्षूसी अपैसें तटस्थ करी ॥ ३६ ॥ ना तो कमळ पराग पूरा । रोधी भ्रमर धांवे सैरा किसलयतल्पीं त्या मधुकरा । लोधूनि पाडी ॥ ३७ ॥ ना तो हंस मानस सरोवरीं । कोमळ कमळ मृणाळपरी । चुंचु निक्षेपून धरी । सुरस माधुर्यता ॥ ३८ ॥ कीं करूनि चक्षूची रसना । चकोर सेवी चंद्रकिरणा । तेणें तृप्तीची कारणा । पूर्णकाम करी ॥ ३९ ॥ तैसी अपरोक्ष सख्लीनता । स्वरूपभूमिका तत्त्वता । आपस्वरूपींच सवेगता । उपरम वृत्ती ॥ ४० ॥ या सख्लीनतेसी आलियां सज्जन । करिती नित्यानंदींच मज्जन । जैसें तृप्तीवरी दिसे चिन्ह । तेज आप्यायनाचें ॥ ४१ ॥ ज्ञानामृत सिंधूची उकळी । कीं हे चैतन्य चित्कळा तेजागळी । वसे अनुभव शिवाचे मौळी । गुरु चंद्र चंद्रिका ॥ ४२ ॥ चैतन्य राउळींची आत्म जोती । हे आत्मशिवलिंग प्रकाशिती । कीं हे अभिनवमोक्ष संपती । सत्रावी जीवन कळा ॥ ४३ ॥ हे चि जैं रूपासी तारुण्य करी । तैं ब्रह्मदशा रूढे शरीरीं । मग सख्लीनतेचा धरी । तळतेचि सुख्लीनता ॥ ४४ ॥ हे स्वरूपानुभवें निर्विकार । हे साक्षत्वे चि वर्तवी संसार । हे विद्या अविद्या विस्तार । विस्तारी सुखें ॥ ४५ ॥ हें भ्रमिमात्र अंतर्कळा । ईचेनि योळे ससुगु . जिव्हाळा । अभिवृद्धीनें परिपाळी ळळा । ब्रह्मादि देवांचा ॥ ४६ ॥ हें ब्रह्मानंद दशापूर्ण । असंसक्त नामिका गहन । हेचि पदार्था भाविनी निर्माण । तूर्यगा भूमी ॥ ४७ ॥ हे आत्म शिवानुभव शिवा । अनुभवामृतें जीववी जीवा । हे दैविक दशेनें देवां । प्रतिष्ठित प्रतिपाळी ॥ ४८ ॥ हें ब्रह्म स्फूर्ति पैं आपुली । आत्मत्व दशा समूळीं । जागृती सुषुप्ति रूपा आगळी । समांतर्कळा ॥ ४९ ॥ हे दैविकी माया असळ । ईचेनि रूपासी आटे सकळ । त्या सकळांतरीं अविकळ । आत्मत्व अरपारा ॥ ५० ॥ इति श्री भीमोपदेश । दैविकी माया वर्णन । प्रचीति आणुनी व्हावें समरस । म्हणे मेरु अनंत ॥ ५१ ॥ दशम सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

श्री

## सूर्य १० कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सर्वापर सर्व कर्तार। सर्वसाक्षी स्वयें अकर्तार। जगत्कारण होय निरंतर। रज्जुसर्पा परीं ॥ १ ॥ स्वयें रज्जु तो निर्विकार। द्रष्टुत्वींच सर्पविकार। पाहतां रज्जुवरील सर्पाकार। तोहीं निर्विकारी ॥ २ ॥ चित्र-वनांतील पंचानन। विभांडी मदगज सेना संपूर्ण। परी तेथें न दिसे चि मरण। प्रत्यक्षाकारें ॥ ३ ॥ आभास हे विश्वात्मक दृष्टीं। देउनियां स्वरूपासी पाठी। पोटीं अव्यादुनियां ज्ञान रवि कोटी। जगदांध करी ॥ ४ ॥ इच्छा दृष्टी झांकुनी पडे। मोदें विषपानें होय मडें। महाकल्मश क्रियेनें विरुढे। मरणाच्या आगरीं ॥ ५ ॥ जेविं वृंदारक तरूची ख्याती। धावी कल्पीत जाति संपत्ती। इच्छिल्या मरणदुःख मती। काय देतां भागेल ॥ ६ ॥ तैसी अनिच्छा मुळींची असतां। इच्छेसी प्रवर्तोनी सकामता। नाना संस्कारें लघुता। मरण दुःखें भोगी ॥ ७ ॥ स्वयें निष्काम निर्दोष। निराभास निर्विशेष। निःप्रपंच निरावकाश। निर्द्वैत निर्गुण ॥ ८ ॥ सत्य संकल्प कवणें केला। हा मूळ शोध पाहिजे जाला। या चि कारणें प्रवर्तला। साधुवृंद सर्वार्थे ॥ ९ ॥ विचारासी कारण ज्ञान। तैसें चि कारण होय अज्ञान। ज्ञानाज्ञानासी अधिकरण। विद्यमानी स्वयें ॥ १० ॥ आपणा वांचुनी दुसरा। येथें कवण आहे विचारा। सर्वही आत्मत्वींच विचारा। चित्त चैतन्य योगें ॥ ११ ॥ नित्य प्राणासी चेतवित। चैतन्य म्हणावें तयातें। अमृतासी अमृतत्त्व देतें। चैतन्य जाणिजे जीवीं ॥ १२ ॥ चैतन्य मूळींचें महा तत्त्वज्ञान। चैतन्य निजसत्त्वें विद्यमान। चैतन्य सत्तासृष्टी सुभान। अव्यक्त उभारा ॥ १३ ॥ त्या चैतन्यावरी अकळ। विश्वरूपाची कळ। चैतन्य तनु चळवळ। तत्त्वसृष्टीची ॥ १४ ॥ जैसी शरीरीं सर्वज्ञता। तैसी अव्यक्ता-माजि सत्ता। पदार्थ ज्ञान व्यापकता। नाना विस्तारली ॥ १५ ॥ विविधाभास उभवणी। विज्ञान देव तरु व्यावणी। चैतन्य वैरागर खाणी।

नाना आकृतींची ॥ १६ ॥ आकाशाची पंचतत्वें । व्यापुनी चैतन्याच्या सत्वें । भूतें प्रत्येकपणें साक्षत्वें । धरूनी वर्तवी ॥ १७ ॥ अभिनव दृश्य उभारा । विश्वाकार पसारा । पदार्थीं चैतन्य दोरा । आक्रमुनी असे ॥ १८ ॥ विचित्र देहपरवडी । अभिनवरूपें विरूढी । अद्भुत कर्तव्याची प्रौढी । पाहे लक्षूनि जीवीं ॥ १९ ॥ हृदय करूनियां विस्तीर्ण । आकाशएवढा जीव संपूर्ण । माजि सर्वत्र सांठवण । जाणीव रूपें ॥२०॥ पाहतां जीव तो निराकृती । परी जिव्हाळा होय जगती । अनुभवें चि तयाची स्थिती । आणिजे मना ॥ २१ ॥ परमात्मा परमेश्वर । प्रत्यगात्मा परात्पर । परम पुरुष परेचा धर । तो कवण पहा ॥ २२ ॥ विश्वसाक्षी विश्वेश्वर । विश्वरूप विश्वंभर । विश्वकुक्षी विश्वाधार । जीवींचि वोळखा ॥२३॥ अर्धनारी नटेश्वर । मूळपुरुष षड्गुणेश्वर । शिवशक्ती नामें अपार । कवणाची पहा ॥ २४ ॥ नानारूपाची वोळखी नामें । नाना व्यवसायीं अनुक्रमें । नाना व्यक्ति नाना संभ्रमें । कवण प्रवर्तला ॥ २५ ॥ नाना देश नाना आश्रम । नाना पुरुषार्थ आक्रम । नाना विख्याति पुरुषोत्तम । एक सकळीं ॥ २६ ॥ नरोत्तम वीरोत्तम परम । नाना अवतारीं उत्तमोत्तम । नाना घटवणा विक्रम । अघटीत सामर्थ्य ॥२७॥ नाना चळवळेची स्फूर्ती । जगदांतर रूढी सत्कीर्ति । सर्वात्मा सर्व प्रवृत्ती । न होती तेणें वीण ॥ २८ ॥ जेणें प्रवृत्तीनें सर्व प्रवर्ते । तेणें वर्तविलें सर्व वर्ते । ज्याचेनि प्रवृत्तिपर विवर्ते । प्रवृत्ति जाळ ॥२९॥ तो पुरुष नपुंसक प्रकृती । न होनी नटला सर्वाकृती । तो अंतरात्मा अंतरस्थिती । आधीं वोळखावा ॥ ३० ॥ परम सुंदर वनिता । भ्रतारें वीण होय वृथा । तेवि हृदयस्थेवीण वर्ततां । देहबुद्धि नाडे ॥ ३१ ॥ जैसी पवित्रतेवीण दीक्षा । व्यर्थचि जाय बोध शिक्षा । दिव्य चक्षुवीण परीक्षा । नाना रत्नांची ॥ ३२ ॥ ना तरी सद्गुरुकृपेवीण । व्यर्थ चि जाय शब्दज्ञान । जेवि पात्र योग्यते वीण । थोरीव नृप नटाची ॥ ३३ ॥ सूक्ष्माहूनि अति सूक्ष्म । असे निज अंतर्याम । त्या हृदय सर्मी परम । दशेचें ज्ञान वसे ॥ ३४ ॥ त्यास्तव साधक वृत्तीनें ।

सूक्ष्मतर सद्वृत्तीनें । विशुद्ध चित्त भव निवृत्तीनें । शोधावें हृदय ॥ ३५ ॥ गुरु कृपेनें अंतर्मुख । होउनी स्वरूपीं सन्मुख । नित्योद्भव मती उल्लेख । संस्थान शोधावें ॥ ३६ ॥ टाकुनी सर्व बाह्य वृत्ती । परमार्थ दृष्टीनें सर्वार्थी । मननसील कृतार्थ मती । आपपणासी पहावें ॥ ३७ ॥ येथें आळस केलियां जाण । सहसा निवर्तेना अज्ञान । आणि प्रगटेना आत्मज्ञान । मती सद्रतीविना ॥ ३८ ॥ नातरी अखंड निद्राडोहीं । नित्य गुचक्या खातसाही । जागृती स्थ प्रवाहीं । उभा अडखुळे ॥ ३९ ॥ अद्वैतीं त्याचें अवधान । व्यर्थचि जाय जाणपण । आतां सावधान अवधान । यावें ग्रंथार्थी ॥ ४० ॥ इति श्री भीमोपदेश । सन्मति विद्या प्रकाश । हृदय शुद्धीसी द्या अवकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ दशम सूर्य षष्टम कला संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीराम कृष्ण गोविंद केशव ॥



श्री

## सूर्य १० कला ७

॥ श्रीगोविंदाय नमः ॥

श्रीराम अनंत हृदयीं । अनंत अवधानें समयीं । आठवला अनंत प्रत्ययीं । अनंत अवधानें ॥ १ ॥ एक चि होउनी अनंत । जाला प्रचीत व्यक्तीनें महंत । अनंत संतावधानें हृत । अवधारण करी ॥ २ ॥ अवधानधुरीण धुरंधर । प्रमय क्षीराब्धि मथित मंदिर । सद्गति सौख्य मनोहर । अवधानीं वैसला ॥ ३ ॥ स्वयंपाक करूनि स्वहस्तें । भोजनासी वैसे तोषचित्तें । स्वयंकृत परवडी गोडीतें । प्रार्थावें कवणा ॥ ४ ॥ तेवि आत्मावबोध अद्वैत । अनुभविती स्वरूप संत । तया अद्वैतें अनुमोदित । असे कवणु ॥ ५ ॥ या अद्वैत प्रचीतीचे संत । भोक्ते अनुभवाचे अनंत । वक्ते श्रोते महा महंत । महा अद्वैत वेत्ते ॥ ६ ॥ ते अनेक मुखें वदले । परी एकमुखें ऐक्यासी आले । तेहीं यथार्थ दशेसी देखिलें । नाहीं च

कदापि ॥ ७ ॥ त्याचे सर्वांतर्भाव विराले । ज्याचे उन्मेष उठवे मुराले । ज्याचे कृत संकल्प जिराले । नव्हत्या चि परी ॥ ८ ॥ ते निःशब्द ग्रहामोडीनें । कुबेर जाले अर्थजोडीनें । अद्वयविवरी फडोविकडीनें । येती गती निर्गतीसी ॥ ९ ॥ तिहीं चि अवधान द्यावें ग्रंथीं । बैसोनी अनुभव मनोरथीं । तिहीं चि प्रतीतिपर सर्वार्थी । कीजे येथें संवाद ॥ १० ॥ क्षीर नीर निवडावया । योग्यतेसी वायस नव्हे तया । हंसेंचीण जाय वाया । ते फळ्या सहजें ॥ ११ ॥ मुक्तांचे शृंगार भारें । जे बोसंडत सर्वावसरें । तेथें पडधातु अळंकृत आदरें । वनिता योग्यते न ये ॥ १२ ॥ जेथें शिणल्या तत्व विशुद्धमती । जेथें वेडावल्या श्रुतिस्मृति । जेथें नाना चतुरांच्या युक्ती । निरार्थक जाल्या ॥ १३ ॥ जेथें सुतार्किक शिणले । जेथें सद्विवेकी वेडावले । जेथें सवेदक मंदले । अति सूक्ष्मतर ॥ १४ ॥ ऐसें तें निजहृदय । आत्मस्थितीचें आलय । तयाचा शोध घेउनी स्वयें । व्हावें निज विजयी ॥ १५ ॥ जैसा गृहस्थ आपुल्या घरीं । दिवस रात्रीचा विहारी । जाणें माजि घर ओवरी । जाणें सभास्थळ ॥ १६ ॥ परी तो एक देसी भला । समर्थी तितुक्या स्थळीं शोभला । तेणें प्रकारें चि लाभला । उपभोगासी ॥ १७ ॥ तैसा नव्हे हा हृदयस्थ । सर्व उल्लेखीं सर्वगत । सर्वावस्थेंत सदोदित । संत बैसकेसी उभा ॥ १८ ॥ जें जें आठवासी आलें । तया पूर्वी च त्याचें रूप जालें । आदि मध्यांतीं ठसावलें । अद्वैतरूप ॥ १९ ॥ आतां हे द्रष्ट्याची त्रिपुटी । डोळां घालुनी निजदृष्टी । हृदय देश दशदिक्पटीं । संचरे स्वइच्छा ॥ २० ॥ व्यापक वसुमतीचा राजा । तेथींचा उपभोग लाहोनी वोजा । अनादि सिद्ध सहजा । अवस्थेपर तो ॥ २१ ॥ धरणी च आधीं निर्विकार । तेथें अद्वैतदशा उद्धार । अकल्पित दशा अगोचर । पिके स्वानंद तेथें ॥ २२ ॥ आत्मा हृदयस्थ अरूप । प्रधान सूत्र चिद्रूप । ते चि संस्थानी मति नृप । सत्तेनें वर्तवी ॥ २३ ॥ आत्मनृप तो निर्विकार । नावडे द्वैताद्वैत व्यवहार । उन्मनीरत पर संस्कार । तो ही नसे चि त्या ॥ २४ ॥ चिद्रूप तयासी उपचारी । पुरवलें जाय पदार्थवरी । आत्मनृपाची

सूक्ष्मतर सद्वृत्तीनें । विशुद्ध चित्त भव निवृत्तीनें । शोधावें हृदय ॥ ३५ ॥ गुरु कृपेनें अंतर्मुख । होऊनी स्वरूपीं सन्मुख । नित्योद्भव मतीं उल्लेख । संस्थान शोधावें ॥ ३६ ॥ टाकुनी सर्व बाह्य वृत्ती । परमार्थ दर्शनें सर्वार्थी । मननशील कृतार्थ मती । आपपणासी पहावें ॥ ३७ ॥ येथें आळस केलियां जाण । सहसा निवर्तेना अज्ञान । आणि प्रगटेना आत्मज्ञान । मती सद्गतीविना ॥ ३८ ॥ नातरी अखंड निद्राडोहीं । नित्य गुचक्या खातपाही । जागृती रथ प्रवाहीं । उभा अडखुळे ॥ ३९ ॥ अद्वैतीं त्याचें अवधान । व्यर्थचि जाय जाणपण । आतां सावधान अवधान । द्यावें ग्रंथार्थी ॥ ४० ॥ इति श्री भीमोपदेश । सन्मति विद्या प्रकाश । हृदय शुद्धीसी या अवकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ दशम सूर्य षष्टम कल्प संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीराम कृष्ण गोविंद केशव ॥

---

श्री

## सूर्य १० कळा ७

॥ श्रीगोविंदाय नमः ॥

श्रीराम अनंत हृदयीं । अनंत अवधानें समयीं । आठवला अनंत प्रत्ययीं । अनंत अवधानें ॥ १ ॥ एक चि होउनी अनंत । जाला प्रचीत व्यक्तीनें महंत । अनंत संतावधानें द्रुत । अवधारण करी ॥ २ ॥ अवधानधुरीण धुरंधर । प्रमय क्षीराब्धि मथित मंदिर । सद्गति सीता मनोहर । अवधानी वैसला ॥ ३ ॥ स्वयंपाक करूनि स्वहस्तें । भोजनासी वैसे तोषचित्तें । स्वयंकृत परवडी गोडातें । प्रार्थावें कवणा ॥ ४ ॥ तेवि आत्मावबोध अद्वैत । अनुभवितीं स्वरूप-संत । तया अद्वैतें अनुमोदित । असे कवणु ॥ ५ ॥ या अद्वैत प्रचीतीचे संत । भोक्ते अनुभवाचे अनंत । वक्ते श्रोते महा महंत । महां अद्वैत वेत्ते ॥ ६ ॥ ते अनेक मुखें वदले । परी एकमुखें ऐक्यासी आले । तेहीं वगूत्व दशेसीं देखिलें । नाहीं च

कदापि ॥ ७ ॥ त्यांचे सकळांतर्भाव विराले । ज्याचे उन्मेष उद्‍र्व मुराले । ज्याचे कृत संकल्प जिराले । नव्हत्या चि परीं ॥ ८ ॥ ते निःशब्द घडामोडीनें । कुबेर जाले अर्थजोडीनें । अद्वयविक्री काडोविकडीनें । येती गती निर्गतीसी ॥ ९ ॥ तिहीं चि अवधान धावें ग्रंथीं । बैसोनी अनुभव मनोरथीं । तिहीं चि प्रचीतिपर सर्वार्थीं । कीजे येथें संवाद ॥ १० ॥ क्षीर नीर निवडावया । योग्यतेसी वायस नव्हे तया । हंसेवीण जाय माया । ते फळा सहजें ॥ ११ ॥ मुक्तांचे शृंघार भारें । जे चोसंडत सर्वावसरें । तेथे पडधातु अळंकृत आदरें । वनिता योग्यते न ये ॥ १२ ॥ जेथें शिणल्या तत्त्व विशुद्धमती । जेथें वेडावल्या श्रुतिस्मृति । जेथें नाना चतुरांच्या युक्ती । निरार्थक जाल्या ॥ १३ ॥ जेथें सुतार्किक शिणले । जेथें सद्विवेकी वेढावले । जेथें सवेदक मंदले । अति सूक्ष्मतर ॥ १४ ॥ ऐसें तें निजहृदय । आत्मस्थितीचें आलय । तयाचा शोध घेउनी स्वयें । व्हावें निज विजयी ॥ १५ ॥ जैसा गृहस्थ आपुल्या घरीं । दिवस रात्रीचा विहारी । जाणें माजि घर वोवरी । जाणें सभास्थळ ॥ १६ ॥ परी तो एक देसी भला । समयीं तितुक्या स्थळीं शोभला । तेणें प्रकारें चि लाभला । उपभोगासी ॥ १७ ॥ तैसा नव्हे हा हृदयस्थ । सर्व ब्रह्मेखीं सर्वगत । सर्वावस्थेंत सदोदित । संत बैसकेसी उभा ॥ १८ ॥ जें जें आठवासी आलें । तया पूर्वी च त्याचें रूप जालें । आदि मध्यांतीं ठसावलें । अद्वैतरूप ॥ १९ ॥ आतां हे द्रष्ट्याची त्रिपुटी । डोळां घालुनी निजदृष्टी । हृदय देश दशदिक्पटीं । संचरे स्वइच्छा ॥ २० ॥ व्यापक वसुमतीचा राजा । तेथीचा उपभोग लाहोनी वोजा । अनादि सिद्ध सहजा । अवस्थेपर तो ॥ २१ ॥ धरणी च आधीं निर्विकार । तेथें अद्वैतदशा उद्धार । अकल्पित दशा अगोचर । पिके स्वानंद तेथें ॥ २२ ॥ आत्मा हृदयस्थ अरूप । प्रधान सूत्र चिद्रूप । ते चि संस्थानी मति नृप । सत्तेनें वर्तवी ॥ २३ ॥ आत्मनृप तो निर्विकार । नावडे द्वैताद्वैत व्यवहार । उन्मनीरत पर संस्कार । तो ही नसे चि त्या ॥ २४ ॥ चिद्रूप तयासी उपचारी । पुरवलें जाय पदार्थवरी । आत्मनृपाची

अंतुरी । ते ही निर्विकल्पा ॥ २५ ॥ तये निर्विकल्प अंतुरींचा । व्यवसाय अद्वैत स्थितीचा । चालवी बोध साचा । नृपनंदन तो ॥ २६ ॥ विवेकादि महा चतुर । प्रतिनिधी मोहरे धुरंधर । नृप संस्थानी निरंतर । बोधासी अर्चिती ॥ २७ ॥ देखतां निजबोध मनोहर । होय आत्म नृप साक्षात्कार । कां जे तो आत्मज साचार । आत्मरूपें रूढला ॥ २८ ॥ संकल्पें होउनी सावधान । धरून आत्मरूपाचें अनुसंधान । देउनी सद्गुरुवचनीं अवधान । पाहवें निजबोधासी ॥ २९ ॥ पाहोनी निजबोधदृष्टी । पुसाव्या साक्षात्काराच्या गोष्टी । मग त्या निजबोधीं च भेटी । घ्यावी आत्मनृपाची ॥ ३० ॥ जेथें भूमी च दृष्टी न दिसे । तेथींची वसती कैसी असे । त्यास्तव गुरुकृपार्कप्रकाशें । पहावी आत्मनृपचर्या ॥ ३१ ॥ जेथें कर्ता ना कार्यता । जेथें वस्ती ना विस्तार ममता । जेथे पदार्थ ना अपेक्षिता । न दिसे कांहीं ॥ ३२ ॥ जैसा अप्रांत निधीचा तळ । पाहों गेला लवणाचा गळ । धांवे सरिसा चि तात्काळ । जाय विघरला ॥ ३३ ॥ थिजल्या घृताची पुतळी । रिघाली घृतनिधीच्या राउळीं । ते परतोन येतां देखिली । जाय कवण ॥ ३४ ॥ दीपीं झगटे खद्योत । आह्ळोनी होय अचेत । निरावरणी तेवि अखंडित । अवधान तुरे ॥ ३५ ॥ भूमी निर्विकार नृपती । अद्वैतपदार्थ प्रचीती । अद्वैत उपचार प्रजास्थिती । हृदयांबरीं यया ॥ ३६ ॥ एवं द्रष्टा या च दृष्टीनें । पाहे आत्मप्रतिष्ठा विद्यमान । तरी दृश्य त्रिपुटीतीत तेणें । सुखें चि निर्मन तो ॥ ३७ ॥ या हृदय शुद्धीनें आत्मत्त्व । पाहोनी दृढावे निजसत्व । तरी स्वानंद सिंधूंत साक्षत्त्व । विरोनी जाय सुखें ॥ ३८ ॥ स्वरूपानुभवाचा स्वानंद । कीं स्वानुभवाचा अनुभवकंद । हा चि आत्मसंवादविद । आत्मवेत्ते जाणती ॥ ३९ ॥ जिहीं अनुभविला परमार्थ । तयांचें चि जिणें कृतार्थ । येर जन्मले नरव्यर्थ । कृमी ते निरयींचे ॥ ४० ॥ न देखती हृदयस्थ आत्मभानु । त्यांची जीत चि प्रेममय तनु । ते डोळस जात्यांध वानूं । विटली वैखरी त्या ॥ ४१ ॥ प्रचीतीच्या नित्यवसरीं । जे अवधान पर निर्धारीं । तयांच्या स्तवनें वागेश्वरी । पुनीत होय सुखें ॥ ४२ ॥ वचनो-

वचनीं संत चरित्रें । आत्मानुभवाचीं सत्क्षेत्रें । जें आत्मप्राप्तीचीं स्थानें पवित्रें । प्रशंसीत तोपें ॥ ४३ ॥ ऐकोनी प्रचीतीच्या उक्ती । जे विसांवले महा चित्तीं । विसरले देहभाव सर्वार्थीं । वेध तत्वार्थें ॥ ४४ ॥ श्रवणीं असोनी अवधान । गिळिली श्रवण त्रिपुटी संपूर्ण । ते वैसले चि परी निर्वाण । दर्शनें न दिसती ॥ ४५ ॥ भेदुनी चहूं देहाचा धर । स्वरूप धरेचे धराधर । श्रवणावधानें ज्ञानकंधर । माळा धरिती ॥ ४६ ॥ अवधान त्रिदश तरुचीं वनें । वसविती श्रवण निजांगीं सन्मानें । परतत्व प्रमय जीवनें । मती सरोवरें उचंबळती ॥ ४७ ॥ अवधान सुरभीचीं खिल्लारें । पोसी देउनी प्रमयाचे चारे । उभारी अवधान मणिमय नगरें । दशा अमरावती ऐसी ॥ ४८ ॥ अवधान चिंतामणी सदनें । शोभवी शृंघार गतीचीं वदनें । अर्थ अद्वय धातुपंक्तीनें । वसवी जो रत्न सानु ॥ ४९ ॥ अनंत रत्न सानु सुरालय । अनंत विश्रांतीसी वसो ये । अनंत श्रुतीचे अनंत प्रमय । ऐका अनंतावधानें ॥ ५० ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । अवधानी अनंत परेश । अनुसंधानी तो चि जगदीश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५१ ॥ दशम सूर्य सप्तम कळा संपूर्ण ॥ ७ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य १० कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनंतानुसंधानें । अनंत सद्गुरु अनंत कृपेनें । अनंत बोध अनंत वदनें । अनंत प्रचीती ॥ १ ॥ अनंत अनुभवस्थिती । अनंत ग्रंथ अनंतार्थी । आत्मा अनंत वचन उक्ती । प्रमयांतरें ॥ २ ॥ अनंत कडोविकडी कोडी । अनंत विश्रांती परवडी । अनंत सूक्ष्मतर प्रज्ञारूढी । अवधानें रूढे ॥ ३ ॥ अवधाना येउनी अनंत श्रवण । अनंत हृदयींची सांठवण । अनेत विवर मतीनें पूर्ण । प्रचीतीसी यावा ॥ ४ ॥ अनंत हृदयाकाश निर्मळ । अपरोक्षदर्शनें केवळ । गाळुनी जाणिवेची चळवळ ।

सेविजे नियंत ॥ ५ ॥ जेथें सेव्य ना सेवकता । जेथें आश्रय ना आश्रयिता । जेथें व्याप्य ना व्यापकता । स्फूर्ती च नाटळे ॥ ६ ॥ जेथें अनुभव ना अनुभविता । जेथें वाच्य ना वाचकता । जेथें लक्ष ना अलक्षता । कांहीं च न स्फुरे ॥ ७ ॥ जें ऐसें शुद्ध प्रकारें । जें असंगत उदास एकसरें । जें परेवाण अपार पसरें । नुसधें तें चि तें ॥ ८ ॥ जें परोक्ष ना अपरोक्ष । बद्धतेसी न ये चि कैंचा मोक्ष । जेथें विपक्ष नो कांहीं पक्ष । न दिसे संस्कार ॥ ९ ॥ तें स्वभाव सिद्ध स्वरूप । तें आपेआप निर्विकल्प । तेथें कल्पना कांहीं विकल्प । हेतु नसतां ॥ १० ॥ जेथें कार्याकारण नुमसें । जेथें स्वभावें साक्षात्कार न दिसे । तेथें अज्ञान ना ज्ञान न भासे । द्वैतपणें ही ॥११॥ ऐसें प्रचीतीचें अभ्यंतर । व्योम गाळीव प्रचीत पर । अनुभविती तत्त्व योगेश्वर । कवण्या प्रकारें ॥ १२ ॥ हे स्वभाव अक्षेपरूढी । माया ब्रह्मीची संधी गाढी । बोल्ती परस्परें जाणीव प्रौढी । सर्वत्र जन ॥ १३ ॥ माया ब्रह्मीं नाहीं जाली । हे अनुभव सिद्धांची बोली । परी साधारण पृष्टा भली । गोवी महा महासी ॥ १४ ॥ परी प्रवृत्तीपर सर्वशास्त्रें । शास्त्रसंपन्न उक्ती यन्त्रें । भेदीत भाविकांचीं गात्रें । विश्रांती लेश नसे ॥ १५ ॥ साक्षर ज्ञानसंपन्न कळा । नेणोनी अद्वैत जिव्हाळा । गुंफीत वचनवाक्यमाळा । योग्यता वर्चसें ॥ १६ ॥ निर्गुण भाउनी निराळें । सगुणभावना विश्वमुळें । अहंकृत जाणीव प्रबळे । निरर्थक चर्चा ॥ १७ ॥ येथें अद्वैतीं उमजेसा । युक्तीनें न दिसे अपैसा । रात्री दिवसें वीण दिवसा । रूपक आश्रय ॥ १८ ॥ स्वरूपांबर अभ्यंतरीं । अनुभव सद्रोदय करी । जो अखंड मंडळाकारीं । निर्बिंब बिंबे ॥ १९ ॥ जो प्रवृत्ति निवृत्तीचें निस्तरण । जो सर्व गताचें अस्तरण । जो विस्तीर्णतेचें विस्तरण । प्रमय भरणें भरी ॥ २० ॥ तो अधिकार विशेषें श्रोता । जो वक्तयाचा हि वक्ता । सुखें चि चावळिजे तत्त्वता । हें गुज तयांसी ॥ २१ ॥ जाणे अंतरींचे भाव सखोल । परीक्षूनी घे निःशब्द बोल । महा अद्वैत सुखाचे डोल । देत हें गुज ऐके ॥ २२ ॥ सद्भाविक

आणि सज्ञान । त्याचें चि रिघे। येथें अनुसंधान । सद्गुरु कृपेस्तव साधन । पावला पर पार ॥ २३ ॥ ब्रह्ममाया संधी । संदिग्ध ॥ न होतां संशयानळीं दग्ध । सद्गुरुकृपा सुस्नेहें स्निग्ध । नित्य मार्जिला ॥ २४ ॥ आपली चि वृत्ती अपरोधी । स्वरूपापराध भेदबुद्धी । जो भ्रंशेना निरवधी । तो माया निस्तरला ॥ २५ ॥ तो जाल्यांहीं शाश्वत असे । विजातीचा संस्कार नसे । जो सद्भावीं च विलसे । भक्तीचा अंकुरला ॥ २६ ॥ जो अहंब्रह्मास्मीची ममता । मासूनी गेला संधी परता । जो निःसंगपणाच्या वरुता । वीतराग वरिष्ठ ॥ २७ ॥ जो पंच कोशाची सीमा टाकी । जो प्रचीतीपर प्रमय पोखी । जो अज्ञान सिंधूतें शोकी । ज्ञान प्रळयार्क ॥ २८ ॥ जो स्वभाव स्थितीतें अपर । जो पर स्वभावें त्याहीं पर । जो परापर संधीसी धर । धारणें विना ॥ २९ ॥ जो स्वयें अस्तिक्य न भावी । जो सर्व गतासी न दावी । जो देखणेपणे-वीण दावी । अरूप सर्वे ॥ ३० ॥ जो आपणें चि आपणा वेगळा । जो निबिडपरी सर्व मोकळा । जो अकळ परी सकळ कळा । संपन्न करी ॥ ३१ ॥ जो अगुणपरि निजगुणान्वयें । गोप्याचें ही गोप्य स्वयें । अनुभउनी त्याची विस्मयें । अनुभवीं नुरे ॥ ३२ ॥ जो द्वैताद्वैत संधी मार्जी । महा अद्वैत तेजें सहजीं । उमजाचा उमज नुमजीं । उमजवीत सुखें ॥ ३३ ॥ ऐसा हृदयस्थ श्री अनंत । मौनी नामाचा विख्यात । तो अवधानें ग्रंथ इच्छित संत । समाजीं वैसला ॥ ३४ ॥ वक्ता होउनी स्वयें । वगत्वाच्या उद्धतीसी नये । वाचेची वाचा अर्थान्वयें । अर्थासी विवरे ॥ ३५ ॥ सच्चित्सुखाच्या अतिशयें । अनुभवी चि विस्मय होय । तेणें विस्मयेंसीं जाय । निशब्दा माझारीं ॥ ३६ ॥ भावळें साक्षात्कारी ज्ञान । त्याचें अस्तिक्य अधिष्ठान । स्वयें सर्वगत अनुसंधान । संधानीं निवळे ॥ ३७ ॥ परब्रह्माची अस्तिक्यता । प्रचीतीसीं आली तत्वता । हें ज्ञानावांचुनी संभाविता । कळणें केली ॥ ३८ ॥ बरें ज्ञानवस्तु अभिन्नता । ऐसें ह्मणतां सगुणता । अथवा निर्गुण चि केवळ असतां । निर्गुणता नुमसे ॥ ३९ ॥ निर्गुणता उमसली च नाहीं । हें कळलेपणा

आलें पाहीं । यदर्थी संशयनदी प्रवाहीं । पडोनी गेले किती ॥ ४० ॥ स्थिरावलें नसतां अंतःकरण । अद्वैत विचार संसरण । स्थिरावेना चि पां अनुसरण । केवळ प्रचीतीचें ॥ ४१ ॥ प्रचीतीच्या डोळां कांहीं । सांहे चि ना सूक्ष्म हीं । गगन गाळीव तेहीं । खुपों लागलें जेथें ॥ ४२ ॥ ऐसी दृष्टी जयाची निर्मळ । जे द्रष्टेपणासी करी चोखळ । तेथें अहं ब्रह्मास्मि मळ । मुळींहूनी च नसे ॥ ४३ ॥ आत्मज्ञान आत्मदृष्टी । भिन्नाभिन्न परी पाटीं । निवळोनी हृदयीं समसाटीं । जाळी पाहिजे ॥ ४४ ॥ वस्तु अनादि शुद्ध बुद्ध । ज्ञानहि अनादि सिद्ध । ज्ञान प्रभवें समंध । रूप होय सहजें ॥ ४५ ॥ ज्ञानी रूप जालें तें अरूप । तें हें प्रचीतीचें स्वरूप । ज्ञान गिळुनी आपेंआप । उरे निर्विकारी ॥ ४६ ॥ महा सिंधूचें जळ । शोषिती सूर्यरश्मी अकळ । पाहतां तें सूर्यबिंबीं पातळ । प्रवाह न दिसे ॥ ४७ ॥ तप्त लोहाचा पर्वत । कीं धडधडीत कल्पांत वन्हींत । रिचवल्या मेघधारा जात । सहज निदाना ॥ ४८ ॥ छेदिल्या तरूची सार्द्रता । जाय निदानासी स्वभावता । कीं उपजल्याची प्रमाणता । जाय निदानी ॥ ४९ ॥ तरुणांगनेचें सौंदर्य । वृद्धापीं टाकुनी वीर्य । तैसा साक्षत्वाचा सूर्य । अस्तवे पुरता ॥ ५० ॥ सुमनीं संभवला पराग । विलेंबें अथवा सवेग । जाय निदानी अंतरंग । तेवि ब्रह्मदशेचा ॥ ५१ ॥ पाक निष्पत्तीचा स्वाद । जाय अवसरे चि विशद । तेवि स्वरूपाचा स्वानंद । पावे निदानासी ॥ ५२ ॥ मधुर अक्षरांची ध्वनी । जाय सामावोनि गगनीं । तेवि सायोज्यदशा उन्मनी । जाय निदानासी ॥ ५३ ॥ पुढें अनुभव आणि स्वानंद । केवि अनुभविती आत्मविद । ते परमाद्वैतदशा संवाद । अवधारिजे श्रोता ॥ ५४ ॥ इति श्री भीमोपदेश । परापरदशा प्रदेश । वसउनी त्या ग्रंथीं अवकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ दशम सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥



श्री

# सूर्य १० कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनुभवी स्वानंद । स्वानुभवाचा अनुभव कंद । प्रचीति अद्वैत संवाद । होतसे अभिन्न ॥ १ ॥ अनुभवावरील महा स्थिती । जे निरतिशय सुख विश्रांती । स्वभावदशा आवर्ती । स्वरूप गहन ॥ २ ॥ अणुहून सूक्ष्मतर । अनुसंधान स्फूर्तिपर । परसंविद्दशा निरंतर । या त्रि वित्रें ॥ ३ ॥ स्वरूपान्वय निर्धारें । जेवि अग्नीनें काष्ट ज्वाळा कारें । प्रकाशुनी स्वतेज दुर्धरें । काष्ट वन्ही च केलें ॥ ४ ॥ कीं पृथ्वीनें पदार्थ विस्तारें । संभउनी विश्व आकारें । जीर्णतेसी आणुनी तदनंतरें । पृथ्वीरूप केलें ॥ ५ ॥ स्वरूपान्वय साक्षात्कारें । प्रगटोनी स्वरूपावेरें । पदार्थ अभ्यंतर पसरें । निर्विकार पदार्थ केले ॥ ६ ॥ प्रज्ञा प्रभंजन धरें । पंच तन्मात्रा रुपावरें । ब्रह्माकारदशेनें तत्परें । रूपें प्रभंजन केलीं ॥ ७ ॥ सुतीक्ष्ण जाणीव सतेज । नाना कल्पना रूप उमज । आणुनी विज्ञान-दशेसी सहज । दशा अद्वैत केली ॥ ८ ॥ या अनुभवाच्या परवडी । सर्व दैव निजांची गोडी । सर्वकाळ सर्वगत रूढी । नित्योपर्जीविका ॥ ९ ॥ अनु ह्मणिजे अत्यंत गहन । निज स्वरूपानुसंधान । सूक्ष्मात्सूक्ष्म रिघोन । स्मरण होय स्वरूप ॥ १० ॥ जैसी व्यापकता गगनीं । घनता पावे अनुसंधानी । तेंथें अवकाशता सघनी । होय निरावकाशता ॥ ११ ॥ यापरी ज्ञानानुसंधान । भव ह्मणिजे संभव विधान । एवं अनुभव अवधान । ब्रह्म निजध्यासें ॥ १२ ॥ निर्विकल्प समाधी क्रमें । साक्षात्कार निज उगमें । कीं साक्षात्कार निजनेमें । संभवे समाधी ॥ १३ ॥ जें निजाक्षीं विलोकिलें । जें अस्तित्त्वपणें असे संचलें । जें द्वैत स्फूर्तिवीण निवळलें । निज अभ्यंतर ॥ १४ ॥ तेथे सप्तभूमीका वसती । अद्वैत प्रचीतीनें जाणवती । जाणणें ग्रासुनी रूढती । स्थिती अवस्था पर ॥ १५ ॥ साक्षात्काराचें व्याख्यान । जेंवि प्रत्यक्ष देखिजे निधान । तेंवि सदोदित अधिष्ठान । ज्ञानचक्षूसी आंतुडे ॥ १६ ॥ साक्षात्कार आणि अनुभव ।

पाहतां येथ चि अभिप्राय । परप्रचीति स्वभाव । आपुलें हृदयींचा ॥ १७ ॥ या अनुभवावरील सुख । सर्वगत असे सन्मुख । तेथें प्रचीतीचें सुख । विन्मुखतेसी न ये ॥ १८ ॥ पाठीमोरी नव्हे पाठी । तैसें परतोनी पाठीं पोटीं । सन्मुख पाठीमोरें घोंटी । घडमोडी दर्शनें ॥ १९ ॥ या निजदृष्टीमाजि अनुभव । अनुभवीं आनंद निर्भव । जैसा तृप्तीवरील स्वभाव । जाणवे अभ्यंतरीं ॥ २० ॥ जैसी धनिकाची प्रसन्नता । आंगीरूप सस्वभावता । कीं वनितेची सौंदर्यता । जीवीं तोषरूपें वसे ॥ २१ ॥ कीं क्षत्रियाची महा शौर्यता । ना ते महा वैदीकी योग्यता । कीं सर्वज्ञाची चातुर्यता । योग्यता जीवीं विलसे ॥ २२ ॥ महा साक्षेपाची जोडी । अनुभउनी सुखपरवडी । संतोष वाटे जो कां प्रौढी । तैसी अनुभवीं विश्रांती ॥ २३ ॥ अनुभवाचे आंगीं विश्रांती । विश्रांतीसी अनुभव हे कैसी रीती । तरी अवधान करूनि तीक्ष्ण मती । अवधारिजे हें ॥ २४ ॥ स्वानंदें करुनी अनुभव । प्रांजळ जाणिजे अभिप्राव । सुख मनीं मानूनी निर्भव । सुखी होइजे वर्तमानी ॥ २५ ॥ प्रगट नसता रामावतार । भविष्यें चि केला जगोद्धार । कां त्या अवताराचे दुर्धर । तेज प्रसन्नतेचें ॥ २६ ॥ तैसें स्वरूप प्रवर्तलें नसतां । कोण्हासी श्रुत दृष्ट न होतां । ना न धरितां रूपाचेवता । अनुभवासी आलें ॥ २७ ॥ वाल्मीकें केली भविष्य विख्याति । विस्तारली रामावतार कीर्ती । तैसी च सद्गुरूनें प्रचीती । स्वरूपाची प्रगटली ॥ २८ ॥ भविष्य रामावतार महिमा । प्रत्यक्ष होतां तो परमात्मा । तेव्हां वाल्मीक योग्यतेसी सीमा । नाहींसी च जाली ॥ २९ ॥ जे भविष्यें अनुवादला । तैसा चि प्रत्यक्षतेसी राम आला । तेव्हां लोक विख्याति उदेला । वाल्मीक सूर्य वर्चसें ॥ ३० ॥ तेव्हां सद्गुरु ब्रह्मसाक्षात्कार । प्रत्यक्षतेसी आणुनी निज निर्धार । केला यथार्थ जगदोधार । स्वरूप प्रत्यक्षतेनें ॥ ३१ ॥ निजलाभीं ठेउनी दृष्टी । प्रवर्तली आहे सर्व सृष्टी । लाभावांचुनी नुसती गोष्टी । कोण्ही कोण्हासी न करी ॥ ३२ ॥ प्रवृत्ती पाहतां सविस्तरें । इच्छयासुख तदनुसारें । प्रवर्तती नाना प्रकारें । सुखा चि लागी सर्वत्र ॥ ३३ ॥ पुत्रावरील मायेची ममता । विचारूनी

वरी पाहतां । आपुल्या सुखास्तव सलोभता । ऐसी च सर्वत्र ॥ ३४ ॥ माता पिता पुत्र संबंध । स्त्री पुरुष बहुविध । संसार विस्तारला प्रसिद्ध । सुखाची ममता ॥ ३५ ॥ निवृत्तीपर अनुसंधान । सुखास्तव चि वस्तु साधन । जैसें प्राप्त व्हावयासी धन । नाना उपाय कीजे ॥ ३६ ॥ धनानुभव गोडी । लागलिया सर्वत्र रूढी । धनसाधनाची जोडी । करिती प्राण निदानें ॥ ३७ ॥ ज्या प्राणसुखा लागला अर्थ । प्राण वेचिजेति ते तदर्थ । तस्मात् द्रव्याचे ठायीं पदार्थ । नाना स्वार्थ वसती ॥ ३८ ॥ द्रव्यावांचुनी जिणें व्यर्थ । ह्मणती मृतप्राय अकिंचिनार्थ । प्रवृत्तीसी द्रव्यें चि समर्थ । येर ते दुबळे ॥ ३९ ॥ तैसें निवृत्तींत आत्मज्ञान । नसतां जिणे चि होय प्रेतासमान । जन्ममरण संस्कार पूर्ण । अज्ञान यातायाती ॥ ४० ॥ दरिद्रें पीडिले प्रवृत्तीचे लोक । तैसें आत्मज्ञानेवीण विवेक । अनुभवाचे सुख अलौकिक । कैंचें तयासी ॥ ४१ ॥ तस्मात् आत्मज्ञान साधावें । तरी साधनीं नित्य प्रवर्तावें । सर्वकाळ धरावें । अनुसंधान जीवीं ॥ ४२ ॥ हें शिकउणेकेनें न घडे । जरी कां पोटीं प्रस्तावा पडे । संसार निवृत्तीचें आवडे । संभाषण जया ॥ ४३ ॥ हें बहुत जन्मांतरीचें सुकृत । स्वरूपीं उजळे निजहेत । स्वरूप प्राप्तीचे अखंडित । साधन करी ॥ ४४ ॥ भोजनीं पाहिजेत परवडी । तरी तितुका साक्षेप पाहिजे आवडी । साक्षेपेंवीण रसनेसी गोडी । पदार्थेवीण न ये ॥ ४५ ॥ साक्षेपेवीण सभाग्यवंत । पदार्थ अनुभविती अनंत । तरी पूर्वीं जोडिलेती हद्दत । तितुके वोळले ॥ ४६ ॥ भांडारगृहांत द्रव्यकोटी । नाना पदार्थ परिपाटी । दिव्यांबरें अलंकार थाटी । ज्याच्या त्यासी उपेगा ॥ ४७ ॥ तैसीं सुकृतें आर्जविलीं । तितुकी फळप्राप्तीसी आलीं । तरी आत्मज्ञानासी जालीं । कारण साधनें ॥ ४८ ॥ आत्मज्ञान साधनसार । सद्गुरुकृपेचा निर्धार । साधिती गुरुभक्त साचार । सद्भाव भक्तीनें ॥ ४९ ॥ या अनुभवें कडूनी जाणिजे । पात्र स्वानंदाचें होइजे । साधन संपत्तीवीण सहजें । अनुभव नये चि कीं ॥ ५० ॥ हा अनुभवें कडुनी स्वानंद । जाणती आत्मविद निर्द्वंद । पुढें स्वानंदाचा सुखकंद । अनुभविती कैसा

॥ ५१ ॥ सत्स्वरूपाची नित्य पदवी । स्वानंदें चि जो अनुभवी । त्या अनुभवाचें रूप कवी । अनुभविते अवधारा ॥ ५२ ॥ इति श्री भीमोपदेश । स्वानंदानुभवसौरस । निजात्मरूपीं प्रवेश । ह्मणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ दशम सूर्य नवम कळा संपूर्ण ॥ ९ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य १० कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामस्वरूपानुभवी । श्रीराम अनुभवाचा कवी । कृपा प्रसादें चाखवी । भाविकांसी तो रस ॥ १ ॥ नित्यमुक्त हे सकळ जीव । घेतील जरी कां निजानुभव । तेहीं सद्गुरुकृपा नवलाव । घ्यावा वाक्य श्रवणीं ॥ २ ॥ गुरुकृपेवीण सहसा । कळे चि ना ते सोहं हंसा । वाक्यार्थ दीप प्रकाशा । उजळुनी वस्तु पहावी ॥ ३ ॥ जैसे पुरातन निजभूषण । जीर्ण जालें भूमीगत होऊन । तें बहुता काळीं देखोन । तोपें स्वच्छ कीजे ॥ ४ ॥ तैसें आत्मज्ञान शरीरीं । जीर्ण जालें बहुतां प्रकारीं । अवस्थारूपें अभ्यंतरीं । अच्छादलें ॥ ५ ॥ तें सद्गुरुकृपेनें अवचट । आतुडलें निसोदर्यें आंतुवट । ते आत्मज्ञान रवीची पाहाट । फुटली सर्वदां ॥ ६ ॥ न्याहाळुनी आत्मज्ञानाचे डोळे । पाहों लागले प्राचीसी उजाळें । आपुली सर्वगतता तेणें काळें । दिसों लागली सोज्वळ ॥ ७ ॥ गगन गाळीव निजवस्व । ठेवी स्वरूपाची निर्भव । स्वयंभू सुख राणीव । भोगितां चि ठेले ॥ ८ ॥ तैसे संत निजानुभवी । त्याच्या प्रसादाची ठेवी । वानिती वेदादिक कवी । महा महिमे ॥ ९ ॥ जे बोलनें शुक्तीसी न ये । जे कांहीं येकपण न साहे । ते अत्यंत जवळ होय । सद्गुरुप्रसादें ॥ १० ॥ सद्गुरुप्रसाद महिमा । पाववी प्रत्यक्ष परब्रह्मा । ब्रह्म प्रचीती स्वयमात्मा । हे प्रत्यक्षता ॥ ११ ॥ सर्वकाळीं विद्यमान । भूतभविष्याचें अधिष्टान । तो येक आपला आपण । येथें दुजा कैंचा ॥ १२ ॥ आपणा वांचुनी त्रिभूवनीं । पाहतां

दुजा नाडळे कोण्ही । सर्व शरीरीं विद्यमानी । आपणें चि वर्ते ॥ १३ ॥ परी येथें येक अभिनवकळ । अकळ प्रवृत्ति तत्व अकळ । प्रवृत्तीसी येतां जन्ममूळ । निजतत्व दुन्हावें ॥ १४ ॥ कंठीं असोनी मंगळसूत्र । पावे स्वप्नभ्रम तो विचित्र । सौभाग्यहानि अपवित्र । दुखें जाजावे ॥ १५ ॥ तेवि स्वरूपाचें विस्मरण । बोढवलें विश्वरूपें मरण । हें अकळ प्रवृत्तीचें कारण । कळे सद्गुरु करितां ॥ १६ ॥ सद्गुरु दिवाकर उदयें । तमजात रज्जुसर्पभय । वारूनि केलें निर्भय । पूर्ण परीक्षावंत ॥ १७ ॥ ज्ञानरत्नाची परीक्षा । करूं जाणे तो तत्व विविक्षा । निजलक्षे चि त्या अलक्षा । स्वयें चि निवळे ॥ १८ ॥ सद्गुरुकृपा कटाक्षें । निजानुसंधान अंतर्लक्षें । आपणें चि स्वरूप प्रत्यक्षें । प्रचीतीसी आला ॥ १९ ॥ आपणामाजि जगत्कारण । आपणामाजि स्वरूप निष्कारण । हे चि विचारणा भ्रमहारण । चर्चा करावी ॥ २० ॥ सद्गुरुसंत सहवासीं । होउनी गुरुभक्ति विश्वासीं । नित्यानुभव चर्चेसी । अवकाश द्यावा ॥२१॥ स्वरूप अनुभव चर्चा होतां । अवचट त्या सुखे तल्लता । अवस्थेतीत स्वभावता । सुखाची बोळे ॥ २२ ॥ जैसी डांक वाजवितां दैवत । आवेश आंगीं भरे अद्भुत । कीं कामिनीकटाक्ष स्मरजात । कामिका सकामता ॥ २३ ॥ नाना पदार्थ रसाळता । रसना चाखे अरोगितां । ग्रासोग्रासीं संतृप्तता । येतसे अवाप्तीसी ॥ २४ ॥ क्षुधा होउनियां दुस्तर । नाना मधुरान्नें उदर । स्वादतृप्तीने ढेंकर । देत ते तृप्ती चि आथवी ॥ २५ ॥ जगत्कारण कवण्या प्रकारें । आपण आहे हे चि विवरें । विवरावें अभ्यंतरें । अति सावधानता ॥ २६ ॥ आपण येकपणेवीण येकला । स्वभाव स्थितीनें संचला । आपलेपणापासुनी नाहीं जाला । वेगळा कदापि ही ॥ २७ ॥ तो आपण तन्ही कैसा आहे । ऐसें पहावें वाटे पाहे । तें चि दुजेपणासी होय । ठाव आपणामाजि ॥ २८ ॥ आपण निर्गुण निराकार । आपण निःसंग निराधार । ऐसें प्रचीतीचा निर्धार । कवणें केला ॥ २९ ॥ आपलें अपरोक्ष आत्मज्ञान । तें चि होउनी स्वप्रकाशघन । आत्म संदर्शनें समाधान । देउनी ठेलें ॥ ३० ॥ या आत्मज्ञानाची प्रौढी । सिद्धांतें उभविली

गुढी । आत्मसाक्षात्कार प्रौढी । शिवविष्णु परंपरा ॥ ३१ ॥ हें रूढीनें पाहतां न कळे । आत्मप्रचीतीनें निवळे । सद्गुरुप्रभाकरें निज डोळे । चेइरे केलियां ॥ ३२ ॥ सद्गुरुकृपा आत्ममंडळ । ज्ञानरवी अनुभव सोज्वळ । प्रकाशतां हृदयीं सांजवेळ । जाली आस्तव त्या सूर्याची ॥ ३३ ॥ सत्य संकल्प सांजवेळा । नास्ति निवृत्ति आस्तिक्य उजाळा । या उभय द्रष्टत्वाचा निर्वाळा । जाला सद्गुरुकृपेनें ॥ ३४ ॥ उभय द्रष्टुत्व कैसा आपण । या चि प्रचीतीचें निरोपण । निरोपिलें पुढें संपूर्ण । सोहं हंस स्फूर्तीनें ॥ ३५ ॥ जैसें क्षीरनीर मिसळलें । हंस चंचूनें तात्काळ । नीर निवडुनी गोडी आगळें । क्षीर रसना घोटी ॥ ३६ ॥ मिसळलें खरें खोटें नाणें । द्रव्यपरीक्षावंत ईक्षणें । खोटें निवडुनी सन्मानें । उरे खरें प्रसिद्ध ॥ ३७ ॥ तैसें स्वरूपानुसंधानी । सद् असद् वृत्ती दोन्हीं । मिसळल्या त्या निवडुनी । सद्वृत्ती घ्यावी ॥ ३८ ॥ सत्य संस्कारें प्रवळली । पतिव्रता नावागळी । परी वन्हीसेजेसी रिघाली । सती होय तेव्हां ॥ ३९ ॥ तैसी सद्वृत्ति ब्रह्म संस्कारें । निर्वाणदशेसी प्रचीती भरें । स्वरूप सुख साक्षात्कारें । निदान पावे ॥ ४० ॥ आपुला जीव देउनी बळी । निर्दोष निधान साधिलें सकळीं । घोष कीर्तीचा भूमंडळीं । होय प्रशंसा ॥४१॥ तैसें अहंमतीसि ग्रासुनी । निजास्तिक्य अनुभउनी । राहती सज्जन समाधानी । अपरोक्ष तत्ववेत्ते ॥ ४२ ॥ साधु अपरोक्ष तत्यानुभवी । विश्वपावन त्यांची पदवी । ग्रंथोपग्रंथी महा कवी । भाट होउनी वर्णिती ॥ ४३ ॥ तें चि पुढें निरोपण । निजानुभवी लक्षण । देउनियां संत अवधान । अवधारिजे पुढें ॥ ४४ ॥ इति श्री भीमोपदेश । सद्सद्वृत्तीचा प्रकाश । हंस साद्दा सोहंहंसें[1] । ह्मणे मेरु अनंत ॥ ४५ ॥ दशम सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीरामचंद्रार्पण ॥

---

१ हंस तो मी तो मी हंस ( पाठांतर )

श्री

# सूर्य १० कळा ११

॥ श्रीरघुनंदनाय नमः ॥

श्रीरामसोहं हंस अभ्यंतर । सद्सद्वृत्तींचा उधार । अनुभवी निरंतर । साक्षत्वा वेगळा ॥ १ ॥ निराकार स्फूर्ती प्रथम । ते सद्वृत्ती निरोपम । असद्वृत्ती ते संभ्रम । भूत भाविती ॥ २ ॥ पाहतां अद्वय हृदय । संचर निर्विकार निरामय । त्या हृदयीं च सहोदय । वृत्तिद्वय उभारा ॥ ३ ॥ पर्जन्येविण सरिता तुंबळ । वाहों लागलें कोरडे जळ । तेणें जळें पिकलें अखिल । पांचाभूतिक हें ॥ ४ ॥ जैसा वाजीगिरीचा खेळ । नसोनी कांहीं होय प्रबळ । तमासा पाहों आले सकळ । ते डोळस तेथें चि ॥ ५ ॥ जे गर्भांध मुळींचे । त्याची दृष्टी न भासे न वेचे । गुप्त अंतरीं प्राणीचे । ठेवे सर्वांग डोळस ॥ ६ ॥ तेथें विपरी नी सुपरीत । स्वरुप आणी प्रचिती येत । दुजेपणेंविण द्वैत । दुभे अद्वैत सास्वते ॥ ७ ॥ निजाळाभ पसव वेळा । द्वैताद्वैत स्फूर्ति जिव्हाळा । नित्य साक्षत्व उजाळा । परोक्ष परोक्षे ॥ ८ ॥ सद्वृत्तीचें हें उमसलेपण । सोहं हंसा ब्रम्हस्फुरण । जैसें आपला चि डोळा आपण । तेणेंवीण होय आंधळ्य ॥ ९ ॥ चक्षु गेलीयानें कांहीं । तो आपण मरत नाहीं । तैसी सद्वृत्ती पाही । स्फुरे आत्मत्वीं ॥ १० ॥ निज चक्षु उपेगासी । हेतु होय सुखदु:खासी । तैसें आत्मत्ववृत्तांसी । भेदाभेद स्फुरण ॥ ११ ॥ आपसंचलेपणें निर्मळ । दावी सद्वृत्तीचें शीळ । आत्मा सद्वृत्तीयोगे केवळ । दृष्टा होय स्वभावें ॥ १२ ॥ प्रत्यक्ष सद्वृत्तीच्या संस्कारें । न लेंपे कांहिं येक धरें । जैसें गगन त्या पसरें । सर्वी आतुडलेंसे ॥ १३ ॥ तैसें आत्मयाचें व्यापकपण । उरला सद्वृत्तीसि घेऊन । जैसें गगन चि निर्मळपण । दाविले स्फटीका आंगीं ॥ १४ ॥ तेवीं निजांग अस्तित्वयता । सद्वृत्तींची व्यापकता । अस्तित्व व्यापकतेने सत्ता । आमत्व विलसिलें ॥ १५ ॥ पापाणी लिंग स्वयंभ । अनादि होते सुप्रभ । ते आर्चकविधिने

निजलाभ । प्रसन्नतेसी ये ॥ १६ ॥ अकर्तव्य आणि संपूर्ण । आपुले हृदय गहन । सद्वृत्तियोगे सनातन । ज्ञानघन विलोकी ॥ १७ ॥ मृत्तिकेचे आवविले । विंव नागरपणे भले । त्यासी जैसे चि झाले । कडविकड तें नभ ॥ १८ ॥ तेवी सद्वृत्तीचे चोखडें । जेथे जेथे अर्पण पडे । तेथे तैसी चि पाडे । आत्मत्वीं रूढीसी ॥ १९ ॥ आत्मत्वाचे प्रशस्तपण । हे दैविक सिद्धि चि वरदान । कीं निज सुप्रसन्नता आपण । प्रगटले त्यानंदे ॥ २० ॥ गंधर्व स्त्री मंत्र सिद्धीने । अनेक गंधर्व शस्त्रास्त्र माने । प्रगटोन त्या धीरर्थाने । परासी पराभविजे ॥ २१ ॥ चिंतामणीची प्रसन्नता । पदार्थ सिद्धि संपूर्णता । पदार्थाचा संभव पाहता । कांहीं च नाडळे ॥ २२ ॥ अक्षय तूर्णांतून शर । निघतेची असती अपार । त्या शरोत्पत्तीचा विचार । होय शरत्कारेंविण ॥ २३ ॥ नानामंणीं औषधी चमत्कारे । उपयोगासी येती गुणसारे । तिनुका अकल्पीत भाव निर्धारे । येतसे प्रचीतीसी ॥ २४ ॥ नाना दैवत प्रसन्नता । पदार्थ प्राप्त होती वस्तुता । अपूर्णी सदन्न संपूर्णता । होय ब्रह्म संतर्पणीं ॥ २५ ॥ तैसेची सगुण साक्षात्कार । कां गगन वाग्देवता उच्चार । नाना रिद्धिसिद्धि सविस्तर । दैविक रूढलेसे ॥ २६ ॥ तैसें सद्वृत्ती मात्रि संपूर्ण । अस्तिक्यतेचें अधिष्टान । दैविक स्वरूपें प्रकाशघन । प्रगटीत सत्ता ॥ २७ ॥ त्या आत्मत्वाचें अधिष्टान । स्वयमात्मातत्व निधान । साक्षत्व सत्तेने पुरातन । नित्य नूतन वर्ते ॥ २८ ॥ परोक्ष अपरोक्ष द्वयवृत्तीने । माया अविद्या प्रसिद्धतेनें । दृश्य द्रष्टा दर्शन विधीने । रुपासी येतसे ॥ २९ ॥ अकल्पीत आत्मत्वीं ज्ञान । जैसें जीवनामाजी फळ संभवोन । गोडी रसना होऊन । हृदय तृप्त केले ॥ ३० ॥ तैसे सद्वृत्ती माजी दैविक । सत्ता ज्ञानसुखे कांहीं येक । निजस्वरूप सत्ता निश्चयात्मक । हेत उपलब्धीसी ॥ ३१ ॥ या कारणे आत्मत्वशुद्धि । करितीं संत विवेकनिधी । महा समाधीस्त कृतबुद्धी । जाले आत्मत्व शोधे ॥ ३२ ॥ आत्मत्व जें कां आपुलें । स्वरुपाकारे प्रचितीसी आलें । या समाधानासी लाभले । पूर्ण समाधान ॥ ३३ ॥ आपण निजांगें निरंजन । आत्मत्व ब्रह्मज्ञानाचें अंजन । सद्वृत्तिनयनी

सज्जन । विलोकीती निधान से ॥ ३४ ॥ आपुलें स्वरुप आणि ज्ञान । याचा निवाडा ऐसा जाण । आत्मत्व हे प्रकाश घन । निजानुभवें रुढे ॥ ३५ ॥ नाना साक्षत्वाच्या रुढी । नाना पदार्थ परवडी । नाना युक्ती काडी विकडी । आत्मत्व प्रसवे ॥ ३६ ॥ नाना अनुभवाचीं द्वारें । नाना अवधान अनुसंधान परे । नाना वस्तु विधान विस्तारे । उपलब्धी आत्मत्वीं ॥ ३७ ॥ स्वरुप ज्ञान संपुटी करण । अव्यक्त तत्व पंचीकरण । येकानेक अहंकरण । आत्मत्व संभवे ॥ ३८ ॥ जैसा अक्षयीं ज्ञप्ता प्रवर्ती । तैसा आत्मत्वीं चिदाभास स्थिती । आत्माची प्रगटोनी सर्वार्थी । संपन्न होय ज्ञानें ॥ ३९ ॥ पदार्थज्ञाने आणि आत्मज्ञाने । महासत्ता आणि सामर्थ्यानें । विशेषोपलब्धीसी प्रसन्नतेनें । आत्मा प्रुरतरु चि तो ॥ ४० ॥ आत्मा आणि आत्मत्व ऐसें । स्वरुपज्ञान समरसे । विचारता आत्मा येक चि असे । ते चि निरुपण अवधारा ॥ ४१ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । आत्मत्व दैवीक दशा तोष । ज्ञान अधिष्टान प्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥४२॥ दशम सूर्य एकादश कळा संपूर्ण ॥ श्रीरामचंद्रायनमः ॥



श्री

## सूर्य १० कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम आत्मत्व रुपका । आत्मा दैवीक द्योतका । आत्म परायण कौतुका । कारण होसी कैसा नेणे ॥ १ ॥ आत्मा म्हणजे कोण्हि एक । ऐसा नव्हे की हा विवेक । विचारितां निज निश्चयात्मक । आत्मा चि तो आपण ॥ २ ॥ नाना विचार शास्त्रवादें । नाना संमति सिद्ध संवादे । नाना युक्ति सद्गुरुप्रसादे । प्रचितीसी ये आत्मा ॥३॥ आत्म्याचा निवाडा जाला । आत्मा निर्विकारें संचला । तो चि आपण निवळला । निजयोग आत्मत्वीं ॥ ४ ॥ आपण येक येक अंतःकरण । चालिले परि नाव्हिकार प्रमाण । आपणासी सोडुनी संस्कारण । अप्रासें माडिले ॥ ५ ॥ हे

अज्ञानाची महां सवडी । विस्मरणपणेंचि येत धाडी । आत्मत्व , आत्म विघडाविघडी । हे प्रसिद्धि मायेची ॥ ६ ॥ ते माया कांहीं स्वतंत्र नसे । अत्यांतरीं आत्मत्व उमसे । अनेक आत्मर्चे प्रकाशे । अनेक विध कारणे ॥ ७ ॥ अत्रांतर मायेचेनि आत्मत्व । परि . आत्मत्व निजांगें परतत्व । उमसलें मायेचे निसाक्षत्व । अनादि सिद्ध ॥ ८ ॥ या आत्मत्व विद्यमानें । आत्मविद् वेच प्रचितीने । जाले समाधानी प्रसन्नतेने । कृतार्थ करीति जगा ॥ ९ ॥ आत्मानुभवी आत्मपरायण । आत्मज्ञानी ; आत्मसुखसंपन्न । आत्मोपलब्धी आत्मानुसंधानें । सज्जन आत्मावधानीं ॥ १० ॥ जे . निरपेक्ष .अंतरापासून । जे सहज स्थितीचे विसावे पूर्ण । जे स्वभावेंचि उदासीन । सर्वारंभ परित्यागी ॥ ११ ॥ सर्वकाव्यें स्वरुपपर । अखंडतेचा निज निर्धार । येकात्मतेने, निर्वैर । वर्तती जगीं ॥ १२ ॥ स्वरुप ध्यानें नित्य ध्यानस्थ । राहिले स्वरुपतेनें निवांत । अखंड येकांते निःशब्द संत । व्योम दृष्टांत प्रसिद्धि ॥ १३ ॥ निजांगे अंगविहीन ते । अपांगें आत्मप्रद पुरते । विज्ञान अधिष्ठित बोधक सत्ते । माजी सुप्रसन्न ॥ १४ ॥ सर्वातिशय टाकोनी जांवे । निघाले अखंड स्वानुभवे । शांतींचे चि स्वभावे । अंकुरले सुरतरु ॥ १५ ॥ संत विश्रांतींचे अंतर्लेणें । संत स्वरुपतेचें आले केणें । संत निज प्रसन्नतेचें देणें । निजदेवे लाभले ॥ १६ ॥ संत स्वसुखार्णवाचा ठाव । संत स्वभाव स्थितीचा राव । संत आत्मप्रचीतीचा भाव । प्रत्यक्षतेसी आला ॥ १७ ॥ त्या संत दृष्टीसी सहजे । संत स्वरुप विध समाजे । विलोकन आर्चन उमजे । प्रसन्नता भोगिती ॥ १८ ॥ अपरोक्ष वस्तु आत्मज्ञान । हे चि संताचें स्वरुप सनातन । परी नित्य प्रचीतीने नूतन । अनुभविती संत ते ॥ १९ ॥ विश्वरुप व्यक्ति वरव्या । भाऊनी संत स्वरुपे नित्य नव्या । अर्चनविधीने व्हाव्या । नित्य अवाप्ति सुखाच्या ॥ २० ॥ विश्वंभर देवाची भरणी । अभिनव व्याप्ती अभिनव करणी । अभिनव प्रीतीने अंतःकरणीं । पूजा विधाने प्रतिष्ठा ॥ २१ ॥ अष्टभाव सिद्धीचा उभारा । घेऊनी हृदयींचा नम गाभारा । तेथे सद्भक्तींचा देव्हारा । निरोपम शृंगारे ॥ २२ ॥

त्रैलोक्य जीवनाचें जीवन । स्वयंभू सुखाचें भवन । निजानंदाचे वैभव पावन । उपचार विस्तारें ॥ २३ ॥ परा स्फूर्ति गाळुनी जीवीं । निजभ्यासाची प्रसन्नता व्हावी । त्याउनि विज्ञान ठाण दिवी । पृथुकाकारें सर्वत्र ॥ २४ ॥ अंत जारज स्वेदज । चौथें निजांग उद्बीज । लक्ष चौऱ्यांसी रुपे सतेज । निजगूज विस्तारले ॥ २५ ॥ निरखुनी शरीराची धरव । घेऊनि प्रीतीनें अंतर्भाव । मानिलेंने उपचार सर्व । तेथें समर्पावे ॥ २६ ॥ समयोचित देवइच्छेनें । अपेक्षित तें ते काळे तेणें । सद्भाव विनयप्रीतीनें । निवेदिजे सर्व ॥ २७ ॥ सर्व क्षेत्रीं सर्वात्माराम । पावन-प्रचीतीचें परंधाम । प्रसन्नतेसी आणुनी निजविश्राम । विश्वरुप भजावा ॥ २८ ॥ भजन त्रिपुटी विना । अखंडीत भजनविधाना । संत आचरती साधना । सिद्ध संपत्तीने ॥ २९ ॥ विश्वरुप संत अनंत । ध्याती सज्जन संत अखंडीत । होऊनी स्वये संत निवांत । संत अर्जविती ऐसे ॥ ३० ॥ चक्षूनें चक्षुविलोकन । संतपणेंचि तैसें संत अर्चन । संतस्वरुपानुभवीं भजन । सज्जनपरंपरा ॥ ३१ ॥ संतभजनें संत प्राप्ती । संतस्तवनें संतप्रचीती । संत ध्यानें संत स्थिती । प्रत्यक्ष देहीं वर्ते ॥ ३२ ॥ संत सहवासें संत लक्षण । संत संभाषणें संत बोलणें । संत कृपेनें संत चालणे । संत प्रसन्नता ऐसी ॥ ३३ ॥ संत अनुभवी ऐसे अनंत । ज्याचे दर्शास दिसती सप्रचीत । तो संतविख्यातीनें महंत । संतभूषणें सद्गुरु ॥ ३४ ॥ संत अळंकरणें अळंकरला । संत संततीनें असे विस्तारला । संत संपत्तीनें भरला । संतराजा सद्गुरु ॥ ३५ ॥ सद्गुरुचि स्वरुपे अंत । संताचे स्वरुप सद्गुरु अनंत । संत सद्गुरु अखंडीत । अर्चावे गुरुभक्ति ॥ ३६ ॥ देखावे सद्गुरुरुपे संत । सेवावे सद्गुरु निवांत । त्याची अर्चनविधीने अखंडीत । निजप्रीतीसी यावें ॥ ३७ ॥ आत्मत्वावरील अनुभव । आत्मत्व जाले व्योमगाळीव । सरली आत्मत्वाची सींव । निजानुभव सुखें ॥ ३८ ॥ स्वस्वरुपें सनातन । आपुला अनुभवी आपण । या प्रचीतीचें निरोपण । जाणती अनुभवीं ॥ ३९ ॥ जेथें नाहींत स्वानुभव डोळे । तेथें या अनुभवासी कोण निवळे । अद्वैत प्रचीतीनें आगळे । ते डोळस येथिचे

॥ ४० ॥ दशम सूर्य आत्मानुसंधानें । आला निजहृदयासी प्रचीतीनें । नित्य आत्मप्रभा अखंडतेनें । नित्योदय केला ॥ ४१ ॥ अनंत कृपेचा प्रसाद भानु । निजांग चक्षूसी या यत्र यानूं । निज आस्तिक्यतेची दशा तनु । अखंडमंडळाकारे ॥ ४२ ॥ या दशमसूर्य प्रकाशमानें । करी चे येकादशसूर्य विलोकन । तो येकादशेचा चि निजप्रभेनें । विलोकिजेत श्रवणी ॥ ४३ ॥ निजांग प्रचीतीचा श्रवण । अपरोक्ष दशा निरावरण । स्वरुप साक्षात्कारी अनुसरण । अनुसंधान वर्धवा ॥ ४४ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । संतस्तवने प्रकाश । आत्मत्वाचा अनुभव चिद्दश । म्हणे मेरु अनंत ॥ ४५ ॥ दशम सूर्य द्वादश कळा संपूर्णमस्तु ॥श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीगोविंद ॥ दामोदर माधवाय नमः ॥ श्रीरामसमर्थ ॥ राम ॥



श्री

## सूर्य ११ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम येकपणेंवीण येकला । प्रचीती येकपणें चि संचला । येकायेकी हृदयासी आला । मुळीचा येक ॥ १ ॥ येक आस्तिक्य सत्यस्वरूप । प्रचीतीनें जाले रूप । तो येक सत्य संकल्प । मूळ पुरुष येकला ॥ २ ॥ केवळ येकपणेंवीण येक । तयाचें रूप कर्ता दुजा येक । या येकाकरितां येकानेक । रूपासी आला तो ॥ ३ ॥ येकापुढें मांडला येक । येकादश संख्येचा विवेक । अवधारिजे येक अनेक । केवळ येक येकपणें विना ॥ ४ ॥ या प्रचीतीनें आगळा । येकादश रुद्र जिव्हाळा । येकादश रुद्रार्चन लीळा । आवर्तनें व्हावीं ॥ ५ ॥ येकपणेंवीण केवळ येक । तें परब्रह्म निष्कळंक । तेथें येकपणाचें कौतुक । कांहीं च नसे पाहतां ॥ ६ ॥ स्वरूपीं येकपणाची वार्ता । नसे चि येकपणाचें रूपकर्ता । ना ते येकपणेंवीण नित्य अकर्ता । हेही स्फुरेचिना कांहीं ॥ ७ ॥ हें स्वाभाविक सत्य येक । त्यावरी दुजा मूळपुरुष

विनायेक । अस्तिक्य अनुभउनी निष्कळंक । बोधासी प्रवर्तला ॥ ८ ॥ येकदशाची त्याची पाहतां जीवें । भवाब्धीसी तरोनी जावें । ज्यासी अनुग्रहिजेत सदाशिवें । महा समाधी सुखें ॥ ९ ॥ स्वरूप अनुभउनी स्वानंदें । जगदानंद बोध कंदें । लीळा विश्वतारक मुकुंदें । कीजे हें अभिनव ॥ १० ॥ परब्रह्मदशा जिरउनी । आत्मप्रचीती पुंज विरउनी । वस्तु निलानुसंधानें पुरउनी । उरला असे जो सहजें ॥ ११ ॥ जो निजानंद अवतरवी । जो सदोदीत सुख भरवी । जो स्वरूपतेचा दिवस करवी । पूर्ण कृपांबरीं ॥ १२ ॥ तो येक परमात्मा परेश । जो सकळ हृदयस्थ मूळ पुरुष । येकादश रुद्र चित्प्रकाश । तेजोराशी विभवें ॥ १३ ॥ अंतरीं येक बाहेरी येक । स्वरूपें येक अनुभवें येक । पाठीसीं येक सन्मुखीं येक । येकादश दर्शनें ॥ १४ ॥ केवळ येकदर्शनें चि प्रगटे । दशोपनिषद दशदशा नेटें । येकपणावरील अनेकपण अवचटें । दशविध अवधारा ॥ १५ ॥ येक अस्तिक्यावरी सहज । शून्य अवगमिलें सतेज । त्या संपूर्णासी कांहींयेक गुज । सुखें उमसलें ॥ १६ ॥ संपूर्णासी संपूर्णपणाचा । फांटा फुटला स्फूर्तीचा । फांटा फोडितां तेणें शून्याचा । येक होतसे स्वभावें ॥ १७ ॥ त्या येकापुढें शून्य आलें । तेणें दशा कासीरूप जालें । शून्य नवांक विस्तारलें । अनेकपणेसी पहा ॥ १८ ॥ तो अनेकपणाचा फांटा । येकाचा काढितां विश्वसांटा । मग न पडतां चि तो अव्हांटा । रिघे अखंड मंडळीं ॥ १९ ॥ अस्तिक्य व्यापकता निरावरण । होतां निजांग विवरण । पुसोनी जाय शून्य । निष्कारण सर्व कार्येसीं ॥ २० ॥ येकावरील नव शून्याकरितां । येकें चि प्रकाशिली अनेकता । तें शून्येंशून्य निवारितां । येक अस्तिक्य उरे ॥ २१ ॥ ऐसें हें येकपण सोलींव । प्रचीतीचें व्योम गाळींव । सद्गुरुकृपेनें अभिनव । हृदयासी आलें ॥ २२ ॥ या येकादश सूर्याचें दर्शन । होतां भवतम जाय निरसोन । सतेज संपत्ती हर्षोन । वसों येती घरां ॥ २३ ॥ रामरुद्र प्रचीत भाषण । स्वरुपानुभव पोषण । सायोज्यतेचें निजभूषण । अवधारिजे मंथार्थें ॥ २४ ॥ रुद्र करुनियां निज अवधान । व्हावें सनातन सावधान ।

श्री

## सूर्य ११ कळा २

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम मी मज माझेनि । उमजलों गुरुकृपा अनुसंधानीं । तत्व सनातन अवधानी । नित्यज्ञानें निवळलों ॥ १ ॥ मी मज माझारि वक्ता । मी मज माजि होय श्रोता । मी वाक्य वाक्यार्थ विवरता । होय प्रबोध प्रौढीनें ॥ २ ॥ मी मज युक्तीच्या घडमोडी । उपक्रम उपसंव्हार शास्त्र-स्टी । मी चि अनंत सिद्ध कडोविकडी । मज चि विवरें ॥ ३ ॥ मी मज वांचुनी कोण्ही । पाहतां दुजा नसे त्रिभुवनीं । मी माझ्या स्फुरणावांचुनीं । कोठें तन्ही स्फूर्ति असे ॥ ४ ॥ झाड झाडपणें मी आपण । दगड दगडपणें माझेपण । मी च सर्व प्रवृत्ती आपण । पाहतां सर्व पदार्थ ॥ ५ ॥ पाहतें करूनि सर्वगत । पाहणें करावें अनंत । ते अनंतावलोकन ह्रद्रत । सर्व ह्रदयीं पहावें ॥ ६ ॥ गगनें सर्व पदार्थासी व्यापुनी । प्रकाशिले व्यापकत्वें लोक तिन्ही । तेविं आत्मत्व विश्व अंतःकरणीं । निरंतर असे ॥ ७ ॥ गगनाचा सांटोवा होउनी । वसे सहज आपुलेपणीं । क्षोभासी न पवे काळें कोण्ही । ऐसें निवांत तें ॥ ८ ॥ आपुलेपणें आपणासी बोधी । नव्हे चि कोण्हासीं कांहीं विरोधी । संपूर्णपणें कोण्हा अवरोधी । ऐसें नव्हे चि कीं सहजें ॥९॥ आपुलेपणें उदास निर्मळ । निराभासपणें असे केवळ । तें निरवकारीं अकळ । अवकाशें पहा ॥ १० ॥ सावकाश बैसोनी तत्पर । करा निरावकाश आत्मविवर । धरा आपुला आपण धर । धीर करूनि धृतीचा ॥ ११ ॥ करा त्रिपुटिविना ध्यान । धरा आप आपुलें अनुसंधान । वरा सायोज्यता नित्य नवीन । आपुली स्वरूपता ॥ १२ ॥ धरा परतोनियां आपुल्या । भरा निजदृष्टी दीपल्या । स्मरा सद्गुरूच्या सिकविल्या । स्वानुभव खुणा ॥ १३ ॥ विश्वगतानुवेध अधिकरणें । त्रिविधा विविध अंतःकर्णे । विविध अहंकरण कारणें । आपुलेपणें पाहतां ॥ १४ ॥ राहे निजांग तेज विलोक । पाहे प्रतिष्टित मति त्रिलोक । वाहे अनुभवासी अलोक । लोकालोक प्रतिष्टी ॥ १५ ॥ आपुली आपणा सलोकता ।

येवं प्रतिष्टीत हे ममता । तेथें आपुली चि निर्ममता । न खैगुण्यें प्रगटे ॥ १६ ॥ तमप्रमेनें सूर्य आगळा । करी तम तेज निज उजाळा । आपुलें ऐश्वर्य आपुल्या डोळां । पाहे तो सभाग्य ॥ १७ ॥ आपुली दृष्टि आपणा जवळीं । आपुली निजठेवी आपणा आकळी । आपुली विश्रांती आपण मुळीं । अनभवितां होय ॥ १८ ॥ त्रिभुवन मणि माळेसी तंतु । होय आपुला चि निजहेतु । भवाब्धीसी आपण बोधसेतु । तारक निजचर्यनें ॥ १९ ॥ आपुली स्फूर्ती चतुर्विधा । होय गुण समंध विविधा । तेणें भव विकृतीनें बाधा । जाली दुर्धर ॥ २० ॥ आपुली गुण क्षोभकता । बळावली विश्व अहंता । विसरूनि निजतत्व साम्यता । समता दुऱ्हावली ॥ २१ ॥ ममता मती भाजनें अनें आनक । पदार्थ सांटविले येकेयेक । त्रिगुणाधिपती त्रिभुवन नायक । सत्ता प्रतिष्टली ॥ २२ ॥ सलोभ ममतेनें अहंकार । क्षोभित दुराशा विस्तार । निज अनोळखीनें सविस्तार । लोभ विस्तारला ॥ २३ ॥ विश्वका मायत न कळेनें । निसोपभोग शृंखळेनें । अकळला ठायीं ठायीं अवकळेनें । दैन्यदशा भोगी ॥ २४ ॥ आपणासी विसरतां आपण । क्षोभणें दुराशाकृत भीपणें । अज्ञान परवडीनें बंधन । पावे विश्व हृदयीं ॥ २५ ॥ जैसें घट अनेक संपत्तीनें । अवकाश अवराधिले व्यक्तीनें । तेवि संकल्प संभूत शक्तीनें । स्वभाव आक्रमिले ॥ २६ ॥ शब्दें आक्रमिला जैसा अर्थ । कीं प्रलयें तो परमार्थ । तेंवि आपुलेपणें पुरुषार्थ । चतुर्विधा आक्रमिले ॥ २७ ॥ तापलें जळ जैसें संतप्त । हातीं न धरवे वन्ही क्षोभित । तैसें स्वगतज्ञानहृद्गत । त्रितापें क्षोभलें ॥ २८ ॥ तप्त जीवनासी निवउनी । घ्यावें रोग उपशमनीं । बळ क्षीण अन्नपथ्या लागुनी । घ्यावें आरोग्यकर ॥२९॥ स्यास्तव षड्रस जाव्य माधुरी । वर्जूनि आरोग्यतेसी सत्वरी । घ्यावे उपोपणावारी । सूक्ष्म अहार ॥ ३० ॥ तैसें वीतराग मतीनें । विरक्तीसी येउनी आपण । पदार्थ अभावें निजशुद्धीनें । शोधावें निजरूप ॥ ३१ ॥ स्यास्तव सद्गुरु उपदेश । ह्मणिजे समीपदर्शचा स्वदेश । जेविं पदार्थरुचीसी सविशेष । अधिकारी रसना ॥ ३२ ॥ ना ते मनोहर रूप ठेवी । विलोकन

देउनी स्वरूपानुसंधान । श्रवणें चि आघवा ॥ ९ ॥ आपुलें स्वरूप आपण । अनुभवावयासी धरिला प्राण । तें चैतन्यदशा चिद्घन । आपण स्वरूपतेनें ॥१०॥ प्राण पंचवृत्ती मुळें । पंचतन्मात्रा समेळें । पंच अपंचीकृत पाल्हाळें । आला पंचीकृतासी ॥ ११ ॥ अव्यक्त अपंचीकृत अहंकार । आपआपला चि होय पसर । पंच विंशति विस्तार । वासनात्मक ॥ १२ ॥ जीवीं जाणिवेचा अक्षोभ झरा । जीवासी घेउनी वाहे सैरा । संगात्संजायते स्मरा । स्मर अपूर्तीनें सक्रोध ॥ १३ ॥ क्रोधात्संभवती मोहाची । मोहापासुनी स्मृति विभ्रमाची । विभ्रमापासुनी बुद्धीची । स्पर्धा नाशवृत्तीसी ये ॥१४॥ बुद्धि नष्ट जालियां जाण । नाश पावतसे आपण । पुन्हां अनुताप दर्शनें पूर्ण । आपणासी विलोकी ॥ १५ ॥ हे ज्ञानाज्ञान आपुली स्फूर्ति । अनादि सिद्ध माया प्रवृत्ती । सर्व निरासें उरे निवृत्ती । उत्तम रो निजव्यर्था ॥१६॥ निवृत्तीसी रिघोनियां शरण । ज्ञानदेव जाला आपण । ज्ञानदेवयोगें सोपान । निवृत्तीसी आला ॥ १७ ॥ ज्ञानदेवयोगें मुक्तस्थिती । प्रसन्न करूनी आपणासी निवृत्ती । नित्यावधानें अनुभविती । संत नामदेवादि ॥ १८ ॥ स्वरूप दर्शेच्या महा विभूति । सिद्ध येकनाथादि प्रभृती । महा दर्शनें खेचर स्थिती । प्रसिद्धीसी आले ॥ १९ ॥ नापेक्षितां यातिवर्ण कुळें । स्वरूपता सुख निवळे । ज्याच्या दर्शनें चि तात्काळ । महादशा: रूढे देहीं ॥ २० ॥ स्वरूपतेचा तत्व कटाव । अपरोक्ष दर्शेचा नवलाव । अनुभव आपुला अभिनव । अवतरला अवेवें ॥ २१ ॥ येकेक संताची महिमा । ते स्वरूपतेची गरिमा । समाधी अष्ट सिद्धि रमा । स्वरूपता केवळ ॥ २२ ॥ संतनाम आत्मस्मरणी । जो कंठीं मिरवी अनुदिनीं । तो साक्षात्कार दर्शेचा धणी । तत्व त्रिभुवनेश ॥ २३ ॥ विवेकसिंधु वर्ता मुकुंदमुनि । जोगा परमानंद सिद्ध मैनी । बहिरा पिसा संत शिरोमणी । चोखा मेळा प्रसिद्ध ॥ २४ ॥ रोहिदास गोराकुंभार । सावंत सुरदास कबीर । कान्हो मह्को विश्वंभर । रूपाचीं भरणें ॥ २५ ॥ आत्मालंकृत संत आभरणें । केशव कौस्तुभाची किरणें । येकरूप जगदांत:करणें । स्वरूपता अनुभवी ॥ २६ ॥

प्राकृत अप्राकृत संत। स्वरूपभूषणें महामंत। स्वरूपाची शोभा मही दीसवंत। विभूषित भूषणें ॥ २७ ॥ अनंतयुगीं अवसरोचित। अनंत शरीरीं अनंत संत। अनंत प्रचीतीनें येशवंत। अनुभविती स्वरूपता ॥ २८ ॥ हें संतानुसंधान हृदयीं। भूतभविष्य वर्तविता पाहीं। प्रचीतीसी प्रचीतीसी येउनी टवटाहीं। पायन केलें आपणा ॥ २९ ॥ प्रचीतीसी करूनि प्रमाण। परवडीसी केलें अंतःकरण। नाना युक्तींचें विस्तीर्णपण। पात्र केलें श्रवणासी ॥ ३० ॥ विविध वगृत्वाची आवडी। अर्थांतर विचाराची गोडी। कडो यिकर्डनें घडामोडी। रूढविली स्वरूपता ॥ ३१ ॥ उत्प्रेक्षा उदाहरण। समस्या दृष्टांत सुलकारण। वाक्यार्थ रूढीनें अवधारण। आपआपण वळावलें ॥ ३२ ॥ अर्थ तात्पर्य लाभ अद्भुत। स्वरूपतेचा होय सिद्धांत। संत संवादें निजयेकांत। याचेसी आला ग्रंथार्थ ॥ ३३ ॥ असंख्य नामरूप पदार्थ। तितुक्या शब्दार्थी तत्वतार्थ। निज श्रवणासी आणूनि कृतार्थ। होय श्रवण स्वयें चि ॥ ३४ ॥ ऐसा निजांग श्रवण होउनी। निज अर्थांतर विवर घेउनी। निरंजन अंजन लेउनी। होय निजनयन स्वयें ॥ ३५ ॥ निजांग नयन असोनी। निजरूप उपलब्धी वसोनी। उपलब्धी व्हावया तोपोनी। गमन विधींसी आचरे ॥ ३६ ॥ स्वरूपतेचें संचरण। होउनी स्वयें आपुलें करण। आपणावरी चाले परतोन। पाठीमोरा ॥ ३७ ॥ झांकुनी आपुली निजदृष्टी। आपणें चि होय आपुली पाठी। आपणांसी सांटउनी पोटीं। पोट होय आपण ॥ ३८ ॥ आकंठ स्वसुखें कंठी। उत्कंठीत सुख वैकुंठीं। प्रणव विहीन नीलकंठीं। कंठ जाहला ॥ ३९ ॥ अनाक्षरा अक्षरपरा। याचा होउनिया वरा। निःशब्द उचारें स्वरा। स्वरूपतेसी आणी ॥ ४० ॥ त्रिकाळ काळासी शिक्षण। हा अव्ययतेचा ज्ञानदशन। दशा बत्तीस लक्षणें भक्षण। आप आपुलें ॥ ४१ ॥ काळांतक दंष्ट्रा कराळ। रगडी काळ प्रळयाती अकाळ। स्वयें चि अधर अकाळवेळ। जें तो चुके सहजें ॥ ४२ ॥ तें त्या दशनें रगडोनी। करी स्वगतभेद दुखवोनी। अनुभव रसना छिन्न होउनी। आपण दुःखासी संभवी

॥४३॥ दुःख न होतां दुखवे आपण। ऐसें हें अनादिकृत अज्ञान। आपणें चि प्रसवोनी-मीपण। नाना विपत्तीसी भोगी॥ ४४॥ त्यास्तव या दुःख परिहारा। जावें निजविश्रांति माहेरा। पावोनी निज उपलब्धीच्या घरा। सुखें पहुडावें॥ ४५॥ ते निज सुखाची अंतर्वोवरी। जियेतें नित्य उन्मनी सावरी। शृंघारोनी निजदशावरी। आपणासी आपण॥ ४६॥ सायोज्यतेचें निजविधान। स्वरूपीं समरसलें अवधान। ते चि साक्षात्कार दर्शनें अनुसंधान। घ्या अर्थांतरें॥ ४७॥ आपणासी आपणा माझारीं। विस्तारूनि विश्व विस्तारीं। नामरूप विवर्जित त्यावरी। योजावें आपणासी॥ ४८॥ वेउनी जागृतीचें अभ्यंतर। सुषुप्तीसी योजावें निरंतर। उन्मेश विहीन साक्षात्कार। स्वप्न अनुभवावें॥ ४९॥ स्वप्नीं चि आपुल्या विसर विस्तार। स्वप्नीं च आपण होय विश्वाकारें। त्या चि स्वप्नीं सद्गुरुकरें। होय जागृत स्वप्न साक्षी॥ ५०॥ नित्य जागृतीनें जागे। सायोज्य सुखेंवरी वेधे। तें चि अवधान मज द्यावें वेगें। स्वसायोज्य श्रवणीं॥५१॥ इति श्रीमद्वीमोपदेश। त्रिविधमुक्तीचा आत्मा ईश। तो चि सायोज्यता मुक्तिप्रकाश। ह्मणे मेरु अनंत॥ ५२॥



श्री

## सूर्य ११ कळा ४

॥ श्रीरामचंद्राय नमः॥

श्रीराम स्वसायोज्य सदना। निजबोधामृत कर वदना। नित्य उपलब्धी भवकदना। मदन मनोहरा॥ १॥ आत्म साक्षात्कारी परदैवत। निजआराध्य स्वसुखशाश्वत। निजप्रसन्नतेचें अभिष्टपूर्त। मनोरथ सिद्धि परदा॥ २॥ आपुली प्रसन्नता आपणासी। स्वरूप प्राप्तीची दशा ऐसी। जे आपणामाजि आत्मसंतोषी। समरसणें सुखें॥ ३॥ बीजीं तरुवर सामावे। परी तो परतोनी वृक्षत्वें संभवे। तैसा हा उपरम नव्हे स्वभावें। परतोनी भव असेना॥ ४॥ भव संभव ममता नुरे। सोहं सद्भावें अभाव

सारे । स्वरूपानुभवें संचलन विरे । सायोग्य महिमा ॥ ५ ॥ कल्पित संसार सारे । अकल्पीत स्वरूप उरे । प्रचीतीनें अभ्यंतर मुरे । सायोग्य दर्शनें ॥ ६ ॥ सायोग्य म्हणिजे योगावें स्वयें । आपणामाजि आपण प्रलयें । दृश्य द्रष्टा दर्शन विलयें । जावें समरसोनी ॥ ७ ॥ जळतरंगाकारें अंकुरे । सर्वें नि· आपणामाजि आपण विरे । जळ असतां चि तरंगाकारें । न चुके आपणासी ॥८॥ नाना पदार्थ रूपें स्मरण । विस्तारें जाहले विश्वस्फुरण । तेणें सत्स्वरूपाचें विस्मरण । दृढावलें जीवीं ॥९॥ अभिनव आपुलेपण संपूर्ण । पदार्थमात्रीं असें व्यापून । स्मरण विस्मरणामाजि आपण । दुसरा कोण्ही असे ना ॥१०॥ स्मरणविस्मरण संस्कारें । द्रष्टा बहुविध अवांतरें । भोगी जन्ममरण फेरे । नाना सुखदुःखें ॥ ११ ॥ स्मरण विस्मरणाचें अभ्यंतर । आपुला आपण निरंतर । निरोपाधी निःसंग निर्विकार । सहज सिद्ध संचला ॥ १२ ॥ स्मरण विस्मरण मिश्र अवस्था । संमिश्र संसार व्यवस्था । ते संदिग्ध अवस्थेपर पाहतां । उभय अवस्था केवळ ॥ १३ ॥ केवळ विस्मरणाची स्थिती । निर्विकल्प समाधी अलंन प्रचिती । अथवा अविद्यायोगें सुषुप्ती । पदार्थी भाविनी ते ॥ १४ ॥ केवळ स्मरणाची अवस्था । ते स्वरूप ज्ञानाची प्रसन्नता । साक्षत्वातीत स्वभावता । सहज स्थिती केवळ ॥१५॥ विस्मरण समूळ हारपलें । स्मरण गाळीव जें उरलें । तेहीं ब्रह्म प्रचीतीनें विसांवलें । निवालें अभ्यंतर ॥ १६ ॥ येथें सायोग्याची निज समृद्धि । अपरोक्ष स्वरूप उपलब्धी । अन्वयें साधूनी समाधी । सर्वगत दशा घ्यावी ॥१७॥ निज द्रष्टुत्व अभ्यंतर । पाहतां परब्रह्म निरंतर । त्या ब्रह्म प्रचीतीनें साक्षात्कार । द्रष्टुत्वीं रूटला ॥१८॥ द्रष्टुत्व अस्तित्वाचा उभारा । गाळीव गगनाचा गाभारा । तेथें त्रिगुण साक्षत्वदोरा । दग्ध जाला ज्ञानाग्नीत ॥१९॥ साकारणें द्रष्टुत्व प्रांजळ । होतां द्रष्टा निजांगें निर्मळ । सर्व पदार्थी तत्व केवळ । देखे निज व्याप्तीनें ॥ २० ॥ हे अवांतर देखणी कळा । परी समरसोनी अवलीळा । जाली निजांग ते स्वलीळा । सायोग्य म्हणावें तियेसी ॥ २१ ॥ पदार्थमात्रीं स्वरूपदर्शन । हें चि निजद्रष्ट्याचें विलोकन । स्वरूप अन्वयें सनातन । स्वरूप योजणें ऐसें ॥ २२ ॥

स्वरूप व्यापीनें अपार । सुरे चि पदार्थ पसर । हा स्वरूपान्वय साचार । अनुभवीं स्वयें ॥ २३ ॥ दुसरा अन्वय उपक्रम । स्वरूप अस्तिक्य परम । तेथुनी ब्रह्मस्फूर्ति महा व्योम । भूत परंपरा ॥ २४ ॥ माया ब्रह्म अन्वय दोन्ही । द्रष्टा देखे निजनयनीं । स्वरूप समावेश अंतःकरणीं । माया ब्रह्मदर्शनें ॥ २५ ॥ मायाब्रह्म साक्षी स्वयें । त्रिपुटी आलिया उभय अन्वयें । स्वास्तव व्यतिरिकें निजहृदय । योजावें स्वरूपीं ॥ २६ ॥ नाना पदार्थ स्थूळ विस्तारें । सूक्ष्मींच विश्व अवतरे । परतोनी सूक्ष्मीं च भरे । स्वभाव स्थितीनें ॥ २७ ॥ या कारणें वासनात्मक । पाहतां ब्रह्मांड कोटी रूपक । तत्व सृष्टीसी महा कौतुक । होय संभवितें ॥ २८ ॥ लिंग देह विचारें पाहतां । पदार्थ जागिवेची ममता । अनादि सिद्ध मायेची सत्ता । पदार्थ सिद्धि संभवे ॥ २९ ॥ स्वप्नींचे पदार्थ साचे होतां । होय प्रत्येक सृष्टीकर्ता स्वता । आपुले इच्छेनुसार विधाता । विष्णु शिव करूं येत ॥ ३० ॥ मनें प्रपंच मनें परिपालन । मनें चि संकल्प सत्य विस्तारून । मनें चि उपभोग उपलालन । उपयोग विधानें ॥ ३१ ॥ मने चि सृष्टी मनें चि संव्हार । मनें चि प्रतिष्ठे ये ईश्वर । मन वश जालियां सविस्तर । जीवें करूं ये इतुकें ॥ ३२ ॥ मनासी वश जालियां जीव । होय बंधना चपेडा स्वभाव । तेथें मुक्तपणाचा अंतर्भाव । दुरी अंतरे ॥ ३३ ॥ या कारणें स्वाधीन मन । जयासी ते सुखें चि आपण । स्वरूप अनुभवति संपूर्ण । कृतार्थ करिती जगा ॥ ३४ ॥ अन्वय व्यतिरेक दृष्टी । चाळिली जेहीं सर्व सृष्टी । सत्स्वरूपेंसी साटी । केली वासनात्मकाची ॥ ३५ ॥ खंडान्वय व्यतिरेक । अखंडान्वय तैसा चि निश्चयात्मक । या वितिरेक दृष्टीनें विवेक । नित्य जागतसे जयां ॥ ३६ ॥ भूतीं भूत संभवलें । क्रमान्वयें जाणोनी भलें । तैसें चि पुन्हां सामावलें । सहज जेथील तेथें ॥ ३७ ॥ सृष्टिरूपें विस्तारलें । नाना दृश्य उभारलें । संव्हारकाळीं संव्हारलें । यथोचित क्रमें ॥ ३८ ॥ पृथ्वी आपजाळीं वितळोनी । आप अग्नी जाळें

अद्ळोनी । अग्नी यायो जाला विझोनी । वायु विरोनी होय नभ ॥ ३९ ॥ नभ अवकाशें जाणीव । उपाधिविळयें होय नेणीव । गुण साम्येचा स्वभाव । महा शून्य अवस्था ॥ ४० ॥ ते अवस्थेचा द्रष्टा ईश्वर । अवस्था तेणें चि होय तदाकार । ईश्वर स्वरूपें साचार । परब्रह्म तत्वता ॥ ४१ ॥ हें ब्रह्मस्फूर्ति ब्रह्मार्पण । वितरेक दृष्टीचें ज्ञान । स्वरूपानुसंधानें समर्पण । सर्व पदार्थाचें ॥ ४२ ॥ हें शास्रांतर रूढी युक्ती । उत्पत्ती स्थिति संव्हार रीती । आतां स्वभाव सायोंज्यमती । सहजें अवधारा ॥ ४३ ॥ जो साक्षपी दक्ष विचक्षण । जाणोनी भूतोत्पत्ति समर्पण । होय द्रष्टा साक्षत्वें आपण । स्वभाव सिद्ध वस्तु ॥ ४४ ॥ जो मुळींहून निर्गुण संचला । जो मुळींहून साक्षत्वा नसे आला । जो जन्म मरणाच्या संस्काराला । स्पर्शला चि नसे ॥ ४५ ॥ तो गुणगुण संकल्प नेणे । तो अन्वय व्यतिरेक काय जाणे । जो द्रष्टुत्वासी कवण्यागुणें । आला नसे चि सर्वथा ॥ ४६ ॥ जो अलिप्त व्यापकतेनें पूर्ण । जो निर्विकारी निरंजन । जो गगनाहूनि उदासीन । त्यासि द्रष्टुत्व कैचें ॥ ४७ ॥ ऐसें निवळलें केवळ । तें चि द्रष्टयाचें जन्ममूळ । स्वरूपांवरें साळमाळ । स्फुरलें ब्रह्म स्फुरण ॥ ४८ ॥ त्या ब्रह्मस्फूर्तीत आक्रमलें । सदोदितपणें संचलें । तेथें द्रष्टुत्व प्रतिष्ठलें । मूळपुरुषरूपें ॥ ४९ ॥ त्या मूळपुरुषीं शुद्ध सत्व । गुणक्षोभ गुणसाम्य साक्षत्व । महत्तत्व महद्भूत आत्मत्व । बहुधा रूपें ॥ ५० ॥ सहज आणि साक्षेपता । स्वजाति विजाति क्षोभकता । स्वगतभेद अवस्था । अवांतर स्फूर्ति ॥ ५१ ॥ तितुक्या प्रवृत्ती सरोनी । यावें सद्वृत्तीसी अवधानीं । तेव्हांच स्वभाव सायोज्य श्रवणीं । होय साक्षात्कार ॥ ५२ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । तुर्यगा भूमीसी प्रवेश । साक्षत्वा वरील सायोज्य हंस । ह्मणे मेरु अनंत ॥ ५३ ॥ येकादश सूर्य चतुर्थ कळा संपूर्ण ॥ ४ ॥ ॥



श्री

# सूर्य ११ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सायोज्यस्वभावें । निजानुसंधानीं रिघावें । निजावधान उजळावें । पहावें निजनयनीं ॥ १ ॥ परसंवित्सत्वपरंजोति । तत्व अभ्यंतर व्यापकस्थिती । विस्तारें नित्यानित्य संगती । ते स्फूर्ति विवरा ॥ २ ॥ सारासार स्वभाव स्फुरे । सत्यासत्य तदनंतरें । प्रवृत्ति निवृत्ति अवतरे । आपणापासूनी ॥ ३ ॥ तो मी निजवृत्तीचा साक्षी । कैसा आहे कवण्या पक्षीं । जो आपणें चि आपणा परीक्षी । तो चि चतुर पुरता ॥ ४ ॥ सर्व कांहीं परीक्षा जाणे । सर्वज्ञपणाच्या भूषणें । आपुली परीक्षा चि करूं नेणे । तो चतुर पढत मूर्ख ॥ ५ ॥ आत्महिरा परीक्षावंत । अपरोक्ष प्रचीतीनें महंत । जो स्वरूप प्रचीतीनें संत । उमसो चि नेणे सर्वथा ॥ ६ ॥ स्वरूपानंद सागरीं । समरस जाला अभ्यंतरीं । अपरोक्ष प्रचीतीची ल्हरी । चाले अकळ दर्शनें ॥ ७ ॥ आनंद समुद्रीं रिघाला । स्वयें चि स्वानंद सिंधु जाला । मग प्रचीतीचे कल्लोळ त्याला । सहज चि येती ॥ ८ ॥ साक्षत्व दृष्टीचें हें देखणें । परी अपरोक्ष प्रचीतीचें उणें । साक्षत्व दृष्टी वांचुनी होणें । असे चि ना कांहीं ॥ ९ ॥ स्वभावीं योजलें अद्वैत । स्वभावें चि होय सदोदित । अद्वैतीं स्वभाव अखंडित । योजला ऐसा ॥ १० ॥ हे सायोज्यता स्वामार्पण । अनुभवसिद्ध संतर्पण । या चि सद्व्रतीनें आपुलें तर्पण । आपणें चि करी ॥ ११ ॥ आपुला अनुभव आपणासी । केली सस्वरूपीं मिरासी । स्वभाव सायोज्यतेची ऐसी । पदवी असे पहा ॥ १२ ॥ आतां गुरुकृपेचें अंजन । घालुनी पहा निज निरंजन । पदार्थ अभावें सर्व सज्जन । अंतर्दृष्टीनें पाहती ॥ १३ ॥ सद्गुरु प्रबोधार्क उजाळा । लक्षुनी निज प्रचीतीच्या डोळा । पहावें निज अभ्यंतर मोकळा । पैस सर्वगत ॥ १४ ॥ ज्ञान दृष्टीच्या पसरें । ज्ञाता सर्वगत

पसरे । तें ज्ञानदृष्टीच्या निदारें । निर्विकार ज्ञाता होय ॥ १५ ॥ द्रष्ट्यासी दृष्टी करी निर्विकार । ते चि दृष्टीचा महिमा थोर । इतर दृष्टीचा सविकार । भवकाम विक्षेपें ॥ १६ ॥ ये यथा मां प्रपद्यंते । तांस्तथैव या अर्थे । भावना चि होय सर्वार्थे । फळदायक ॥ १७ ॥ हृदयीं जैसा जैसा स्फुरे भाव । तैसा तैसा प्रगटे देव । भावीं त्व संभवोनी अभाव । देव स्वभाव अच्यादि ॥ १८ ॥ केवळ सद्भावासरिसें । अंतर्दृष्टीच्या प्रकाशें । अंतरीं रिघोनी निजपैसें । पसरावें स्मरण ॥ १९ ॥ हे निजलक्ष दृष्टी सहजें । स्वरूपीं स्वस्त करूनी उमजें । स्वभाव सायोज्य वोजे । अनुसंधान दे ॥ २० ॥ ते सायोज्यतेची सिद्धि । निरोपाधी उपलब्धी । स्वरूपाची सहज समाधी । नित्यमुक्ती अस्तिक्यता ॥ २१ ॥ जीवन स्थूळ विकृतीसी ये । तितुकें जीवनपणाहूनि जाय । त्याची विचारितां गती काय । सर्वगत जाली ॥ २२ ॥ अग्नि काष्ठाकारें प्रबळे । काष्ठ अभावें वितुळे । तरी तो काय तेणें मुळें । जाला निर्विकार ॥ २३ ॥ पृथ्वीं कर्पुराकारें अग्नी । काय पावे निज निदानीं । जाणीव कल्पना होऊनी । सरता काय निदान ॥ २४ ॥ नाना अंचल विक्षेपें वारा उपजोनी लोपे । तो दडाला गगनाचे खोंपे । न निपजे मागुतेनि ॥ २५ ॥ प्रवृत्तीमुळें अवकाश नुरे । तो काय निरवकाशें सरे । मरतां नुच्चारी अक्षरें । तो काय निःशब्द ॥ २६ ॥ पदार्थअप्राप्तीनें शीणोनी । निर्हेत होय सहज मनीं । तरी काय तया लागुनी उन्मनी । वाणली दशा ॥ २७ ॥ नसतां युक्तीचें बळ । शास्त्रार्थी टोणपशीळ । मौन्य धरून राहिला केवळ । तेणें काय योग्यता तयाची ॥ २८ ॥ पर शक्तींवंत उद्धती । तो क्षोभक होय यदर्थी । धरूनि बैसला जो शांती । तो काय संत म्हणावा ॥ २९ ॥ अवस्थारूप भेदवृत्ती । जाणतो सर्व हि प्रवृत्ती । सर्वज्ञपणाची सद्वृत्ती । निवृत्ती होय कैसा तो ॥ ३० ॥ ऐसे संकल्प मतीचे विक्षेप । सहस्रावधि भवाक्षेप । अंतरदृष्टीनें निजसाक्षेप । संक्षेप सुखें अवधारा ॥ ३१ ॥ येथें जाणिवेचें काय प्रयोजन । न सरे मानसपूजा भोजन । जैसें ज्ञानगंगेचें

स्नान । तीर्थ प्राशनासी नये ॥ ३२ ॥ येथें प्रत्यक्ष आपुली स्थिती । आपुला स्वभाव आत्मप्रचीती । आपुलें अपरोक्ष ज्ञान विश्रांती । आपुली आपणा ॥ ३३ ॥ संपूर्णपणाच्या सुखार्णवीं । आली स्वरूपतेची पदवी । ऐसा उमजुनियां जीवीं । जीवदशा विसरे ॥ ३४ ॥ रंक वैसला सिंहासनीं । तो काय जाणे भांक्षेची कहाणी । नित्य आरुढला सुखासनीं । तो न मनी परीभ्रमण ॥ ३५ ॥ नित्यामृतें तृप्त जाला । क्षुधेची बाधा न होय त्याला । स्वरूपतेनें अधिष्ठिला । तो प्रवृत्तीसी च न ये ॥ ३६ ॥ सद्गुरुकृपा आत्मप्रचीती । जो गौरविला शास्त्र संमती । जो अंतर्दृष्टीने वृत्ती । पावला स्वरूपाची ॥ ३७ ॥ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ स्वयें । क्षेत्र वृत्तीनें प्रांजळ होय । तो क्षेत्र लागुनी निज निश्चियें । राहे न क्षेत्रमार्या ॥ ३८ ॥ तो क्षेत्रीं बैसोनी स्वलीळा । क्षेत्रज्ञ तो क्षेत्रा निराळा । क्षेत्रज्ञ वृत्तीचा जिव्हाळा । लागला परात्पर ॥ ३९ ॥ इति श्रीमद्ब्रह्मोपदेश । अंतर्दृष्टीचा प्रकाश । पाविजे निज अधिष्ठान पैस । म्हणे मेरु अनंत ॥ ४० ॥ येकादश सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीरामार्पण ॥



श्री

## सूर्य ११ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम जिव्हाळा परात्पर । स्वरूप अवबोधें निरंतर । स्वरूपदर्शनें साचार । स्वरूपकर्ता ॥ १ ॥ सद्वृत्तीच्या मुळें अमूल्य । उभय संस्कारें जन्ममूळ । स्वरूपदर्शनें साचार । स्वरूपकर्ता ॥ २ ॥ सत्यावलोकनीं निजदृष्टी । लोक ह्मणिजे विलोकन सृष्टी । परलोक पाहण्या परपोटी । न पाहणें चि केवळ ॥ ३ ॥ तें परब्रह्म येकजिनसी । संग न साहे कांहीं त्यासी । सर्वांतर्गत सर्व निवासी । सर्व प्रवृत्ति निराळें ॥ ४ ॥ आस्तिक्य परी करासी नाडळे । निर्मळ परी चक्षूसी न न्याहळे । संपूर्ण

मा उभय वृत्तीचा करूनि विवर । अवधारा पुढें ॥ ४१ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । उभयवृत्तीचा अवकाश । प्रचीतीसी बैसोनियां सावकाश । ह्मणे मेरु अनंत ॥ ४२ ॥ येकादश सूर्य षष्टम कळा संपूर्ण ॥ ६ ॥ ॥ श्रीरामार्पण ॥



श्री

## सूर्य ११ कळा ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अभिनवाचा विवर । चौअवस्थेचा करूनि घेर । अवस्यातीत अवस्था धुरंधर । अवधारा बरें ॥ १ ॥ भक्ति भोजनीं घेऊनी रुची । प्रीतीनें अपेक्षा पदार्थांची । तयांसी ते सुगरिणीचो । सर्वज्ञता कळे ॥ २ ॥ केल्या पदार्थांचें सार्थक । जेविती परवडी येकयेक । तेव्हां सुगरिणीसी महां धेनुक । वाढी उदार हस्तें ॥ ३ ॥ रुचिकर देखतां पदार्थ । जाणिवेची रसना होय कृतार्थ । चवी परिक्षूनियां तृप्त्यर्थ । आरोगणा करी ॥ ४ ॥ तैसे तुम्ही येथें चतुर । वागेश्वरीचे अर्थ विवर । शब्दरचना मनोहर । परीक्षा करितां ॥ ५ ॥ हे वारंवार काय स्तविजे । तुम्ही आत्मेचि माझे सहजें । येक आत्मा असतां जाणिजे । कां आत्म्यासी बहुपण ॥ ६ ॥ शाश्वत येक आत्मा अखंडीत । त्यावेगळे आत्मे तितुके अशाश्वत । या अर्थे उपचार द्वत । ऐसा च मनावा ॥ ७ ॥ येकपणें बहुवचन । कां जें बहुतांचें घेऊनि थोरपण । येक चि बहुतपणें आपण । विस्तारलासे कीं ॥ ८ ॥ हें विश्वरूप संबोधन । विश्वरूपी विभूति संपूर्ण । अनेकपणें अलेकपण । गौरवले येकपणें ॥ ९ ॥ अनेक संतांचीं दर्शनें । अनेक साधूंचीं संभाषणें । अनेक युक्ति अनेक अनुसंधानें । येक तत्वचि ठाई पडे ॥ १० ॥ म्हणोनि तितुकेही आत्मेचि होती । आत्मप्रचीतीनें भेटों येती । हें चि अनेकपणाची होय स्तुती । सर्वज्ञ तुम्ही असां ॥ ११ ॥ माझे तुम्ही जिवलग श्रोते । तुम्हीच वगृत्वासी आणिले होते । तुमचें

दातुत्व अनंत उचितें । निवेदितों तुम्हांसी ॥ १२ ॥ मी कवण निवेदन कर्ता । माझें अनुसंधान मी च अकर्ता । माझे प्रचीतीसी मी चि धर्ता । धारणेवीण ॥ १३ ॥ आतां मी मज माजि बोलेन । तया शब्दार्थी मी चि डोलेन । अपरोक्ष तत्व ज्ञानानें डोलेन । वृत्तीसी न येतां ॥ १४ ॥ मी विश्वरूपें होईन श्रोता । मी च ग्रंथ ग्रंथांतर वक्ता । या सृष्टीपूर्वील माझी कथा । सांगेन मी मजपासी ॥ १५ ॥ सृष्टी संव्हारा वरील । निजतेज अवधान धरील । ते हृदयांवर भरील । मीपण स्वानंदें ॥ १६ ॥ ऐसी सखोलता मजमाजि । गगनटांचे उणीव सहजीं । मी साना ना थोर उमजीं । बरा उमजलों ॥ १७ ॥ मी स्थूल ना सूक्ष्म कारण । मी कार्यकर्ता ना महा कारण । मी सगुण ना नव्हे निर्गुण । याही परता संचरलोंसे ॥ १८ ॥ मी नव्हे पिंडब्रम्हांडधर्ता । मी जीव शिव ना सर्वकर्ता । मी वाचा ना वाचक अकर्ता । नव्हे कांहीं येकपणें ॥ १९ ॥ ऐसें केवळ माझेंपण मज । अनुभवासी आलें जे कां सहज । हा सद्गुरु प्रसादें उमज । आला अकल्पीत जीवीं ॥ २० ॥ येथं सर्वंगत अवधानें । मज निवळ करा अनुसंधानें । अक्षरांचीं अक्षरें घेणें । परीक्षुनि बरीं ॥ २१ ॥ निज उल्लेख अभ्यंतर । जेथून सदसद्वृत्ति धर । सदसद्विलक्षण साचार । आपुलेंपण तें ॥ २२ ॥ अचल पीठिका प्रचीती । वरी सहजासन संवित्ती । त्यावरी बैसका आथंती । बैसोनी स्मुखें ॥ २३ ॥ अपरोक्ष ज्ञान डोळे । स्वरूप निटारे सगळे । अर्धोन्मिलित अवलोके । असतां तटस्थ ॥ २४ ॥ उल्लेखांकुरीत खेचरें । परापर पातीं अभ्यंतरें । तळ ऊर्ध्व गतीच्या निर्धारें । विकासीत नेत्रकमळें ॥ २५ ॥ मुक्त अगोचर । सहज दृष्टी अगोचर । तेथें साक्षात उघडेल पदर । विशुद्ध स्व स्फटिकाचा ॥ २६ ॥ तेथून जग साक्षत्वपणें । होती प्रबोध चक्षुप्रभेनें । त्या साक्षत्व आत्मदर्शनें । पूर्णानंद विलोका ॥ २७ ॥ सदसद्वृत्ती समाधीत । सर्व साक्षी तुर्या प्रदीप । पाहेन देह त्रिगुणनांव । पाहे त्रिगुणाकार ॥ २८ ॥ शुद्ध सत्वाची निजज्योती । निष्कामदृष्टी दिवें प्रदीप्ती । ते दश दिशा दशा

उजळली । त्रिकाळ उदीची ॥ २९ ॥ अप्राचीसी घेउनी प्राची । हे तुर्याप्रभा आत्म सूर्याची । स्थानमानें चहूं देहांची । पाहे अवस्थारूपें ॥ ३० ॥ येक जागृती ब्रह्मदशा । येक सुषुप्ती भवदुर्दशा । सुषुप्ती जागृती मिश्र दुराशा । होय स्वप्नावस्था ॥ ३१ ॥ स्वतंत्र तमोगुणाची सुषुप्ती । उभययोगें रजोगुण उत्पत्ती । जे जागृती अज्ञान स्थिती । स्थूळ देहीं प्रकाशे ॥ ३२ ॥ महाकारणीं विशुद्ध सत्व । तेणें प्रकाशलें परतत्व । कारणी सत्व तम साक्षत्व । अभाव देखे जगाचा ॥ ३३ ॥ करूनि जग विसराचा ठाव । टाकुनी स्वरूपाचा आठव । हृदयाकाश कटाव । वसविला आनंदें ॥ ३४ ॥ तो आनंद जरी नुमसे वृत्तीसी । तरी तोचि जाणिजे मुक्त निश्चयेसीं । सर्व विसरें स्वरूपासी । विसरला म्हणोनि ॥ ३५ ॥ जाला सुषुप्ती रूपें आनंद । अंकुरला विश्वबीज मूळकंद । शिवशक्ति स्वभावें द्वंद्व । विस्तारासी आला ॥ ३६ ॥ म्हणोनि स्वप्नचि जालें सकळ । विश्वाकारें तोचि अखिल । सुषुप्तीचा आनंद केवळ । परिणामासी आला ॥ ३७ ॥ जरी स्वप्नींचें जग न होता । तरी तो चि कृतार्थ होता । तस्मात् जग वासने करितां । पावे अवस्था बंधन ॥ ३८ ॥ या बंधनाचे अभिनव मोटें । काया संभउनी भेटें पाटें । सर्वांचि रज्जु होउनी परिपाटें । बांधे आपआपणा ॥ ३९ ॥ हें सत्वगुणाचें संस्थान । परी तमोगुणें केलें अज्ञान । ज्ञानाज्ञान योगें त्रिगुण । स्वप्न त्रिजग होय ॥ ४० ॥ स्वप्न अवस्थेसी स्वतंत्र । सत्वगुण होय परत्र । परी रजोगुणाचें विचित्र । कर्तृत्व प्रबळे ॥ ४१ ॥ सत्वगुण पडिला तळीं । इच्छा रजोगुण धुमाळी । त्यावरी शून्याची पोकळी । आवरण शक्ती तामस ॥ ४२ ॥ जैं सत्वाचें उजगरलें पण । तैं स्वप्नाची होय वोळवण । सरे सुषुप्तीचें आवरण । नित्यअवस्थापालटें ॥ ४३ ॥ जैं सत्वाची जागृती प्रगटे । अकल्पीत सद्गुरु भेटे । नित्य ब्राह्मीची पहांट फुटे । तैं तुर्या ते प्रगटली ॥ ४४ ॥ तें स्वप्न तें सत्वगुणाचें । भोगी वैभव जागृतीचें । देणें सद्गुरु स्वामींचें । अभिनव ऐसें ॥ ४५ ॥ येर रजोगुण जागृती । कांहीं सत्वाची असे स्फूर्ति । कांहीं तमोगुणाची

भ्रांती। स्थूळदेह संस्कारें ॥ ४६ ॥ जीवनीं कालविलें काळीजिरें । जीवन कडु होय त्या संस्कारे । तैसा स्थूळ देहाच्या विकारें । सत्वगुण जाय ॥ ४७ ॥ तमोगुणाचें पुरतें आवरण । तमाश्रित सत्व उठोन । आत्मदृष्टीनें अन्यथा ज्ञान । पदार्थवरी पाहे ॥ ४८ ॥ जागृती तरी होय यथार्थ । परी न पाहेचि वस्तु तत्वतार्थ । स्वरूपाची वाट मोडिली स्वार्थ । महालोभ मूळीं ॥४९॥ त्यास्तव स्थूळीं रजोगुण । विषय स्फूर्ती जगद्भान । जैसा चुकोनियां अन जाण । अडरानीं पडला ॥ ५० ॥ तेथून दैवगती निर्गम । होऊनि सांपडे मार्ग उत्तम । जो स्वरूपासी पावे परम । कोठें न चुकतां ॥ ५१ ॥ दैवीक गतीचें दैव उदेले । तरी सद्गुरु परदैवत भेटलें । भेटोन स्वरूप दिधलें । उचितासी तेथें ॥ ५२ ॥ स्थूळीं स्थूळाचा अभाव । सूक्ष्मासी तरी नुरे चि ठाव । कारणाचा तो नवलाव । नुरे महा कारणेसीं ॥५३॥ कां जे वृत्तीवरी वेधलेपण । दुरावलेंपणें चि दारुण । मूळासी येतां परतोन । निजठायीं च पडिलें ॥ ५४ ॥ इति श्री भीमोपदेश । सन्मतींचा उभय कोश । वृत्तिद्वयविवर अशेष । म्हणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ येकादश सूर्य सप्तम कळा संपूर्णमस्तु ॥ ७ ॥



श्री

## सूर्य ११ कळा ८

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामतर्पगा वृत्ती परता । स्वरूपानुभव सुखें पुरता । निजांग आलिंग्यतेनें सरता । होय संकल्प विहीन ॥ १ ॥ स्वरूपानुभवाद्री अकळ । निज जिव्हार भेदुनी अविकळ । सवळार्थ हेतु विहीन सकळ । फळा प्रवीण होय ॥ २ ॥ अभेद प्रचीतीचें अभ्यंतर । उन्मनीपर निरंतर । प्रणवानुसंधानें परात्पर । उगमीं अगमळा ॥ ३ ॥ उगमानुसंधान विवरें । स्वयंभ आत्मत्व निजभरें । सद्गुरु कृपा साक्षात्कारें । उगमी उगम रिघे ॥ ४ ॥ जीवन होउनी उगम जालें । उगमीं च प्रवाहाचें रूप फेलें । जीवनपणा न टाकीत आलें । संसरणें गर्तासीं ॥ ५ ॥ तेथूनि अधःपतन संस्कारें ।

अनेक कल्पना बोध विस्तारें । नाना प्रवृत्तीचीं देशांतरें । सरितारूप विख्याति ॥ ६ ॥ या निज जीवनाचा निर्धार । पाहतां अभिनव असे अपार । जो संकल्पमुळीं होउनी स्थीर । निज विचर करी ॥ ७ ॥ सत्यसंकल्पाधिष्ठीत तत्वें । महत् तत्वभूषण साक्षत्वें । प्रकाशवी विशुद्ध सत्वें । पाहे निज नयनीं ॥ ८ ॥ गुणत्रयाचीं अधिष्ठानें । स्वरूपप्राप्तीचीं संस्थानें । स्वर्गस्थिरांत उपक्रमानें । जें उपक्रमासी आलीं ॥ ९ ॥ प्रवृत्तीचा उपक्रम सविस्तर । करून प्रवर्ती उपसंव्हार । व्यतिरेकें उपक्रमासी येउनी सार । उपसंव्हार देखती ॥ १० ॥ जें सबीज प्रवृत्तींचीं कारणें । ज्ञानाग्नीं बीज भर्जीत करणें । जें निजानुसंधान रविकिरणें । प्रसवती निजांग विवीं ॥ ११ ॥ सोहं स्वरान्वित पदरें । परोक्षापरोक्ष तत्व पसरें । विस्तारूनि येकसरें । होती गुण साम्येपर ॥ १२ ॥ प्रणवाभ्यंतर होउनी । प्रणवविस्तारासी येउनी । प्रणवमस्तकीं राहुनी । होती निर्गुण वस्तुता ॥ १३ ॥ त्रिगुणपरंपरा दैवतें । अभिवंदुनी स्वकीय सन्मतें । गुणापरतत्व निर्गुण ते । स्वयें चि अनुभविजे ॥ १४ ॥ झरावोध अधःपतन । भूमी होऊनि निजायतन । दाविजे गुणत्रयगतीचें कथन । जीवनीं नसतां ॥ १५ ॥ ऐसें निजजीवन निर्मळ । ब्रम्हास्मियोगें निजमूळ । स्वानंदाची वोल चित्कल्लोल । अभेदाद्रीतूनि येतसे ॥ १६ ॥ पर्वतांगीचा वाहे झरा । तो अत्यंतीक निर्मळ वरा । तया जीवनामाजि जलचरा । उत्पत्ति हेतू चि नसे ॥ १७ ॥ तया झऱ्यांतूनि मत्स्य मगर । पर्वत फोडूनि नयेति वलोत्तर । जीवन थारलियां तो संस्कार । जीवनीं च संभवे ॥ १८ ॥ कोठें प्रवाहें स्थिरावले । कोठें अवरोधें चि राहिलें । वृत्ती भूस्थानीक जाहले । सखोलपणें संपूर्ण ॥ १९ ॥ जळ संस्कार संभव जळीं । जाळीं जळचरें अतुर्बळी । ऐसें निजजीवन अंतराळीं । परतोनी जरी वाहे ॥ २० ॥ दोनी गती या जीवनासी । अधःपतन उर्ध्वता स्थितीसी । जाणोनी जग जळचरें तयासी । जरी कां वोळखती ॥ २१ ॥ ऐसी जीवनाची गार । विघरोनी होय जीवन सार । जगजीवन अभ्यंतर । सहज चि असतां ॥ २२ ॥ जीवना वेगळीं जें पडती । तें

काळवदनीं सांपडती । जळसंभवासी पुडती । काया धरिती अनिवार ॥ २३ ॥ जळ जाणोनि जळीं सुखें । विरोनी जाती निजउल्लेखें । तरी त्या जन्मभूमिकेसी हरिखें । पावती जीवनरूप ॥ २४ ॥ जीवन परिशुद्ध निर्मळ । निज जिव्हार केवळ । अनभऊन स्वसुखाचे अचळ । पोटीं धरिती जीवनासी ॥ २५ ॥ जगत्कारण निज जीवन । स्वरूप दर्शनें परम पावन । अपरोक्ष गतीचें निजभवन । जयाचे हृदयीं ॥ २६ ॥ जीवन ग्रासूनि जीवन प्रसरें । जीवन होऊनि सर्व प्रकारें । जीव जीवनामाजि विचारें । वर्तऊं जाणती ॥ २७ ॥ ते त्रिगुण अधिष्ठित देव । विश्वायतन गतीचे ठाव । विश्वसाक्षत्व संभवशिव । विधि विष्णु ज्यांपासूनि ॥ २८ ॥ ते स्वरूपानुभवी देवश्रेष्ठ । शिवसनकादि योगी वरिष्ठ । जिहीं आपुलें स्वरूप स्पष्ट । प्रचीतीसी आणिलें ॥ २९ ॥ प्रचीतीचा अवांका अपार । प्रचीतीपर विसांवा थोर । प्रचीती माजि स्वरूपें साचार । प्रतिष्ठिले सहजें ॥ ३० ॥ त्याचे प्रचीतीची धारणा । आश्रित होय जगत्कारणा । तें स्वानुभव रवि किरणा । संकल्प चंद्रकर घेती ॥ ३१ ॥ त्याचे प्रचीतीचे अभ्यंतर । जरी कां स्पर्शे शून्य अहंकार । तरी चंद्रामृत किरणें गार । प्रवाहें झरती ॥ ३२ ॥ त्याचे प्रचीतीची प्रसन्नता । जरी कां आतुडे संकल्प हस्ता । तरी गगनाची व्यापकता । अवरोधिती जग ॥ ३३ ॥ गगन नाकुरे कांहीं । तैसें सर्व प्रकारें पाहीं । जयाचें अभ्यंतर प्रवाहीं । पडोचि नेणे सूर्यशां ॥ ३४ ॥ ते चित्सूर्याचे कुळदीप । ते स्वरूपदर्शेचे याप । ते विश्रांतीचे अमूप । विसावे होती ॥ ३५ ॥ ते अनर्घ्याचे टोळस । ते अपरोक्षतेचे विलास । ते मायोपरमेचे फळस । झळकती निज तेजें ॥ ३६ ॥ ते स्वरूपानुभवाने गिरिवर । दोंमधिं स्वरूपता पाठार । पायांचे स्वरूप अगोचर । धृतीमुळें न फळे ॥ ३७ ॥ जाले जन्दी प्रल्हादि सुरर । नन्दी ते प्रयत्नांचे संस्कार । संताची महिमा साचार । कल्पनांसी च न फळे ॥ ३८ ॥ स्वरूप आणि स्वरूपानुभवी ।

नसे चि जयासी हें उठाठेवी । ते चि महानुभाव गोसावी । संपन्न स्वरूप-ज्ञानें ॥ ३९ ॥ प्रवृत्तीमुळें अपेक्षा । अथवा काळ शासन दीक्षा । हे ही जयांसी उपेक्षा । असे चि ना कांहीं ॥ ४० ॥ तयाचें स्वरूप निर्वि-कार । परी स्वरूपतेचे अळंकार । सायोज्य सुखाचे अवतार । अवतरले जगीं ॥ ४१ ॥ अवतारासी कैंसें अवतरण । हें अनुसंधान जीवीं धरणें । अनुभवसूर्याचीं किरणें । पाहों गेली सूर्यासी ॥ ४२ ॥ तैसी परीक्षा पहूं जातां । परीक्षवंताची दिसे योग्यता । दीपप्रभेनें ज्योति तत्वता । पाहों अपेक्षिली ॥ ४३ ॥ सुवासें अपेक्षिलें सुमन । निजलक्षें आत्मानुसंधान । निजांग पहावयासी नयन । उघडिले जेविं सूर्ये ॥ ४४ ॥ सहलक्ष्मी वरील मणिशोभा । तये प्रभेवरी राहूनि उभा । पसरूनि द्विसहस्रजिव्हा । पहावया आश्चर्य ॥ ४५ ॥ जैसें मृगजळ तान्हेलें । मृगतृष्णेसी प्राशन केलें । तैसें सज्ञानपणाचें जालें । होईल सार्थकतेनें ॥ ४६ ॥ आपण स्वमुखें चि अवतरले । बोध विश्वरूपें भव तरले । परापार उतरले । अवतारावरी अवतार ॥ ४७ ॥ दीपापासूनि लक्ष कोडी । निघती दीपांच्या पवडी । तेथें काय प्रभेची वांकुडी । होय प्रभावचेंसें ॥ ४८ ॥ अमृताची केलीं देउळें । अमृतस्वाद घेतां तात्काळें । अमृत सिद्धांनें न बोळे । काय आराधितां तया ॥ ४९ ॥ दिव्यामृत तेज नगरें । शोभविती नभ दिशा जागरें । परी त्या दिवसाचे नि उजागरें । वागतां अति लज्जित ॥ ५० ॥ तैसीं तार्किक तत्वज्ञानें । विपत्ती संपत्तीचीं अडरानें । जैं वसविती ल नगर उद्यानें । तैं ते अभिनव पिके ॥ ५१ ॥ टाकूनि सर्वस्व देहाभिमान । होऊनि वस्तुता निराभिमान । लेऊनि अंगांगीं आत्म सुमान । जे अळंकरले ॥ ५२ ॥ साधुसहवासें साधु होती । कस्तुरीयोगें होय कस्तुरी माती । सद्वर्तीसी कारण सत्संगति । यदर्थी संशय नसे ॥ ५३ ॥ निज अभ्यंतरींचें समाधान । स्वरूप प्राप्तीचें साधन । सद्गुरुकृपेचें अनुसंधान । कृपेनें अवधान या मन ॥ ५४ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । संतस्वरूप ते चिद्विलास । पावन दशावतार परेश । म्हणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ येकादश सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥

श्री

# सूर्य ११ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम कैवल्य क्षेत्रपती । जगदोद्धार चरित्र स्थिती । जगदाचरणें प्रवृत्ती । पावन केली ॥ १ ॥ जेविं परोपकारास्तव । अव्यक्त तत्व होय सावेव । विश्वसंभव आत्मानुभव । रूपस जाला ॥ २ ॥ आनंदतनुमानसा रूपें । प्रगटोनियां सत्यसंकल्पें । तपोनी स्वरूपप्राप्तीचीं तपें । जाला महा तपाढ्य ॥ ३ ॥ निष्काम आणि सद्भावें । निर्दोष आणि निजानुभवें । निष्कळंक आणि जीवस्वभावें । व्यक्तीसी आला ॥ ४ ॥ हे परोपकाराची करणी । होय विश्वायतन धरणी । विश्वविलास आचरणीं । उपेग विस्तारला ॥ ५ ॥ विश्वें उपेगासी यावया । कळवळा न सांवरे चि तयां । द्रवोनी स्वानंदें हृदया । भरिलें आर्द्रतेनें ॥ ६ ॥ जीवन होउनिया जिव्हाळा । जियंत केली अंतरीं जीवनकळा । एवढा परोपकाराचा कळवळा । आदि पुरुषीं तया ॥ ७ ॥ जीवनावांचूनि निश्चयेसीं । उपेग जगउपजीविकेसी । काय आहे निज मानसीं । बरें पहा ॥ ८ ॥ जो स्वानंदसुखाचें भरण । जो निरोपाधि निष्कारण । तो चि परोपकारास्तव संपूर्ण । द्रवला जीवनरूप ॥९॥ तैसा चि स्वप्रकाशगभस्ती । जो न देखे संकल्प दिवाराती । तो चि नानाप्रकारें जगती । दिवारात्रीं वर्तवी ॥१०॥ या लोकोपकारास्तव सूर्य । उदय करूनि त्रिजगती ऐश्वर्य । जगाच्या डोळां दाखवी आश्चर्य । नित्य निराश्रयें धावतां ॥ ११ ॥ जठराग्नि होउनी आपण । चतुर्विध अन्नें परी पचन । तैसा चि सर्वांगीं होउनी व्यान । रस पावरी सर्वत्र ॥ १२ ॥ जो निष्कंप व्यापकतेनें । स्फूर्तीची चळवळ उथा नर्तनें । तो नियांत परि निज सत्तेनें । प्राणरूपी पवन होय ॥ १३ ॥ जो निघोट निरावकाश । जयासी न साहे उन्मेष । तो सकळांचे हृदयीं परेश । होउनी सकळां वर्तवी ॥ १४ ॥ जयासी दृश्य त्रिपुटी साधेना । जो साक्षत्वें हि आतळेना । जो परतत्व म्हणोनी येईना । निज व्यापकतेसीं ॥ १५ ॥ ऐसा सर्व

( १ ) चळवळण्या नर्तनें ( पाठांतर )

प्रकारें प्रांजळ । तो चि संकल्पाचेनि गर्भे अकळ । ज्यातें म्हणिजेत कां अंतराळ । होय जय सांठवणेसीं ॥ १६ ॥ परोपकारा एवढें सुकृत । आणीक नसे चि म्हणउनी भगवंत । परोपकार तप आचरत । होय नित्य नवा ॥ १७ ॥ टाकून भगवत्पणाचा अभिमान । होउनी सर्वस्व निराभिमान । सकळांचे जीवीं सावधान । तपासी उपदेशी ॥ १८ ॥ सकळ जीवांचें अभ्यंतर । स्वबोधें करुनी निरंतर । देऊनि नित्या नित्य विचार । तपासी आचरवी ॥ १९ ॥ साना थोर न म्हणे जीव । न म्हणे जाति विजाति संभव । अधिकारी आणि अनाधिकारी सर्व । समत्वेंचि देखे ॥ २० ॥ तो सर्वात्मा सुखें संचला । वेदादिकीं प्रसिद्ध प्रशंसिला । परी परोपकार आचरला । हें न कळे म्हणती जरी ॥ २१ ॥ तरी ते कृतोपकारें भार वाही । वेददेव भाट जाले पाहीं । तैसे चि महानुभाव तेहीं । उपकारेंचि दाटले ॥ २२ ॥ जगदीश्वराची उत्तीर्णता । धरवेणें होइजेल पाहतां । त्यास्तव वर्णितां वर्णितां । मागले निगम ॥ २३ ॥ जयाच्या द्विसहस्र रसना । वर्णितां वर्णितां अनुसंधाना । श्रवणीं चि लाऊनि नयना । पाहता प्रज्ञा सरली ॥ २४ ॥ त्या परमेश्वराच्या उपकारें । दाटले सप्रेम अभ्यंतरें । ते कवेश्वर अपरोक्ष विवरें । वर्णितात्ति अद्यापि ॥ २५ ॥ सर्व हृदयस्थ परमेश्वर । विश्वहृदयीं निरंतर । ज्ञान देऊनि साचार । परिपाळी परोपकारें ॥ २६ ॥ धरूनि महाविष्णूचें शरीर । करी परोपकार व्यवहार । करूनि दुष्टांचा संव्हार । प्रतिपाळी सुष्टांसी ॥ २७ ॥ तैसा चि होऊनि शंकर । निरसूनि उपाधि कृपाकरें । जीव किंकर दशेचा अभयंकरें । करी स्वरूप तयासी ॥ २८ ॥ निवर्तउनी भूतबाधा । दे स्वरूपदशा प्रबुद्धा । जो कृपाळूपणें विविधा । व्यक्तीनें सांभाळी ॥ २९ ॥ तैसा चि जग अपेक्षितदाता । परोपकारमूर्ति विधाता । नाना पदार्थ संभविता । होय जग उपलब्धीसी ॥ ३० ॥ जगोपलब्धीचे ईश्वर । जयाचें सामर्थ्य विश्वंभर । परी सद्भावें जयाचें अभ्यंतर । आर्जवी सकळा ॥ ३१ ॥ थोरपणाचा अभिमान । टाकूनि जाले निराभिमान । जगदांतरींचे अधिष्ठान । ध्यानें आर्जविती ॥ ३२ ॥ जगदांतरात्मा ज्ञानघन । हें जगदांतर अधिष्ठान ।

होऊनि जगा धाकुटें तें सज्ञान । पाहती जग ईशत्वें ॥ ३३ ॥ परमेश्वर-पणाची स्थिती । निराभिमानता पुरती । या चि भावें तो सर्वार्थी । संपन्न जाला ॥ ३४ ॥ या चि गळितवृत्तीनें सर्वदा । पावल्य सत्स्वरूप संपदा । ते निज रसेसीं भोगी प्रमदा । वरपडा न होनी ॥ ३५ ॥ जियेच्या दासी महासिद्धी । जगासी संपन्नता उपलब्धी । त्या अल्पलक्ष्मी कटाक्ष वेधीं । किती उत्पतीसी आले ॥ ३६ ॥ तैसा नव्हे तो लक्ष्मीकांत । जो योगियांचा निज एकांत । तो ही परोपकारें गुणवंत । अवतारी होय. ॥ ३७ ॥ आपुल्या स्वरूपाचा आव । धरूनि जाला अवतारी देव । जीव अज्ञान दशेचा राव । तारिला या अर्थे ॥ ३८ ॥ परोपकार परपीडण । याचें रूप व्हावें आहे गहन । तरी तुम्ही अवधान हंसवाहन । अवधानासी यावें ॥ ३९ ॥ सहजाचें जें अनुसंधान । तें आराधन करितां सावधान । साक्षेपदशा अवधान । ध्यानीं च प्रत्यक्ष होय ॥ ४० ॥ इति श्रीमद्धर्मोपदेश । परोपकार तप निर्दोष । सद्भाव भजन अविनाश । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ एकादश सूर्य नवम कळा पूर्ण ॥ ९ ॥ श्रीरामार्पणमस्तु ॥



श्री

## सूर्य ११ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सत्स्वरूपी साचार । कां जे असत्स्वरूपाचा करी उद्धार । येक सत्स्वरूपी पद निर्विकार । कृतोपकारी नव्हेति ते ॥ १ ॥ राम कृतोपकारी जगदीश्वर । रामचरित्र भवतारक सार । रामप्रतिमा मनोहर । होय भव निवृत्तीसी ॥ २ ॥ रामनाम भवतारक नौका । सप्रचीत-आत्मदशा सुखात्मका । जे स्मरणेंचि सनकादिकां । दे स्वरूपदशेची दीक्षा ॥ ३ ॥ कृतोपकाराच्या कोटी । जग तारावयासी हेतु पोटीं । दाटुनी परमात्मा निकटीं । कृपेनें अवतारला ॥ ४ ॥ मुळींहून केवळ कृपाळूपण ।

जयाचें हृदय महा विस्तीर्ण । गगनाऐसी सांठवण । सांठविली जेथें ॥ ५ ॥ निरोपद्रयाचा महा पैस । केवळ मोकळा अवकाश । काठिण्यतेचा कांहीं येक लेश । असे चि ना तेथें ॥ ६ ॥ कोमळपणाच्या उपमा । द्यावा तरी गाळुनी टाकिलें व्योमा । ऐसा निरोपम परमात्मा । उपकारा सीमा न करवे ॥ ७ ॥ व्यापकपणें संपूर्ण । जाला स्फूर्तिरूपें आपणं । सोहंउन्मेष गगन । आला अव्यक्त तनूसी ॥ ८ ॥ निरोपाधि निरहंकृती । निरुपद्रव निजांग स्थिती । निर्ममता सशांतवृत्ती । निर्लोभ निष्कर्मी ॥ ९ ॥ सर्वत्र असोनी संपूर्ण । न सुपे कवणाचे आंगीं प्रमाण । समानतेचा ठाव देऊन । होय विसांवा सकळांसी ॥ १० ॥ निरतिशय सुखाच्या कोटी । संभऊनि प्रति उल्लेख सृष्टी । प्रतिपाळित असे पोटीं । वसऊनि सकळां ॥ ११ ॥ सकळ विश्रांतीचा विसांवा । सकळ सुखाचा सुख ठेवा । सकळ प्राप्तीचा योग बरवा । नित्य नवा पुरवीतसे ॥ १२ ॥ आनंदायतन तनु अव्यक्त । नित्योपलब्धीचे योग युक्त । देत साक्षात्कार नित्यमुक्त । दशेचे प्रसाद ॥ १३ ॥ अव्यक्तीं सदाचिद् आनंद । विशुद्ध गुणत्रयाचे कंद । व्यक्त अव्यक्त द्वंद्व निर्द्वंद्व । स्वभाव अभ्यंतरें ॥ १४ ॥ महद् अहंकार लीला । सत्याभिमान सत्वागळा । जो सत्य प्रतिज्ञेनें भवजळा । पासूनि तारी जग ॥ १५ ॥ स्वरूपें सत्य प्रतिज्ञावंत । त्रिगुण अधिष्ठानें येशवंत । व्यवसाय संभव कीर्तिवंत । होय अधिष्ठानत्रय ॥ १६ ॥ समविषम समान । सुखदुःख गुणागुण । विष अमृतें प्रतिष्ठुन । होय कृतोपकारी ॥ १७ ॥ हें अनुमानितांचि पोटीं । विवेक निधी जगजेठी । मानिती आश्चर्याच्या कोटी । परी अकळ महिमा ॥ १८ ॥ प्रचीतीचे परीक्षावंत । तुम्ही अद्भुत दशेचे संत । इहपर परीक्षेने समर्थ । तुम्हांपुढें काय बोलावें ॥ १९ ॥ विश्व उपेग महातेजासी । चातुर्यदीपिका प्रकाशी । काय तोषविजेल विशेषीं । केविं संपन्नतेनें ॥ २० ॥ विशेष रूढीनें अमृत । विश्रांति कर उपेगी यथार्थ । परी कृतोपकारी विष होत । कैसें अवधारा ॥ २१ ॥ स्वानंद क्षीणार्णव संभूत । विष महा तेजस्वी अमित । कंठीं धरूनि विश्वनाथ । कां संरक्षी तया ॥ २२ ॥ जरी कां उपेगी नसतें ।

तरी कां ते शिवासी प्रिय होतें । प्रियकर म्हणउनी धरिजेतें । क्षणभरी कंठीं ॥ २३ ॥ हें तरी सर्व काळ कंठीं वसे । गौरवें नीलकंठ नाम प्रशंसे । हा हि अभिप्राव मानसें । अवधारिजे सुखें ॥ २४ ॥ अहंकार प्रकृतीचे प्राणी । जे अति उन्मत्त जनीं । नाटोपती कलिकाळ्यासी ध्यानीं । अजिंक ऐसे ॥ २५ ॥ आर्जऊनि परात्पर । नमनूनियां ईश्वर । निज उद्धतीनें अहंकार । चर्या आचरती ॥ २६ ॥ त्यास्तव हें विश्वनिदान । कंठीं वसऊनि ईशान । प्रयोगून काळवदन । दशा रूढवी ॥ २७ ॥ काळक्रमें करूनि सविस्तर । रूढलें विश्व होय जर्जर । त्यास्तव करूनि विश्वसंव्हार । नूतन प्रतिष्ठी ॥ २८ ॥ जैसे जीर्ण हेमालंकार । पुटीं घाउनी तो कर्तार । करी नूतन प्रकाश कर । भूषण महा वर्चसें ॥ २९ ॥ तैसे विश्व घाऊनियां पुटीं । संभवी विविधा रूपसृष्टी । हा विषरूप महिमा कंठीं । धरिलासे ईश्वरें ॥ ३० ॥ पंचायतन पांचिक । टाकून जाय हंसनायक । त्या अमंगळ्यासी होऊनि पावक । परिशुद्धीसी आणी ॥ ३१ ॥ जगाचीं महा पाप कळिवरें । प्रक्षाळी वैश्वानर नीरें । मज वाटे या चि परोपकारें । असे सीमा टाकिली ॥ ३२ ॥ नूतन शरीर सुकृतें । जैसा निज जनक सुतातें । तोषें वस्त्र देत स्वहस्तें । तेविं जगासी गौरवी ॥ ३३ ॥ आवडलीं तितुकीं शरीरें । देऊनि पुरवला कृतोपकारें । आपुला संसार विस्तारें । कैसा प्रतिपाळीतसे ॥ ३४ ॥ तस्माच्छिवाचें कृपाळूपण । जग पाप निवृत्तीसी कारण । जगदोद्धारी आचरण । संव्हार चर्येनें ॥ ३५ ॥ अमृताचीं दोनी रूपें । सौम्य सात्विक संकल्पें । दुजें शौर्य प्रतापें । होय चमत्कारी ॥ ३६ ॥ अमृतें मरण बांचविलें । या अर्थें मरण बळिवंत जालें । अथवा अमृतें मरण वारिलें । तरी अमृत महिमा ॥ ३७ ॥ मृत नव्हे म्हणऊनि अमृत । तस्मात्संभवासी न यावा हेत । अमृतपानें होती जिवंत । मरणं भोगावया ॥ ३८ ॥ नाना संस्कारीं दुर्द्वेत । वांचऊनि दुःख भोगवित । त्यासी कैसें म्हणावें अमृत । यथार्थतेनें ॥ ३९ ॥ विष सेऊनि मरती । पुन्हा जन्मांतरा येती । तें विषें चि नव्हे निश्चिती । आतां अवधारा पुढें ॥ ४० ॥ इति

श्रीमद्भीमोपदेश । कृतोपकारें दाटला ईश । जगत्कुक्षी वर्धवी तोष । म्हणे मेरु अनंत ॥ ४१ ॥ एकादश सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ श्रीकृष्ण कृष्णा श्रीकृष्ण ॥



श्री

## सूर्य ११ कळा ११

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामजगदोद्धारी सदय । जगदानंद सुधामय । अवतरला स्वप्रकाशसूर्य । रामचंद्र प्रसिद्धीनें ॥ १ ॥ ज्ञानसूर्याची खडतरता । जे शिवहृदयींची सत्ता । अंकुरोनि भूमी मार्दवता । दावी सहजें ॥ २ ॥ बीजभूमीचा संस्कार । घेऊनि विस्तरे वृक्षाकार । रामी शिवकंठीचा साचार । संस्कार धरिला ॥ ३ ॥ राहोनि शिवाचे ध्यानीं । प्रगटोनि विष उपशमनीं । स्वानंदघन उन्मनी । अमृतकर केला ॥ ४ ॥ संदीप्त काळकुटें तेणें । शिव अहळला विष उष्णतेनें । तात्काळ येक नामस्मरणें । परम सुखी केला ॥ ५ ॥ रामचंद्र वसतितां हृदयीं । महा आनंद सिंधु प्रवाहीं । चुबकळ्या देत महा सुखडोहीं । निवाला निजांगें ॥ ६ ॥ रामचंद्र सन्निधी केवळ । सितिकंठ होय सुसीतळ । विश्वकल्याण समूळ । सुखी केलें श्रीरामें ॥ ७ ॥ ज्याचेनि सकळ सुखी होती । त्यासि सुखी करणें हे महास्थिती । विश्वसुखकर शंकरमूर्ती । सुखी केले श्रीरामें ॥ ८ ॥ हा कृतोपकार महिमा । सत्यावतार रामगरिमा । दुःख निवर्तक रामचंद्रमा । अल्हादकर विश्वासी ॥ ९ ॥ नभीं खपुष्पा ऐसा उज्वळ । विपरीत दृष्टीसी दिसे तेजाळ । त्या चंद्रम्याचें सुधामंडळ । लांछनयुक्त असे ॥ १० ॥ संकल्परूपी मनचंद्र । क्षयवृद्धि सुधा विषसांद्र । तैसा नव्हे स्वसुखें समुद्र । रामचंद्रमहिमा ॥ ११ ॥ महा संकल्प सिद्धी जाती । महा ईश्वरी सत्ता जगती । महा तेज वैभवस्थिती । महा येश शुभता ॥ १२ ॥ सत्कीर्ति निर्दोष चरित्र ।

रामचंद्र परम पवित्र । परत्रगतीचें तेज विचित्र । शिवहराकाशीचें ॥ १३ ॥ प्रवृत्तीक्षयवृद्धिकर । जगत्कारण निदानपर । संकल्पचंद्री च निरंतर । वसे सम विषमता ॥ १४ ॥ निर्विषय विषाची स्थिती । विषययुक्त विषयउद्धती । तैशाचि अमृताच्या रीती । प्रांजळ पहा ॥ १५ ॥ निर्विषय विषमाया । विषय निर्विषय सिद्ध काया । उभय साक्षत्वीं उगवाया । साक्षत्व केलें ॥ १६ ॥ निर्विषय ते चि विषयामृत । कांहीं नसतां धरिला दुहेंत । मरण स्वरूपी क्षयगत । हें विश्व नव्हे काय ॥ १७ ॥ सविषय अमृत विष । उद्बोधदशेनें निस्तोष । संस्कार निरसूनि चित्प्रकाश । अमृत चि करी ॥ १८ ॥ हें उभय विषमामृतें । निरसूनि साक्षत्व पुरतें । रामचंद्रामृत निरुतें । सेविलें जे ही ॥ १९ ॥ ते सचित्सुखतनुसंत । रामे अनभंऊनि अनंत । राम प्रचीतीनें कृपावंत । तारिती जगासी ॥ २० ॥ सुधा विषसमविषम । निरसूनि साक्षत्वाचा संभ्रम । निरुपम आत्माराम । करिती विश्वासी ॥ २१ ॥ या परोपकारा एवढें । दुजें तप चि नसे जगीं गाढें । ज्या तपतेज उजेडें । मरणजन्म गती चुके ॥ २२ ॥ प्रत्योपकारी सविस्तर । विश्वेश्वर विश्वंभर । ब्रम्हा विष्णु महेश्वर । होय परोपकारासी ॥ २३ ॥ रचूनि स्थूळ विराट देह । जगाची सांठवण होय । जग उपजीविका पाहे । जगत्कुक्षी तो ॥ २४ ॥ होऊनि स्थानमान अवस्था । अपंचीकृत तत्वव्यवस्था । पिंड ब्रह्मांड संस्था । केली सर्वत्रांसी ॥ २५ ॥ प्राणाचा होऊन निजप्राण । जगासी जीवविलें सत्राण । अंतःकर्ण होऊनि मुख्यप्राण । प्रतिष्ठा केली ॥ २६ ॥ सारासार विचार । अन्वय व्यतिरेक विवर । द्रष्टा होऊनि निरंतर । अजपा जपला ॥ २७ ॥ विस्मरणावरी स्मरण देत । चैतन्य चेतवी सर्वगत । सुषुप्त परेश जागृत । करी निज ज्ञान हस्तें ॥ २८ ॥ चमत्कारें स्वसुख चेतवी । अमोघ निजबोध हेतवी । सशांतदशेनें सांठवी । असंत जीवांसी ॥ २९ ॥ तत्वमसि ज्ञेय हाटक । अलंकारी तत्व भेद पाठक । निःशब्दपरेसी उद्धाटक । होय निजप्रत्ययें ॥ ३० ॥ त्रिपुटीविना तत्व विबोधक । साक्षत्वविना हृदयशोधक । अवरोधकतेविना रोधक । होय विषय करणासी ॥ ३१ ॥

स्फूर्ति जोतिविना दीपिक । रूपवृत्तीरहित रूपक । साक्षत्व संधीसी व्यापक । व्यापकतेविना ॥ ३२ ॥ माया माईकविना ममता । काया संस्कार रहित समता । चातुर्य पदगर्तनें भ्रमतां । भ्रमण परि हरी ॥ ३३ ॥ गुणातिशय जेथें जर्जर । तेथें धांवोनी होय स्वरूपें निर्जर । निवारी संकल्प सुरवर मार्जर । गतीसी आणिला जेणें ॥ ३४ ॥ अक्षीय वज्रपंजरनभ । होऊनि सर्वगतशुभ । अपरोक्ष निभा स्वयंभ । विश्व प्रकाशिसी ॥ ३५ ॥ विश्व चेतव्यता पवन । विश्वोद्भव निज जीवन । विश्वधारणा निज भवन । होय त्रिभुवन दीप ॥ ३६ ॥ प्रत्यगावृत्तीनें सर्वत्र । परिपाळी जगचित्र । याची विचित्र महिमा पवित्र । जरी वाचा पढे ॥ ३७ ॥ मूळ प्रकृती महब्रम्ह सत्ता । महाकारण तनुतत्वता । अर्धमात्रात्मक सावित्ता । निजांग प्रकाशी ॥ ३८ ॥ धरूनि निजमूर्ध्नीस्थान । अद्वैत परेचें अनुसंधान । निजज्ञान संधानें संधान । करी साक्षत्व मुक्त ॥ ३९ ॥ तें ज्ञान सत्ताशक्ती प्रख्यात । शुद्ध सत्व तनूमी शोभवीत । निजांग दर्शनें अक्षोभित । पाववी निज पदा ॥ ४० ॥ अनिर्वाच्य निजअर्थांतर । होऊनि परेची रसना जिव्हार । ज्ञानसाक्षरे सविस्तर । हृदयग्रंथ लिपी ॥ ४१ ॥ अपरोक्ष प्रचीतीनें प्रांजळ । प्रचीति अक्षरें अर्थ केवळ । याची अनुहातलिपी अकळ । अर्थवी निज हृदया ॥ ४२ ॥ केवळ अनुभवाचा उपभोग । घेत आनंदावभास भोग । निजांगीं निजसंयोग । योग विभूषित च्यर्या ॥४३॥ निज जागृतीचा दुर्धरधर । धरूनि असिपद निजविवर । साक्षत्व परिहारें तत्त्व धुरंधर । तुर्या प्रकाशली ॥ ४४ ॥ प्रत्तेक होऊनि प्रपंचासी । तत्त्व प्रत्येक पण मानसीं । गिळूनि परापर भावनेसी । होय प्रत्यगात्मा ॥ ४५ ॥ येवं सकळ तत्वाचे धर । होय आपणेंचि विश्वंभर । महाकारण प्रभाकर । विश्वउपयोगी हा ॥ ४६ ॥ एवढा प्रत्योपकार पवाडा । अनुभवसूर्य धडपुडा । जागे सकळांतरी रोकडा । आत्मा जगदांश ॥ ४७ ॥ तयाची परोपकारचर्या । प्रकाशीत परोपकार सूर्या । विश्वसान्निधानें पावे तुर्या । हृदयस्थासी ॥ ४८ ॥ परस्वभावें

इतर । ते स्वरूपासी चुकले अभ्यंतर । त्यासी करणें जो उपकार । तो परत्रगतीचा ॥ ४९ ॥ उप म्हणिजे समीप आकार । अथवा करणें स्वरूप समीपधार । बोधचिदानंद तनुसुंदर । उपकारी होय ॥ ५० ॥ या मुक्तासी नाहीं जोडा । मुक्ततार्थे निज उजेडा । पाहून सुष्कर्तव्य जो पवाडा । तो पवाडे स्वरूपीं ॥ ५१ ॥ या स्वरूप उपकारें संत । बोध सूर्य कीर्तिमंत । त्याच्या परोपकारीं सर्वगत । सार्थकतेसी आले ॥ ५२ ॥ आतां संत कृपेचें महिमान । परपीडा निवृत्ति संधान । प्रचीतीचें निज अनुसंधान । ग्रंथीं निरंतर ॥ ५३ ॥ तेचि सप्रचीत अवधान । देऊनि ग्रंथीं कीजे सावधान । मम आराध्य तुम्ही यशोधन । परिपालन करा ॥ ५४ ॥ इति श्रीमद्बोधोपदेश । स्वरूपगतीप्रदप्रकाश । बोध सर्वगत अविनाश । म्हणे मेरु अनंत ॥ ५५ ॥ येकादश सूर्य येकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ गोविंद गोविंद गोविंद गोविंद गोविंद ॥



श्री

## सूर्य ११ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम संप्रज्ञातविथीं । विश्वसुखायन घोतत्री । संबोधूनि सुखे पदवी । कृतार्थ करी जग ॥ १ ॥ निज अभ्यंतर विशाळ । शून्य प्रकाशमंत सोज्वळ । ते कारण शून्य मंडळ । भेदूनि प्रवर्ते ॥ २ ॥ जे विश्व आस्तिक्य अवरोधी । जे विश्व दुर्गतीसी बोधी । जे विश्व नाशासी समंधी । समंधीकरण ॥ ३ ॥ जे दुर्भव संभवस्थान । जे अनर्थगतीचें संस्थान । जे अवदशा दुर्धर प्रधान । अज्ञान चिन्हें ॥ ४ ॥ तेथें सोहं ब्रम्हास्मि भावे । स्वरूपीं ध्यानस्थ स्वभावें । अज्ञान साक्षी अंतर्भावें । राहिला ध्यानस्थ ॥ ५ ॥ सकळाचा अभाव सहजें । त्रिपुटीरहीत सुख उमजें । निर्विकल्प सुषुप्ती भोजें । आनद भोग भोगी ॥ ६ ॥ जें परेचें अभ्यंतर । उल्लेखासी आणूनि निर्धार । शब्देंवीण निज उद्गार ।

होय प्रचीती परमंर्था ॥ ७ ॥ यासना प्रसाद विसरें । विरक्तिरूप अभ्यंतरें । तामसदशा निज निर्धारें । केवळ तमोगुण ॥ ८ ॥ कारण क्षेत्री तमोगुणीं । विश्रांतिरूप सुषुप्तस्थानीं । भोगी सुषुप्ती निर्विकल्प मनीं । मकारमात्रा ॥ ९ ॥ विश्वबीजें द्रव्यशक्ती संपूर्ण । सर्वगताचें हृदयस्थान । प्राज्ञ अभिमानी अज्ञान । विस्मरण सर्वप्रकारें ॥ १० ॥ भोगी स्वप्न स्वभाविक । तेणें चि होय वासनात्मक । तेथें स्थानमानें प्रकाशक । होय सविता ॥ ११ ॥ स्वर्मीच निजजागर । पदार्थ जागृती दिवाकर । अपेक्षीत पदार्थ अपार । पुरवत्या न्याय ॥ १२ ॥ सर्वारंभ परित्यागी । होऊन सर्वारंभ प्रसंगीं । सर्वावस्थेसी संभोगी । आहे वरी जीवासी ॥ १३ ॥ येकांगें होय पांगुळ । येकांगें होय अंध केवळ । उभय अव्यंगता अविकळ । येकात्मतेसी आणी ॥ १४ ॥ पायें चाउवी पांगुळ्यासी । डोळां पाहवी जात्यंधासी । त्याची अभिनय करणी ऐसी । यत्नासी कळे ॥ १५ ॥ त्याचें हृदय घेऊनि स्वयें । संत अनुभविती निश्चयें । तो संतमहिमा सूर्योदय । श्रोत्रचक्षूनें पहा ॥ १६ ॥ जें सद्गुरूंचें माहेरघर । जें आत्मज्ञानाचें भांडार । जें स्वरूपतेचें अभ्यंतर । तें हृदय जयाचें ॥ १७ ॥ जें सारस्वताचें संभव संतान । जें गांभीर्यतेचें गुणनिधान । जें औदार्य दशेचें संस्थान । अंतःकरण ज्याचें ॥ १८ ॥ सत्यसंकल्पाचें आयुष्य । चिरंतन उपलब्धी विशेष । तें मानस जयाचें चित्प्रकाश । राउळ उन्मनीचें ॥ १९ ॥ चिंता विहीन निज चिंतन । जे सद्गुरूंचें अयतन । ध्यानस्वरूपें चिरंतन । चित्त जयाचें ॥ २० ॥ भवबोधविना प्रबोधी । बोधस्वभाव विबोध प्रबोधी । केवळ निजउद्बोध बोधीं । बुद्धि जयाची ॥ २१ ॥ दुर्गतीचेनि संस्कारें । विषयांध जीव माजिरें । सद्गुरु कृपा संस्कारें । संस्कारीं असतां ॥ २२ ॥ दुर्गती कल्मष संचारें । चरती अविद्या राणवें । विद्यमानें चि तावरे । हृदय जयां ॥ २३ ॥ दृष्टीपुढें अमृत सरोवर । पाठिमोरें विष कासार । हें जाणोनी अभ्यंतर । वि[illegible] ॥ २४ ॥ ऐसियासी कृपा करणे । दुरितदशा परिहरणें । नि[illegible] करणें भरी ॥ २५ ॥ ऐसा जयाचा विचार ।

कृपाविलोकनें करी संचार । जेविं साक्षात्कार सूर्यकर । अज्ञानतम हरी ॥ २६ ॥ तेवि त्या शरणागतासी । कृपावज्रपंजरें प्रकाशी । निजानंद-राणिवेसी । करी संस्थानीक ॥ २७ ॥ ऐसा जयाचा सहज स्वभाव । कृपाप्रसन्नतेचे देव । शरीर देवालयीं सदैव । प्रतिष्ठिलें जिहीं ॥ २८ ॥ भवापध्वांतहर्तें । स्वभाव दिवस्पती सुखकर्ते । विश्रांति वसुमतीचे मर्ते । जयाचे उन्मेश ॥ २९ ॥ सहज विलोकन अमृत । जीवासी करिती सदोदित । परोपकारें चि मूर्तिमंत । संत अवतरले ॥ ३० ॥ संसारार्क संपर्कें संतप्त । त्रिविध तापें खवळलें हृद्गत । कृपा सुरतरु छायेसी निवांत । निववितीं सदा ॥ ३१ ॥ ज्यांची कृपा स्वरूपाकारें । ज्याचें ज्ञान स्वयंभ अलंकारें । अलंकृत करी शृंगारें । साजिरें निजरूप ॥ ३२ ॥ ज्याचें स्वभाविक आचरण । करी भवसिंधूसी तारण । ज्याचें दाक्षण्य सुखकारण । प्रतिष्ठी सर्वत्र ॥ ३३ ॥ जे स्वभाव स्थितीचे ईश्वर । जे स्वरूप दशेचें आगर । जे विश्राति विसांवे अपार । सत्य प्रसिद्धीनें ॥ ३४ ॥ त्याची नाम अक्षर माळा । जरी कां रुळे अखंड गळां । तरी ते सद्गती वेळोवेळां । भावें पायांसी लागे ॥ ३५ ॥ त्याची चरित्रें कल्पतरु । रचूनि वागेश्वरी अक्षरें । नित्य पढतां साक्षात्कारें । सेविजे सर्वदा ॥ ३६ ॥ गाळीव पंचतत्व सारें । सत्चित्सुखघन शरीरें । बैसतां निजदृष्टी चमत्कारें । वरी चित्स्वरूपता ॥ ३७ ॥ ज्याच्या सन्निधान विशेषीं । तोपें चि जाय दिवस निशी । नित्यानंद विशेषीं । उपचारुं ये ॥ ३८ ॥ त्याचीं संभाषणें सुखकरें । प्रलयाचीं माहेरघरें । अक्षराचीं प्रमय विवरें । स्वरूप चि करिती ॥ ३९ ॥ तत्व चिंतना कडोविकाडी । उकल अपल गर्ताची बोडी । युक्ती जयांच्या परवडी । देती ते तत्वतार्थ ॥ ४० ॥ जयाचे गांभिर्य सुचर्य । वर्चसें प्रकाशला चित्सूर्य । तें शुचिष्मंत तप आश्चर्य । ऐश्वर्यवंत करी ॥ ४१ ॥ सर्व समारंभे लीळा । ज्याची कृपेची अमृतवेळा । करी दिनरात्री उजाळा । सर्वगत ब्रम्हीं ॥ ४२ ॥ कृपा जयांची अभिनव । करिती कृपेनें स्वरूपजीव । कृपेचें अधिकारी वैभव । देती जगदोद्धारा ॥ ४३ ॥

असाधारण संतकृपा । तात्काळ चि पावती सरूपा । प्रतिष्ठूनि सत्य संकल्पा । देती सायोज्यसुख ॥ ४४ ॥ ऐसिया संतांचें स्मरण । केलिया सरे जन्ममरण । संतकृपा ग्रंथ कारण । ग्रंथार्थ श्रवणें ॥ ४५ ॥ अपरोक्ष ग्रंथ विचार । अपरोक्ष साक्षात्कारी धर । अवधान देऊन अपार । अवधारिजे सुखें ॥ ४६ ॥ प्रचीत ज्ञान खटतरता । सर्वगत सूर्याची दीप्तसत्ता । चित्सूर्य वंशकुळ दीपकता । प्रकाशी ग्रंथ अभ्यंतर ॥ ४७ ॥ त्या अगोचर निज उजेडें । प्रचीती अंजनेयपवाडे । चोखडें परतत्व चहूंकडे । देखे निज निरंजन ॥ ४८ ॥ तो हा अक्राया रुद्र स्वयें । घेऊनि प्रचीती सूर्योदय । मंत्रसिद्धि बोधहृदय । दिवाकर जाला ॥ ४९ ॥ ऐसा अपरोक्ष येकादश सूर्य । शोभवी प्रचीतीचें ऐश्वर्य । तूर्या हृदयस्थ आश्चर्य । उरलें द्वादशार्की ॥ ५० ॥ तें परम अगोचर ज्ञान । होऊनि चित्सूर्य रोचन । ध्यावें अपरोक्षदर्शन । ग्रंथानुसंगतीनें ॥ ५१ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । संतकृपा महिमा विशेष । स्वरूपदशेचा दिवस । म्हणे मेरु अनंत ॥ ५२ ॥ येकादश सूर्य द्वादश कळा संपूर्णमस्तु ॥ १२ ॥



श्री

## सूर्य १२ कळा १

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामसमर्थ कृपानुमेळीं । आली आनंदसिंधूची उकळी । निज प्रसन्नतेच्या राउळीं । अभिषेचिलें सुखें ॥ १ ॥ अनंत ज्ञान दीपावळी । उन्मेष परचक्षु न्याहळी । विश्रांति विसावां मनमुळीं । फावला अवचट ॥ २ ॥ आश्चर्यवटतरु संसार । सत्यासत्य उभारा विस्तार । तयाचे मुळीं साक्षात्कार । ध्यानरतपर दैवत ॥ ३ ॥ जगदाद्य जगत्कारण । जगदोद्धारी सच्चित्सुखभरण । जगदानंद अधीकरण । विश्रांति निलय ॥ ४ ॥ हंस तरुवर फुलला । संपूर्णतेच्या विस्तारा आला । सुमनीं मकरंद निघाला । कोंदाटीत नभा ॥ ५ ॥ महा रासिक मुनी मधुकर ।

देऊनि सौरभ्यरस सार । शिवपदकमळीं सुस्थिर । राहिले जडोनी ॥ ६ ॥ जया वृक्षाची अतिक्रयता । स्वरूप धरणी तत्वता । विशुद्ध सर्वे सुलीनता । सोहं मुळाश्रित ॥ ७ ॥ स्वपक्षपर्णी विभूषित । असंख्यपक्षी वृक्षाश्रित । परिपक्वदशेचीं फळें अच्युत । सेविती महासुखें ॥ ८ ॥ हृदयाकाश स्फिटिक शोभा । कीं आनंदचंद्राचा गाभा । कैवल्य नित्यमुक्त प्रभा । वेदिका अभिनव ॥ ९ ॥ सर्वोत्कर्ष यशोवर्धन । सत्ता सामर्थ्ये परिपूर्ण । दक्षणामूर्तीचें निज विमान । अनुभवें उभारलें ॥ १० ॥ शोभेची शोभा प्रकाशली । लावण्याची सृष्टी शृंघारिली । चिदानंद विग्रहें अर्चिली । विमान विस्तीर्णता ॥ ११ ॥ जे अपरोक्ष दशा निचळ । ते विमानातळवटीं भूमी निर्मळ । कैवल्यगाभारा अकळ । सर्वोत्तम निवासी ॥ १२ ॥ चित्त चमत्कार सुवर्ण । अपरोक्षरत्ने संपूर्ण । विमान शृंगार प्रकाशवन । शोभा वीरश्रीनें ॥ १३ ॥ ज्ञानसूर्याचें मंडळ । वितान प्रभा चित्कल्लोळ । निवांत स्थितीनें निश्चळ । वैसलीं सिद्ध प्रस्थानें ॥ १४ ॥ न हालतां उन्मेष नेत्रपातीं । नेणतां प्रवृत्ती दिवाराती । संकल्पासी न येतां चित्तीं । सिद्ध चमत्कारले ॥ १५ ॥ सनक सनंदन योगीश्वर । सनत्सुजात सनत्कुमार । कवि हरी अंतरिक्ष थोर । दशेनें आगळे ॥ १६ ॥ प्रबुद्ध पिप्पलायन अविर्होत्री । च्यमसकरभाजन तत्वश्रोत्री । द्रमिळ कपिल जे पत्री । विनटले सर्वस्वें ॥ १७ ॥ नंदी भृंगी मृकुंडी सुदीन । मौन दीक्षेनें विराजमान । अगस्ती मार्कंडेय देदिप्यमान । सर्वादय तत्ववेत्ते ॥ १८ ॥ मौनि दिगंबर निर्धूत काया । सेविती समाधिस्थ शिवा अद्वया । स्वरुपानुभवे हृदया । आणिली दक्षणामूर्ति ॥१९॥ वटतरुपर्णे हाटकवर्ण । गगनायेवढें विस्तीर्णपण । येकछत्र पत्र छायापूर्ण । विश्वासी निववी ॥ २० ॥ वर्णितां वटतरूची थोरी । तरी कांपावउा ऊर्धतेवरी । चिदंबर समसरी । आश्चर्य सुरतरु ॥ २१ ॥ महावाक्य अर्थांतरें । प्रचीतीचा पैस पसरें । त्या विस्तीर्णतेच्या विस्तारें । चित्रवट तरु ऐसा ॥ २२ ॥ योगियांचें अभ्यंतर । नित्य व्राह्मीदशा मनोहर । विश्वपरंपरा विश्वंभर ।

मनास आलियां उदार वर्तति । दाते न मागतां चि देती । हे हीं अभिनव नव्हे ॥८॥ आठवासी येउनी जेव्हां यावें । तेव्हां चि याचकासी प्राप्त व्हावें । याचक इच्छेनुसार लाभावें । तें अभिनव थोर ॥९॥ जैसें आर्जविलें तें निजधन । नापेक्षील याचनें तें साधन । इच्छेनुसार वाचावें चि निधान । ऐसें देणें सद्गुरूचें ॥१०॥ निज स्वरूपेसीं सत्ता । देउनी कृपाळूपणें पुरता । दातृत्वेंसीं दातेपण दाता । हे अभिनवता न वर्णवे ॥ ११ ॥ सद्गुरुस्वरूप सुख ठेवा । निजांचा अक्षयीं विसांवा । भाविकांसी आंतुडला बरवा । विनयोग स्थितीनें ॥ १२ ॥ सिद्ध महानुभाव सज्जन । योगी मुनीऋषी अर्थसंपन्न । जाले सद्गुरूचेनि संपूर्ण । राजे परमार्थाचे ॥ १३ ॥ दिल्हा स्वरूपाचा निज ठेवा । न पुरे गगनाचा सांटोवा । वेचिता संपूर्णपणें न व्हावा । तिळ मात्र उणा ॥ १४ ॥ नव्हे तस्करबाधा अथवा कांहीं । उपद्रवाचें भये चि नाहीं । निरोपाधि धन अक्षयी । देणें समर्थ सद्गुरूचें ॥ १५ ॥ सद्गुरु समर्थाचें देणें अनंत । सद्गुरु अनंतकृपा हे समर्थ । समर्थ अनंतपणें सदोदीत । देणें सद्गुरु रामाचें ॥ १६ ॥ साधनेंवीण धन साधावें । उपाधिवीण व्यवहारावें । संपूर्णपणें घावें घ्यावें । जाणींवेसी न येतां ॥ १७ ॥ अभिनव या धनाचा विनियोग । धनाचा धनासी उपभोग । धनें चि होउनी अंतरंग । महा धनीक व्हावें ॥ १८ ॥ सद्गुरुकृपा चिरंजीवी । अक्षीय धनीक अनुभवी । आतां अवधानीं करावी । कृपा परिपूर्ण ॥ १९ ॥ रामवशिष्ट संवाद । सीताहनमंत [illegible] । [illegible]धिःकारी मोद । अगस्ती कश्यप [illegible] [illegible]रवेष्टित येकांतवन । सुवर्ण विल्व तरु पावन । जितक्रोधी ज[illegible] [illegible] संभ[illegible]ावन भवन । सुवासें भरिती ॥ २७ ॥ सनकादि शिष्यकोटी सुखें । निवाले स्वरूप शिवहरिखें । उल्लेख विसरोनी उल्लेखें । आराधिती शिव ॥ ३८ ॥ काळ परिभ्रमणवेळा । दिवस रात्री कल्पकोटी लीळा । बाल्य तारुण्य उमाळा । आदळे वृधाप्य आंगीं ॥ ३९ ॥ जीवकोटी विलंबित काळें । वयोवृद्ध सिद्धांचे मेळे । बहुश्रुत ज्ञानागळे । तपो वृद्ध तैसे चि ॥ ४० ॥ काळ प्रमाण देहधारी । जर्जर जाले शरीरीं । ते

नामरूपाचा गौरव । चमत्कारें दिधला ॥ २५ ॥ प्रज्ञेचा संपूर्ण पैस । माजि विश्वसांटोवा रूपस । फावला तिनुका निजविलास । जाला ज्ञानप्रकाशें ॥ २६ ॥ कवणेंसी अनुवादे कवण । येकात्मतेचें अनुसंधान । हें चि पाहतां पाहतां परतोन । प्रचीतीसी येतसे ॥ २७ ॥ आत्मा आणि आत्मप्रचीती । आत्मज्ञानाची महा स्थिती । आत्मस्वरूप अनुभविती । महाराज संत ॥ २८ ॥ आतां तृप्तीवरील क्षुधा । ते तृप्ती चि नुसधी सुधा । भक्तीचा अनुवाद विविधा । अनुभव गोष्टी ॥२९॥ आत्मोपलब्धीचें विधान । महत्प्राप्तीचें साध्यसाधन । आचरले सद्भक्तीनें यशोधन । आत्मनिधान प्राप्तीसी ॥ ३० ॥ भोजनावरील राजोपचार । दिव्य तांबोल जाति प्रकार । गंधपरिमळ सुमनहार । सल्लाप सुखाचे ॥ ३१ ॥ संपूर्णतेचा घेउनी आव । स्वरूपतेचे संत राव । स्वरूपदर्शनें अभिनव । संवाद करिती ॥ ३२ ॥ कृत कार्य जे कां महापेशवंत । परमार्थ ठेवे प्रसिद्ध संत । स्वरूपार्थदाते कीर्तिवंत । महा प्रख्यातीनें ॥ ३३ ॥ उचंबळलेनि महा सुखें । चाले संभाषण संतमुखें । नित्य सुखोपपत्ती हरिखें । असे पार टाकिला ॥३४॥ नित्यानंद नित्य विचार । नित्य उपदेश सुखें अगोचर । नित्यात्मस्थितीचा निर्धार । होय सत्समागमें ॥ ३५ ॥ सत्समागमेवीण कांहीं । सद्गती आणि विश्रांती नाहीं । पुडती पुटती या चि निश्चई । येती सर्वत्र निश्चयें ॥ २ ॥ हा सद्गुरुमहिमा अपार । वा[illegible] रूपें सुंदरें । प्रचीत न येतां चि साचार । स्वरूप केलें शिष्यासी ॥ ३ ॥ [illegible] थोरें । हागटोनी अन्यतरूसी त्वरें । चंदनें चि करी चमत्कारें । हें आ[illegible]नि नव्हे ॥ ४ ॥ तैसा चि परिसाचा संस्कार । लोहाचें सुवर्ण करी साचार । हा परिसाचा महिमा थोर । परि स्पर्शातें अपेक्षी ॥ ५ ॥ चमत्कारें नि उतरी विष । ऐसा मंत्र महिमा विशेष । परि पठणसंस्कारें स्पर्श । अपेक्षी घ की तो ॥ ६ ॥ तैसें सद्गुरुसी कांहीं । कर्तव्यतेचें संकट नाहीं । कृपा कल्पद्रुम सर्व ही । प्राप्तीसी येळव्या ॥ ७ ॥ येक जाणोनी अभ्यंतरस्थिती ।

निर्विकार । आकाश तप करी ॥ ३२ ॥ तपोभावना न धरूनि कांहीं । तपरूप प्रवर्तले हृदयीं । कां जे संतपणें चि सर्व हीं । तप स्थितीसी धरी ॥ ३३ ॥ तेणें शब्दगुणी सरे । शून्य संकल्पासी नुरे । नास्तिक्यतेसी विरे । आस्तिक्य उमस ॥ ३४ ॥ निर्दोष हें गगनतपें । सहज चि होय स्वरूप । प्रचीत शब्दगुणें प्रदीप । अनुभव उजळी ॥ ३५ ॥ व्यापकतेचीं ज्ञानसत्ता । होय अखंडमंडळसविता । अहं आत्मत्व तप आतां । पहा प्रलक्ष जीवीं ॥३६॥ कांहीं येक स्फूर्तीसी न येतां । महत्तत्व आस्तिक्यता । उपदेशक्रम उद्दीपकता । सर्वांचे हृदयीं ॥ ३७ ॥ हें ईश्वराचें महा तप । जीव होउनीयां स्वरूप । आतां ब्रह्मासीचें निष्कंप । तप तें अवधारा ॥ ३८ ॥ ब्रह्मासीचा तपीं जप । धरूनि अनुसंधान अजपारूप । जप संपुटीकरण सद्रूप । अवधारिजे पुढें ॥ ३९ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । तपसंपुटी करण निर्दोष । तें चि संभवे निज उन्मेष । ह्मणे मेरु अनंत ॥ ४० ॥ द्वादश सूर्य तृतिय कळा संपूर्ण ॥ ३ ॥ श्रीराम ॥



पाहता चि होय निर्विकार । ऐसा अजपा मंत्रोचार । अभिनव दर्शेचा ॥७॥
हा निःशब्दाचा शब्दोचार । या च उच्चारीं ॐ कार । पावन जाला निरंतर ।
चतुश्चरणीं ॥ ८ ॥ हंस उच्चार अगोचर । याहीं मंत्राचा जरी उच्चार ।
करितील ते चि साचार । जप सिद्धी ॥ ९ ॥ जीवीं आजपेचें अम्यंतर ।
विचारितां ब्रह्म परात्पर । पावनदशा साक्षात्कार । प्रत्यक्ष अजपेचा ॥१०॥
अजपां निजध्यासें पूर्ण । जप चि जाला ब्रह्मार्पण । ब्रह्म प्रचीतीनें
परतोन । जप होतसे जीवीं ॥ ११ ॥ जीवमात्र हा जपकर्ते । नोळखती
जपकर्तयासी पूर्ते । अकर्ता चि जपकर्ता वर्ते । अनुसंधान अभ्यंतरीं
॥ १२ ॥ अजपेनें आस्तिक्य संग्रहिलें । अजपेनें भवभेदासी निग्रहिलें ।
अजपेनें जीवासी अनुग्रहिलें । ब्रह्मरूप सर्वदा ॥ १३ ॥ जप चि जप
करीतसे अपार । येक अम्यंतरें चि विश्वंभर । प्रत्येक्पणाचा विस्तार ।
सांभाळी अजपा ॥ १४ ॥ अजपाजपें ब्रह्मस्थिती । अजपाजपें ब्रह्मस्फूर्ती ।
अजपाजपें हे प्रवृत्ती । सर्व प्रवर्तली ॥ १५ ॥ अजपा हे परा आश्रित ।
अजपा चि हे अवस्था निश्चित । अजपाचि हे समाश्रित । स्वरूप दर्शनें
॥ १६ ॥ अजपा उल्लेखाचें रूप करी । अजपा उल्लेखांत अहंकारी ।
नाना अभ्यास जप करी । नाना कल्पना ॥ १७ ॥ पृथ्वीचा होउनी
आकार । पुन्हा पृथ्वी होय निर्विकार । तैसा अजपेचा उचार । निर्वोचार
होय ॥ १८ ॥ घटरूप वसुधा टेंकुरें । संतती वृक्षाकारें अंकुरें । काळ-
दर्शनें होउनि किंकरें । शंकरें सांभाळिजेत ॥ १९ ॥ पर्वता आंगीच्या
दर्कुटी । हे पर्वताची च परिपाटी । पर्वत पाटारें उंच कोटी । शिखरें चि
जाली ॥ २० ॥ माती दगड सोनें जालें । परी तें पृथ्वीपणें चि
संचलें । तैसें अजपेचें जग जालें । परतोन होय अजपा ॥ २१ ॥
सुवर्णाचे नाना अळंकार । परि तें सोनें चि साचार । तैसी अजपा
चि विश्वाकार । पाहतां ब्रह्मस्वरूप ॥ २२ ॥ नाना शरीरें सुंदरें ।
जप रहिवास मंदिरें । व्यवहार करितो तत्वकंदरें । धुरंधरें तत्वांचीं
॥ २३ ॥ स्थूळ शरीर होय अर्धें । प्रगटे सूक्षम देह तदनंतरें ।
सूक्ष्मा पासुनि अम्यंतरें । निःशब्दाचीं होती ॥ २४ ॥ आद्य विस्तर

दोन्हीरूपें । अजपा चि हे सत्य संकल्पें । प्रचीतीचा जैं जप जपे । तें च तें कृतार्थ ॥ २५ ॥ अनाक्षरी अर्धमात्रा जप । अर्धमात्रेची मकार रूप । मकारापासूनि अमूप । उकार होती ॥ २६ ॥ उकारापासूनि अकार । परियंत अजपेचा उच्चार । अकारीं च निर्विकार । प्रचीत आतुडे ॥ २७ ॥ अकारीं अजपा वैखरी । महावाक्याचा अटोप करी । उपदेशाचा विस्तारी । उपक्रम अजपा ॥ २८ ॥ अजपा सद्गुरु अधिष्ठान । अजपा सत्शिष्य प्रतिष्ठान । अजपा चि ज्ञानें प्रतिष्ठान । अंतःकरणासी ये ॥ २९ ॥ अंतःकरणाची शब्द परवडी । होय अर्थांतर घडमोडी । श्रवणासि येउनि तांतडी । शब्दार्थ परिसे ॥ ३० ॥ सोहं ब्रह्मास्मि अभ्यंतर । ऐके सद्गुरुमुखें विवर । विवरे प्रचीतीचें जिव्हार । निर्वाण होय ॥ ३१ ॥ हे अजपाजप अनुसरण । यथार्थ जप संपुटी करण । सद्गुरु कृपेचें अवतरण । साक्षात्काराचें ॥ ३२ ॥ जीवीं जप जपोनी बरा । आपुला आपण उमज धरा । चिदानंद सिंधूचा झरा । वाहेल हृदयीं ॥ ३३ ॥ जीवीं च असोनि ऐसी सद्वृती । नेणती ते मंदमती । संकल्प टाकूनि सर्वार्थी । शोधावी अजपा ॥ ३४ ॥ अकार टाकूनि अर्थांतरें । होय उकार अर्थाकारें । प्रज्ञा परमार्थ संचारें । जागवी मकारा ॥ ३५ ॥ टाकुनिया निज अभाव । होय भाव सर्वगत राव । जाला अर्धमात्रेचा स्वभाव । परतोनि पहा ब्रह्म ॥ ३६ ॥ जप संपुटी करण अनुसंधान । जिव्हारीचें स्वरूप संधान । या अजपाजपें यशोधन । यपसंपन्न जाले ॥ ३७ ॥ साधुनी साधन विधानी । बैसावें सद्गुरूचें ध्यानीं । ते ध्यान संपुटीकर अवधानीं । बरवें आणिजे ॥ ३८ ॥ ध्यानें प्रतिष्ठुनि ध्यान । त्रिपुटी रहित संधान । विसर्जन स्थितीसी न येतां जाण । विचारें ध्यान कीजे ॥ ३९ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । अजपाजप प्रकाश । ब्रह्म प्रचीतीचा निजध्यास । म्हणे मेरु अनंत ॥ ४० ॥ चतुर्थ कला ॥ ४ ॥

॥ श्री ॥

## सूर्य १२ कळा ५

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सच्चिदानंद ध्यानी । सद्गुरु अनंत अनुसंधानी । बोळलों सर्वगत समाधानी । निज प्रसन्नतेनें ॥ १ ॥ ध्येय ध्याता आणि ध्यान । उल्लेख ग्रासुनि साधन । साधितो अंतर्निष्ठ संधान । ध्यान सर्वकाळीं ॥२॥ ध्यानास आलें निरंजन । लेइला सद्गुरु कृपांजन । ध्यान त्रिपुटीचें रंजन । तेथुनि सरलें ॥ ३ ॥ अहं स्फुर्ति मुळीं वैसोनि । सावकाशें स्वरूपीं पैसोनि । ध्येये चि सत्वता हर्पानि । ध्यानीं समरसला ॥ ४ ॥ टाकुनि सर्व हि साधनें । स्थिरावला सद्गुरुध्यानें । ध्येय स्फूर्तिच्या अंतर्धानें । ध्येईं समरसला ॥ ५ ॥ सहज स्थितीच्या स्थिरावें । स्थिरावोनि अंतर्भावें । सर्व स्फूर्ति विहीन अभिनवें । ध्यान करी सद्गुरूचें ॥ ६ ॥ ध्याना आणितां सद्गुरुमूर्ति । ध्येये चि जाला तो सर्वार्थी । काष्टीं वन्हीची प्रख्याती । काष्ट वन्ही च जालें ॥ ७ ॥ स्वानंदतनु दिव्य मनोहर । सद्गतीचें माहेरघर । सद्गुरु स्वामी निरंतर । हृदयासी आला ॥ ८ ॥ उभय दृष्टि साक्षत्व घोंटुनि । निजांग चक्षुसि वैसोनि । अनंत स्वरूपें पैसोनि । नित्य हृदयासी आलों ॥ ९ ॥ वचनी प्रगटोनि लीळा । तत्वतांचें निज जिव्हाळा । श्रवणासि येउनि मेळेंमेळें । प्रचीत हृदयासि ये ॥ १० ॥ श्रवणचक्षु दोन्ही डोळे । स्वरूपतेच्या तेजें पुंजाळले । ते दृष्टी निरसुनियां जिव्हाळे । लागले निरंतर ॥ ११ ॥ ध्यान निजजीवन बळी । आस्तिक्य सद्गुरु ध्यानमुळीं । फोंदाटला दृष्टी अंतराळीं । उचंबळलें जीवन ॥ १२ ॥ ध्यान त्रिपुटीचा संस्कार । दृष्टीं स्वानंदसागर । गुरुध्यान चंद्रोदयें अपार । भरितें योसंवे ॥ १३ ॥ ते आनंदवृष्टि निरंतर । दाटीत अटभावें अभ्यंतर । वर्ष जें सद्गुरुस्वरूपें साचार । रिघाला हृदयीं ॥ १४ ॥ विशुद्धसत्वें आर्जविलें प्रेम । तेणें संपूर्ण होतें हृदयव्योम । त्यामाजि घनानंद आत्माराम । सद्गुरु रिघाला ॥ १५ ॥ सद्गुरु अधिष्ठान सर्वगत । शाश्वत अस्तित्य सदोदित ।

हृदयीं प्रवेशला इत्यंभूत । कवणेपरीं ॥ १६ ॥ कां तो पुरातन चि होता । तेणेंविण ठाव चि नसे रिता । सर्व ठाईं पाहों जातां । नित्य व्यापक तो ॥१७॥ व्याप्य व्यापकता कांहीं । नसे चि स्वामाजी पाहीं । देखणें द्रष्टुत्व सर्व हि । कांहीं च नसे तया ॥ १८ ॥ परंयाचि प्रचीतीनें । जैसा आहे तैसा चि आस्तिक्यतेनें । हृदयासि आला व्यापकतेनें । सर्वगत सद्गुरु ॥ १९ ॥ सोहं अजपेच्या मुळीं । ध्यानस्त बैसला अंतराळीं । त्या निजध्यानें करूनि न्याहळीं । सर्वगतासि स्वयें ॥ २० ॥ ऐसिया ध्यानस्ताचें ध्यान । करितां ध्याता होय ध्येय पूर्ण । प्रत्यक्षतेचें निजनिधान । होय सद्गुरुध्यानें ॥ २१ ॥ ध्येयाचे बहुतर ध्यान करिती । तेणें ध्यातेपणासि ते येती । ध्यातयाचें ध्यान करिती । ध्यान त्रिपुटींत गुंतले ॥ २२ ॥ ध्यातयाचें करूं जातां ध्यान । निज अपरोक्षता अनुसंधान । अवचट दशेचें निजनिधान । ध्यान त्रिपुटीसि नुरे ॥ २३ ॥ जयाच्या ध्यानासि आलें सर्वगत । तो चि ध्यान त्रिपुटीचा हेत । स्मरण विस्मरणें अकल्पित । स्फुरों लागला ॥ २४ ॥ ध्यानासि आलें त्रिभुवन । उत्पति स्थिति निजनिदान । तया ध्यानस्ताचें ध्यान । विसर्जलें मुळींचें ॥ २५ ॥ ध्यान विसर्जुनि ध्येय ध्याती । तेणें ध्यान त्रिपुटी विस्तारती । स्वयें चि ध्येय असतां होती । ध्यातेपणें कनिष्ट ॥ २६ ॥ अभिनव ध्यान संपुटीकरण । या प्रचीतीचें सुलोचन । आपणामाजि आपण रिघोन । ध्यान करिती सर्वदा ॥ २७ ॥ अणुमाजि सूक्ष्मतर । ध्यान रूपक दिवाकर । ध्यानीं अखंड मंडळाकार । निवांत बैसला ॥२८॥ तत्व सद्वृत्तीचीं आवर्णे । येकीं अनेक अंतःकरणें । तितुकिया ठाईं अवतरणें । ध्यानीं च प्रवर्तला ॥२९॥ कोठें सूक्ष्म निवास स्थळ । कोठें नमाहून विशाळ । कार्यकारण प्रवृत्ति मूळ । मुळीं ध्यानस्थ बैसला ॥ ३० ॥ दैविक निजस्मरण सत्ता । निवास अधिकारें वस्तुता । संकोचित व्यापकता । अवकाश आक्रमीं ॥ ३१ ॥ ज्ञानाचा उठनी दीपक । स्वयें चि होउनि ध्येयरूपक । ध्यातेपणाचें कौतुक । ध्यानी विनियोगी ॥ ३२ ॥ स्थूळसूक्ष्म कारणीं । धरून महाकारण धरणीं । विराट हिरण्यगर्भ अंतःकरणीं । अव्याहती ध्यानस्थ

॥ ३३ ॥ प्रकृतीचे जे जे पैस । तितुके पुरुषत्वें व्यापीस । प्रकृती पुरुष परध्यास । ध्यानी च वैसला ॥ ३४ ॥ कोठें प्रकृतीचेनि आवरला । स्वयें चि ध्येय विसरला । तऱ्हीं सोहं निजध्यासें उरला । निजध्यान संधानीं ॥ ३५ ॥ अंडज्यादिकाच्यारि खाणी । लक्षचौऱ्यांसि समासनी । पदच्युत होउनि ध्यानी । पुन्हा ध्यानस्थ होय ॥ ३६ ॥ जग प्रवृत्तीच्या सोसें । विसरला स्वरूप अपैसें । तऱ्हीं निवांत चि वैसे । ध्यानीं आपुले चि ठाईं ॥ ३७ ॥ जे आपणाहूनि पर । अंतःकरण रूप सविकार । तयासि प्रकाशुनि निरंतर । द्रष्टा चि ह्मणवी ॥ ३८ ॥ मी नव्हे अंतःकरण स्वभावें । प्रवृत्तीच्या संस्कारीं संभवें । परंतु निर्विकल्प अंतर्भावें । साक्षि ह्मणवी केवळ ॥ ३९ ॥ शाश्वत व्यापांश यथार्थ । तो कृतार्थ स्वरूपी तत्वतार्थ । सर्व संस्कारीं असे सत्यार्थ । परमार्थ स्वरूपें ॥ ४० ॥ पीळपेंच नाना वळसे । प्रकृती पंचकोशपैसें । पैसावोनि तो अपैसें । न गौसे संस्कारीं ॥ ४१ ॥ अवांतर संकल्पें करूनि । रुढला जाग्र सत्य संकल्प ध्यानीं । जैसें आकाश घटस्थानी । घटाकाश जालें ॥ ४२ ॥ पाहतां विचारूनि भलें । घटाकरितां घटाकाश जालें । किंवा आकाशाकरितां आलें । आकाशासी उपनाव ॥ ४३ ॥ घटाकाशाची जन्मभूमी । विचारितां अंतर्यामी । घटना आकाश परि हे उर्मी । द्रष्ट्याचे दृष्टीची ॥ ४४ ॥ तैसें अत्यंता भावलक्षण । अष्टधा घटरूप जाण । आणि ब्रह्म तें निरावरण । निर्गुण सहजें ॥ ४५ ॥ अनावरासि आवरिजे । कवणे उपायें काय कीजे । आकाशासि बांधोनि आणिजे । कवण्या प्रकारें ॥ ४६ ॥ जें सर्वगतपणें उदास । जें असंगपणें निराभास । तयास कोण्हीयेक अभ्यास । पाहतां काय असे ॥ ४७ ॥ ब्रह्ममाया उपक्रम । जो ब्रह्मासीचा उगम । पाहतां विद्यमानी अंतर्याम । स्वयें चि रूपकर्ता ॥ ४८ ॥ येथे हि त्रिपुटी उमसे । विचाराचें रूप कैसें । आपणासी पाहतां तुमसे । हृदयीं कांहीं येकपण ॥४९॥ द्रष्ट्यासि पाहूं जातां द्रष्टा । पावे परब्रह्म प्रतिष्ठा । मग ते सहज चि त्रिपुटि चेष्टा । निरसे सुखें ॥ ५० ॥ आलें द्रष्टुत्व कैसे स्वयें । पाहतां पाहतां निजहृदय । पाहणें

सरोनि विसयें। विस्मयों वोसरे ॥ ५१ ॥ तस्मात् अन्वयें करूनि पाहीं। अंतःकरण अविछिन्न हृदयीं। प्रत्यक् चैतन्य प्रवाही। पहिला कैसा ॥ ५२ ॥ जें काळत्रय अबाधित। तें द्रष्टेपणा कैसें येत। ध्यान मुळीं होउनि ध्यानस्थ। पहा ग्रंथांतरें ॥ ५३ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश। ध्यान संपुटीकरण तोप। स्वस्वरूपाचा निजध्यास। ह्मणे मेरु अनंत ॥ ५४ ॥ द्वादश सूर्य पंचम कळा संपूर्ण ॥ ५ ॥ श्रीरामकर्ता ॥

श्री

## सूर्य १२ कळा ६

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सर्वतोमुखध्यानी। ध्येय स्वरूप अनुसंधानी। सद्भाविक भक्ति विधानी। ध्यानासि आला भक्तांच्या ॥१॥ जे मुळीचे सद्भावभक्त। जे स्वरूपेंसि अखंडयुक्त। जे निराकारपणें विनिर्मुक्त। नित्य विरक्त ज्ञानी ॥ २ ॥ जे सकळ हृदयाचें रूपक। जे विश्रांति विसांवे नेमक। जे स्वरूपतेचे दीपक। त्रिपुटीविना ॥ ३ ॥ नित्यावधानें निरंतर। नित्य सद्भाविक अभ्यंतर। नित्य स्वरूपतेचे अळंकार। शोभविती सुखें ॥ ४ ॥ जयाच्या निर्मळ हृदईं। वसे परमात्माचि सर्वही। ध्येय ध्यानें वीण पाहीं। ध्येये चि आराधिलें ॥ ५ ॥ सद्भाव सिंहासनी सुंदर। स्वानंद द्विभुज साक्षात्कार। कृपावेदेही अगोचर। भाव अनुजेंसीं ॥ ६ ॥ निजलाभ घल्पतरुतळीं। रुपातिशय तेज नव्हाळी। अनुभवाची प्रकाशळी। चर्या अमृतमय ॥ ७ ॥ निज प्रसन्नतेचा उदय। अमृताचा झरा सुखें चि वाहे। स्वरूप प्रचीतीचा अतिशय। रूपासी आला ॥ ८ ॥ अक्षयानंदाचें अवतरण। सच्चिद्विभवें संपूर्ण। ज्ञेय त्रिपुटीचें अधीकरण। आत्माराम निवास ॥९॥ समाश्रित सुखासनी सहज। प्रवृत्ति निवृत्तिरूप द्विभुज। ज्ञान दिवाकर सतेज। धीरा गौरविला ॥ १० ॥ अभिनव वंश कुळदीप। वंशासि प्रसवला चिद्रूप। त्या निज प्रचीतीनें सद्रूप। वंश माळिकेसि आला

॥ ११ ॥ चिदाभास निराभास । सावकाशीं निराविकारी । स्फुर्ति प्रकाश स्फुर्ति निरास । कर्ता कर्तुत्वें विना ॥ १२ ॥ परेशा करितां परब्रह्म । प्रचीतीसि आलें अंतर्याम । वेदादिकांचे परम । हृदय प्रकाशलें ॥ १३ ॥ या चिदानंद विग्रहेंविण । प्रचीतीसी कर्ता कवण । माया निवृत्तीसी अनुसंधान । कवण निवळे ॥ १४ ॥ प्रचीती ना अप्रचीती । म्हणीं कांहींच न घडे प्रसक्ती । या निश्चयाचीं रूपें होती । मग कवणाचे नि ॥ १५ ॥ नेत्राविण जग आंधळें । तेंवि मूळ पुरुषेंविण न कळे । तो नसतां शून्य अवकळे । माजी जगदांध दशा ॥ १६ ॥ अस्तिक्याचें रूप स्वयें चि । चिदानुभव रूप तें चि । सत्यानंदचर्यां मुळींची । अनादि सिद्ध असे ॥ १७ ॥ सत्यासि द्रष्टुत्व न घडे । ऐसें निवळलें चोखडें । निजांग रूपक उजेडे । अनादि सिध सहजें ॥ १८ ॥ परब्रह्माची स्वभावता । शुद्धबुद्ध निर्दोषता । उपाधि रहित वास्तव्यता । निवळली जेथें ॥ १९ ॥ ते प्रचीतीचें माहेरघर । सच्चित्सुखाचें भांडार । विश्रांतीचें मनोहर । रूप साजिरें ॥ २० ॥ ज्याच्या वचनापासुनि ब्रह्म । प्रचीतीसी आलें अंतर्याम । साक्षात्कारी तें परम । रूप सद्गुरूचें ॥ २१ ॥ आदिगुरु तो मूळ परेश । ब्रह्मानुभवी तो निर्दोष । मायानिरासें ब्रह्मोपदेश । परंपरेसि कर्ता ॥ २२ ॥ आस्तिक्य निजविवरें । परेश तत्व अभ्यंतरें । स्वयें चि अंतर्याम निर्धारें । निर्धारिजे ब्रह्म ॥ २३ ॥ जेथें उपाधि संस्कार नसे । जडाजडतत्व नुमसे । तो अनुभवोनि तदोद्देशें । चालिला उपदेश ॥ २४ ॥ त्यास्तव अभिन्न ब्रह्मज्ञान । अपरोक्षसंधी निर्वाण । द्रष्टा ना दृश्य दर्शन । कांहीं च नसे ॥ २५ ॥ केव्हां द्रष्टुत्वासि आलें कैंच कवण । कोणें रूप केलें हें निर्वाण । ऐसे प्रचीतीचे उघडोनि नयन । बरवें पहा ॥ २६ ॥ प्रचीतीच्या श्रवणीं बैसा । उल्लेखरहित हृदयीं पैसा । मग हा निर्वाण योग अपैसा । निवळेल सहजें ॥२७॥ जें जें प्रचीतीचें अभ्यंतर । तें तें स्वरूपें चि निरंतर । प्रतिष्ठिलियां मग साचार । कैंचें द्रष्टुत्व तथा ॥ २८ ॥ द्रष्य ना साक्षी कैंचा कोण । सहज उडालें त्रिपुटीभान । सहजें प्रतिष्ठलें

निर्गुण । प्रतिष्टेविना ॥ २९ ॥ नभें देखिलें चि नाहीं अभाळ । तेथें निरसावयाची चळवळ । नसे चि गगनासि केवळ । अपेक्षा कांहीं ॥ ३० ॥ अभ्रें कैंचीं माझें ठाईं । स्वयें चि निर्मळपणें चि पाहीं । या उठाठेवीचें कांहीं । न धरी प्रयोजन ॥ ३१ ॥ सद्भावबोध दशा देहीं । देहविदेह नुमसे कांहीं । योग संपुटीकरण हृदईं । कवणे परीं पहा ॥ ३२ ॥ स्वयें चि सर्वगत केवळ । आस्तिक्य निजांगें निर्मळ । सकळ्य-ठाईं सुनिश्चळ । निजयोग बरवा ॥ ३३ ॥ या अस्तिक्यतेसी उणा असता । तरि हा निजयोगी नव्हता । या च स्वरूपतेनें पुरता । हृदयस्थ निजयोगी ॥ ३४ ॥ पाहतां जगदांतर होय । जगविलें जग निजहृदय । उपदेश क्रमें जगन्मय । बोध जगदीश ॥ ३५ ॥ पैस धरून मोकळा । परतत्वज्ञान जिव्हाळा । अखंड मंडळाकार सगळा । विखुरला बहु ॥ ३६ ॥ तितुके ठाईं स्वतसिद्ध । हृदयस्थ निजयोगें सिद्ध । शुद्ध बुध सहज निर्बंध । योगी निरोपाधी ॥ ३७ ॥ निजयोगासि विसरलासा । अवस्थायोगें करी वळसा । सर्व चि निजयोग आठव ठसा । पाहोनि निवळे ॥ ३८ ॥ अव्यक्त महतत्व सारें । सोहं स्फुर्ति विशाळतेनें । संभावना ज्ञान विद्यमानें । पुरवला जाय ॥ ३९ ॥ जितुका केला तितुका होतो । जिकडे नेला तिकडे जातो । परतोनि आणिल्यिां येतो । ज्ञानयोग स्थितीनें ॥ ४० ॥ सुंगीमाजी प्रकाशला योगें । ब्रह्मादिक त्याच्या चि प्रसंगें । योग्य आस्तिक्य निजरंगें । जाले अंतरंग ॥ ४१ ॥ योग प्रस्थानीक प्रबळ । सनकादि सिध योगी केवळ । योगें वळावले सकळ । त्याच्या निजयोगें ॥ ४२ ॥ निजांगें निजवस्तुयोग । जग अंतर्यामी संयोग । उद्बोधुनि निजांग संग । पुरवी निजयोगरीती ॥ ४३ ॥ सिध अंतर्भावें करूनि । स्वरूपानुभवी ज्ञानी । तेथुनि स्वरूपता योगधानी । संपुटी करी ॥ ४४ ॥ जे संपुटी पासूनि अकळ । तयें संभवती सकळ । आणि स्वरूपदशा केवळ । योग सिद्धी संभवे ॥ ४५ ॥ हे निष्कारण कारण । योग संपुटी कारण । विस्तार जाणिवेचें स्फुरण । बहुधा येथुनि ॥ ४६ ॥ अनंत जीव अनंत कारणें । अनंत योग सिध्यांची भरणें । भरिली अनंत

अमृत किरणें । अनंत योग संपुटी हे ॥ ४७ ॥ जेथुनि निजयोग प्रवृत्ति । तैसी च होय निजयोग निवृत्ति । स्वरूप जीव संयोग गती । योगसंपुटी करणी ॥ ४८ ॥ आतां योगसंपुटी करणांत । तत्वसंपुटीकरण धोतत । निजतत्वान्वेषण संभूत । येक अष्ट तत्वें ॥ ४९ ॥ येकीं अष्टतत्वें सविस्तर । अष्टतत्वीं अनेक तत्वविस्तार । त्या अनेक तत्वीं निजतत्व साचार । संग्रहिलें मुळीं ॥ ५० ॥ तें निजबोध संपुटी करणें । संग्रहिलें अनुभवतत्व आचरणें । तें चि श्रवणतत्वें अवधारणें । तत्वरूप कर्ते हो ॥ ५१ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । योगसंपुटीकरण प्रकाश । जगदांतर योगनिर्दीप । ह्मणे मेरु अनंत ॥ ५२ ॥ द्वादश सूर्य षष्ठम कळा संपूर्ण ॥ ६ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य १२ कळा ७

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम स्वबोधतत्व संपुटी । ज्ञान सुवर्ण घालुनी पुटीं । उन्मेश अंतर्भाव पोटीं । तत्व प्रकाश माळा ॥ १ ॥ जेथुनी तत्वें संभवलीं । जगदाद्य हेतुलें प्रकाशलीं । तत्वें तत्व हेतुत्वें देखिलीं । तत्व द्रष्ट्यानें पहा ॥ २ ॥ काळत्रय जो अबाधीत । निजांगें निजतत्व सदोदित । दृश्य द्रष्टा द्रष्टुत्व हेत । असे चि ना जया ॥ ३ ॥ ऐसा जो निजांगें निर्मळ । तो चि तत्वद्रष्टा होय केवळ । जीवींचा जीवीं पाहोनी निर्मळ । प्रचीतीसी आणावा ॥ ४ ॥ तत्वद्रष्टे मुनि मननशीळ । तैसे चि निजयोगी अनुभवी केवळ । जें आत्मत्व पाहोनी अकळ । असती सर्वदा ॥ ५ ॥ प्रवृत्तींचें मूळ तत्वमाळा । ब्रह्म स्फूर्ती चैतन्यकळा । तत्व चैतन्य जिव्हाळा । स्वभाविक जीवीं ॥ ६ ॥ उदकीं स्वभाव तरंगाकारें । तेविं जगत्कारण अवतरे । अव्यक्त तत्व पंचक स्फुरे । विश्व अंतर्मात्रें ॥ ७ ॥ सकळ्यासी कारण

ज्ञानसत्व । प्रवृत्ति निवृत्ति प्रकाशतत्व । स्वरूप अनुभवें महतत्व । अंतःकरण मुळींचें ॥ ८ ॥ अनिच्छा इच्छा सर्वगत । अभूत भूत संभूत । अरूप रूप विश्व हृद्गत । तत्व विश्वाकारें ॥ ९ ॥ निजांग रूपक अखंडाकारें । निज विद्यमान निर्धारें । स्वानंद मुक्त साक्षात्कारें । लीला तत्व प्रवृत्ति ॥ १० ॥ अनंत ब्रह्मांडाच्या माळा । नाना आकृती रूप चित्कळा । नाना उपभोग जिव्हाळा । नाना कर्तृत्वें ॥ ११ ॥ कांहींच साक्षेपासी न येतां । कांहीं कर्तव्यतेसी नाणितां । नाना व्यवसाय नाना अवस्था । आठवीं च प्रत्यक्ष ॥ १२ ॥ अकल्पी ते सुखें अमरतरु । जो विश्रांतीचा विश्राम सद्गुरु । स्वयें चि उपदेशिता निर्धारु । निवृत्तीपर द्रष्टा ॥ १३ ॥ प्रवृत्ती निवृत्तीचा योग । विश्वोद्भव निज निसंग । अव्यक्त विश्व अंतरंग । अंतरात्मा चि जो ॥१४॥ जें जें अंतरीं प्रकाशलें । तें तें अवकाशें आश्रयिलें । निजसत्तेनें प्रतिपाळिलें । अनेक तत्व हृदयीं ॥ १५ ॥ अष्ट तत्वांची अष्टधा । होय ते सकळ तत्व वसुधा । तत्व घडमोडीनें विविधा । तत्वांसी पिकवी ॥ १६ ॥ तें सद्वृत्ति अष्टविधा । अनेक वृत्तीनें बहुधा । निज मूळानुसंधानें त्रिविधा । गुणासी पावली ॥ १७ ॥ पंचभूतें अव्यक्त मूळीं । जाली सांठवण सगळी । मूळीं सत्वगुणाची पाहली । प्रकाशचर्या ॥ १८ ॥ निर्दिस्य ज्ञानरवी लीला । स्वभावतेनें उघडी डोळा । तंव निर्मळ तेजाची उजाळा । सर्वत्र देखे ॥ १९ ॥ निराश्रय निर्विकार । उदास गगना ऐसें अपार । निजदृष्टीचा पैस थोर । विशाळपणें पवाडे ॥ २० ॥ जैसी उदयरवीची प्रभा । प्रकाशीत धरणी नभा । तैसें तत्वसृष्टीचा गाभा । प्रकाशी तत्वसृष्टी ॥ २१ ॥ नाना स्थूळ विशाल विस्तारें । नाना सूक्ष्माचीं अभ्यंतरें । नाना कारण सविस्तरें । धारणा हेतु बीज ॥ २२ ॥ अमृताची शृंघार वल्ली । तत्व शृंघारें फुलली । स्वानंद प्रतीतीनें फळली । इच्छाकुमारी ॥ २३ ॥ जें जें स्फुरद्रूप अभ्यंतरीं । तितुकियाचा विस्तार करी । स्वरूपांवर पैस धरी । तत्व सांठवण ॥ २४ ॥ अवकाशें स्मरण रूप । विस्तारला विश्वरूप । विश्वबीज स्फुरद्रूप । स्फुरे विश्व अभ्यंतरीं ॥ २५ ॥

शुद्धतम पदार्थ परवडी । महद्‌भूत तत्वें घडमोडी । सत्तारूप तत्व अनेक आवडी । अंतर्कळाचि ते ॥ २६ ॥ नभ पावन वैश्वानर । जीवन वसुधा विस्तार । या पंचतन्मात्रारूपें संसार । इच्छा शुद्ध राजसी ॥ २७ ॥ नसतां पंच महाभूतें प्रत्यक्ष । अव्यक्त भूताचें अंतर्लक्ष । त्रिगुण एकी भुक्त स्वपक्ष । अंतर्भावना ॥ २८ ॥ जन्मांधासी सांपडले अर्थ ठेवे । अपेक्षितां चि चक्षूसी दृष्टि संभवे । तैसें जाणिवेसी जालें स्वभावें । अभिष्ट पुरतें ॥ २९ ॥ नाहीं दुसरेपणाचा वारा । नाहीं साधनाचा पसारा । प्राप्ती कल्पतरुचा उभारा । स्मरणें चि सिद्धी ॥ ३० ॥ आटोपले तितुकें आवरी । फावलें तितुकें स्वीकारी । भावलें तितुकें विस्तारी । मनोगत स्वयें ॥ ३१ ॥ ऐसी स्वइच्छा ब्रह्मकुमारी । आदि पुरुषांची सत्ता वरी । जे सकळिकांचे शरीरीं । वसे चैतन्यता ॥ ३२ ॥ ते विश्वरूप चैतन्य माळा । पांच पंचकें अंतर्कळा । आवडीनुसार धरीत स्थूळा । प्रवर्तली सर्वत्र ॥ ३३ ॥ इच्छेने वर्तउनी जग । अंतर्कळा चि ते लगबग । स्वरूपीं मिळावया अंतरंग । चेतवी अनुतापें ॥ ३४ ॥ जैसीं महातेजांची किरणें । श्रीमंत जग चक्षूसी करणें । प्रभेची सत्ता अंतःकरणें । श्रीमंत होती ॥ ३५ ॥ ना तें वन्हीचें कर्तव्य अतिशयें । अपेक्वासी पक्व करी स्वयें । ना तें साधूचें निज हृदय । अयोग्य योग्यतेसी आणी ॥ ३६ ॥ तैंवि ते चिदानंद लहरी । निजरूपीं प्रबोध विस्तारी । निद्रिस्तासी जैसें जागे करी । कार्यार्थी जिवलग ॥ ३७ ॥ स्वत्वीं प्रबळ स्मरण रूप । निवारूनि भव विक्षेप । समाधानेंचि स्वस्वरूप । वस्तीसी आणी ॥ ३८ ॥ पदार्थ मात्रीं संपूर्णपणें । जैसें आकाशाचें आसणें । तैसें सर्वगत आस्तिक्यतेनें । प्रगटे प्रचीतीरूप ॥ ३९ ॥ मुक्ताफळीं तेज आगळें । तैंवि सत्ता शरीरानुमेळें । अनर्घ्य वस्तु जात जिव्हाळे । चित्कळा विशेष ॥ ४० ॥ देहीं च विदेह गरिमा । आभास तत्वीं तत्व महिमा । अंतर्दृष्टीनें अंतर्यामा । पाहतां निवळे ॥ ४१ ॥ तत्वोपक्रम तत्वसंव्हार । तत्व साक्षत्वें तत्व निर्धार । निजतत्व विद्यमानें उद्धार । केला आपला आपण ॥ ४२ ॥ हे तत्वबोध संपुटी । अव्यक्तसत्ता कोटि सृष्टी । परिक्षितां

नेमें करूनी ॥ २० ॥ श्रीसमर्थ कृपेनें श्रीराम । असुचें चि जालें अंतर्याम । समर्थ प्रसन्नता परम । वल्मीम रूपें ॥ २१ ॥ या प्रचीतिनें सप्रेम । श्री अनंत सद्गुरु विश्राम । माझा अनंत समर्थ राम भीम । प्रसन्नतेनें ॥ २२ ॥ अनंत समर्थ कृपाळूपणें । अनंत श्रीराम सत्तेनें । अनंत कृपा सीतावचनें । भीम मेरु अनुभवी ॥ २३ ॥ माझा अनंत वसिष्ट स्वरूपें । मज राम प्रतिष्ठूनि कृपें । जें प्रबोधलीं तत्वें सद्रुपें । राम पंचायतनें ॥ २४ ॥ ते प्रचीतीनीं अवधारिली । परंधाम विभवें अनुभवलीं । राम सभेसी प्रशंसिलीं । प्रमय ऋषिवृंदें ॥२५॥ अनंत माझा शिवरूप स्वयें । कृपेनें प्रसन्न मज होय । अधिकारें अगस्ति करूनि सदय । वोधी अद्वैत रामायण ॥ २६ ॥ प्रसिद्धतेचीं संत प्रस्थानें । युगानुयुगीं होउनी सन्मानें । त्या शरीरीं मज कारणें । अनुग्रहीत आला ॥ २७ ॥ मी मुळींचा चि विक्षेपपर । जालों विश्वरूप अहंकार । त्यास्तव श्री अनंतें साचार । धांवणी केली ॥ २८ ॥ नाना स्वइच्छेनें शरीरें । चतुर्विध खाणी विस्तारें । अवतरलों विश्वाकारें । अफाट सैरा ॥ २९ ॥ मज अनावरासी आवरिलें । मज असंगतासी सावरिलें । वोध देऊनि प्रतिपाळिलें । यथार्थ स्वरूपें ॥ ३० ॥ होउनी प्रज्ञेची वसुमती । निज साक्षात्कार सर्वगती । सुखें उन्मेष अंकुरती । अनंत सदयतेनें ॥ ३१ ॥ नाहीं अधिकार पाहिला । नाहीं सद्भाव इच्छिला । निजयोग प्रकाशिला । दर्शनमात्रें ॥ ३२ ॥ त्यास्तव सद्गुरु श्रीअनंत । होय प्रसन्नतेचा अभिजित । माझी सद्वृत्ती सदोदित । अनंत चि होय ॥ ३३ ॥ माझें स्वरूप होउनि स्वयें । अनंत प्रचीतीसी आला विस्मयें । अनंत प्रत्यगात्मा प्रमयें । अनंतार्थ ग्रंथ हा ॥ ३४ ॥ अनंत परेचें अधिष्ठान । अनंत परा उद्घाटण । अनंत परमार्थ अर्थज्ञान । कृपेनें अनुवादला ॥ ३५ ॥ जो वाचेसी बोलतां चि नये अर्थ । ते वाचा चि केली परमार्थ । ऐसा अनंत समर्थ । कृपाळू माझा ॥ ३६ ॥ जो श्रवणासी न येउनि शब्दार्थ । तो श्रवणें चि केला तत्वार्थ । ऐसा कृपाळू होय यथार्थ । अनंत सद्गुरु माझा ॥ ३७ ॥ जो अर्थ प्रज्ञेसी नये पाहतां । तो अर्थ प्रज्ञा केली तत्वता । ऐसीं अनंत

कृपेची सत्ता । मज प्रत्यक्ष होय ॥ ३८ ॥ अनंत कृपेचें महिमान । अनंत कृपेचें अनुसंधान । अनंत कृपा सनातन । अवधारिजे श्रोतां ॥ ३९ ॥ इति श्रीमद्बोधोपदेश । समर्थ कृपा निजध्यास । समर्थ कृपा निजतोष । म्हणे मेरु अनंत ॥ ४० ॥ द्वादश सूर्य अष्टम कळा संपूर्ण ॥ ८ ॥ श्रीराम ॥



श्री

## सूर्य १२ कळा ९

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम अनंत संगती । अनंत कृपाकृपण स्थिती । अनंत संबोधन प्रचीती । अनंतानंत स्वयें ॥ १ ॥ अनंत प्रबोध अभ्यंतर । हृदय प्रकाशक तेज दुर्धर । नुरे चि तेणें भवतिमिर । यथार्थतेनें पाहतां ॥ २ ॥ लोकाभिराम भवसंस्कारें । पदरज वटलें हृदय वरें । विकल्प अभाव अहंकारें । तिरस्कारिलें जाय ॥ ३ ॥ दिल्हें अक्षय सुख निश्चयेंसीं । जाय प्रवृत्तीरूढ सहवासी । अजित निश्चय तेजोराशी । संशय तमें प्रळय ॥ ४ ॥ अक्षीयमवनाची निजवस्ती । होय नासिवंत भवजीत मती । जनसंस्कार संगती । संशयाभिवृद्धी होय ॥ ५ ॥ सद्रूपतेचा निजउभारा । शोभला शाश्वततेचा उजगरा । तो विकल्प संकल्पें दुर्गतीधरा । संश्रीत होय ॥ ६ ॥ यास्तव विवेकी जन । सद्गुरुकृपेचे सज्जन । अखंड सत्समागमी निरंजन । दशा संरक्षिती ॥ ७ ॥ जर्‍ही अपरोक्षवेत्ता जाला ज्ञानी । तर्‍हीं जन संस्कारें दुखवे मनीं । क्षुधापन्न प्राणाचेनि । आत्मा आहळे ॥ ८ ॥ अन्नसंपर्के दोष जडे । दुर्जनसंपर्के निश्चय मोडे । त्रिगुणसंपर्के स्वसुख उडे । कांहीं येक तर्‍हीं ॥९॥ यास्तव सद्गुरुसी प्रार्थुनी । उदास स्थितीनें समाधानी । विक्षेपासी न येतां मनीं । उन्मन दशा भोगिजे ॥ १० ॥ महां स्वरूपदशा स्वानुभवें । येकांत वृत्तीच्या अंतर्भावें । कांहीं येक संस्कार जीवें । न धरी जैसा ॥ ११ ॥

मार्गी चालतां उष्ण निवृत्ती। अंबरें यरूनि सुखापुरती। न चालतां चि चालणें स्थिती। मन मानसपूजेनें ॥ १२ ॥ नाना उपायें निजसुख। राखावें स्वरूप सन्मुख। निर्वैरदशा उद्वेग। जग देखावें दृष्टीसी ॥ १३ ॥ येतां तीक्ष्ण नाराच्यमारा। बोढणें निवारिजे सैरा। तेवि अमाव्य अभ्यंतरा। लागों चि ने दिजे ॥ १४ ॥ महा पुरुषार्थाचे रणशूर। जाले जन्हीं विद्यार्तीनें थोर। तेहीं त्या अहंकृतीचा भार। मस्तकीं न घ्यावा ॥ १५ ॥ जया जय देता ईश्वर। जो विजयश्रियेचा भर्तार। अघटितघटणा कर्तार। लीला पहावी त्याची ॥ १६ ॥ सत्तेनें न करी त्यासी करवी। कर्तेपणाचा दंभ विरवी। अकर्तेपणाचा नुरवी। अभिमान कोठें ॥ १७ ॥ ईश्वर संकल्पें सर्वत्र। वर्ततसे जगचित्र। येथ दृश्यपणें चि विचित्र। कवतुक पहावें ॥ १८ ॥ जीव बुद्धीचा संस्कार। असतां अभ्यंतरीं साचार। साक्षी होउनी निर्विकार। असावें सहज ॥ १९ ॥ ईश्वरसत्ता बुद्धिप्रभवें। स्वभाव सिद्ध स्वानुभवें। जगदांतर सद्भावें। वसवावें शिवरूप ॥ २० ॥ आपुल्या देहीं स्वभाविक। चेष्टा होती अनेक। तयाचा विवेक अविवेक। कवण कर्ता ॥२१॥ आपणा वांचून दुसरें। कवण आहे जगदांतरें। कर्तव्य तितुकें सविस्तरें। निजसत्तात्मक ॥ २२ ॥ हें यथार्थ पाहतां विचारें। परंतु सद्भावभक्ति अभ्यंतरें। प्रसन्न दैवत साक्षात्कारें। सर्वदा सांभाळी ॥ २३ ॥ स्वयें चि जगदांतर ईश्वर। स्वयें चि जगदाद्य निर्विकार। स्वयें चि साक्षात्कारी अधिकार। जीवरूप स्वभावें ॥ २४ ॥ त्रिगुणात्मक कडोविकडी। इच्छानुरूप हे परवडी। अंतर्भावना घडमोडी। जग होत जातसे ॥ २५ ॥ त्यास्तव निजरूप निर्धार। राखावें स्वरूप प्राप्तीचें घर। सारूनि गुणातिशय थार। करावी सत्वगुणी ॥ २६ ॥ ममता देह प्रलोभांगना। नाना दुर्वृत्ति देहभावना। टाकून मतीचे संस्कार भजना। सर्वदा प्रवर्तावें ॥ २७ ॥ सद्गुरु कृपेचा निर्धार। करूनि प्रतिज्ञा बलोत्तर। स्वरूप अनुसंधानी च निरंतर। राखावें स्मरणासी ॥ २८ ॥ यदर्थी सद्भाव पाहिजे बरा। सद्भक्तीचा पुरावा करा। ऐसा आपणासी च जागरा। माजि वसवी जो ॥ २९ ॥ तेणें

सद्गुरुचें करावें स्मरण। तेणें संस्कार न लगती दारुण। जेवि वन्हिज्वाळामाजि गगन। करपोनी न जाय ॥ ३० ॥ दोष दर्शनें पाहतां संत। अभवें चि होती कल्पांत। परंतु सद्भावेंवीण निवांत। स्वरूपता नातुडे ॥ ३१ ॥ जे जे गुणाविळे, महां सिद्ध। अनुभवाचे अचळ प्रसिद्ध। तेथेंही पाहतां देह समंध। आढळें चि लागे ॥ ३२ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर। स्वरूपज्ञानी महाघोर। याच्या क्रिया पाहतां सविस्तर। दिसे दोष दर्शनें ॥ ३३ ॥ तैसे चि शुकादिक ऋषेश्वर। केवळ विरक्तिचे अवतार। परि परिक्षूनि पाहतां विकार। परीक्षावंतासी दिसती ॥ ३४ ॥ कामें चि संभवले शरीर। कामें चि वर्धलें सविकार। चेष्टा तितुक्या सविस्तर। कामरूप क्रिया ॥ ३५ ॥ मोक्षादि अपेक्षा काम। आत्माराम तो ही पूर्णकाम। कामक्षोभे अंतर्याम। विश्वरूप जालें ॥ ३६ ॥ यामाजि निष्कामता कैसी। दृष्टीदोष नाडळे मानसीं। पहावें त्या निज वस्तुसी। सर्वदेहीं ॥ ३७ ॥ सद्गुरु वचनीं धरिला भाव। तेथें न यावा तो अभाव। अभाव त्यागुनी अंतर्भाव। जीवीं धरिला ॥ ३८ ॥ कल्पांत जालिया निष्ठा न मोडे। ऐसिया निश्चयाचे नर निधडे। सत्क्रिया आचरोनी निवाडें। सद्भावें जग देखती ॥ ३९ ॥ पवित्रता कर्माचरण फुंज। नसे चि दुराग्रहाचें काज। संकल्पातीत ते सहज। देखती सर्वत्र आत्मा ॥ ४० ॥ या कारणें जीवें भावें। संसारापासुनी जरी सुटावें। ऐसें असेल तरी सद्भावें। जग पहावें ब्रह्मरूप ॥ ४१ ॥ काळें शोधितां शुद्धपणें। नाढळ चि कांहीं भ्रमें होणें। रजोगुण भावनेनें। विकार उठती ॥ ४२ ॥ सद्गुरु अथवा दैवत। भक्त सद्भावें जीवंत। असद्भावें निघोन जात। सत्तातेज तेथींचें ॥ ४३ ॥ मंत्र महावाक्य प्रतिमा। क्रियावंत संत साधु महिमा। असद्भावनेनें ते गरिमा। विकृतीसी आणी ॥ ४४ ॥ जैसें आपुलें अभ्यंतर। वसवितां स्वरूप निरंतर। स्वरूप दर्शनें चि साचार। समाधानासी ये ॥ ४५ ॥ तें चि असद्भावने करितां। ममता रूप क्षोभकता। दुस्तर स्वर्ग नर्कादि अवस्था। भोगी नाना दुःखें ॥ ४६ ॥ त्यासतव

पर निंदापर दोष । दृष्टीसी नाणी जो निर्दोष । तो चि सद्बिवेकाचा ईश । परमात्मा स्वयें ॥ ४७ ॥ परमात्मा दृष्टीनें देखे । परतत्व स्वरूपें वोळखे । परमानंद रस चि चाखे । पर स्वभावचर्या ॥ ४८ ॥ परगुण परमाणु पर्वत । मानून पर तोषवी चित्त । पर संभावना उचित । सर्वत्र आचरे ॥ ४९ ॥ मान खंडीना कवणाचा । सन्मानें रुढली वाचा । सद्भावें चि भजनाचा । व्यासंग वाढवी ॥ ५० ॥ सहज होउनी ब्रह्मार्पण । अहं स्फूर्तिविना आपण । करी सर्वदा संतर्पण । ब्रह्म प्रतिष्ठा जगीं ॥ ५१ ॥ आनंद सिंधूचा वोल्हावा । तो अभ्रांत सुखाचा सांठोवा । तो अविकार स्थितीचा ठेवा । अपूर्व जगीं ॥ ५२ ॥ तें चि पुढें निरोपण । स्वरूपतेचें समाधान । तुम्ही गुण ग्राहीक सज्जन । सहज अवधारा ॥ ५३ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । बोधें निवर्तविला संगदोष । निर्विशेष स्वयंभ प्रकाश । म्हणे मेरु अनंत ॥ ५४ ॥ द्वादश सूर्य नवम कळा संपूर्णमस्तु ॥ ९ ॥



श्री

## सूर्य १२ कळा १०

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीराम सत्क्रिया जयध्वज । प्रसिद्ध सद्वतीनें सतेज । करी उपासकांसी सहज । कृपेनें स्वरूप ॥ १ ॥ भक्तांच्या आचरतां क्रिया । भक्त अंतर्भावीं तया । होऊनी सद्रूपदया । आपणचि वर्ते ॥ २ ॥ भक्तीं निवेदिलें सकळ । अंगिकारी भक्त वत्सल । कां जें अंतर्भावें अविकळ । भक्तीं आराधिला ॥ ३ ॥ जो श्रुति शास्त्रांसी नातुडे । तो भक्त हृदयीं सांपडे । स्वभाविक भक्तांकडे । वोढें सर्वस्वेंसी ॥ ४ ॥ भक्त आंखिला ठाईं पडे । भक्त प्रसिद्धीनें स्वयें पवाडे । भक्तावांचुनी नावडे । कांहींच तयासी ॥ ५ ॥ भक्त भावाचा भुकेला । भक्त अंतर्भावें तोषला । भक्त जीवें भावें पोसला । महासुरवाडें ॥ ६ ॥ हा देव भक्त अंतर्भाव । जाणे आत्मा देवाधिदेव । सद्गुरु कृपेचा नवलाव ।

देव भक्त प्रशंसा ॥ ७ ॥ देवासी प्रतिष्ठुनि अभ्यंतरीं । भक्तांसी बोध उपक्रम करी । ऐसा अभिनव चमत्कारी । रूपक होय सद्गुरु ॥ ८ ॥ नाना वृक्षादिक जिनस । अभिवृद्धीसी येती दिवसें दिवस । परि वसंतेविण तयास । फलप्राप्ति नसे ॥ ९ ॥ शब्दादि पंच विषय । मुर्ळीचे चि पाहतां ते अन्वयें । परंतु देहेवीण महाविस्मयें । रूप नोहे तयाचें ॥ १० ॥ नाना बीजांच्या परवडी । त्यांची त्याची भिन्न भिन्न गोडी । परंतु अंकुरल्या वीण मोठी । फलप्राप्तीसी न ये ॥ ११ ॥ अंतःकरणातें नाना इंद्रियें । स्थानाधिपत्येंवीण विस्मयें । नाना फळात्मक तत्कार्य । रूपासी न येती ॥ १२ ॥ उदर पूर्तीसी नाना अन्नें । तृप्तीसी येती प्रत्यक्ष भोजनें । ऐसी सद्गुरु कृपा विद्यमानें । मेळवी देव भक्ता ॥ १३ ॥ देवपणें देव आपुले ठायीं । भक्तपणें भक्त निज हृदयीं । त्या देवभक्तासी पाहीं । भेटवी सद्गुरु ॥ १४ ॥ देव निर्धूत निर्विकार । कांहीं च न साहे तया संस्कार । ते चि भक्त भावनेचा विचार । सरता करी सद्गुरु ॥ १५ ॥ देव संपूर्णपणें सदोदय । देवें चि प्रतिष्टिलें भक्त हृदय । भक्तांसी उमजउनी प्रत्यय । देव चि करि सद्गुरु ॥ १६ ॥ भक्त विभक्तपणें दुन्हावला । अनुतापें अत्यंत तापला । देव जवळी असोनी जाला । विक्षेप रूप अंतरीं ॥ १७ ॥ जननी चुकलियां बाळक । वियोगें तळमळी व्यामोहक । तियेचे भेटीसव तें अनेक । प्रवृत्ति धुंडाळी ॥ १८ ॥ तिये जननीसी भेटविती जे कोणी । ते मानावी जननीची जननी । तैसें सद्गुरुनें वचनीं । भेटविलें देव भक्तां ॥ १९ ॥ आत्मशास्त्र सद्गुरु प्रचीती । भक्त अंतर्भाव महास्थिती । देव निरंजन आथंतीं । भक्त चि जाला ॥ २० ॥ हें कृपाळूपणाचें कर्तव्य । महा साक्षात्कारी हृदय । निज सामर्थ्य सत्ता अदय । सद्गुरु कृपेचें ॥ २१ ॥ आपुलें स्वरूप देउनी स्वयें । कृतार्थ केलें निजप्रत्ययें । परात्पर वस्तु निरामय । सर्वगतता दिली ॥ २२ ॥ निजसायोज्य समरसीं । साम्य रस्य केलें तोष विशेषीं । अक्षयानंद सिंधूसी । मज्जविलें सुखें ॥ २३ ॥ चित्त चैतन्य चमत्कारी । सुखाब्धि कल्लोळ हारी । उल्लेखानुभव वरिवरी ।

चालिले प्रलय ॥ २४ ॥ देवभक्त सायोज्य सुख । अनुभवासी जाले
सन्मुख । अनुभव गुरुकृपा हरिख । होती उल्लेख माळिका ॥ २५ ॥
एवं सद्गुरु कृपेचें महिमान । देवभक्त समसमान । परब्रह्म स्वरूपें पूर्ण ।
निज ऐक्यासी आलें ॥ २६ ॥ त्या सद्गुरुची कृपा अभिवृद्धि । अनुभव
सिद्धसमाधी । ब्रह्मीं प्रतिष्ठली निजबुद्धि । बोध त्रिपुटीविना ॥ २७ ॥
सद्गुरु हृदय प्रतिष्ठा ब्रह्म । आतां सहज चि मी निष्कर्म । मीपणें वांण
निजवर्म । सुखें चि अनुभवी ॥ २८ ॥ मी येक अनुभविता ऐसें । हे ही
मज प्रमाण नसे । उरले पणे वीण विलासें । स्वानंदघनसुखें ॥ २९ ॥
नित्यमुक्त दशेचा शेवट । आत्मतीर्थ विधान अवचट । यात्रा संपूर्णतेचा
उत्कट । तोष अभ्यंतरासी आला ॥ ३० ॥ जन्म सार्थकतेचा दिवस ।
सर्वकर्तव्यतेचा कळस । तत्वाची शृंखळा मुक्ततेस । आली सहजे ॥३१॥
सहज साधनाची सिद्धि । निज अवसानदशेची उपलब्धी । स्वरूप समावेष
अवधि । प्रमाणासि आली ॥ ३२ ॥ निजसंस्कार अनादि संग । ममतेचा
बोळावा अंतरंग । करूनि बोळवणी निःसंग । सामावला सरिसा ॥ ३३ ॥
हे अक्षीय सुखाची बोळवण । गौरविलें आपणासी आपण । निजोत्सवसुख
वितरण । महदानंद वेव्हा ॥३४॥ अनादिविपत्तीचें आयुष्य निदान । अकल्प
कोटि आयुष्यप्रमाण । उभय साक्षत्व संधी विहीन । आलों स्वरूपतेसी ॥३५॥
निज उपक्रम संव्हार । निज विवेक निज निर्धार । निज बोध निज
उधार । आणिला अवासीसी ॥ ३६ ॥ निज अवाहन विसर्जन । निज
संस्कारे वीण अविष्करण । निज संभावना निष्कारण । सहजासी आणिलें
॥ ३७ ॥ प्रवृत्ति निवृत्ति निर्शन । जालें स्वरूप संवर्धन । निज अंतर्भाव
आकर्षण । चैतन्य अवस्तंभ हा ॥ ३८ ॥ त्रिपुटी कार्याची कांहीं नुरे ।
ऐसा स्वभाव सुखें वोसरे । आतां हेतुवीण साक्षात्कारे । सिद्धचि असे
संचला ॥ ३९ ॥ हा उगाणिला निजानुभाव । उपेगासी आणी अंतर्भाव ।
विसांवला जीवीचा जीव । स्वरूप साक्षात्कारें ॥ ४० ॥ आतां उल्लेखेवीण
अक्षरें । चित्रकारेंवीण मनोहरें । चित्रिलीं चित्रें सुंदरें । दृष्टीवीण पहा
॥ ४१ ॥ प्रतिष्ठेचे जगीं धर्म कर्ते । ते सत्कीर्तिश्रियेचे भर्ते । त्यांची

चरित्रें ऐकतां प्रवर्ते । जग धर्म क्रियेसी ॥ ४२ ॥ तैसें अवधारा ग्रंथोक्त गुज । स्वरूपीं सामावलें निज तेज । कांहीं एक दशेचा उमज । उल्लेख सरला ॥ ४३ ॥ देव प्रतिष्ठा नाना नगरें । ब्रह्म प्रतिष्ठ महां अग्नारें । शिव प्रतिष्ठा शिवालयें गोपुरें । निर्मिलीं पुण्यश्लोकांनीं ॥ ४४ ॥ ब्रह्मादिकांची अनुष्ठान स्थळें । अद्यापि चमत्कार ज्या योगानुमेळें । फिरतां सृष्टींत लाभकाळें दृष्टीसी पडती ॥ ४५ ॥ महा तपश्चर्या प्रतिष्ठान । नद्या पर्वत महा उद्यानें । महा तीर्थे अवघड स्थानें । साक्षेपें पहावीं ॥ ४६ ॥ अस्ता समीप दूरि दिशेसी । नाना सायासीं सुख विशेषीं । जाऊनि पाहतां दृष्टीसी । समाधान वाटे ॥ ४७ ॥ देखिलें चि देखावें निज दैवत । पाहिलें चि पहावें अत्यद्भुत । ध्याइलें चि ध्यावें निजव्रत । स्वरूप सद्गुरूचें ॥ ४८ ॥ तैसें निजस्वरूप । अवधानें होउनी संन्मुख । ग्रंथांतर दृष्टीनें उल्लेख । लेख हृदयासी आणावें ॥ ४९ ॥ इति श्रीमद्बीमोपदेश । निर्वाण दशेचा तोष विशेष । वर्तमानासी आलें भविष्य । म्हणे मेरु अनंत ॥ ५० ॥ द्वादश सूर्य दशम कळा संपूर्ण ॥ १० ॥ ॥ श्रीकृष्ण ॥ श्रीकृष्ण ॥



श्री

## सूर्य १२ कळा ११

॥ श्रीरामसमर्थ ॥

श्रीराम देवनयाचीं चरित्रें । जगदांतर स्वदोंने विचित्रें । पुण्यश्लोक आचरणें पवित्रें । श्रोत्रद्वयासी आणिलें ॥ १ ॥ महाऋषिप्रोक्त ग्रंथ महिमे । अनुभवाचे समुद्र अनुक्रमें । ग्रंथ अवधारितां आक्रमें । स्वरूप सर्वगत ॥ २ ॥ ऐकावें तें हृदयीं धरूनि । स्वयें चि आचरावें ग्रंथ होउनी । सिद्ध ग्रंथ प्रोक्त वचनीं । महा विश्रांति असे ॥ ३ ॥ महा सुकृताच्या कोटी सुटें । ग्रंथी वसती अर्थ उल्लेखें । विधासें ऐकतां निज हरिखें । हृदय सुखें उतटे ॥ ४ ॥ महानुभाव ग्रंथ गरिमा । श्रवणें स्वरूप करी

महिमा । हा देवतार्चन क्रम संयमा । नित्यावृत्तीचा ॥ ५ ॥ ब्राह्मणासी जैं नित्य नूतन । आचरावें लागे संध्यास्नान । कीं भगवद्भक्तांसी भजन । प्रीतीनें करावें लागे ॥ ६ ॥ तैसे परी नित्यानुक्रमें । ग्रंथ अभ्यंतर पहावें नेमें । सद्भाविकें येयें सप्रेमें । श्रवणीं प्रीति धरावी ॥ ७ ॥ ग्रंथवाचें निज अभ्यंतर । ग्रंथीं ऐकावें निज जिव्हार । ग्रंथमननें अक्षरें अक्षर । प्रचीतीसी आणावें ॥ ८ ॥ ग्रंथांतर स्वरूप स्वयें । वचनें वचन अनुभव प्रमयें । महा विश्वासें अर्थ विस्मयें । अर्थ संपन्न व्हावें ॥ ९ ॥ ग्रंथवचन मुक्तमाळा । अखंड घालावी प्रलयें गळां । श्रवणीं नित्य मुक्त तेज लीळा । भूषण भोगावें ॥ १० ॥ भीम प्रस्थान ग्रंथ महा सिद्धी । श्रवण होती सर्व उपलब्धी । ग्रंथ वक्ता भीम कृत बुद्धि । प्रतिज्ञेनें पहा ॥ ११ ॥ जीवीं भावना धरूनि मावें । ग्रंथ श्रवणें कार्य सिद्धीसी यावें । हे भीम अभय स्वभावें । घ्यावे परिक्षूनि तुम्ही ॥ १२ ॥ आकाश संधीं वायुसंधान । वाचा संधी जिव्हा अनुसंधान । हें अंतर्भावना विधान । अवधानें पहा ॥ १३ ॥ प्रत्यक्षतेचा निज उजगरा । जैसा अमोलिक तेजें हिरा । चिंतितार्थ पुरविता वरा । फावे चिंतामणी जैसा ॥ १४ ॥ कीं प्रसन्नता निज दैवत । आर्जवितां प्रसन्न होत । तैसें चि परी श्रवणीं देत । ग्रंथ महा सिद्धीतें ॥ १५ ॥ सकळ देवांचें अधिष्ठान । सद्गुरु रूपें विद्यमान । बोळले प्रसन्नतेनें संपूर्ण । फावलें सर्वदा ॥ १६ ॥ नित्योपजीविका ज्या जैसी । नित्यार्जवें फावे सिद्धीसी । तैसी च हे सिद्धि सुखेंसीं । बोळे सर्वदा ॥ १७ ॥ आतां निज प्रणवाचें अभ्यंतर । करूं शब्देंविना निज उच्चार । वैखरीसी न येतां अक्षर । निवेदूं परात्परीं ॥ १८ ॥ श्रवणासी न येतां शब्द । अवकाश भेदुनी निशब्द । निरावकाशीं स्वतःसिद्ध । करूं ग्रंथ सर्वदा ॥ १९ ॥ उल्लेखासी न येतां अर्थ विवर । प्रचीतीचें स्वरूप अभ्यंतर । अर्थ प्रचीतीनें निरंतर । नित्य विवरों सुखें ॥ २० ॥ मनासी न येतां निज मन । करूं स्वरूपें निजध्यासन । ब्रह्मसाक्षात्कार संपूर्ण । होऊं सर्वदा सुखें ॥ २१ ॥ सुमनासीं न येतां परिमळ । घेऊं स्वरूपें चि घो अकळ । कीं रसना पदार्थेंवीण केवळ ।

अखंडैक रस सेऊं ॥ २२ ॥ रूप दृष्टीविण पाहूं निर्मळ । चरणेंविण चालों धरा निश्चळ । क्रियेवीण आचरों प्रांजळ । अक्रिय पूजा ॥ २३ ॥ धृतीविण धरूं धारणा । जाऊं जगत्कारणाच्या कारणा । यापरी सद्गुरूच्या चरणा । सेऊं निरंतर ॥ २४ ॥ सद्गुरु नामामृतपानें । राहों सर्वदा नित्यतृप्तीनें । सद्गुरुस्वरूप ध्यानें । ध्याऊं निरंतर ॥ २५ ॥ सद्गुरू अरूपाचें रूप । सद्गुरुप्रचीतीचें स्वरूप । सद्गुरु स्मरणें महा तप । सिद्धी वोळगती ॥ २६ ॥ सद्गुरु सद्व्रतीचें जीवन । सद्गुरु सत्कीर्तीचें भुवन । सद्गुरुपद तीर्थें पावन । ध्यान्हीं पुरुषार्थ लाभती ॥ २७ ॥ सद्व्रतीचें निज आराधित । नाहीं सद्गुरुविना अन्य दैवत । प्रसन्नतेचा कल्पतरु श्री अनंत । कृपेनें मज वोळला ॥ २८ ॥ पुढती पुढती महा प्रीतीनें । अनंत आठवीन वोधवचनें । अनंत अर्थवीन प्रचीतीनें । अनंत अर्थरूप ॥ २९ ॥ जें जें प्रबोधासी आलें । तें तें प्रचीतीनें रूढलें । नानाशब्दार्थ विवरें जालें । समर्पण सद्गुरूसी ॥ ३० ॥ अक्षयरूप ग्रंथसंतान । अनेकप्रती प्रीती करून । श्रवणार्थें निवेदन । श्री अनंतासी माझ्या ॥ ३१ ॥ सप्रेमें ग्रंथानुलेखन । अनंत निजदृष्टीसी देखोन । हृदयीं साठवितां हर्षोन । पावे माझ्या अनंतासी ॥ ३२ ॥ ग्रंथसंग्रह करितां विश्वासें । तेथें निश्चयेंसीं अनंत वसे । ग्रंथश्रवण प्रीतीनें उल्हासे । माझा अनंत सद्गुरु ॥ ३३ ॥ आतां निजमौन्य होय बोलिकें । निःशब्देसी शब्द तुके । ऐसें अनंत कृपा कौतुकें । चालिले अनुसंधान ॥ ३४ ॥ परा पश्यंति मध्यमा । सुखाची मूस धरूनि उत्तमा । केवळ ब्रह्मरूप महिमा । वैखरीसी आणिली ॥ ३५ ॥ पापाणीं दैवत प्रतिष्ठिलें । तें प्रसन्नतेच्या आंगा आलें । मग तया क्षेत्राचें काय उरलें । पापाणपण ॥ ३६ ॥ तैसें वैखरीचें महिमान । सद्गुरू कृपेचें वरदान । स्वरूपार्थ दानें संपन्न । केलें सर्व प्रकारें ॥ ३७ ॥ हे प्रसन्नतेची उदारता । जगीं उपमा चि नसे पाहतां । आतां निरोपमाची तया पाहतां । निवों सुखें सर्वदा ॥ ३८ ॥ निजानंदघन पदवी । सद्गुरु कृपा दत्त अनुभवी । अनंत ग्रंथ वक्ता कवी । पहा अनंतार्थें ॥ ३९ ॥ सर्वगती केलें उपेणें । स्वरूप होउनी स्वरूपाचें लेणें । लेउनी निजभूषणें

तेणें । भूषणाढ्य जालों ॥ ४० ॥ नित्यामृताची नित्य तृप्ती । दिवा रात्रीविण आचंतीं । सदोदित सेजेसी विश्रांती । केली सर्वदा ॥ ४१ ॥ स्वभाविक सर्व सत्तेनें । वर्तत आहे स्वभाव क्रमानें । तया ईश्वरेंविण करणें । वर्तविलें हें जाय ॥ ४२ ॥ सर्वोपनिषद ग्रंथगर्भ । आतां स्वयंभाचा स्वयंभ । उभविला ग्रंथ जयस्तंभ । द्वैताद्वैत ज्याचें ॥ ४३ ॥ द्वैत उपशम सहजें । अद्वैतीं केलें बीजें । महा अद्वैत सुखभोजें । स्वराज्य अनुभऊं ॥ ४४ ॥ परम साक्षात्कारी विद्या । अर्पितां हृदयासी आद्या । ग्रंथस्वरूप तत्त्ववेद्या । आतां नमन करूं ॥ ४५ ॥ अखंडित सद्गुरुसेवा । देवार्चन जैसे सद्भाव जीवा । सद्गुरु आर्जव अर्घ ठेवा । परमार्थ प्रचीती ॥ ४६ ॥ निज प्रचीतीचें सूर्यमंडळ । हृदयाकाशीं जालें अकळ । दिवसरात्रि विना निर्मळ । पाहलें पाहा ॥ ४७ ॥ हे अक्षर ब्रह्म भरणी । चित्सूर्य वंश विभु करणी । अखंडीत आणितां श्रवणी । तेचि पदवी लाभे ॥ ४८ ॥ आत्माराम रवि वंशज । साक्षात्कारी सूर्य सतेज । कृपेचा प्रकाशें उमज । देईल निज अभ्यंतरीं ॥ ४९ ॥ आर्जऊनी श्रीराम समर्थ । दिधला परंपरेसी परमार्थ । तो श्रीराम स्वरूप सर्वार्थे । प्रचीतीनें जगवावा ॥ ५० ॥ जगदात्मा जग जीवन । जगद्रूप विश्रांति घन । उपासना हे आर्जऊन । सदृढ धरावी ॥ ५१ ॥ उपासनेसी पडतां दुरी । होय इहपर प्राप्तीची बोहरी । समर्थ अभ्यंतर ग्रंथांतरीं । आज्ञारूप जाणिजे ॥ ५२ ॥ सकळ केलियाचें सफळ । उपासनेसी आर्जवा अविकळ । हा बीजमंत्र केवळ । जाणिजे समर्थ आज्ञेचा ॥ ५३ ॥ समर्थ वळभीम स्वयें । समर्थ आत्माराम निश्चयें । समर्थ परब्रह्म प्रत्ययें । उपासना स्वरूप ॥ ५४ ॥ समर्थ रामप्रचीती । अनुभव अनंत स्थिती । भीमोपदेश आद्यंतीं । प्रगट उपासना ॥ ५५ ॥ इति श्रीमद्भीमोपदेश । ग्रंथार्थे अयोध्याधीश । परब्रह्मस्वरूपीं चित्प्रकाश । म्हणे गेह अनंत ॥ ५६ ॥ द्वादश सूर्य येकादश कळा संपूर्ण ॥ ११ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीरामसमर्थ ॥

श्री

# सूर्य १२ कळा १२

॥ श्रीरामचंद्राय नमः ॥

श्रीरामद्वत ग्रंथ अनंत । विशुद्ध तत्वाचें तेज मथित । प्रकाशलें सत्व सदोदित । निःसंगतेनें ॥ १ ॥ निर्मळ गगनीं स्वभावें । अर्थे आलीं होतीं प्रभवें । वितळोनि गेलीं अंतर्भावें । उरलें निरोपाधि ॥ २ ॥ उभारा राहजावरी संपूर्ण । तो संकल्पेसी गेला सरोन । सद्भाव प्रचीतीनें उत्तीर्ण । होउनि गेला ॥ ३ ॥ सहज विश्रामास उडाला । साक्षात्कार ब्रह्मीं दडाला । अनुभवसिंधूत बुडाला । अनुभवसिंधु ॥ ४ ॥ अक्षय स्वानंदाच्या सुखें । उगवे सर्वगत उल्लेखें । त्रिपुटीतीत निज हरिखें । सीमा टाकिली सहज ॥ ५ ॥ अप्रांतेसीं निज प्रांत ये । येकांततेसी येकांत स्वयें । आत्मप्रचीतीनें हृदय । मोकळें जालें ॥ ६ ॥ निजप्रचीतीपांग फिटला । उगऊन स्वभावतंतु तुटला । निजस्वरूपतेचा सुटला । ब्रह्मास्मि अनुभव ॥ ७ ॥ फुटला कमंडलु अत्यद्भुत । तुटला दंड निज आविर्भूत । नटला ईश्वर अवधूत । परमहंसदर्शनें ॥ ८ ॥ नाहीं परिभ्रमण निवास । नाहीं प्रणवाचा जपाभ्यास । नाहीं कांहीं विश्रांति उमस । नसे चि विक्षेपता ॥ ९ ॥ अवस्थेचे पल्लव सुटले । अवस्थातीत भाव विनटले । अनुभवाचे थारे तुटले । सहज वस्तूनें ॥ १० ॥ आस्तिक्य निजांगलाभें । स्वरूपप्रचीती दुभे । ते हें अनुभउनी बाळभें । जीर्णतेसी आली ॥ ११ ॥ शून्य रेखेसी आणिलें । चहूं शून्यासी घेउनी गेलें । रेखा होउनी निवर्तलें । पूर्ण परब्रह्मीं ॥ १२ ॥ मात्रुकाचें ठाव पुसिलें । ते प्रचीतीचे ठेवे प्रकाशले । प्रमेयाविण पाहिले । ते चि पाहवे आधीं ॥ १३ ॥ द्रष्ट्यासी न पाहतां दृष्टी । पाहणें चि जागली पाठीं । तेणें न पाहणें परिपाटी । न पडतां सुख ॥ १४ ॥ विसरा विसरोनी

आठव । स्वरूपतेचा नाठव । आठवनाठवाचा ठाव । अवचट पुसला ॥ १५ ॥ जेथें प्रमाणें सरलीं । तेथें प्रचिती अवतरली । तये स्वसुखीची पुरली । भडस सुखें ॥ १६ ॥ सत्य संकल्पेविण सहज । आलें मनोरथ सिद्धीसी गुज । उमज नुमजेंवीण सुख भोज । पर्याप्तीसी आलें ॥ १७ ॥ स्वभाव साक्षपेंवीण काज । सिद्धी पावलें सबीज । ते मंत्र प्रसन्नतेचें गुज । निवेदन जालें ॥ १८ ॥ संकल्पसूर्य आस्तवला । विकल्पचंद्र कैंचा तयाला । घेतां निरावकाशें जाला । समान योग ॥ १९ ॥ स्वरूपें घेतला स्वभाव । आतां उरलेपणें नवलाव । वाट चोरूनि अनुभव । चालिला कैंचा नेणों ॥ २० ॥ विवेक पांगुळ जाला जेथें । न हालतां पावलों तेथें । श्रीसद्गुरु अनंत समर्थें । कृपा केली अभिनव ॥ २१ ॥ विदेहतत्व चावळला । त्या आकृत कवचें निवळला । तो ब्रह्मावबोध आकळला । पावला परत्रीं ॥ २२ ॥ अप्राण सत्वें चेष्टला । सद्भाव स्वरूपें वेष्टला । ज्ञापि अंतर्भाव अर्थाष्टला । पावला स्वरूपीं ॥ २३ ॥ निर्गुण प्रचीतीनें उन्मन । लाधलें स्वानुभवें निर्मन । असंग प्रचीतीनें सुमन । समर्पिलें स्वरूपीं ॥ २४ ॥ असंग निजांग संगीं । अनुभऊनि अंग प्रलंगीं । केवळ अनुभव प्रसंगीं । निवेदिलें अंतरंग ॥ २५ ॥ नसे चि कांहीं संकल्पसंग । सो प्रचीती उन्मेश भंग । केला अक्षयार्थें अभंग । आला सहजासी ॥ २६ ॥ अविनाश नित्य आस्तित्वयता । प्रचीतीसी आणिजे कवणें आतां । त्यास्तव अनुभवें श्री अनंता । अभिवंदिलें सुखें ॥ २७ ॥ ऐसें निर्वाळलें निज हृदय । तें अनुवादलें नव जाय । आतां कवणाप्रति बोलावें काय । ये आस्तित्व स्थितीनें ॥ २८ ॥ मोक्षश्रियेचा माया उजळ । बोध तनुज सुखें प्रबळ । जाला स्वराज्यें अढळ । मिरासी तेयींचा ॥ २९ ॥ परम पुरुषार्थें उत्तीर्ण । जालें पुत्रत्वें परिपूर्ण । अर्थरूपें होउनी सुवर्ण । पितरीं विनयोगला ॥ ३० ॥ जीवन्मुक्त उत्तीर्णवचनें । नित्यमुक्ततेच्या अनुभवानें ।

आत्मक्रिया करूनि गतीनें । परत्रीं मिळाला ॥ ३१ ॥ आत्म पिता पुत्र पावन । जालें समर्पणाचें विधान । सहज आस्तिक्यता निधान । उरलें सहज ॥ ३२ ॥ धनासी धन अनुभवी । ऐसी देउनी निजपदवी । बसला निवांत गोसावी । आपुले ठायीं ॥ ३३ ॥ नसे चि बोध ना बोधविता । बोधिजे कवणें कवणासी आतां । या ग्रंथमाळेनें मागुता । मेरु अनंतासी पावे ॥ ३४ ॥ तत्वस्मरण माळिका हातीं । ग्रंथ परिपूर्ण स्थिती । येकरों चवेताळीस आवृत्ती । अनंतहस्तीं आला ॥ ३५ ॥ निज आनंद क्रीडा विशेषीं । श्री अनंतें हातीं धरिलें जयासी । मग काय उणें असेल तयासी । पद्य पद्य बरें ॥ ३६ ॥ महा समर्थाचे पाठीं वैसतां । सहज चि आली योग्यता । नातरी नृपाचे उदरा येतां । नृपाळता सहज चि ॥ ३७ ॥ तैसें श्री सद्गुरुअनंतें अनुग्रहिलें । आपुलें चि स्वरूप केलें । तेथें काय बोलिजेल बोलें । औदार्यपदवी ॥ ३८ ॥ आतां अनुवाद तितुका अनंत । अनुभव तितुका निवांत । प्रबोध तितुका संत । स्वभाव स्थितीनें ॥ ३९ ॥ सद्गुरुसंत उपासना । निजप्रसन्नतेची भावना । साक्षात्कार मती सुलीना । जाल्या सद्गुरुपदीं ॥ ४० ॥ महा युक्तीचे कळस चढले । तया अग्रावरी पहुडले । स्वानुभविक बहुडले । ते चि होउनियां ॥ ४१ ॥ ऐसें स्वभाविक शाश्वत । मदीय प्रचीती हृद्गत । ग्रंथस्वरूपें श्री अनंत । निज दृष्टीसी आला ॥ ४२ ॥ अनंत स्वरूपतेनें लीळा । निवाळी निजदृष्टी चित्कळा । लागला विश्रांतीचा डोळा । आतां उगळे च असा ॥ ४३ ॥ पुरते निद्रेसी ठाव । होय तेंवरी माझा स्वभाव । प्रार्थना मानुनी स्वभाव । निःशब्द असावें ॥ ४४ ॥ आतां गजवजूं नका आस्तिक्यतेनें । सांचल येईल निद्रेसी तेणें । अनादिसिद्ध जागृतीनें । फार द्वारंवळलें ॥ ४५ ॥ श्री अनंत कृपेच्या पर्यंकीं । निशब्द सहजें अवलोकीं । निदारला नयन येकायेकीं । झांपडी पटिली

॥४६॥ इति श्रीमद्भीमोपदेश। नसे जागृति निद्रा तमस। परब्रह्म समावेश। ह्मणे मेरु अनंत ॥४७॥ श्रीमद्भीमोपदेश ग्रंथ संपूर्णमस्तु॥श्रीरामचंद्रार्पणमस्तु॥

शार्वरीनामसंवत्सर फाल्गुन शुद्ध द्वितीया शनिवारीं श्रीसद्गुरु गोविंदबाळस्वामीचे कृपें ग्रंथलेखन संपूर्ण जाहलें ॥ ७ ॥

श्लोकः ॥ यदक्षरं पदभ्रष्टं मात्राहीनं तथैवच ।
तत्सर्वं क्षम्यतां देव नारायण नमोस्तुते ॥

पाठि कटी कंधर दुखे । ताठे दृष्टि आणि मुख ।
ऐसे कष्टें लिहिलें पुस्तक । सांभाळीं निकें याल्लागी ॥

श्लोकः ॥ तैलाद्रक्ष जलाद्रक्ष रक्ष शिथिल बंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यं एवं वदति पुस्तकं ॥ श्रीराम ॥

